# मराठी रियासत

## उत्तरविभाग—१

### सवाई माधवरावाचा पूर्वायुःक्रम

[ सन १७७४ ते १७८३ ]




लेखक

गोविंद सखाराम सरदेसाई, बी. ए.



प्रकाशक

गणेश महादेव आणि कंपनी, पुणें शहर

किंमत साडेतीन रुपये

# गो. स. सरदेसाई यांचीं पुस्तकें

| | | |
|---|---|---|
| १ | मुसलमानी रियासत भा. १ ला (१०००–१५२६) | रु.३-०-० |
| | ,, ,, ,, २ रा (१५२६–१८०३) | रु.३-८-० |
| २ | मराठी ,, पूर्वविभाग (आवृत्ति खलास) | रु.३-८-० |
| ३ | ,, ,, मध्यविभाग १ (१७०७–४०) पहिले दोन पेशवे | रु. ३-०-० |
| ४ | ,, ,, मध्यविभाग २ (१७४०–६१) पे. नानासाहेब | रु. ३-०-० |
| ५ | ,, ,, मध्यविभाग ३ (१७५०–६१) (आवृत्ति खलास) पानिपत प्रकरण | रु. २-४-० |
| ६ | ,, ,, मध्यविभाग ४ (१७६२–७४) पे. माधवराव | रु. ३-०-० |
| ७ | ,, रियासत उत्तरविभाग १ (१७७४–१७८३) | रु.३-८-० |
| ८ | ,, ,, उत्तरविभाग २ (१७८४–१७९५) | रु. ३-८-० |
| ९ | ब्रिटिश ,, पूर्वार्ध | रु. ३-८-० |
| १० | शालोपयोगी भारतवर्ष | रु. १-०-० |
| ११ | बालोपयोगी महाराष्ट्राचा इतिहास, नवीन आ. | रु. ०-४-० |
| १२ | महाराष्ट्राच्या ३० सोप्या गोष्टी | रु. ०-६-० |
| १३ | इंग्लिश भाषेची गृहशिक्षा | रु. ०-८-० |

गणेश महादेव आणि कंपनी,

६०८ सदाशिव पेठ, पुणें शहर.

# प्रस्तावना



१. **साहित्याचा प्रचंड विस्तार.**—स.१९२५ सालांत मराठी रियासतीचा वृत्तान्त सवाई माधवरावाचे जन्मापर्यंत पुरा करून वाचकांचे हातीं दिला. तेव्हां त्या पुढच्या या दुर्दैवी पेशव्याचा भागही वर्ष सहा महिन्यांत पुरा करीन अशी उमेद होती, त्यास आज चार वर्षें लागलीं हें पाहून माझें मलाच आश्चर्य वाटतें. या चार वर्षांत पाटणा विश्वविद्यालयांतील व्याख्यानें व मुंबई येथील शिवछत्रपतीचा त्रिशतसांवत्सरिक उत्सव ह्या दोन कामांत गेलेले सात आठ महिने वजा घातले तर बाकीचा सर्व वेळ मी निष्ठुर मनानें केवळ या रियासतीच्याच उद्योगाकडे लाविला आहे. पूर्वीचा उद्योग बडोद्यांतील नोकरी सांभाळून मला करावा लागे, तसा लकडा आतां पाठीवर नसून कामशेत सारख्या निवांत स्थळीं आपला सारा वेळ याच कामास लावण्याची मला हल्लीं सोय आहे. असें असतां या कामास इतका वेळ कां लागला व त्याचें स्वरूप किती किचकट आहे याची जाणीव प्रथम वाचकांस करून देणें जरूर आहे.

पूर्व मराठशाहीच्या अभ्यासावरून उत्तर मराठशाहीकडे जसजसें येऊं लागावें, तसतसें आजच्या काळाकडे न कळत येऊन पोंचल्याचा मनास भास होऊं लागतो. पूर्व भागांत कृति फार व बोलणें थोडें, तर उत्तरभागांत कृतीपेक्षां बोलणेंच फार असा प्रत्यय येतो. शिवकालीन भागांत राष्ट्रीय धडपड प्रामुख्यानें आढळते, तर उत्तर मराठशाहींत व्यक्तिविद्वेषांस ऊत आलेला दिसतो. विशेषतः थोरल्या माधवरावाच्या मृत्यूनंतर एकंदर घडामोडींचा ओघ अत्यंत त्वरेनें पालटत जातो. उच्च राजकारण बाजूस राहून, उखाळ्या पाखाळ्यांची रेलचेल मनांत उद्वेग मात्र उत्पन्न करते. नाना आणि महादजी, हेस्टिंग्स आणि फ्रान्सिस, गोविंदराव काळे आणि निजामअली, तुकोजी आणि अहल्याबाई असे अनेक खंदे वीर शाब्दिक रंगभूमीवर वर्षानुवर्ष कुस्ती खेळत असलेले पाहून, त्यांत जिंकला कोण व हरला कोण हें ठरविणें मुष्किलीचें होतें. त्यांतच देशभर संचारणाऱ्या हेरांच्या बातम्या, निर-

निराळ्या पक्षांचीं व व्यक्तींचीं कारस्थानें, शत्रुमित्रांचे गैरसमज व डावपेंच, अनेकांचे मतलबी व फितुरी प्रयत्न, कामगिरीवर गेलेल्या फौजांच्या तक्रारी व भांडाभांडया, मुख्य काम बाजूस ठेवून लहान मोठ्यांनीं चालविलेल्या नसत्या उठाठेवी, इत्यादींचा असा कांहीं प्रचंड विस्तार या वेळच्या कागदांत व्यक्त होतो, कीं आजच्या क्षणीं सभोंवार चाललेल्या अधोगतीस आपण त्या वेळींच येऊन पोंचलों होतों अशी भावना होऊं लागते. म्हणजे मराठी राज्य बुडाल्या नंतरच्या एक शतकांतील कटु अनुभवानें सुद्धां आपण कांहींएक नवीन शिकलों नाहीं किंवा पूर्वींपैकीं कांहींएक विसरलोंही नाहीं, अशी खात्री पटते.

अशा या नानाविध भानगडींची गुंतागुंत सोडविणें मोठें बिकट काम आहे. एकंदर कागदांची जुळवाजुळव करणें, आणि त्यांतील काळ, स्थल, व्यक्ती, बनाव इत्यादि निश्चित करून त्यावरून एक एका प्रकरणाची संगति जुळविणें अत्यंत त्रासदायक व त्यापासून होणारी फलनिष्पत्ति फारच अल्प पाहून मनास खिन्नता वाटल्याशिवाय राहत नाहीं. अशा या उत्तरकालीन साधनसाहित्याचा संभार केवढा विस्तृत आहे, याची सामान्य वाचकांस कल्पना असणें शक्य नाहीं. इतिहास-संग्रहांतील ऐतिहासिक टिपणें, स्फुट लेख, वस्तु, चर्चा, चरित्रें; दिल्ली, महेश्वर, हैदराबाद, कलकत्ता, चिनापट्टण वगैरे ठिकाणचीं बातमीपत्रें; राजवाडयांचे व खऱ्यांचे खंड; पेशव्यांच्या रोजनिशा; भारतवर्ष व काव्येतिहाससंग्रह यांतील बखरी व हकीकती, ग्वालेर-च्या पत्रव्यवहाराचे अनेक भाग, घराण्यांच्या हकीकती वगैरे बाबतींचें या काळास लागू असणारें मराठी साहित्य अवाढव्य आहे. त्यांतच इंग्रजी काग-दांची भर उत्तरोत्तर विपुल पडत जाते. एकट्या फॉरेस्टनेंच छापलेल्या ऐतिहासिक कागदांचे आठ प्रचंड भाग आहेत. त्यांखेरीज कलकत्याच्या फारसी कागदांचे भाषांतरित पांच भाग, हेस्टिंग्स व कॉर्नवॉलिस यांचा पत्र-व्यवहार, नागपुरकर भोसल्यांचे इंग्रजी कागद, हिस्टॉरिकल रेकॉर्ड्स् कमिशनचे वार्षिक अहवाल व तसेंच लायल, मक्डोनल्ड, मॅलेसन, कीन, फ्रँक्लिन, माल्कम वगैरे लेखकांचे ग्रंथ असें हें बहुविध साहित्य लक्षांत घेतलें तर सवाई माधव-रावाच्या एकवीस वर्षांच्या कालखंडास निदान दहा हजार पृष्ठें भरतील एवढें छापील साहित्य पुढें येतें. तें सर्व वाचून ऐतिहासिक रचना करूं लागल्यास

फलितार्थ फारच थोडा निघतो. भाषेच्या दृष्टीनें मात्र हें सर्व भांडार खरो-खरच बहुमोल असून, या वेळचे मराठी कागद हेच त्या भाषेंतलें मुख्य गद्य वाङ्मय होत.

छापील पुस्तकांपलीकडे हस्तलिखित संग्रह तपासूं लागल्यास एकट्याच्या हातून कामाचा पारच येणार नाहीं. मुंबई व कलकत्ता येथील सरकारी दप्तरखान्यांत ढीग पडले आहेत, ते शोधण्यास अभ्यासकच कोणी नाहींत. यांशिवाय खासगी संस्था व व्यक्ती यांजपाशींही बहुविध कागद पडलेले आहेत ते वेगळेच. सारांश, उत्तर मराठीशाहीच्या इतिहासास शिवकालाप्रमाणें कागदांच्या अभावाची अडचण नाहीं. येथें वाण एकनिष्ठ अभ्यासकांचीच आहे. काम करण्याची इच्छा असल्यास भरपूर साहित्याची सोय येथें आहे. विश्वविद्यालयांतील उच्च अभ्यासक्रमांत उत्कृष्ट कामास येतील असे कालखंड व विषय या भागांत पाहिजे तितके मिळूं शकतील. अशा स्थितींत वरील साहित्याचा अभ्यास करणारे महाराष्ट्रीय विद्यार्थी एका हाताच्या बोटांनीं मोजण्याइतके सुद्धां पैदा होऊं नयेत ही केवढी शोचनीय गोष्ट आहे!

**२. तत्कालीन लेखांची सजावट.** हा शोचनीय प्रकार दूर करण्याची दृष्टि ठेवून मीं या पुस्तकाची रचना केली आहे. उपलब्ध कागदांची संगति लावून एक एक प्रकरण शक्य तितकें तत्कालीन शब्दांनींच लिहिण्याचा प्रयत्न केला आहे. एकवीस वर्षांच्या कालास रियासतीचीं अकराशें पानें खर्च झालेलीं पाहून कित्येकांस हा अनवश्यक पाल्हाळ वाटेल. पण जुन्या लिखाणांच्या दहा हजार पृष्ठांचा संक्षेप सूचक विवेचनासह अकराशें पृष्ठांत केला तर त्यास पाल्हाळ म्हणावें कीं संकोच म्हणावें याचा विचार ज्याचा त्यानें करावा. सर्व उपलब्ध साहित्य संगतवार उपयोगांत आणिलें तरच राजवाडे, पारसनीस, खरे इत्यादिकांच्या उद्योगाचें चीज झालेंसें म्हणतां येईल. भरपूर तपशिलामुळें कित्येक भाग तर कादंबरीप्रमाणें चटकदार व मनोवेधक वाटतील. तथापि विवेचनाच्या भरांत निदान माझ्या कृतीनें भावी अभ्यासकांची दिशाभूल होऊं नये अशी धास्ती मात्र मला सदैव मनांत बाळगावी लागत आहे. पुष्कळ व्यक्तींचीं चरित्रें, राजकारणें, व व्यवहार अद्यापि अपुरे किंवा अज्ञात आहेत. अनेक व्यक्तींचा उल्लेख सुद्धां इतिहासांत अजून आलेला नाहीं. या गोष्टी पूर्ण होण्यासाठीं नवीन माहिती बाहेर यावी, आणि हल्लींच्या

उणीवा भरून काढण्याची सोय राहवी, असाही माझा हेतु असून नवीन संशोधनाची दिशा मीं ठिकठिकाणीं दाखविली आहे. सर्व प्रकाशित साहित्य शिवकालापासून अखेरपर्यंत वाचून त्यांचा एकंदर आढावा घेणारे अभ्यासक पैदा होईपर्यंत, आणि पुष्कळ लोक माझ्या रियासतींवर अवलंबून निर्धास्त राहतात यामुळें, मला आपली जबाबदारी विशेष जड वाटते. ज्यानें ज्यानें म्हणून स्वराज्याची कामगिरी केली असेल, त्याचें स्मरण या राष्ट्रीय इतिहासांत कायम व्हावें आणि अनेक विसकळित प्रसंगांची उघड चर्चा अभ्यासकांकडून निरनिराळ्या दृष्टींनीं होऊन आपल्या समग्र इतिहासाची रचना सुटसुटीत, प्रमाणभूत व हृदयंगम व्हावी, अशी कितीही हाव मनांत असली, तरी तसा काळ येण्यास माझ्या मतें अद्यापि अवकाश आहे. तसा कोणी अधिकारी गिबन निपजेपर्यंत हल्लींचा हा माझा प्रयत्न पहिला कच्चा खर्डा म्हणून उपयोगी पडावा एवढीच अपेक्षा मी बाळगितों. यास्तव वरील साधनसंचयांतले पुष्कळसे निवडक वेंचे व मिळाले तितके भरपूर तपशील थोडासा विस्तार सोसूनही मीं मुद्दाम दिले आहेत. हिंदुस्थानच्या अर्वाचीन इतिहासांत अठराव्या शतकाच्या उत्तरार्धास अनेक कारणांमुळें मोठें महत्त्व प्राप्त झालें असून, त्या काळाचें चित्र हुबेहूब मनांत ठसण्यासाठीं, त्या वेळची भाषा, रीतरिवाज व व्यवहार जरूरच्या तसे वाचकांपुढें मांडून एक एक बाबत सुस्पष्ट करण्याची दक्षता मीं ठेविली आहे. ज्या थोर पुरुषांनीं आपला हा इतिहास प्रत्यक्ष बनविला त्यांचें ऋण फेडण्याचें एकच साधन हल्लीं आपल्या हातचें आहे, तें हें कीं त्या वेळच्या भल्याबुऱ्या लेखांतील माहितीचा कसोशीनें संग्रह करून, त्यांचीं जीवनचरित्रें समृद्ध करून दाखवावीं. तशा प्रकारच्या अभ्यासाची सोय या पुस्तकानें झाली तरच माझ्या उद्योगाचें सार्थक होईल. काम करीत असतांना घराण्यांचे व व्यक्तींचे जितके तपशील उमगून आले, तितके बहुधा एकत्र आणण्याचा प्रयत्न मीं मुद्दामच केला असून, घराण्यांच्या वंशावळी व त्यांतील पुरुषांच्या हयाती उपलब्ध झाल्या तितक्या देण्याचा क्रम आरंभापासूनच ठेविला आहे. नुसत्या फुटकळ व्यक्ती सांगूनच इतिहासाचें कार्य भागत नाहीं. घराण्याचा पूर्ण तपास लागण्यास व प्रस्तुत वंशजांचें लक्ष त्यांजकडे वेधण्यास पूर्वींच्या वंशावळी दृष्टीसमोर पाहिजेत. मात्र सर्वच वंशावळी मीं प्रस्तुत कालापर्यंत पुऱ्या केल्या

आहेत असें नाहीं. तशा त्या विस्तृतपणें देऊं लागल्यास निष्कारण काम वाढेल. मराठ्यांचें राज्य संपल्यावर पूर्वींच्या घराण्यांचें ऐतिहासिक महत्त्व उरलें नाहीं. सबब अठराव्या शतकाच्या अखेरीपावेतोंच घराण्यांचा विशिष्ट उल्लेख मीं केला आहे. यांत कांहीं चुका किंवा अपुरेपणा आढळल्यास वाचकांनीं तो मला कळवून दुरुस्त करवावा अशी विनंति आहे.

पाश्चात्यांच्या लेखांत इकडील हकीकतीसंबंधानें पुष्कळ विपर्यास झालेला आढळतो. अशा ठिकाणीं मीं स्वजातीय अस्सल लेखांस प्राधान्य देऊन पडताळा पाहिला आहे; आणि जरूर तेथें निरनिराळ्या लेखकांच्या योग्यतेचें विवेचन केलें आहे. प्रस्तुत विवेचनांत मीं मुख्यतः राजकीय घडामोडींचीच संगति लावण्याचा प्रयत्न केला असून, त्या पलीकडे भाषा, धर्म, समाज, व्यापारधंदे, न्याय निवाडा वगैरे अनेक विषय विवेचन करण्याजोगे असूनही ते हातीं घेण्याची तूर्त मला सवड झाली नाहीं. माझा मुख्य उद्देश इतकाच कीं, इतिहासाचा ओघ सांगतांना एवढ्या विस्तृत व बाजूस पडलेल्या प्रचंड गद्य वाङ्मयाकडे वाचकांचें लक्ष जावें; शिवकालीन भाषेच्या मानानें उत्तर मराठशाहींतील भाषा अनेक खंबीर लेखकांच्या हातून कशी कमावली गेली, त्याची चव अल्पांशानें तरी लोकांस कळावी, आणि तत्कालीन वातावरणांत अल्प काल वाचकांस विहार करण्यास लावावें. त्या वेळच्या वाङ्मयांत भाषेचे उत्तमोत्तम मासले, अपरिचित शब्द, वाक्प्रचार व व्यवहारसंकेत पदोपदीं आढळतात. वाङ्मयदृष्ट्या अद्यापि या लेखांकडे विशेष कोणाचें लक्ष गेलेलें नाहीं. हा प्रकार इतिहासाध्ययनाच्या द्वारें सुधारावा, म्हणून मीं त्या वेळचीच भाषा शक्य तितकी कायम ठेविली आहे. सहज समजण्यापुरते जुजबी फेरफार तींत कोठें कोठें केले आहेत. कांहीं पत्रे (?) व कागद थोडेसे अनवश्यक वाटले तरी ते इतरत्र प्रसिद्ध झालेले नसल्यामुळें मुद्दाम मीं येथें छापले आहेत. प्रत्येक विधानास आधार देऊं लागल्यास, वाचकांस अडचण होऊन छापण्याचें कामही बेसुमार वाढतें, सबब आधार बहुधा कलमाच्या किंवा परिच्छेदाच्या शेवटींच व टीपांत दिले आहेत.

**३. घरच्या कोठावळ्यांची आळवण.**—हल्लींच्या मनूंत विरोधकांच्या तडाख्यांतून मी मी म्हणणारे थोर कार्यकर्ते पुरुष सुद्धां सुटत नाहींत, हा विचार मनांत आणिला, म्हणजे मला चहूंकडे आजपावेतों जी सहानुभूति

मिळत गेली तीच माझ्या उद्योगाचें मुख्य प्रोत्साहन होय. जे अनेक सद्गृहस्थ किंवा संस्था आज इतिहास विषयांत सरकारी किंवा खासगी रीतीनें ठिक-ठिकाणीं वावरत आहेत, त्यांस जरूरीप्रमाणें पत्रानें किंवा समक्ष भेटून मीं नानातऱ्हेची माहिती, प्रश्न किंवा शंका विचारल्या. त्यांचे खुलासे त्यांनीं कृपा करून कित्येकदां अत्यंत परिश्रमपूर्वक मला लिहून पाठविले, हे खरोखरच त्यांचे मोठे उपकार आहेत. त्यांच्या अशा साहाय्यामुळेंच मला या इतिहासांत पुष्कळ नवीन भर टाकतां आली, आणि अनेक कुटुंबांचे व व्यक्तीचे छडे लावून त्यांचे कित्येक अज्ञात तपशील मला देतां आले. अद्यापिही छडा न लागलेल्या व्यक्ती व बाबती पुष्कळच आहेत. कलकत्ता, मद्रास, ग्वालेर, अजमीर, कोटा, हैदराबाद, नागपुर, गोवा अशा दूरदूरच्या ठिकाणीं माझ्या या उद्योगास कळकळीचें साह्य, कित्येकदां अनपेक्षित रीतीनें, मला मिळत गेलें. राजवाडे, खरे, पारसनीस व साने यांच्या ग्रंथांतील माहितीची तर मीं लूटच केली आहे, हें या पुस्तकांतलें प्रत्येक पान सांगूं शकेल; आणि कोण-तेंही हक्क राखून न ठेवणाऱ्या त्या उदारचरितांस माझ्या या लुटीनें जिवंत-पणीं सुद्धां आनंदच वाटला. परंतु एकदां मीं लुटीच्या या घमेंडींत राहून एक अतिप्रसंग केला त्याची आठवण बुजणें शक्य नाहीं. खुद्द स्वराज्याच्या राज-धानींतील अस्सल भांडारांत मी एकदां आत्मिक भावनेनें लूट करण्यास गेलों-किंबहुना या कृतीला लूट म्हणतात हेंही मला तेव्हांच प्रथम कळलें. शिव-छत्रपतीचें ब्रीद तंतोतंत पाळलें नाहीं तर मग तें स्वराज्य कसलें ! परराज्यांत वाटेल तशी लूट करण्याची मुभा शिवाजीनें आपल्या अनुयायांस दिली होती. पण स्वराज्यांत त्यानें यत्किंचित् स्वैर वर्तन कोणाचेंही चालूं दिलें नाहीं. शिवाजी महाराजांच्या इतिहासाचें संशोधन व त्यांच्या कृतीचें अनुकरण एक-मेवाद्वितीय भावनेनें जर कोठें चाललें असेल, तर तें अलबत पुण्यासच होय, हें मी विसरलों. कारण कसा झालों तरी मी पडलों बहिष्कृत, पुण्य नग-रीच्या तेजस्वी वातावरणांतील नव्हे. याचें भान न राहून मी हावरेपणानें एक भलताच वेडेपणा केला. लहानशा सुटसुटीत विषयांत वावरण्याऐवजीं मी आपल्या उद्योगाचें क्षेत्र मुसलमानी रियासतीच्या आरंभापासून ब्रिटिश रियासतीच्या टोकापर्यंत विस्तारून चुकलों. आणि अखिल महाराष्ट्रास स्वदेशी इतिहास पुरविण्याचें जोखीम पत्करिलें. त्यामुळें झालें काय कीं,

दर पंधरवड्यास नवीन शोधांचीं टिपणें वाचून 'संशोधक' ही बहुमानाची पदवी संपादन करण्याची संधिच मला स्वराज्यांत प्राप्त झाली नाहीं. अशाही स्थितींत पुण्यांतील तज्ज्ञांनीं कृपाळुपणें बहाल केलेल्या 'संकलन-कारा'च्या तुच्छ कोटींतच समाधान मानून मीं स्वस्थ बसावें कीं नाहीं! पण लुटीचीं सवय जडली ती मला थोडीच स्वस्थ बसूं देणार! त्यामुळें आणखी एक घोडचूक करण्याची अवदसा मला आठवली! मी या स्वराज्या-च्या दारांत 'तहाहयात' निमंत्रित समजून लुटीचा हक्क बजावण्यास गेलों. परंतु सुदैवानें तेथचे चालक माझ्यासारखे नियमबाह्य वर्तन करणारे किंवा हलगर्जी नव्हते. त्यांनीं माझें अंतःकरण बरोबर ओळखिलें, आणि 'तुम्हांस आपल्या रियासती सजविण्यासाठीं आम्ही आमच्या घरांत अशी लूट करूं द्यावी कीं काय?' अशा कठोर शब्दांचा रोकडा कोरडा माझे पाठीवर ओढून, मला विन्मुख परत पाठविलें. हा हितकर धडा शिकविल्याबद्दल मी त्यांचा आजन्म ऋणीच राहणार. मर्यादा सोडून चालतो त्यास अद्दल घडली यांत वाईट तें काय? भिक्षाच मागायची किंवा लूट करायची, तर ती अम-क्याच घरीं असा आग्रह कशाला? त्यास सर्व देश मोकळा आहे. प्रस्तुत मी इतकेंच आश्वासन देऊं शकतों, कीं या ग्रंथाचे बाबतींत मी स्वराज्याच्या राखीव रानांत सहसा पाऊल ठेविलें नाहीं, ही गोष्ट दर एक प्रकरणांतील आधाराच्या उल्लेखांवरून स्पष्ट दिसेल. यापूर्वींच्या ग्रंथांत सुद्धां असला अतिक्रम थोडाच आढळेल. तथापि मजकडून घडलेल्या अन्यायाबद्दल त्यांनीं मला सदय अंतःकरणानें क्षमा करून आपल्या प्रेमभावाचा ओलावा साफ आटवूं नये, अशी त्यांस माझी विनंति आहे.

४. **क्षमायाचन.**—सर्व वाङ्मय काळजीपूर्वक तपासूनही कित्येक महत्त्वाचे कागद किंवा त्यांतले तपशील माझ्या नजरेंतून गळाले नसतील असा बाणा मी बाळगीत नाहीं. वड्या मोठ्या उद्योगांत नानाविध चुका राहिल्यास नवल नाहीं. हजार बाराशें पानांच्या लेखी संभारांत पुष्कळदां मागचें पुढचें अनुसंधान सुटून विषयाचा ओघ तुटणें किंवा त्याच त्या विचारांची पुनरुक्ति होणें असंभाव्य नाहीं. छापतांना अवतरण चिन्हें गळून किंवा भलतेच शब्द मागेंपुढें पडून विपर्यास किंवा घोटाळा उत्पन्न होतो. अशा दृष्टीनें पाहतां माझ्या या कृतींत पुनरुक्ति, पाल्हाळ, अव्यवस्था, घोंटाळ,

भाषेकडे दुर्लक्ष, इत्यादि किती तरी दोष राहिले आहेत हें इतरांपेक्षां मीच ज्यास्त ओळखून आहें. पण इतकी चोखाळ साफसुफी करण्याचा मला आतां बिलकूल दम निघत नाहीं. अद्यापि अशा प्रकारचें काम अंगावर घेणारा कोणी मला दिसत नाहीं. माझे सोबती पटापट स्वस्थानास चालले, आणि मीही त्याच मार्गानें धाव घेत आहें. अशा स्थितींत पुढील बाजी-रावाचा भाग संपवून मराठशाहीच्या अखेरीचा पल्ला कसाबसा गांठला कीं मिळविली, ही भावना रात्रंदिवस मनांत उभी आहे. निबंध, लेख, व्याख्यानें, संमेलनें अशांसारख्या बाबतींत पुष्कळ प्रेमी गृहस्थ मला आदरानें बोल-वितात, आणि त्यांस नकार देण्याचें जिवावर येतें. पण करणार काय? सकाळपासून रात्रीपर्यंत अर्धक्षण फुकट न घालवितां कैक वर्षें मी या उद्यो-गांत खपत असून अद्यापि मजल लांब आहे, आणि काळाची धाव तर बंद पडत नाहीं. यास्तव बाह्य शृंगाराकडे किंवा नीटनेटकी सजावट करण्या-कडे पुष्कळदां मला मुद्दाम दुर्लक्ष करावें लागतें. हें सर्वच काम असहाय स्थितींत मला एकट्यालाच करावें लागत आहे, ही जाणीव ठेवून, वाचकांनीं व संशोधकांनीं आपल्या अंतःकरणांत कोमल अनुकंपेचा अल्पांश तरी माझ्यासाठीं धारण करावा, अशी त्यांस माझी नम्र प्रार्थना आहे.

५. **कार्याचा आढावा.**—मराठी रियासतीस आरंभ केला, तेव्हां पुढील विस्ताराची बिलकूल कल्पना नव्हती. त्यामुळें माझ्या ग्रंथसंज्ञा कित्येकांस घोटाळ्याच्या वाटतात. आजपर्यंत मराठी इतिहासाचे पांच भाग प्रसिद्ध झाले असून त्यापुढचे हे आणखी दोन हल्लीं बाहेर येत आहेत. यापुढील दुसरे बाजीरावाचा भाग किती वाढेल तें आतांच सांगतां येत नाहीं. हे सर्व भाग एक, दोन, तीन या अनुक्रमानेंच संबोधले जावे अशी योजना मी करीत आहें, पण ती होऊन गेलेल्या कामास पुनरावृत्तीचे वेळींच लागू करितां येईल. प्रस्तुत मराठी रियासतींचे खालील भाग प्रसिद्ध झालेले आहेतः—

१ पूर्वार्ध स.—१६००–१७०७ (आवृत्ति खलास.)

२ मध्यविभाग १—१७०७–१७४० बाळाजी विश्वनाथ व बाजीराव.

३ मध्यविभाग २—१७४०–१७६१ पेशवा नानासाहेब.

४ मध्यविभाग ३—१७५०–१७६१ पानिपत प्रकरण. (आवृत्ति खलास.)

५ मध्यविभाग ४—१७६१-१७७४ माधवराव व नारायणराव.
६ उत्तरविभाग १—१७७४-१७८३ सवाई माधवराव, पूर्वायुःक्रम.
७ उत्तरविभाग २—१७८३-१७९५ सवाई माधवराव, उत्तरायुःक्रम.

ह्या पुस्तकांचें काम चालू असतांच मुसलमानी रियासतीची नवीन तिसरी आवृत्ति गेल्या सालीं दोन भागांत छापून प्रसिद्ध केली. अद्यापि शिवछत्रपतीचा सर्वच भाग दुरुस्त करून लिहावयाचा आहे. ब्रिटिश रियासतीच्या उत्तरार्धास तर स्पर्श सुद्धां नाहीं. मात्र प्लासीपासून वेल्स्लीपर्यंतचा ब्रिटिश राजकारणाचा भाग बहुधा संकलितपणें मराठशाहीच्या ओघांत येऊन गेलाच आहे. तथापि मुख्य काम हातावेगळें झाल्यावर शक्ति व आयुर्मर्यादा लाभल्यास वरील सर्व अपुरीं कामें संपविण्याची उमेद राखीत आहें. सत्य संकल्पाचा दाता भगवान किती मनोरथ पूर्ण करतो, पाहवें.

मु. कामशेत, जि. पुणें,
३१ ऑगष्ट १९२९.

गो. स. सरदेसाई.

# साधन ग्रंथ

—*०*—

पूर्वी मध्यविभाग ४ यांत साधनग्रंथांची यादी संकेत निर्देशांसह दिली आहे, तीच यादी या कालास लागू असून शिवाय खालील पुस्तकांचाही उपयोग यांत केला आहे.

**पारसनीस**–ग्वालेरचा पत्रव्यवहार भा. २–५ (ग्वा.)

„ –बुंदेलखंड प्रकरण.

**नातू**–महादजी सिंदे.

**राजाध्यक्ष**–जीवबादादा बक्षी ( जी. च. ).

**मोडक**–कोल्हापुरचा इतिहास.

**खरे**–इचलकरंजी इ० ( इ० ) व अधिकारयोग.

**भावे**–रुमाल ३ ( रु. ).

**भागवत**– इंदूरचा पत्रव्यवहार १–३.

**दळवी**–मराठा कु० इ०.

**आपटे**–श्रीरंगपट्टणची मोहीम.

## ENGLISH

Malcolm's Pol. Hist. of India, vols 1 & 2.
Malleson's Final French Struggles in India.
Begam Samru by Brajendranath Banerji.
Kanungo's Hist. of the Jaths.
Dodwell's Private Letters of Warren Hastings.
Hastings' Letters–World Classics by Keith.
Wills' Nagpur and the Gond Kingdoms.
Macdonald's Nana Fadnis.
Hastings Frazer's Our Faithful Ally the Nizam.
Lyall's British Dom. in India.

Historical Records Comn.'s Reports 1–10.
Persian Calendars vols 1–5.
Franklin's Shah Alum.
Broughton's Letters.
Gazetteers of Baroda, Gwalior & Hyderabad.
Forrest's Imp. series vols 1–3.
Do Maratha & Home series vol 1–3.
" Warren Hastings vols 1–2.
Ross' Correspondence of Cornwallis.
Basu's Rise of the Chr. Power.
War with the Maratha Nation, 1781.
Burke's Letters.
Papers of the Raja of Satara.
Imp. Gazeetter.
Parasnis' Poona in By–gone Days.
Do Selected papers of Gwalior, English.



# अनुक्रमणिका



प्रकरण चवथें—मोरोबादादाची बंडखोरी



प्रकरण पांचवें—इंग्रजांची पाचर तळेगांवावर निसटली



प्रकरण सहावें—बारभाईचें रूपांतर एकभाईत



प्रकरण सातवें—युद्धाचा तीव्र स्फोट

प्रकरण आठवें—**गुजरातेंतील मोहीम**



प्रकरण नववें—**अखिल हिंदुस्थानचा इंग्रजांवर उठाव**



प्रकरण दहावें—**चौकडीच्या जुटीचा फलितार्थ**



प्रकरण अकरावें—**युद्धसमारोप, सालबाईचा तह**

**वंशावळी:—**



**चित्रें,—जानोजी व मुधोजी भोसले, नागपुरकर**

# सवाई माधवराव—

## १ भाग्यनिर्देश

> धन्यवीर एकेक पुरुष जणुं कल्पवृक्ष पिकले ।
> शतवर्षे द्विजपक्षी आनंदे त्या तरुवर टिकले ॥
> जलचर हैदर नबाब सन्मुख रणकारितां थकले ।
> ज्यांनि पुण्याकडे विलोकिलें ते संपतिला मुकले ॥
>
> —प्रभाकर

## २ निधनप्रलय

> इथुनि अतां प्रारंभ दिसंदिस अद्भुत प्रळयाला ॥
>
> —प्रभाकर

# इंग्रजी नांवांचा मराठी अवतार



## (श्री० यशवंत नरसिंह केळकर)

भाषा ही व्यवहाराकरतां असते, व्यवहार कांहीं भाषेकरतां असत नाहीं. निरनिराळ्या भाषांतून परभाषांतील अनेकविध शब्दांची शुद्ध वा अपभ्रष्ट स्वरूपांत जी मिसळ झालेली असते ती यामुळेंच. पेशवेकालीन भाषेंत फारशी शब्दांचें इतकें प्राबल्य आहे कीं ती नीट समजण्यास प्रो. पटवर्धनांचा स्वतंत्र फारशी मराठी कोशहि अपुरा पडतो. सदर कोशाचा उपयोग करणाऱ्या इतिहासाभ्यासकास, पावला पावलाला येणाऱ्या फारशी शब्दांचें मूळ शुद्ध रूप काय असतें व व्यवहारांत प्रचलित झालेलें त्याचें गढूळ स्वरूप काय असतें याची जाणीव हरघडी होते. शेंकडा ६०।७० शब्द अपभ्रष्ट स्वरूपांतच रूढ झालेले असतात. पण रूढ स्वरूपांतच त्यांचा अर्थ व उपयोग समजून घेणें अगत्याचें असतें.

जी गोष्ट फारशी भाषेची तीच मराठी भाषेसंबंधांत इंग्रजीची आहे. पेशवाईच्या पूर्वार्धांत इंग्रजांचें विशेष प्राबल्य नव्हतें, यामुळें मराठी भाषेस इंग्रजीचा फारसा संसर्ग नव्हता. पण उत्तरार्धांत इंग्रज प्रबळ झाले, त्यांचा व्याप वाढला, व्यवहार फैलावला, आणि पेशवाईच्या अखेरीस तर इंग्रज घुसला नाहीं असें राजकारणच बहुधा शिल्लक राहिलें नाहीं. अर्थात् इंग्रज आले त्याबरोबर त्यांचीं नांवें व व्यवहाराला उपयोगी पडणारे आवश्यक शब्दहि आले. आज आपण सर्वस्वी इंग्रजी झाल्यामुळें त्या भाषेचें ज्ञान आपणास उत्तम असतें, म्हणून इंग्रजी शब्द अपभ्रष्ट स्वरूपांत बहुधा रूढ होत नाहींत. पण ऐतिहासिक काळांत तशी गोष्ट नव्हती. यामुळें ऐतिहासिक वाङ्मयांत येणाऱ्या युरोपियन नांवांचा व शब्दांचा सूड लावणें कठिण नसलें तरी थोडें डोकें खाजवावयास लावणारें असतें. उदाहरणार्थ, कपतान हालकी, बष्टुर, कारनीदर, कालकिराफ, जिकसिपेल, जुरस फिरंगी, वगैरे शब्दांचे वा नांवांचे मूळ युरोपियन शब्द काय असावेत ते उकलत नाहींत. कांहीं कांहीं नांवांना तर असा विचित्र संस्कार घडतो कीं त्यांच्या रूढ स्वरूपा-

खालीं तो परजातीचा आहे असा संशयहि येणार नाहीं. अँडरसनचा इंद्रसेन झाल्यावर, नारंजचा नारद बनल्यावर, मूळ नांवाचा सामान्य वाचकाला संशय कसा यावा? तामसेन हा बहुधा तानसेनाचा भाऊ शोभावयाचा; पण तो एक इंग्रज Thomson आहे. सरताउस हें मधुर नांव म्हणजे तें एखाद्या ताउसासारख्या वाद्याचें असावेंसें वाटतें; परंतु तें एका Sar.orius नांवाच्या साहेबाचें आहे. मॅडॉकचें मंडूक आणि मेडोजचें मंडूस झाल्यानंतर, रॉड्रीकचें रुद्रक झाल्यावर किंवा कार्मायकेलचें कर्मखल झाल्यावर, किंवा रॉस लॅंबर्ट रासलंपट बनल्यावर, मूळ नांव इंग्रजी प्रत्यंतर पुराव्यावांचून शोधणें कठिण जाणार हें उघडच आहे. जी गोष्ट नांवांची तीच शब्दांची. कोसल, कोटमास, मनवर, परझ, वगैरे शब्द त्यांचीं उदाहरणें होत. सारांश, अशा नांवांची व शब्दांची यादी करणें उपयुक्त व मनोरंजक आहे. येथें अशा नांवांची एक छोटीशी यादी जोडली आहे.

| | | | |
|---|---|---|---|
| जहाज फिरंगी | George Thomas | इस्काट | Scott |
| पोट साहेब | Ford | इस्पक | Spoke |
| मेजर कनक | Major Camac | कुफर | Cooper |
| इष्टिन | Hastings | फालबर | Fowler |
| बेगल | Baickle | कामरेल | Cambell |
| पियास | Col. Pears | जानमारी | John Murray |
| गाडर | Goddard | कलन | Collins |
| आपटन | Upton | तरनल | Turner |
| लिटली | Little | फारकीस | Forquith |
| कवलबुरग | Colebrooke | बिलाईकी | Blankie |
| मेघफास | Macpherson | मय | May |
| किलकपाट्री | Kirkpatrick | करणवालिस | Cornwallis |
| मालीट | Malet | हटली | Hartley |
| मेघडूर | Commodore | घमंडी | Cavendish |
| तामगिरास | Thomas Graham | फेद्री | Fredrik |
| इबरकरंबी | Abercrombie | यून | Evans |
| एकमुठी | Achmuty | पाखट | Pacekt |

# शुद्धिपत्र



| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| १२ | शेवटीं | पूर्बेच्या | पूर्णेच्या |
| १६ | २ | ४-७-४ | ४-७-७४ |
| ५१ | ५ | हस्तक | दस्तक |
| ५८ | २० | आपणास | आप्टणास |
| ८३ | ७ | कारभाराच्या | कारभाऱ्यांच्या |
| ८९ | खालून २ | वगैरे | वगैरे कडे |
| १४८ | १४ | फौजेस जाणाऱ्या | जाणाऱ्या फौजेस |
| १५२ | ३ | दयाबाई | दर्याबाई |
| १५६ | १२ | ७-९-१७७७ | ७-९-१७७८ |
| १५७ | ७ | २९-१०-१७७७ | २९-१०-१७७८ |
| ५५५ | १५ | सुरतवाले इंग्रजास | सुरतवाले यांनीं इंग्रजास |
| ३७१ | २० | मुत्सद्यांत | मसुद्यांत |
| ४२१ | ८ | चार राजांनीं | चार इंग्रजांनीं |
| ४४६ | १७ | भाईना | बारभाईना |
| ४०६ | ४ | बडोद्याचे गायकवाड | सर्जेराव घाटगे |





मुधोजी भोसले, नागपुरकर, सेनाधुरंधर, १७५६-८८

# मराठी रियासत



## उत्तर विभाग १

### सवाई माधवरावाचा पूर्वायुःक्रम



प्रकरण पहिलें

## दादाचा पाठलाग



१. दादाचा महाराष्ट्रास शेवटचा रामराम.
२. बारभाईंचें चुकीचें धोरण.
३. समेटाची वाटाघाट, कारभाऱ्यांचें तापीतीरास प्रयाण.
४. गारदी सुमेरसिंग व महंमद इसफ यांचे अंत.

*        *        *        *

**पूर्वविभाग, मध्यविभाग व उत्तरविभाग** असे मराठी रियासतीचे तीन मुख्य खंड मीं कल्पिले आहेत. पहिल्याची समाप्ति औरंगजेबाच्या मृत्युबरोबर होते. तेथून पुढें मध्यविभाग सुरू होतो, त्याची समाप्ति सन १७७४च्या एप्रिलांत सवाई माधवरावाच्या जन्माशीं मीं धरिली आहे. तदुत्तरच्या कालास उत्तरविभाग ही संज्ञा देऊन त्याचा आरंभ आतां करावयाचा आहे.

**१. दादाचा महाराष्ट्रास शेवटचा रामराम.**—(मे, जून १७७४)

नारायणरावाच्या वधानंतर सन १७७४ च्या आरंभीं बारभाईंचें कारस्थान सुरू झालें; त्या संबंधांत ता. ३-२-१७७४ रोजीं नाना फडणविसानें बाबूराव आपटे यास साताऱ्यास लिहिलें*—"चार पिढ्या ज्यांचें अन्न भक्षिलें त्यांचें

---

* भा. व. १ प. या. ४.

सार्थक करावें, असें चित्तांत आणून, सखारामपंत व आम्ही मोरोबादादांस अनुकूल करून, त्रिंबकरावमामा, साबाजी भोसले, वामनराव पटवर्धन वगैरे सरदार व हुजुरातीची फौज, सर्वांचें मानस एक होऊन, गंगाबाईचें संरक्षण करावें, दौलतीचा बंदोबस्त करावा, असें चित्तांत आणून, आम्ही व सखारामपंत उभयतां मातोश्रीस घेऊन साताऱ्यास येणार होतों; परंतु बंदोबस्तासाठीं पुरंदरास आलों. लवकरच यांस घेऊन सातारियास येऊं. तुम्ही कदाचित् बापूंचा संशय घ्याल तर सर्वांनीं आपापले अभिमान सोडून निखालस खावंदांचे वंशाचें बरें व्हावें हीच इच्छा आहे. शिंदे होळकरहि येणार." कासेगांवच्या लढाईंत त्रिंबकराव पेठे पडला, व हरिपंत फडके दादाचा पाठलाग करीत उत्तरेस चालला. दरम्यान ता. १८-४-१७७४ रोजीं पुरंदरावर सवाई माधवरावाचा जन्म होऊन त्यास ता. २८ मे रोजीं पेशवाईचीं वस्त्रें मिळालीं. तेणेंकरून पेशवाई मिळविण्याची दादाची हाव निर्मूळ झाली. तेव्हां आतां भांडण विकोपास न नेतां पुण्यास कारभाऱ्यांकडे येऊन पुढील कर्तव्याचा विचार करणें त्यास योग्य झालें असतें; परंतु तो विचार सोडून बारभाईस हाणून काढून पेशवाई मिळविण्याचा आपला उद्योग त्यानें तसाच पुढें चालू ठेविला. आपल्या कृतीनें राज्यास बरें वाईट काय होईल याचा त्यानें विधिनिषेध बाळगिला नाहीं. बारभाईंच्या सामान्यतः विरुद्ध वागणारे किंवा पेशव्यांच्या उत्कर्षाचा हेवादावा करणारे असे त्यास जे जे माहीत होते, त्या सर्वांकडे निरोप, पत्रें व माणसें रवाना करून त्यांस आपल्या लगामीं लावण्याची खटपट त्यानें जारीनें चालविली. गोदावरीच्या तीरापर्यंत जातो न जातो तोंच, शिंदे होळकरांस वश करून घेण्याचा प्रयत्न चालविला. यांत यश नच आल्यास तसेंच पुढें सरकून सुजाउद्दौला व रोहिले यांची मदत मिळविण्याचेंहि त्याच्या मनांत होतेंच. मारवाडच्या बिजेसिंगाकडे माणसें पाठविलीं. कच्छभूजपावेतों व सीदीकडे राजकारण केलें. $ हैदर अलीशीं तर त्याचें सूत्र पूर्वींपासूनच होतें. मात्र त्याच्या आश्रयासाठीं परत दक्षिणेंत यावें, तर मध्येंच कारभाऱ्यांचे हातांत अचानक पडण्याचा संभव होता. यासाठीं दादानें प्रथमपासून इंग्रजांच्याहि आश्रयाची खटपट चालविली. तरी हरिपंत फडके लगट करून त्याचे पाठीवर बऱ्हाण-

$ खंड १२-१६६.

पुराकडे येतांच, एप्रिलअखेर दादा लगबगीनें नर्मदा पार होऊन प्रथम इंदुरास होळकराकडे गेला. खरें म्हटलें तर हरिपंतानें त्यास यापूर्वी पकडलें सुद्धां असतें; परंतु त्याचे साथीदार साबाजी भोसले व निजाम केवळ स्वतःच्या मतलबानें वर्तत असल्यामुळें, त्यांस सोडून आपण एकटेच पुढें गेल्यास, न जाणो, त्रिंबकराव पेठ्यासारखी आपलीही गत होईल, कदाचित् साबाजी व निजाम मागून दादास मिळण्यास कमी करणार नाहींत, तेणेंकरून सर्वच व्यूह फिसकटेल, याचा नीट विचार करून एकटें पुढें जाण्याचें जोखीम हरिपंतानें मुद्दाम अंगावर घेतलें नाहीं. 'दादा पळून पळणार कोठें, फार तर थोडी दिवसगत लागेल, इतकेंच;' अशा समजुतीनें कारभाऱ्यांनींही नसतें साहस § अंगावर न घेण्याविषयीं हरिपंतास सुचविलें. 'धायगुडे दादास सोडून आल्यापासून दादाचें लष्कर बहुतच घाबरें झालें. गोदातीरींच श्रीमंतांस लोकांनीं रोजमऱ्याकरितां अडविलें. औरंगाबादेस कर्ज घेऊन रोजमरा वारतों, असें सांगून पुढें गेले; परंतु तेथें तरी कर्ज कोठून मिळणार? त्याच्या फौजेची अगदींच पांगापांग झाली. या वेड्यापीराच्या नादीं लागण्यांत आतां अर्थ नसून उलट हानि आहे, अशी दादाच्या पक्षपात्यांची खात्री झाली. आधीं गंगाबाईस पुत्र झाल्यामुळेंच बहुतेक पारडें फिरलें होतें. त्यांत बजाबा पुरंदरे, आपा बळवंत, आनंदराव गोपाळ, शहाजी भापकर, खंडेराव दरेकर हे 'आपल्याच्यानें तुम्हांबरोबर पळवत नाहीं' असें दादास सांगून, तोफा सामानसह नर्मदेवरून परत येऊन तापीतीरीं चांगदेवावर हरिपंतास मिळाले. बऱ्हाणपुरावरच मोठा तळ पडला. हरिपंतानें त्यांस रोजमरा चालू करून आपल्याजवळ ठेवून घेतलें. फक्त सखाराम हरि, मानाजी फाकडे, सदाशिव रामचंद्र, मालोजी घोरपडे व बाबूराव पाटणकर हे सरदार, दोन हजार स्वार व एक हजार गार्दी दादाबरोबर नर्मदा पार होऊन इंदुरास गेले. हरिपंत लिहितो, † 'आम्हावर चालून येण्याचा प्रकार राहिला. जीव मात्र घेऊन पळतात. एकट्यानें जाऊन करणें काय तें कळतच आहे. हस्तगत करावे या लागांत आहों.' महादजी सिंदेही उज्जनीहून येऊन इंदूर येथें दादास भेटला. 'श्रीमंतांचें दर्शन होऊन २।१२५ रोज झाले,' असें ता. १६ मेला महादजी लिहितो, यावरून एप्रिलच्या शेवटच्या आठवड्यांत दादा इंदुरास पोंचला असें होतें.

§ खरे-१३६७. † खरे १३६३, १३८२.

गोदावरीकांठीं येतांच ता. १०-४-१७७४ रोजीं दादानें महादजीस पत्र पाठविलें कीं, 'कारभाऱ्यांवर भार देऊन आम्हं कर्नाटकांत गेलों असतां मागें त्यांनीं मन मानें तसा फितूर केला. मोगल व ते एकत्र झाले, यामुळें मनसबा भारी पडला. त्रिंबकराव झुंजास आले, ते मृत्यु पावले; परंतु मागती सर्व जमा होऊन नानाप्रकारचे फितवे करतात तुम्हांकडे महादाजी बल्लाळ गुरुजी पाठविले आहेत, त्यांस तुम्हीं साफ उत्तर केलेंच असेल. फितुरियांचे पारिपत्य झाल्याविना बंदोबस्त होत नाहीं. याजकरितां तिकडील सर्व कामें सोडून तुम्ही व तुकोजी होळकर फौजेसहवर्तमान येऊन पोंचावें. ये समयीं दौलत राखावी. भरंवसा तुमचा आहे. येविशीं फार लिहावें तर तुम्ही सर्व समजतां. दौलतीचा भार तुम्हांवर आहे. सविस्तर बेत व्यंकटरामशास्त्री लिहतील.' ( ऐ. टि. १-५४ ).

यापूर्वीच सिंदे होळकरांकडे कारभाऱ्यांचाही पेश चालला होता. त्रिंबकरावास चुकवून दादा पंढरपुरच्या रोखें निसटून चाललेला कळतांच कारभाऱ्यांनीं ता १० मार्चचे सुमारास महादाजीपंत गुरुजीस सिंदे होळकरांकडे पाठवून उत्तरेकडून दादावर चालून येण्याविषयीं त्यांस कळविलें. पुढें ३० मार्च रोजीं सखारामबापूनें महादजीस लिहिलें, 'मोगल, भोसले व सरकारची फौज दादांचे मागें आहेत. कदाचित् ते पळत पळत नर्मदा पार जाले तरी होऊं न द्यावें. तुम्हीं व होळकर आडवे होऊन हस्तगत करावें. हें न बने तरी तुम्हीं त्यांस न मिळावें. महादाजीपंत तुम्हांस आणण्यास पाठविले असतां दिरंगाईवर पडलें. अतःपर दिवसगतीवर न घालवितां जलद येऊन पोंचावें.' यावर महादजीनें २७-४ रोजीं जबाब लिहिला* कीं, 'पाठलाग लांब राहिल्यामुळें दादा स्थिरतेनें येतात. इकडेही कारकून व पत्रें येतात. बजिन्नस गुरुजी पाहतात. आडवें व्हावें, नर्मदेअलीकडे येऊं न द्यावें, या अर्थी आम्ही व तुकोजी होळकर २४-४ रोजीं डेरेदाखल जालों. श्रीमंतांकडे आमचे उभयतांचे कारकून गेले आहेत, जे 'इकडे न यावें. आल्यास ठीक नाहीं.' आजवर एकनिष्ठेनें सेवा करून प्राणांच्या कुरवंडी केल्या, असें असोन आपण शब्द लावून लिहितां, काय म्हणावें! लोकांची सहा वर्षांची समजा-

* ऐ. टि. १-५४, १-५५.

वीश होणें आहे. पैका नाहीं. कर्ज मिळेना. तत्रापि बाहेर निघालों. नर्मदे-अलीकडे येऊं देऊं असें व्हावयाचें नाहीं. आमचें लक्ष आपणावेगळें नाहीं. याचा तपशील गुरुजी लिहितील त्यावरून कळेल. प्रस्तुत मोरो व्यंकटेश श्रीमंतांकडून आले, त्यांजबरोबर स्नेह व दाब दोनही प्रकार सांगून पाठविले आहेत. जसा त्यांचा निश्चय प्रत्ययास येईल, तशी पैरवी करण्यात येईल.' हें पत्र लिहिल्यानंतर लगेच दादा इंदुरास पोंचला.

याच तारखेचें म्हणजे २७ एप्रिलचें उज्जनी मुक्कामाहून लिहिलेलें महादाजी-पंत गुरुजींचें पत्र|| स्पष्ट व उद्‌बोधक आहे. त्यावरून सिंदे होळकर बारभाईशीं कपटानें वागत होते असें म्हणतां येणार नाहीं. तो लिहितो, 'आज्ञा घेऊन निघालों तो दरमजल इंदुरास आलों. पाटीलबाबा तेथेंच होते. भेट जाहली. ते बोलले, 'पूर्वी चाकरीस अंतर केलें नाहीं, पुढें पक्ष कैलासवासी यांचाच (नारायण-रावांचा) अवलंब आहे. दुसरें घडणार नाहीं. फौजेचें देणें सहा वर्षांचें निघालें, त्यामुळें अवघडलों. त्याची तर्तूद करून चालतों. संशय न मानावा. होळकरांस मायेंत घेतल्यावांचून जातां नये, म्हणून मानापमान एकीकडे ठेवून त्यास मेळवून घ्यावयाकरितां इंदुरास आलों.' आपलीं पत्रें पाटीलबाबांस येतात तीं ते दाखवितात, आम्हीं पाहतों. दादासाहेबांचे चिटणीस आबाजी रघुनाथ यांचींही पत्रें येत होतीं तींदेखील मला दाखवीत होते. दगा करणें असतें तर पत्रें न दाखविते. लोकांचे ओढीचा प्रकार पाहिला तो खराच आहे. कटारा काढून मारावया पावेतों दंगा जाहला. सबब दिवसगत लागून, येण्यास लांबण पडली. पाटीलबावा बोलले, बाया व कारभारी यांसच सामील होऊं, दुसरें लक्ष नाहीं. मूल (नारायणराव) सकुटुंब फसला, तो काढला पाहिजे, यास्तव अनेक हुन्नर करणें पडतील; राजकारणें लावावीं लागतील, येतों म्हणावें लागेल; वर्तमान लोपणार नाहीं. तेव्हां बापू व नाना विषम मानून कल्पना करतील, दुरारोप ठेवतील तर विकल्प सहसा न आणावा.' असें बोलतात, व करणींतही सरळताच दिसते. पडदा राखीत नाहींत. सिंदे होळकर उभयतां डेरेदाखल झाले. त्यांस निकड फार केली आहे. धारचे कृष्णाजी व जिवाजी पवार यांसही निकड लाविली आहे. तेही लौकरच

|| भा. व. २ प. या. ६४.

तयार होऊन सामील होतील.' या लेखावरून निरनिराळ्या गृहस्थांच्या मनाची व वर्तनोद्देशांची कल्पना होते. विशेषतः महादजीचे शब्द, 'अनेक हुन्नर करणें पडतील, राजकारणें लावावीं लागतील, नानास वैषम्य वाटेल,' हे पक्के लक्षांत ठेवावे. नाना व महादजी यांचा स्वभावभेद व लढा समजण्यास ते पुढें उपयोगी पडतील.

**२. बारभाईचें चुकीचें धोरण.**—प्रस्तुतच्या दुहीचा प्रसंगच असा आणीबाणीचा व घोटाळ्याचा होता, कीं त्यांत सर्व मराठमंडळाचीं मनें दुलग होणें साहजिक होतें. त्यांतून दादा तर इतका निकरावर आलेला होता, कीं आपल्या विरुद्ध यत्किंचित् वागणारांची तो राखरांगोळी करूं लागला. अशा स्थितींत निश्चयानें एकाच पक्षास उघड पाठिंबा देण्याचें पुष्कळांनीं होतां होईल तों टाळलें. जो तो प्रसंगानुसार वर्तन ठेवूं लागला. उद्यां दादा विजयी होऊन आपला सूड घेईल, ही धास्ती प्रत्येकाचे पोटांत होती. ताकपीर पुरंदरास येण्यास निघाला असतां, दादानें वाटेंतच त्यास जबरीनें पकडून नेलें; त्याची हकीकत गुरुजीच्या वरील पत्रांत आहेच. असें होतें, तरी कित्येक विशिष्ट व्यक्ती खेरीज करून एकंदर मराठमंडळाचीं मनें सामान्यतः बारभाईच्याच बाजूचीं होतीं. रघुनाथरावाची नालायकी सर्वांस महशूर असून, राज्याची व्यवस्था लागली तर ती बारभाईकडूनच लागेल, अशी समंजसांचा भावना होती; आणि त्या दृष्टीनेंच बहुतेकांचे प्रयत्न चालू होते. शिंदे होळकरांसारख्या मातबर सरदारांस आपआपल्या बाजूस वळविण्याच्या खटपटींत दोनही पक्षांचे चालक होते. परंतु या झगड्यांत इतर पुष्कळशा लहान इसमांची कुचंबणा अतोनात होऊं लागली. जो तो प्रथम आपला स्वार्थ पाहणार. मोरोबा फडणीस, इंग्रजांचा मॉस्टिन व अटकेंत असलेला तोतया हे त्या दृष्टीनें कारस्थानें रचूं लागले. म्हणून पुढील घडामोडींत कोणासही दोषी किंवा निर्दोषी ठरविण्यापूर्वीं ही दुलग परिस्थिति अवश्य लक्षांत ठेविली पाहिजे. ता. ८-५-१७७४ रोजीं मुरारराव घोरपडे बारभाईस लिहितो,$ 'आपण स्मरण करून हरएक बंदोबस्त करण्यास लिहाल, या अर्थें फौज गारदी वगैरेसहित यथास्थित राहिलों; पण आपण आमचें स्मरणच न केलें. आपणास आमची

$ ख. ले. १३६६.

निखालसता सांगितलीच आहे. आमचा सर्व भार बापूंकडे. त्यांस आवश्यक तेंच आम्हांस, अन्य विचार नाहीं. दादांशीं वांकडें सर्वथा योजूं नये. माधवराव नीं पूर्वीं करार केल्याप्रमाणें त्यांस मुलूख द्यावा. नारायणराव, त्रिंबकराव या उभयतांस मारल्याची कीर्ति त्यांची त्यांजकडेच असों द्यावी. वरकड फौज व सरदार एकंदर फुटूं न देतां, चारसहा महिने बंदोबस्त करून नंतर हिंदुस्थान कर्नाटककडील मनसबा योजावा. आमच्या ध्यानांत आलेला अर्थ सुचविला आहे.' हा सल्ला अत्यंत पोक्तपणाचा असून, सूड घेण्याच्या इच्छेनें दादास उगाच चिडवूं नये, त्याची सुव्यवस्था लावून व त्यास अभय देऊन स्थिर करावें, अशी मुराररावाची सूचना आहे. शिंदे होळकरांची भावनाही अशीच दिसते. आनंदीबाईनें तर पुढें तेंच सुचविलें. सखारामबापू व मोरोबा फडणीस यांचाही कल अशाच स्वरूपाचा होता. परंतु पटवर्धन, नाना फडणीस वगैरे मंडळींचे विचार अगदीं उलट दिशेस वाहत होते; आणि त्यांचेंच कारभारांत पुढें प्राबल्य झाल्यामुळें अनेक प्रकरणें विकोपास जाऊन अखेर राज्यास बाधक झालीं. मोरोबा व बापू कैदेंत जाण्यास हीच सुडाची भावना कारणीभूत झाली. राजकीय गुन्हेगारांच्या बाबतींत अगदीं कांटेकोर न्यायापेक्षां त्यांच्या अपराधाकडे कानाडोळा करणेंच पुष्कळ वेळां राज्यास अखेर हितावह होतें, या ऐतिहासिक सत्याकडे दुर्लक्ष केल्यामुळें राज्याचा घात झाल्याचें हें सर्वोत्कृष्ट उदाहरण आहे. दादाला पेशवाई मिळविण्याचा मनस्वी हव्यास होता. तो सदैव आपणास पंतप्रधान म्हणवी, (१२-१४३,१५७), आणि बापू नाना वगैरे मंडळीस तो 'फितुरी' म्हणे. 'फितुरी, लबाड, कृत्रिमी; आम्हांस कैदेदाखल ठेवावयाची योजना करितात. प्रत्यक्ष डौल आम्हांस कैद करावयाचा आहे. खर्च ते चालविणार, हा आणखी त्यांचा उपकार. दौलत करावी म्हणोन अंगरेजांचा आश्रय केला, त्यास कैद, तेव्हां दैव म्हणावें. यापेक्षां मरण कबूल. शत्रूच्या कबजांत राहण्यापेक्षां जीव जाईल तर बहुत उत्तम. आबरू शत्रूचे हातीं न जावी, सर्व आशा सोडून तीर्थवास तरी करावा,' (खं.१२ पृ. ८६, ९२, ९७), असे दादाचे निरंतरचे उद्गार आहेत. हा त्याचा स्वभाव बहुतेक सरदार ओळखून होते. शिंदे होळकर आजपर्यंत दादांस यजमान मानून त्याच्या हाताखालीं वाढलेले निकरानें त्यास न पकडतां त्याच्या कलानें वागूं लागले असें पाहून, नानाबापूंस वाटलें, कीं ते सरदार दादास सामील झाले. बारभाईनीं दादास

विशेष न छेडतां उत्तर हिंदुस्थानांत भटकूं दिलें असतें, त्याचे खर्चाची तजवीज केली असती, व त्याचे साथीदारांवर जुलूम केला नसता, तर त्याचे चाळे बहुधा आपोआप थंड पडले असते. निदान पुण्यास व्यवस्थित राज्यकारभार चालविण्याची तजवीज बारभाईंनीं प्रथम हातीं घेतली असती, तर सर्व वातावरण लवकरच निवळलें असतें. इंग्रजांच्या कारभारांत हा गुण ठळकपणें दिसतो. बंडखोरांसंबंधानें जाहीरनामे काढून, ते आपलें पुढील धोरण आगाऊ पुकारतात, तेणेंकरून लोकांस आपला मार्ग निश्चित करण्यापूर्वी विचार करावयास सवड मिळते. मीरकासीम, आपासाहेब भोसले नागपूरकर, पेंढारी सरदार, उमाजी नाईक, शीखांचे पुढारी इत्यादि अनेक बंडखोरांस, सुडाची भावना मनांत न आणतां, इंग्रजांनीं रानोमाळ भटकूं दिलें. परंतु बारभाईंनीं कारभाराच्या व्यवस्थेपेक्षां बंडखोरांवरच मुख्य शिस्त धरली, त्यामुळ स्व राष्ट्रांत नऊ वर्षे भयंकर गोंधळ माजून, अनेक पेंच व फसगती झाल्या, आणि बाकीचा कारभार बंद पडल्यामुळें वसुलाचें नुकसान होऊन पैशाची अडचण वाढली. जे कोणी दादास कडक शासन करण्याचे कामीं मनापासून झटले नाहींत, ते राजद्रोही ठरून शिक्षा पावले. पूर्ण राजनिष्ठ असा बहुधा कोणी राहिलाच नाहीं; एकंदर वातावरण भीतिप्रद व क्षुब्ध राहिलें. मोरोबा, सखारामबापू, बजाबा पुरंदरे, चिंतो विठ्ठल, सखाराम हरि, मानाजी फाकडे, धायगुडे, आनंदराव गोपाळ, विसाजी कृष्ण, रघुपत नारायण, असल्या अनेक कर्तबगार माणसांवर वहीम आलेला पाहून जनतेस इकडे आड आणि तिकडे विहीर असें होऊन गेलें; आणि नानासुद्धां केवळ महादजीचीं आर्जवें करून राहवें लागलें. ‘एक महादजी सिंदा मात्र आमच्याशीं लढावयास पुढें जाहला आहे.’ (१२-८०) असें दादा वारंवार म्हणे वास्तविक महादजीवर स्वामिद्रोहाचा आरोप करणारांनीं ही राष्ट्रीय परिस्थिति व खुद्द महादजीची मनोभावना मनांत आणावी.

सखारामबापू स्वभावतः तडजोडीच्या वृत्तीचा, दे वाण घे वाण करून व्यवहार उलगडणारा होता, तर नाना फडणीस सडेतोड व रोखठोक वृत्तीचा, न्यायनिष्ठुर एकवार उच्चारलेला शब्द खरा करूं पाहणारा असा होता. अर्थात् रोजच्या हजारों प्रकरणांत या दोघांचें मुळींच पटण्याजोगें नव्हतें. मनुष्यस्वभावाची पारख जशी महादजीस किंवा सखारामबापूस दिसते, तशी नानास दिसत नाहीं. ‘आपण होऊन दादाचा बंदोबस्त करून, कारभाऱ्यांचा अंमल

निर्बंध करून दिल्यावर मग ते आपली गरज कशास ठेवतील, उलट आपणांस जहागिरीचा हिशेब मात्र बिनचोख द्यावा लागेल; त्यापेक्षां दादाचें खूळ एकदम निकालांत न आणतां, उभयपक्षांकडून शक्य तितका आपला मतलब साधून घ्यावा, असें दुटप्पी वर्तन मुद्दामच शिंदे होळकरांनीं ठेविलें,' असें रा. खऱ्यांचें प्रतिपादन असून, त्यास कित्येक पटवर्धनी पत्रांचा आधार आहे: परंतु सामान्यतः मनुष्यस्वभावावरून शिंदे होळकरांच्या वर्तनाची पारख केल्यास त्यांनीं या वेळीं जाणून बुजून कुचराई किंवा दगाबाजी केली, असें सर्व कागद पाहिल्यावर वाटत नाहीं. ता. १६-५-१७७४ रोजीं वामनराव पटवर्धन नर्मदेवरून लिहितो, "बऱ्हाणपुरापासून दादांची फौज फुटून आम्हांकडे आली, तेव्हां ते लांब मजली करून हजार दीड हजार फौजेनिशीं बडवाईच्या घांटानें इंदुरास गेले. तुकोजीच्या व महादजीच्या भेटी झाल्या. गुरुजींची पत्रें आलीं होतीं, कीं बडवाईच्या घांटानें दादास आम्हीं येऊं देत नाहीं. हांड्याच्या घांटानें गेल्यास मात्र तुम्ही जलद पाठोपाठ यावें."‡ त्यावरून हरिपंत, मोगल व भोसले बऱ्हाणपुरावरच राहिले: आणि वामनराव वगैरे कित्येकांस त्यांनीं दादाचे पाठीवर रवाना केलें. ते नर्मदेवर पोंचण्यापूर्वीच दादा नेमका बडवाईच्या घांटानें इंदुरास पोंचला. शिंदे होळकरांनीं पुढें येऊं नये, असें लिहिल्यावरून वामनराव नर्मदेवरच मुक्काम करून राहिला. इतक्यांत नर्मदाउत्तरतीरास येण्याविषयीं त्यास गुरुजींचीं पत्रें आलीं, कीं 'सरदार बोलण्यांत वाईट दाखवीत नाहींत, तरी लांबणीवर पाडितातसें दिसतें.' त्यावरून हरिपंतासही वामनरावानें निकडीनें पुढें बोलाविलें. ता.१५-५रोजीं महादजी वामनरावास लिहितो, 'श्रीमंतांचें दर्शन होऊन २०-२५ रोज झाले. कोणतीही तोड पडून निश्चयांत येईना. अनेक प्रकारें हिताहित व अंदेशें बोध केला. निश्चयांत आणिलें आहे. तीन अंश काम झालें. एख अंश राहिला तो आज उद्यां शेवटास जाईल. आम्ही उभयतां त्यांसमागमें देशास येतों. तिकडील फौजांची गांठ न पडावी. सहासात लक्षांची ऐवजाची तर्तूद करून शिबंदीपासून त्यांस मोकळें करावें.'§ त्याप्रमाणें हरिपंतानें रकमेचा भरणा केला, परंतु दादा बोलाचालींत वेळ घालवून सर्वांसच

‡ खरे–१३८२. § खरे–१३८०-१३८१.

फसवीत होता. चिंतो विठ्ठल व सेनाखासखेल गोविंदराव गायकवाडाचा हस्तक बाबूराव काशी हे आगाऊ उज्जनीस जाऊन तेथें दादाच्या राहण्याची सर्व व्यवस्था लावीत होते, त्यासंबंधींच्या हिशेबाचे कागद, चिठ्या-पावत्या व हुंड्या हल्लीं मिळाल्या आहेत.$ दादा पूर्णपणें ताब्यांत सांपडला असतां त्यास सरदारांनीं एकदम पकडून कां हस्तगत केला नाहीं अशी एक शंका येते. परंतु त्यासंबंधानें इतकेंच लक्षांत ठेविलें पाहिजे, कीं विश्वासघातानें त्यास पकडावा, कैदेंत टाकावा किंवा मारावा, अशी कोणाचींच भावना नव्हती. तोही मालक आहे, आपल्या हक्काकरितां झगडत आहे, त्यानें आजपर्यंत बरीं वाईट कामें राज्यांत केलीं आहेत, त्याची समजूत घालून व्यवस्था लावून द्यावी, अशीच सर्वांची इच्छा होती. दादाबरोबर अनेक करार झालेले प्रसिद्ध आहेत, त्यांत हाच मतलब आहे. दमाजी गायकवाडास पूर्वीं नानासाहेबानें विश्वासघातानें पकडिलें, असा बोभाट होऊन त्यामुळें नानासाहेबाचे कारभारास मोठें वैगुण्य आलें होतें; तेव्हां विश्वासानें वाटाघाट होत असतां सरदारांनीं दादास पकडून बारभाईंचे हवालीं कां केलें नाहीं, असा प्रश्नच मराठ्यांच्या राजनीतींत उत्पन्न होत नाहीं व होऊं नये. कां तर विश्वासघातानं कोणाचा मुद्दाम जीव घेणें हें मराठ्यांचें ब्रीदच नाहीं. एका-खेरीज राज्यास वारस असलेले बाकीचे सर्व ठार मारून टाकण्याची मुसल-मानांची पद्धत मराठ्यांस अत्यंत किळसवाणी वाटते. नारायणराव पेशव्याचा खून हा एकच असला प्रसंग मराठ्यांच्या इतिहासांत अपवादासारखा असून तो लोकांच्या अंतःकरणास अद्यापि झोंबतो, यांतच आमची राष्ट्रीय भावना व्यक्त होते. पूर्वीं थोरला माधवराव व दादा यांचा झगडा चालला त्यांत माधव-रावानें थोडी दगाबाजी केली असती तर दादा त्याचे हस्तगत होऊन दोन मोठे युद्ध प्रसंग टळले असते. बाकी दादा सुद्धां अत्यंत सावध व हिकमती होता; तो सहसा पकडला गेलाच नसता. या त्याच्या गुणाचा फायदा इंग्रजांनीं मात्र पुढें चांगला करून घेतला. 'दादासाहेब म्हणजे मोठा किमया इंग्रजांचे हातीं सांपडला आहे. त्यांस प्रस्तुत स्वर्ग ठेंगणा झाला आहे,' असें एक लेखक लिहितो.† माळव्यांतूनच दादाचीं इंग्रजांशीं बोलाचाली सुरू होती. ठिक-

$ खं. १२-२४१, २४४–२८२. † खं. १०-१५७.

ठिकाणीं संधान बांधून जिकडून आपला मतलब साधेल तो मार्ग दादा पत्करणार होता. अर्थात् बारभाईनीं त्याचा नाद सोडून आपलें लक्ष कारभाराकडे घातलें असतें तर कांहीं दिवसांनीं वातावरण शांत झालें असतें. " सिंदे होळकरांनीं त्यास अशी सल्ला दिली, कीं पेशवाईवर तुम्हीं हक्क सांगूं नये. सवाइमाधवरावास गादीवर बसवून तुम्हीं कारभार करावा. तुम्हांस लढायाच करणें असतील तर हिंदुस्थान मोकळें आहे. फौजा घेऊन मुलूख सोडवावा, पण पेशवाईचा अभिलाष ठेवूं नये, तुम्हांस यश मिळाल्यास सखाराम बापू वगैरे वगैरे सर्व आपोआप तुमचे पक्षास मिळतील." परंतु हा सल्ला दादास बिलकूल पसंत पडली नाहीं. त्यास पेशवाईच पाहिजे होती. अर्ध्या राज्याची मागणी, अमृतरावाचें दत्तविधान, नारायणरावाचा वध इत्यादि सर्व गोष्टी करून पुनः पेशवाई नाहीं ती नाहींच, याची त्यास खंत वाटली. त्यानें सुजाउद्दौला याजकडे संधान लावून कलकत्त्याहून इंग्रजांची मदत आणविण्याची तजवीज चालविली. ( जून १७. १७७४-प. कॅ. ४-११०८ ).

इंदुरास वाटाघाट चालू असतां, दादाचा परिवार बराच काळ अवंतिका नगरीं होता. तेथें गोविंदराव गायकवाडानें त्यास वर्ष सहा महिने खर्चास पुरविलें. दापी, कामी वगैरे दादांच्या रक्षांचा बंदोबस्त विशेष काळजीनें करण्यांत येत होता. 'तुळाजी खासबारदार वगैरे चौघे चार प्रहर जागत असतों. देवाधर्मास जाणें तर घरचा बंदोबस्त राखून बरोबर जातात. जामदारखान्याखालीं समाधानपूर्व्या अष्टौप्रहर बसवीत असतों. स्वारी इकडे येण्यापूर्वींच सूचना आली म्हणजे दाणादुणा खरेदी करणें ठीक पडेल.' अशीही तपशीलवार हकीकत ता. १४-५-१७७४ च्या पत्रांत बाबूराव काशी चिंतो विठ्ठलास लिहितो. उज्जनीच्या व्यवस्थेच्या आणखी कांहीं गोष्टी खं. १२ ले. २४१-३०२ च्या कागदांत अवश्य मिळतील.

इंदुरास असतां सरदारांच्या दादाशीं ज्या वाटाघाटी झाल्या, त्यांची हकीकत १३-६-१७७४ च्या पत्रांत मोरो गिरमाजीनें हरिपंतास लिहिलेली वाचण्याजोगी आहे. 'बोध करणार बहुत, एकाचा विश्वास नाहीं. सरदारांपैकीं एकाचा भरंवसा, एकाचा संशय. त्यांचाही परस्परांत संशय. अहल्याबाईकडूनही पुस्तपन्हा होत होती. तेव्हां युक्तीचे वाटेनें सरदारांस निक्षून सांगितलें, कीं श्रीमंतांस देशीं घेऊन चलावें. त्याजवरून श्रीमंतांशीं बहुत प्रकारें बोलिले. दुसरे दिवशीं दोन

प्रहरां सिंद्यांचे डेऱ्यास येऊन होळकरासही तेथें आणिलें. बहुत प्रकारें मोह उत्पन्न होई असें सांगितलें. चार पर्याय सांगितले. १ नर्मदातीरीं स्नानसंध्या करून राहूं; २ पुण्यास घेऊन जावें, कारभाऱ्यांशीं रहस्य करून द्यावें. आमचें तेज राखावें. ३ पूर्वी माधवरावांनीं जहागीर किल्ले सुद्धां दिली, त्याप्रमाणें द्यावी. पुढें फितूर करणार नाहीं येविशीं जिमा करून घ्यावा. ४ हे तीन प्रकार न घडत तर आम्हांस निरोप द्यावा. काशीस अगर देव वाट देईल तिकडे जाऊं. हेंही न घडे तर पायांत बेड्या घालाव्या; अथवा तरवार पुढें ठेविली, जें करणें तें करावें. रात्रीं गुरुजीस शिंद्यांनीं बोलावून सर्व प्रकार सांगितले. त्यास शेवटच्या प्रकाराचा उच्चार करूं नये. त्यानें कोणाचें बरें झालें आहे ? बाकीचे पर्यायही विचारांतीं निरुपयोगी ठरून तूर्त देशीं जाण्याचा निश्चय झाला. ता. १२-६ रोजीं इंदुराहून निघण्याचा करार ठरला. (ऐ. टि. १-४९).

पण दादा तर केवळ हुलकावण्या दाखवून कालहरण करीत होता. प्रत्येक बाबत पुरंदरास कळवून कबुली आणविण्यांत दिवसगत होऊं लागली, तेव्हां समक्षच सर्वांनीं बोलून निकाल करणें सोयीचें, असें पाहून दादांस घेऊन सरदारांनीं दक्षिणेंत येण्याचें ठरविलें; परंतु परत गेल्यास आपण शत्रूंच्या हातीं पडूं, या भीतीनें 'सरदारांस चुकवून भोपाळकडे जाण्याचा मनसबा करून चार कोस गेले. लगेच शिंदे होळकर पाठीवर जाऊन भोंवताले बसले. कटकट झाली, जे आम्ही तुम्हांस जाऊं देणार नाहीं. आम्हाशीं करार केल्याप्रमाणें देशास चलावें. आम्ही घेऊन जातो. दुसरीकडे जाणें घडणार नाहीं. असें म्हणतांच एक दोन मुक्काम केले. सिंद्यांचा निग्रह पाहून उपाय चालेना. तेव्हां बोलले, कुच करावें, देशास येतो. तेव्हां घांट उतरून खालीं आले. सिंदे होळकर पाठीवर आहेत. नर्मदा उतरून येतात. पर्जन्यामुळें नद्या उतरावयास दिवस लागतील त्यास उपाय नाहीं.' हें वर्तमान जून अखेरचें आहे.$ पुढें २५ जुलईस दादा नर्मदा–दक्षिणतीरास आले. श्रावणमासीं गोदातीरास येतील. अहल्याबाईचीं व सरदारांचीं पत्रें आलीं. आतां संशय दिसत नाहीं. हरिपंत एदलाबादेजवळ‡ आहेत, तेही सरदार दादांस घेऊन आले म्हणजे बाजूनें जाबता ठेवीत येतील. निजाम फौजसुद्धां औरंगाबादेस आहे.'|| ता. १-८-१७७४ रोजीं

$ ख. १३८८. ‡ भुसावळच्या पूर्वेस २० मैल पूर्वेच्या कांठीं.
|| ख. १३९५.

हरिपंत नानाफडणिसाचे माहितीसाठीं लिहितो, 'दादा धूळकोटापलीकडे सहा कोसांवर मुक्काम करून आहेत. श्रावणमासचे खर्चास दोन लाख रुपये द्यावे, तेव्हां कूच करतील. याची तजवीज विष्णुपंत बाबा गद्रे (सावकार) करीत आहेत; परंतु त्यांची फेड लवकर करावी लागेल. होळकराचे नारो गणेश शौचे, सिंद्यांचे बाळाराव व विष्णुपंत असे बऱ्हाणपुरास आले. हें बोलणें करण्यासाठीं पुरंदरास जात आहेत. महंमद इसफ वगैरे गारद्यांस दादांनीं कराराप्रमाणें बऱ्हाणपुराहून निरोप दिला. त्यांस पुढें घालून तापीअलीकडे आणावयाचे आहेत. नाहीं तर पुनरपि गारदी श्रीमंतांस मिळतील. त्याचा बंदोबस्त करून मग हे त्रिवर्ग कारभारी पुरंदरास जातील. श्रीमंतांचे येण्याचाच घोळ पडला. शेवट काय करतात कळत नाहीं. खर्चास नाहीं पावलें तर मुलकास तसदी देतील. दोनहीकडून नुकसानी जाणून विष्णुपंताचेमार्फत तर्तूद करविली. सरदारांनीं मसलत लांबविली. एक वेळ चांदवडास दाखल झाले म्हणजे साऱ्या गोष्टींची भ्रांति फिटेल. आम्हीं मसलत लांबविली, मेहेनत बरोबर केली नाहीं असें मनांत येत असेल तर, आम्ही काय करितों तें पत्रांत काय लिहावें! दर्शनांतीं विदित करूं. ममतेंत अंतर नसावें.' ‡

या वेळच्या भानगडी व अडचणी समजण्यास निरनिराळ्या ठिकाणीं विखुरलेले कागद काळजीपूर्वक वाचले पाहिजेत. ऐ. टि. ४–१४चा कागद दुर्बोध, परंतु तत्कालीन स्थितीचा निदर्शक आहे, तो हरिपंतानें पुरंदरच्या कारभाऱ्यांस ऑगस्टआरंभीं लिहिलेला आहे. कारभाऱ्यांनीं हरिपंतास लिहिलेल्या पत्रांतील उतारे घेऊन त्यांजला हरिपंतानें यांत जबाब लिहिले आहेत. दादाचें वर्तन बिलंदर होतें, आणि तो कबजांत येण्यासंबंधानें कारभारी निराश होऊं लागले असतां, हरिपंतानें मोठ्या शिताफीनें नाना तंत्रें जुळवून हातीं धरलेला व्यूह कसा सिद्धीस नेला, हें या पत्रावरून व्यक्त होतें. हातीं धरलेल्या कार्याविषयीं एकनिष्ठपणा, निरलस प्रयत्न आणि निःस्वार्थबुद्धि हे हरिपंताच्या अंगचे गुण या पत्रांत स्पष्ट दिसतात. त्याचा मतलब असा.

दादा कबजांत येईना. त्याचा मुलगा अमृतराव पुण्यांत बसून नाना प्रकारचीं कारस्थानें करीत होता. सरदारांनीं घोळ घातला. पुरंदरास बातम्या

‡ का. सं. प. या. १२४.

आल्या, कीं 'साबाजी भोसले, निजाम, पटवर्धन वगैरेंस दादानें आपल्या पक्षास वळविलें, हरिपंताची फौज फोडिली, सिंदे होळकरांशीं अनुसंधान पक्कें केलें, हरिपंतास चतुर्भुज करून आणणार, आणि बापूनानांस अटकेंत ठेवणार, साष्टी इंग्रजांस देऊन त्यांची मदत घेणार.' या बातम्या दादानेंच सर्वत्र उठविल्या होत्या. त्या ऐकून बापूनाना गांगरून गेले व त्यांनीं हरिपंतास पत्रें लिहून त्याचा विचार घेतला. त्यावरून हरिपंतानें खरी वस्तुस्थिति दाखविणारें धीराचें उत्तर लिहिलें तें या पत्रांत नमूद आहे. तो लिहितो, 'आपण मनसुबा उभारला यांत दादांस संतोष बिलकूल नाहीं. पूर्वी त्यांनीं अशींच कर्मे केलीं व पुढेंही करणार, त्यास दुष्टांचें कल्याण व्हावें अशीच ईश्वराची इच्छा असल्यास मग इलाज नाहीं. यांचे केल्यानें काय होणार ! चार दिवस हिसके बसतील इतकेंच. पटवर्धन, साबाजी भोसले व इतर सरदार प्राण गेला तरी आपल्याखेरीज इतर दैवत जाणत नाहींत. दादा लटकेंच उठवितात. दुसरे कोणी त्यांचें लक्ष धरणारे नाहींत. होळकराकडे नारो गणेश व सिंद्यांकडे गुरुजी आपलें लक्ष ठेवीत आहेत. त्यांनीं दादांचा पक्ष धरावा असा योग दिसत नाहीं. आपल्याकडून कांहीं साधून घेतील इतकेंच; पण तिकडे मिळणार नाहींत. मातबर लौकिकाचे सरदार सिंदे होळकर हे दोघेच. ऐवज तर त्यांजवळ कांहींच नाहीं. इतकेंही असून ते दादांस मिळाले, तर आम्ही व आमचें मंडळ एकदील असतां, सिंदे होळकरांस सुद्धां आम्ही भीत नाहीं; परंतु ते धूर्त आहेत. असें कधीं करणार नाहींत. मात्र आपला स्वार्थ साधून घेतील. वेळ पाहून आपणही त्यांचें कांहीं कबूल करावें. चिंतो विठ्ठल व प्रभुमंडळी वगैरे दादांचे पक्षांत आहेत; परंतु तो पक्ष धरून पार पाडूं, असा भरंवसा कोणासच पुरत नाहीं. मात्र त्यांचीं कामेंच हीं, कीं बखेडे करीत असावें. आपलें मंडळ बलवान् आहे, नबाब आदिकरून आपले लक्षांत आहेत. मग अशा किरकोळांचे हातून काय पराक्रम होणार! खरे बखेडखोर आपल्याजवळच आहेत, (मोरोबादादा, बजाबा पुरंदरे वगैरे), त्यांच्या बंदोबस्ताची तजवीज मात्र आपण केली नसल्यास अवश्य करावी. अमृतरावांनीं नानाशीं शपथ करून गोड गोड भाषणें लौकिकार्थ बोलतात. मनांतून राजकारणें करीतच असतील. साष्टीचा बखेडा हवालदारानें केला, त्याला तो मोडण्याचा उद्योग अवश्य करावा. सरदारांनीं लांबणीवर टाकून नासलें, नाहीं

तर यापूर्वीच कार्यभाग उरकला असता. दादा चांदवडास आल्यावर, एक वेळ काय देणें तें देऊन त्यांजपासून व सरदारांपासून शपथा घेववून दादास हलकें करावें, म्हणजे पुढें करारांत अंतर पडल्याबरोबर कायम बंदोबस्त करतां येईल. आपण उभयतां एकमतानें वागतां, यामुळें मनुष्य लगामीं आहे. जी न होण्याची गोष्ट ती उभयतांनीं करून राज्य उभें केलें. पैक्याचें बळ जरी कमी पडलें, तरी सर्व राज्य आपले स्वाधीन, किल्ले कोट मुलूख दादांकडे कांहीं नसतां, त्यांची मात्र राजकारणें शेवटास जातील, आणि आम्ही करूं तें शेवटास जाणार नाहीं असें कसें होईल! कसेंही करून बाजी शेवटास न्यावी. दादा पुण्यांत राहून बखेडा करूं लागतांच अटकेंत टाकावें. आपण उभयतांनीं छातीचा कोट करून श्रीमंतांचा वंश रक्षिला, एवढें एकवटलेलें मंडळ फोडून आपलेंसें केलें, ही कीर्ति दिगंत झाली. मी खुशामतीस्तव हें लिहीत नाहीं. दादा गंगातीरीं आनंदवल्लीस राहतील. मात्र निकट गंगापुरास मातुश्री गोपिकाबाईचें राहणें ठीक नाहीं. नरसिंगराव धायगुडे आपल्या भेटीला गेले आहेत; एकनिष्ठ मायेचा आहे. ते सर्व विदित करितील.' हें पत्र$ आगष्ट महिन्यांतलेंच आहे, असें का. सं. प. या. १२४ (१-८-१७७४) वरून म्हणतां येतें. यावरून बारभाईच्या कारस्थानांतील हरिपंतांची कामगिरी कळून येते. दादाचे जिवास अपाय करावयाचा नाहीं, त्याचा योग्य बंदोबस्त करून त्यास निर्वीर्य करावयाचा, असाच बारभाईचा उदात्त हेतु होता. त्यास मारणें किंवा हाल करणें कोणाचे स्वप्नांतसुद्धां नव्हतें. नाहीं तर दादास पकडण्याची संधि पाहिजे तितकी होती.

**३. समेटाची वाटाघाट, कारभाऱ्यांचें तापीतीरास प्रयाण** (ऑगस्ट–नोव्हें. १७७४).—नर्मदेअलीकडे आल्यावरही दादाच्या बयादा सरल्या नाहींत. आपणास पेशवाई न मिळाली तरी विरोधकांसही ती पचूं द्यावयाची नाहीं. अशा रीतीनें तो नाहीं नाहीं त्या अडचणी एकसारख्या उपस्थित करीत होता. त्याचे पक्षपाती सर्व देशभर व खुद्द पुण्यांत उपद्व्याप चालवीत होते. पुरंदरासही फितुराचे प्रयत्न झाले. किल्ल्यावर पाऊस फार व हवा सर्द म्हणून

---

$ पत्र अशुद्ध छापलेलें, विराम चुकलेले, दुर्बोध आहे. सर्व व्यक्ति व संदर्भ ध्यानांत आले तर त्याचा चांगला बोध होतो.

बालपेशवा व मंडळी कांहीं दिवस खालीं माचीस सासवड येथें येऊन राहिली; परंतु तेथें दगा होणार असें कळल्यावरून ता. ४-७-४ रोजीं एकाएकीं रात्रीं कारभारीसुद्धां सर्व किल्ल्यावर जाऊन राहिले. 'सासवडास असते तर हरएक दगा होता. घालमिलींत बहुत होते. परंतु दस्तैवजी पुरावा सांपडत नाहीं. आकसानें कोणी सांगतात त्यांचे नांवाची परिस्फुटता करतां येत नाहीं. किल्ल्याची हवा वाईट पण मान्य करावी लागली. नगर अथवा मिरज जागा युक्त होती, परंतु कारभाऱ्यांच्या चित्तास येत नाहीं. दादांचा बंदोबस्त होई तोंवरच रहाणार. उभयतां कारभाऱ्यांस दगा करून मारावें, राज्यांत खूळ करावें, अशा मनसबेंत बहुतजण आहेत. वर्तमान कळतें, परंतु निकड बसवून पारिपत्य होऊं शकत नाहीं. जवळ रहाणारेच गृहस्थ मनसबा करितात. उभयतांचे मध्यें आपण असावें असें मोरोबांचें मानस, पण विश्वास पुरत नाहीं. आंत शिरून दादांचा पक्ष बळवावा असेंच दिसून आलें. बापू व नाना या उभयतांतून एकही धिटाईचा नाहीं. मात्र उभयतांचें आपसांत ठीक आहे.'‡ पुरंदरावर एक कोणी तरी फौजबंद लढवय्या इसम बंदोबस्तास कायमचा पाहिजे होता.

फितूर होऊं लागले तेव्हां कारभाऱ्यांनीं कडक शासनें आरंभिलीं.* नरसिंगराव धायगुडे हरिपंताबरोबर होता, तो कांहीं जरूरीच्या कामासाठीं देशीं आला. तो पुरंदरास येऊन आगस्टांत घरीं गेला. त्यास तेथें ता. ३१-८-१७७४ चा निकडीचा हुकूम गेला, कीं 'दादांच्या बाजूस जे जे फितुरी लोक चाकरीस वगैरे गेले असतील, त्यांची गांववार चौकशी करून घरें व वतनें जप्त करावीं, आणि त्यांचे आप्तांकडून पत्रें लिहवून ते लवकर परत येतसें करावें. तुम्ही आपले कमावीसदारांस महालोमहालीं पत्रें लिहून बंदोबस्त करावा.' यानंतर लवकरच हरिपंतानें पत्र लिहून नरसिंगरावास आपल्याजवळ बोलाविलें.

सेप्टेंबरांत काय प्रकार चालला त्याची हकीकत महादजीनें सखारामबापूस ४-९-१७७४ च्या पत्रांत लिहिली.$ 'नारायणरावांस दगा झाल्यापासून

‡ ख. ले. १३८६-१३९८, १४०१, १४०५. * खं. १०. १४७, १४८.
$ ऐ. टि. १-५५.

पाऊल वांकडें पडत गेलें. लाखों रुपये खर्च होऊन उपयोग झाला नाहीं. दादा इकडे आल्यावर कोण घोळ झाला तो आपणापासून लपवून ठेविला नाहीं. श्रीमंत माळव्यांत आल्यानें हिंदुस्थानी लोकांस फूस सांपडली. रोहिले, जाठ, वगैरे राजकारणें करूं लागले. पातशहा, वजीर, वगैरेंनीं तमाम मुलूख व पैसा हस्तगत केला. हें दादांचें खूळ त्यांत जाऊन मिळतें तर मुधोजी भोसले, गायकवाड, वगैरे त्यांस अनुकूल असल्यानें मोठाच प्रसंग आला होता. प्रत्यक्ष आम्हांवरच दोनतीनदां मोठी गुदरली होती. त्यांवर श्रीमंतांस कित्येक प्रकारें बोध करून मर्जी ठिकाणीं आणून बऱ्हाणपुरनजीक घेऊन आलों. श्रीमंतांस बहकविणारे चौघे आहेत, ( सदाशिव रामचंद्र, मालोजी घोरपडे, सखाराम हरि व मानाजी फाकडे ). त्यांचीं मुलें माणसें आपण बंदींत ठेविलीं आहेत तीं सोडून द्यावीं, म्हणजे ते दादांचे मर्जीत अंतर पाडणार नाहींत. तसेंच श्रीमंतांस खर्चास नाहीं म्हणून हिसके बसतात. तरी गुरुजी लिहितील त्याप्रमाणें ऐवज लवकर पाठवावा. सर्व राज्याचा भार आपणावर आहे, तेव्हां मनसबा सुधारून आम्हांस यश येईसें करावें.'

दादा बऱ्हाणपुरावर येतांच हरिपंताचे सल्ल्यानें कारभाऱ्यांनीं मुलखांत कडेकोट बंदोबस्त करून, सरदारांवर भिस्त न ठेविता, आपणच सर्व प्रकरण मर्जीप्रमाणें उरकावें, असा योग आणिला. याची जाणीव दादासही होतीच. शिंदे होळकरांचे तंत्रांत राहिल्यानें आपला निभाव लागणार नाहीं, ते हळूहळू आपणांस कारभाऱ्यांचे हवालीं करणार, त्यांच्या दांडग्या फौजा जवळ जवळ येऊं लागल्या, हें पाहून दादानें निराळाच उपक्रम आरंभिला. 'कारभाऱ्यांचें सामान भारी आलें समजोन घाबरे झाले. पुढें येत नाहींत. गच्छन्ति करण्याचा प्रकार आहे. सरदारांचें मानस या अडचणींत आपले मागील मतलब कारभाऱ्यांपासून उरकून घ्यावे; परंतु हरिपंतांची जबरदस्ती पाहून सरदारांस विवंचना पडली कीं, आपण इतकें करून फळ नाहीं. दादांस जाऊं द्यावें तर कारभाऱ्यांचा राग होणार. धरून द्यावें तर बदलौकिक होतो. कारभाऱ्यांनीं साफ कळविलें कीं, ' तुमच्या कराराप्रमाणें आम्हीं कबूल केलें असतां तुमच्यानें निभावत नाहीं, तर तुम्हीं खुशाल दादांस जाऊं द्यावें. ते व आम्ही पाहून घेऊं.' या उत्तरानें शिंदे होळकर चपापले. 'मोरोबादादाशिवाय सर्व मुत्सद्दी व सरदार भवानराव सुद्धां जमा झाले आहेत. निजाम

भोसले सुद्धां एकंदर फौज पंचावन हजारपर्यंत आहे. शिवाय देशींहि पंधरा हजारांची तर्तूद आहे. डौल पाहतां फारच चांगला आहे. निजामास दिल्लीची वजिरी देण्याचें ठरवून त्याचा मिलाफ करून घेतला.' हा बनाव सन १७७४ च्या नोव्हेंबरांतला होय.

*ऑक्टोबरचे आरंभीं दादा तापीवर आला.* 'उतरण्याची तजवीज होत आहे; परंतु सारें कर्म दगाबाजीचें. बरोबर हजार गाडदी आहेत. इकडील सामान भारी पाहून घाबरे झाले. पुढें येत नाहींत. अशीरगडास मानाजी फाकड्यानें दग्याचें कर्म केलें, परंतु किल्लेदार जगन्नाथपंत सावध होते, त्यांनीं मानाजीस हुसकून लाविलें. रगत गाळीत आले. घोडीं, माणसें जायां झालीं, बऱ्हाणपुरासहि दगा करीत होते. फौजा लवकर जमा झाल्या म्हणजे बंदोबस्त होईल.'

दादा तापीवर आल्यावर कारभारी इकडून त्याच्या भेटीस केव्हां कसे गेले हें सांगितलें पाहिजे. दादाचा विष्णु महादेव गद्रे, होळकराचा नारो गणेश व सिंद्यांचा बाळाराव गोविंद असे तिघे वकील पुरंदरास बोलणें करण्याकरितां आले, त्यांच्या भेटी १०-१०-१७७४ रोजीं झाल्या. दादांस दहा लक्षांची जहागीर व दोन मध्यम किल्ले देऊन सिंदेहोळकरांनीं त्यांचा बंदोबस्त ठेवावा, असा ठराव झाला. तरी वकील परत जाऊन उभय पक्षीं बोलणीं संपण्यास वेळ लागतो, सबब बापूनानांनींच फौजेंत आपणाजवळ यावें, असा त्या सरदारांचा आग्रह पडला. कारभाऱ्यांचे मनांत जावयाचें नव्हतें; पण आपण गेल्याशिवाय निकाल लागत नाहींसें पाहून ता. २४-११-१७७४ रोजीं पुरंदर सोडून बापू, नाना, बजाबा, चिंतो विठ्ठल, रामचंद्र गणेश वगैरे निघून औरंगाबादेकडे हरिपंताजवळ गेले. सलोख्यानें निकाल लागला तर ठीकच, नाहीं तर लढाईनें लावावा असा त्यांचा बेत झाला. 'पुरंदरावर बाळ माधवराव व गंगाबाई यांचेजवळ अत्यंत मायेचा आणि सदैव दक्ष व निर्भीड असा पुरुषोत्तमराव दाजी पटवर्धन यास ठेविलें. 'आमचें जाणें आपण घडविलें,' असें नाना फडणीस त्यास लिहितो. म्हणजे पुरंदरवरील जबाबदारी दाजीनें पत्करिली नसती, तर कारभारी बाहेर जाऊं शकले नसते. दाजीनें हें काम किती चातुर्यानें केलें व परिस्थिति किती बिकट होती हें ध्यानांत येण्यास हरिवंशाची बखरच वाचली पाहिजे. नोव्हेंबर-अखेरीस हरिपंत वेरुळावर व दादा खानदेशांत होता. कारभारी येऊन प्रकरण नेटास लागणार असें पाहतांच दादा आपले जागां बहुत घाबरा झाला; आणि

इंग्रजांची मदत घेण्याचें ठरवून त्यानें १० डिसेंबरचे सुमारास एकाएकीं परत माळव्याकडे पलायन केलें. इंग्रजांच्या या बोलाचालीचें पूर्व स्वरूप पुढील प्रकरणांत द्यावयाचें आहे, तें येथें ध्यानांत आणिलें पाहिजे. (ख. १४३१.)

**४. गारदी सुमेरसिंग व महंमद इसफ यांचे अंत.**—दादाचे मुख्य साथीदार गाडदी सरदार असून, त्यांस त्यानें दूर न करतां सर्वदा स्वतःजवळ बाळगिलें आणि हस्तें परहस्तें त्यांचा शक्य तितका बचाव केला, हाच नारायणरावाचे वधांतील त्याच्या पुरस्काराचा मुख्य पुरावा होय. प्रस्तुत बारभाईंशीं वाटाघाट झाली, त्यांत नर्मदेअलीकडे येतांच दादानें गारद्यांस रजा द्यावी असा करार होता. पैकीं सुमेरसिंग जून १७७४ त इंदूर येथें आजारी पडून मरण पावला. 'आषाढ व॥ १३ (५-८-१७७४) रोजीं दादा नर्मदा उतरणार असें करारांत आलें आहे. त्यांचेमागून सिंदे उतरतील. तुकोजी होळकर अगोदरच उतरून दक्षिण तीरास आले. गाडद्यांचा फडशा येथेंच होईल. सुमेरसिंगास* बरें वाटत नव्हतें यामुळें काशीस जाण्यास त्यानें दादांचा निरोप घेतला; आणि व्याही मणिराम परदेशी याचे घरीं इंदुरांत राहिला. तेथेंच अखेर कृमी पडोन मरण पावला. या गोष्टीस आज दीड महिना होत आला. कर्मासारखें फळ झालें. बहुतच हाल झाले. दोघे लेक जवळ होते. ते परत गाडद्यांत आले आहेत.' सुमेरसिंगाचे मुलांस व त्याच्या व्याह्याचे कुटुंबास बारभाईंनीं पकडून आमरणान्त कैदेंत ठेविलें आणि त्यांची सर्व चीजवस्त जप्त केली$.

दुसरा गाडदी महंमद इसफ, त्यास दादानें शिफारसपत्र देऊन मुधोजी भोसल्याचे नोकरींत पाठविलें. ता. २-८-१७७४ रोजीं दादाचा साथीदार सदाशिव रामचंद्र मुधोजीस लिहितो,‡ 'श्रीमंत नर्मदापार झाले. तेथून तापी तीरास जाणार. महंमद ईसफचें लक्ष सर्व प्रकारें आपल्याकडे असून, आम्हीही त्याची बहुत प्रकारें खातरजमा केली आहे. सरदारांचें मानस पाहून चार दिवस आपणाकडे रवाना केले आहेत. यांचा सर्व प्रकारें गौरव करावा. हे आपल्याजवळ पोंचले म्हणजे कोणती गोष्ट अगाध नाहीं. शत्रूचें पारिपत्य करतील. तुम्ही आपासाहेब कायम आहां तर श्रीमंतांस व आम्हांस मोठा आश्रय आहे. हे दोन हजारांसमान आहेत.

*ऐ. टी. १–४७. $स. मा. रो. १-४८-६३. ‡ना. भो. का. २१ व १०.

श्रीमंतांच्या कमरेची समशेर आहे ती आपण जतन करावी. हे जवळ असल्यानें पुणेकर दहशत खाऊं लागले.'

वरील पत्र पावतांच मुधोजीनें इसफ यास आपल्या फौजेंत ठेवून घेतलें. पुढें साबाजी व मुधोजी यांची लढाई झाली, तींत त्यानें मुधोजीच्या बाजूनें चांगलाच पराक्रम केला. पुढें साबाजी मारला जाऊन मुधोजी बारभाईंस मिळाला, तेव्हां या खुनी इसमास जवळ ठेवणें अशक्य होऊन स. १७७५ च्या जून महिन्यांत मुधोजीनें इसफास आपल्या जवळून घालवून दिलें. तो पुढें दोन हजार गारदी व हजार राउतांनिशीं सातपुड्याचे आजूबाजूस राहून नेमाड तालुक्यांत उपद्रव करूं लागला. हरिपंत फडके या वेळीं त्याच बाजूस होता. त्यानें कृष्णराव बळवंतास इसफावर पाठविलें. हंड्याजवळ नर्मदा उतरून तो पुनरपि उत्तरेंत जाणार असें समजल्यावरून, वामनराव, परशुरामभाऊ व आपा बळवंत यांसही हरिपंतानें इसफाचे पाठीवर पाठविलें. ता. २२-८-१७७५ रोजीं पटवर्धन लिहितो, 'इसफ पळोन डोंगरावर गेला. अडचणीची जागा, याजकरितां तोफखाना अशीरगडाहून आणिला. त्याबरोबर तो पळून गोंडांच्या किल्ल्यावर अवघड जागीं जाऊन बसला. त्याचे लागावर जातांच तो सडा निघून गढेमंडळाकडे झाडींत पळून गेला.' त्यास पकडला कसा त्याचें वर्णन मनोरंजक आहे तें असें:—'इसफ दहावीसांनिशीं गढेमंडळावर रेवा उतरावयासी गेला, तेव्हां तेथील अधिकाऱ्यांनीं त्यास सांगितलें, कीं तूं सरकारचा गुन्हेगार, तुला उतरोन दिलें तर सरकारचा शब्द लागेल. पूर्वी महंमद इसफानें मुधोजीस मगरूरीचा जबाब सांगून पाठविला, कीं 'तुम्ही माझी कुमक कराल असा भरंवसा होता, ती गोष्ट तुम्हांकडून जाहली नाहीं. साबाजीस मारून तुम्हांस राज्यावर बसविलें, तेव्हां निंमे राज्याचा खावंद मी. दादासाहेब स्थानापन्न झाल्यावर पाहून घेईन. देवाजीपंत तुमचे कारभारी त्यांनीं इतकें केलें. त्यांचेंही पाहून घेऊं.' तेव्हां हा लहान मनुष्य खरा, याचें पारिपत्य केल्यानें सरकारचा व निजामाचा स्नेह वृद्धिंगत होईल, असें समजोन भोसल्यांनीं ताजखान रोहिल्यास त्याजवर रवाना केलें. गढेमंडळावर उतरूं दिलें नाहीं, तेव्हां माघारा शिवणीकडे$ येत असतां वाटेंत ताजखान व इसफ

$ शिवणी गढेमंडळाच्या पश्चिमेस ५० मैल रेल्वे स्टेशन आहे. दुसरें शिवणी गांव हर्द्याच्या पुढचें स्टेशन. हें दुसरें गांव येथें अपेक्षित दिसतें.

यांची गांठ पडली. इसफानें घोड्यावरून उडी टाकून आतां माझी अब्रू वांचीव म्हणून ताजखानाचे पाय धरले. तेव्हां त्यास कैद करून ताजखानानें मुधोजीस लिहून पाठविलें. पण मुधोजीनें आपला विचार बदलला नाहीं.' ही हकीकत नोव्हेंबर आरंभींची आहे. पुढें पटवर्धनांनीं केसोपंत ओकास पाठवून इसफास हरिपंताचे छावणींत धुळें मालेगांवचे बाजूस आणिलें. तेथून पुण्यास पाठविण्याचा विचार होता; परंतु कारभाऱ्यांनीं लिहून पाठविलें, कीं तेथेंच पारिपत्य करावें. त्यावरून पांच पाट काढून, डोईवर शेंदूर तेल घालून, उंटावर बसवून, शेण-मार करून तोफेच्या तोंडीं देऊन उडविला. बरोबर त्याचा मामा दिवाण होता त्यासही तोफेच्या तोंडीं उडविलें, ( २६-११-१७७५ ). याच वेळीं गणेश विठ्ठल वाघमारे नांवाचा पेशव्यांचा एक सरदार पूर्वीं अहंमदनगरास किल्लेदार (मा. रो. ३४२, ३९१, ३९९) असून प्रस्तुत दादांस मिळालेला, महीवरील लढाईंत पाडाव होऊन हरिपंताचे हस्तगत झाला. पुढें हरिपंतानें त्यास बंधमुक्त करून आपले फौजेंत तैनात देऊन जवळ बाळगिलें; परंतु त्यानें बसल्या बसल्या हरिपंताचे फौजेंत इतका कांहीं फितूर केला कीं हरिपंताचे खासगी नोकर सुद्धां त्यानें फितविले. इतकें केल्यावर त्यानें दादास सुरतेस पत्र पाठविलें || कीं, 'वामनराव पटवर्धन देवाज्ञा पावले; आतां येथील सरदार आम्हीं मायेंत मेळविले आहेत. मार्गशीर्ष शु॥ ८ स हरिपंतास दगा करितों. तुम्हीं चाल करून जलद यावें.' ही फितुरी प्रकट झाली. हरिपंतानें गणेश विठ्ठलास शृंखला घालून पट्टा किल्ल्यावर पाठविलें, व इतरांचीं पारिपत्यें केलीं. हरि भिड्याशीं इंग्रजांची वागणूक व गणेश विठ्ठलाशीं हरिपंताची वागणूक हा स्वभावविशेष ध्यानांत ठेवणें जरूर आहे. महंमद इसफाचे बाबतींत बारभाईस मदत केल्याबद्दल नाना फडणीसानें मुधोजीस ता. ३१-१०-१७७५ रोजीं पत्र लिहून त्याचा गौरव केला. ताजखान रोहिल्यास एक हजार रुपयांचा गांव २१-५-१७७६ रोजीं इनाम दिला. ‡ खरगसिंग व तुळया पवार कबजांत येण्यास अद्यापि तीन वर्षांचा अवकाश लागला, त्यांचा उल्लेख पुढें येईल.

---

|| खरे-१४९५, १५००, १५०१, १५०६, १५०७, १५३७, १५४०, १५४१.
‡ स. मा. रो. १-७१.

प्रकरण दुसरें

# मराठशाहीवर इंग्रजांचा पहिला घाला



१. इंग्रजांकडून साष्टी काबीज, अकारण कुरापत (२८-१२-१७७४).
२. दादाचें इंग्रजांकडे प्रयाण. ३. आनंदमोगरीची लढाई.
४. सुरतेचा तह व आडासची लढाई.
५. साबाजीचा वध, बारभाईचें नुकसान.
६. कलकत्तेकर वकील अप्टन याचें पुण्यास आगमन. ७. पुरंदरचा तह.

* * * *

## १. इंग्रजांकडून साष्टी काबीज, अकारण कुरापत (२८-१२-१७७४).

केवळ स्वतःच्या मतलबाकरितां इंग्रजांनीं साष्टी बेट व ठाणें किल्ला अचानक काबीज करून मराठ्यांशीं हातघाईचा प्रसंग कसा बळेंच आणिला त्याची हकीगत आतां येथें सांगण्याची असून, तिजवरून इंग्रजांच्या राजनीतीची त्या वेळेपासूनच चांगली ओळख होईल.

वसई, साष्टी, करंजा वगैरे मुंबईच्या लगतचीं बेटें मराठ्यांनीं सन १७३९ त मोठ्या हिंमतीनें पोर्तुगीझांशीं लढून काबीज केल्याबद्दल मराठ्यांस पराकाष्ठेचा अभिमान वाटे. इंग्रजांची मदत मिळविण्याकरितां तीं बेटें इंग्रजांस लिहून देण्याचें दादासारख्या पेशवाईस हपापलेल्या स्वार्थसाधूच्या देखील अगदीं जिवावर आलें. या प्रदेशाचा इंग्रजांस भारी लोभ होता. त्या भागाचें उत्पन्न तर मोठें होतेंच, पण त्यापेक्षां देखील पश्चिम किनाऱ्यानें हिंदुस्थान आक्रमण करण्यास या प्रदेशाचा त्यांस फार उपयोग होता. शिवाय मुंबईस प्रत्येक जिन्नस या टापूंतून आणावा लागे. कैक वर्षें इंग्रजांनीं हीं बेटें आपल्यास मिळावीं म्हणून अतोनात खटपटी केल्या. याच हेतूनें त्यांनीं पुण्यास मॉस्टिनसारख्या उपद्व्यापी माणसाची योजना केली होती. नारायणरावाचा खून झाल्यावर हवी असलेली संधि त्यांस मिळाली व ती आतां फुकट जाऊं न देण्याचा त्यांनीं निश्चय केला. सन १७७४ च्या ऑक्टोबरांत दादा तापीवर पोंचला व बारभाईंशीं त्याचा समेट होऊन मराठ्यांची आपसांतील दुही संपणार असा रंग

दिसूं लागतांच मॉस्टिन पुण्याहून ताबडतोब मुंबईस गेला आणि तेथें ठाण्यावर लगोलग हल्ला करण्याची तजवीज त्यानें केली. वास्तविक इंग्रजांचीच ही आगळीक होती; पण तिलाहि त्यांच्या राजनीतीनें एक अजब कारण हुडकून काढिलें. पोर्तुगालाहून नवें आरमार गोव्यास आलें होतें. त्याच्या साह्यानें वसई, वगैरे आपलीं पूर्वींचीं ठिकाणें पुनः जिंकून घेण्याचा पोर्तुगीझांचा उद्देश आहे अशी आपणांस खात्रीची बातमी लागल्याचें इंग्रजांनीं उठविलें. आणि त्या टापूंचें रक्षण ज्याअर्थीं मराठ्यांच्या हातून होणें शक्य नाहीं त्याअर्थीं तो पोर्तुगीझांच्या हातीं जाऊं देण्यापेक्षां आपल्याच ताब्यांत ठेवणें बरें असा मानभावीपणाचा डौल आणून, त्याप्रमाणें अंमलांत आणण्याचें इंग्रजांनीं ठरविलें. या बाबतींत पोर्तुगीझांनींहि त्यांचा पुष्कळ निषेध केला. प्रथम इंग्रजांनीं ठाण्याच्या किल्लेदारास लांच देऊन फितविलें; पण त्याची बातमी पुण्यास लागतांच त्याचा बंदोबस्त झाला. ता. १२ दिसेंबर रोजीं इंग्रजी फौज खुष्कीच्या व जलमार्गानें ठाण्याकडे रवाना झाली, म्हणून तिचा प्रतिकार करण्याविषयीं ता. १५ पासून दररोज पुण्यांतून हुकूम सुटूं लागले.† 'मुंबईकर इंग्रज लढाऊ सामान आरमार सुद्धां साष्टीस येऊन बसला आहे, तर त्याचे बंदोबस्तास विसाजी कृष्ण, जानराव व आनंदराव धुळप, त्रिंबक विनायक सरसुभा, विसाजी केशव लेले, अशा अनेक मोठमोठ्या इसमांस ताबडतोब पाठविण्यांत आलें; आणि बाणकोट वगैरे इंग्रजांचे ताब्यांतील इतर स्थळें हस्तगत करण्याचा बारभाईंनीं उद्योग चालविला. मोरो बापूजीनें इंग्रजांचा बाणकोट किल्ला घेण्याचा प्रयत्न केला, त्यास रायगडाहून मदत आली; आणि त्या बाजूनें होणारी इंग्रजांची पैदास सर्व बंद करण्यांत आली. मुंबई, बाणकोट, सुरत वगैरे ठिकाणीं इंग्रजांचे चाकरीस जे लोक गेले असतील, त्यांचा पत्ता लावून, त्यांचे घरांची व जिंदगीची ताबडतोब जप्ती करण्यांत आली.‡ 'टोपीकरांचें पारिपत्य चांगलें करावें, त्यांचे पाल कबजा करावे, आगी लावाव्या, मुंबईंत उतरून मुंबई जाळून फस्त करावी. म्हणजे लूट माफ व बक्षीसही खेरीज मिळेल.' धुळपांस व आंगऱ्यांस हुकूम § गेले कीं 'तुम्ही एकत्र होऊन मुंबईंत उतरून शहर

† स. मा. रो. २. ४१६–४१९. ‡ स. मा. रो. २. ४४३, ४४७.
§ इ. वृ. १८३३, पृ. ११८.

जाळून फस्त करणें. मेहेनत करून चाकरी करून दाखवावयाचे दिवस हेच आहेत. शत्रूचें पारिपत्य करावयाचा असा समय दुसरा नाहीं,' असे पुण्यांतून सर्वत्र बाहेर हुकूम गेले. यावरून साष्टीसंबंधीं केवढा अभिमान पुणेकरांस वाटत होता त्याची कल्पना होते: परंतु धुळपाची व इतर ठिकाणची मदत ठाण्यास पोंचण्यापूर्वीच इंग्रजांनीं ता. २८-१२-१७७४ रोजीं तो किल्ला व करंजा वगैरे लगत्याचीं बेटें हस्तगत केलीं, तेणेंकरून सालिना चार लाख वसुलाचा प्रदेश इंग्रजांस मिळाला. लगोलग ही बातमी मुंबईकरांनीं कलकत्त्यास कळविली. किल्लेकऱ्यांनीं हिंमत धरून इंग्रजांचे पुष्कळ लोक मारून काढिले. चार अंमलदार व दोनचारशें माणसें ठार झालीं. रामाजी महादेवाचा पुत्र आनंदराव बाहेर होता तो शिताफी करून पांचशें लोकांनिशीं किल्ल्यांत गेला; पण उपयोग झाला नाहीं.† साष्टीचा बखरकार म्हणतो, 'इंग्रजांनीं मुंबईहून पलटणें आणून ठाण्याचा किल्ला सर करून घेतला, त्या समयीं आनंदराव सुभेदार यांनीं मोठी लढाई दिली. किल्ल्यांतील फौज सारी पडली. त्यांपैकीं आनंदराव सुभेदार व एक हवालदार असे राहिले होते. पैकीं हवालदार यांस कप्तानसाहेब यांनीं गोळी घालून मारलें, व विसाजीपंत कळव्यास फौजेनिशीं होते त्यांनीं फितूर होऊन वायबार केले व किल्ल्याच्या मैदानांत घरबंदी होती यामुळें आंतील फौजेचा इलाज चालला नाहीं. यामुळें किल्ला हस्तगत झाला, व दुसरे किल्लेही इंग्रजांनीं सर करून घेतले. आनंदराव सुभेदार यास मुंबईस नेऊन, त्याच्या सन्मानार्थ तोफा वगैरे मारून व गव्हर्नरसाहेब त्यास सामोरे जाऊन, मोठा मान देऊन मुंबईंत ठेविला. नंतर श्रीमंताकडून पत्र आल्यावर त्यास पुण्यास रवाना केलें.' (पृ. २१).

इकडे साष्टींत इंग्रजी अंमल झाला. त्या वेळेस कितीएक आपलीं घरेंदारें टाकून अणजुरास व दुसरीकडे गेले. इंग्रज सरकारानें जाहिराती लावल्या कीं, जो वतनदार असेल, त्यानें वतनावर हजर व्हावें. नंतर साष्टीचे पाटील $ हजर झाले. हें वर्तमान श्रीमंतांकडे गेलें व सरपाटील हे इंग्रजांस फिलाफी झाले, तेव्हां पाटील यांजपासून ७००० रुपये दंड घेण्याविषयीं हुकुम आल्यावरून

† फारेस्ट पृ. २०४-२०८; ख. ले. १४२१-१४३०, १४३२, १४४०.

$ हे पाटील गंगाजी नाइक अणजूरकरांचे वंशज (पहा मध्यविभाग १, पृ. २९२). हा वंश अणजूर, जिल्हा ठाणें, येथें हल्लीं नांदत आहे. त्यांची

मामलेदार यांनीं सर पाटील यांजपासून ७००० रुपये दंड घेतला व वतन घेतलें. पुढें श्रीमंतांकडे जाऊन साष्टीविषयीं विनंति केली. तेव्हां श्रीमंतांनीं सांगितलें कीं, " तुम्ही वतनदार कां हुजर झालां ? तें राज्य आपण घेऊं." पुढें साष्टीचेबद्दल महादजी सिंदे यांस मध्यें घालून नऊ लक्षांचा तिप्पट मुलुख सिंद्यांस देऊन मुंबईच्या लगत साष्टी तीन लक्षांची इंग्रज यांनीं ठेविली.

वसई खाडीच्या मुखाशीं एक इंग्रजी जहाज मराठ्यांनीं जाळिलें. तसेंच यापुढें इंग्रजांवर पुणेकरांचा बेभरंवसा होऊन फ्रेंच व डच यांच्याशीं पुण्यांतून कारस्थानें चालू लागलीं. बारभाईनीं आपल्या प्रयत्नांची अगदीं शिकस्त करून सोडली. नारो आपाजी व हरिपंत फडके हे अत्यंत हिंमतीनें एक एक अडचण निवारीत चालले होते. नारो आपाजीनें फेब्रुवारींत पुरंदरास कळविलें कीं, विसाजी कृष्णास तूर्त महिनाभर कल्याण पारसिकपावेतों टेहळणीस ठेवावें. त्याचप्रमाणें विसाजी केशव, आप्पाजी हरि, शिवाजी विठ्ठल या सर्वांस निक्षून लिहावें कीं, इंग्रजांस दहशत पडेल अशी हरएक तरतूद करावी.' हा नारो आप्पाजी यानंतर लवकरच ता. ६-३-१७७५ रोजीं एकाएकीं वारला. त्याचें जीवनचरित्र पूर्वीं आलें आहेच. अपराध्यास झालेली शिक्षा अमलांत आणण्याचें काम पुण्यास याजकडे असे.

खालील वंशावळ व वतनाचे कागद प्रस्तुतचे वंशज श्री. दिवाकरभाई नाईक यांनीं सद्भावानें दिलेले पाहतां या घराण्याचा मराठशाहीस मोठा उपयोग झालेला दिसतो.




गंगाजीस पेशवे बाळाजी बाजीरावानें वसईच्या कामगिरीबद्दल पालखी करून दिली. त्याचा भाऊ नारायणजी हा साधुवृत्तीनें राहत असे. त्याजवर महादजी सिंद्याचा परम लोभ असून, महादजी सन १७९२ त पुण्यास आला तेव्हां त्यानें विठोबा अणजूरकरास भेटीस आणून, त्यांचें इंग्रजांनीं हस्तगत केलेलें वतन परत द्यावें, अशी खटपट कलकत्त्यास केली.

इंग्रजांकडे या वेळीं कित्येक जहांबाज माणसें होतीं हें निर्विवाद आहे. प्रत्यक्ष ग. ज. हेस्टिंग्स प्रचंड कारस्थानी, वाटेल त्या उपायांनीं आपला पगडा हिंदुस्थानांत बसवीत होता. मुंबईचा गव्हर्नर हॉर्नबी व सेनापति गॉडर्ड हे आपल्या राष्ट्राची सेवा एकनिष्ठेनें करणारे होते. पुण्यांत राहून कारस्थानें रचणारा मॉस्टिन धाडशी व न्यायान्याय गुंडाळून ठेवणारा असून खंबायतचा मॅलेट या कारस्थानांत अनुभव मिळवीत होता. मॉस्टिन आमचे दरबारीं नको, म्हणून नाना फडणिसानें वाटेल तितकें इंग्रजांस सांगितलें, पण त्याची बदली झाली नाहीं. प्रथम ऑक्टोबर १७७२ पासून सुमारें दोन वर्षें, व पुनः मार्च १७७७ पासून ता. ६-७-१७७८ पावेतों मॉस्टिन पुण्यांत होता. मध्यंतरीं जानेवारी १७७६ पासून मार्च१७७७पर्यंत अप्टन होता. तळेगांवच्या मोहिमेवर मुंबई फौजेबरोबर येत असतां मॉस्टिन ता. १-१-१७७९ रोजीं आजारानें मरण पावला. त्यानें स. १७७३ त एक घोडा पुणें येथें खरेदी केला, त्यास पुण्यांतून जकात माफ करण्यांत आली. तसेंच प्रथम मुंबईस जातांना रूपानायकीण इजपासून त्यानें मुसलमानाची पोरगी २५० रु. स विकत घेतली, त्याचीही जकात त्यास माफ करण्यांत आली. ‡ स. १७७५ चे ऑगस्टांत मॉस्टिनास मुंबईस भात पाठवावयाचें होतें, त्याची जकात माफ करून व कांहीं इंग्रज कैदी पकडलेले होते ते सोडून मुंबईकरांची मर्जी संभाळण्याचा प्रयत्न बारभाईंनीं बराच केला, पण त्याचा उपयोग कांहीं झाला नाहीं. मॉस्टिन, मॅलेट वगैरे इंग्रज एतद्देशीयांचे दरबारीं स्वतःच्या रक्षा ठेवून मिजासीनें राहत ही गोष्ट सामाजिक दृष्टीनें ध्यानांत ठेवण्याजोगी आहे.

स. १७७५ च्या आरंभापासून पुढील राजकारणास अगदीं निराळें वळण लागलें. सवाई माधवरावाच्या जन्मानें दादा बंडखोर ठरला; आणि त्यास केवळ मतलबासाठीं इंग्रजांनीं आश्रय दिला, याबद्दल सेयर मुताखरीनसारख्या तत्कालीन परकीय लेखकांनीं सुद्धां इंग्रजांस दोष दिला आहे.

स. १७८० त तो म्हणतो, पुणें दरबारानें दादास पेशवेपदावरून काढून दिल्यावर त्यास इंग्रजांनीं सुरत येथें आश्रय दिला, ही कांहीं आश्चर्याची गोष्ट नाहीं. अशा घरभेद्या लोकांस आश्रय देऊनच त्यांनीं हिंदुस्थान पादाक्रान्त

‡ स. म. रो. ४१४-४१५, ४५२-४५४. मुंबई सेक्रटरियट संग्रहांत यास्टिनची रोजनिशी आहे.

केलें. ( भा. ३ पृ. ९३ ). अहल्याबाई सुद्धां म्हणते कीं, इंग्रजांना चहूंकडून प्रसार करावयाचा मनसबा केला आहे.$ पेशवाईतल्या या बखेड्याचा उपयोग आपला सडकून फायदा करून घेण्याकडे करावा, असा निश्चय पुण्याचा मॉस्टिन, खंबायतेचा मॅलेट, सुरतेचा गॅबियर व मुंबईचा हॉर्नबी यांनीं संगनमतानें केला, असें दुसरा एकजण म्हणतो. यावरून असें म्हणावयास हरकत नाहीं कीं, स. १७७५ आरंभापासूनच मराठ्यांचें खरें युद्ध सुरू झालें. हेस्टिंग्सच्या काउन्सिलांत तंटे असल्यामुळें इंग्रजांचे कारस्थानास त्या वेळीं तितका जोर आला नाहीं. नाहीं तर याच वेळीं इंग्रजांनीं आपली सार्वभौम सत्ता इकडे चालू केली असती. गायकवाड, हैदर, कोल्हापुरकर छत्रपति वगैरे पेशव्यांवर रुष्ट असलेले कित्येक इसम दादास मदत करण्याच्या बुद्धीनें बारभाईविरुद्ध वागूं लागले.

**२. दादाचें इंग्रजांकडे प्रयाण,‡** ( डिसेंबर १७७४ ).—नारायणरावाचे वधापासूनच दादाचें सूत मॉस्टिनकडे होतें. गंगाबाईच्या नांवानें पुरंदरावर कारभार सुरू झालेला कळतांच दादानें मॉस्टिनकडे पुण्यास आपलीं माणसें पाठवून पैसा व फौज यांची मागणी केली; परंतु इंग्रजांचा पेशा लोकांकडून पैसे काढण्याचा होता, लोकांस पैसे द्यावयाचा नव्हता. सबब त्यांच्या मागणीकडे प्रथम त्यांनीं लक्षच दिलें नाहीं. त्यानंतर सिंदे होळकर आपणांस मदत करीत नाहींतसे पाहून स. १७७४ च्या सेप्टेंबरांत सुरतचा इंग्रज अधिकारी रॉबर्ट गॅबियर ( गंभीर ) याजकडे दादानें वकील पाठवून फौजेची मदत मागितली. ही विनंति मान्य केल्यापासून आपणांस पश्चिम किनाऱ्यावर पुष्कळसा नवीन प्रदेश हस्तगत करून मराठशाहीवर शह बसवितां येईल, अशा विचारानें इंग्रजांनीं आपली २५०० फौज दादाचे मदतीस पाठविण्याचें कबूल करून त्याबद्दल अशा अटी कळविल्या,--

१ प्रथम खर्चासाठीं १५।२० लाखांची रक्कम दादानें रोख इंग्रजांपाशीं ठेवून द्यावी; २ मुंबईजवळचीं साष्टी व वसई वगैरे बेटें इंग्रजांचे स्वाधीन करावीं; ३ भडोच व सुरत परगण्यांतील पेशव्यांचे मुलखाचा वसूल इंग्रजांस कायम तोडून द्यावा; आणि ४ इंग्रजांस दिलेल्या मुलखास पुनः केव्हांही खलेल करणार नाहीं अशी कबुलायत लिहून द्यावी. या मागण्या घेऊन दादाचा

$ म. द. बा. पृ. ३४ व ख. २६०३. ‡ खं. १०,८७–१५० व बसूकृत ख्रिस्ती सत्तेचा उदय.

वकील सुरतेहून परत गेला, परंतु मध्येंच तो आजारी वगैरे पडल्याकारणानें वरील मागण्यांस दादाचा जबाब लगोलग इंग्रजांकडे गेला नाहीं. मागाहून दादानें जबाब पाठविला कीं, 'साष्टी वगैरे बेटें देण्याचें आम्हांस बिलकूल मान्य नाहीं. बाकीच्या गोष्टी कबूल आहेत.' कोणत्याही प्रयत्नानें मुंबईजवळचीं बेटें हस्तगत करावीं, अशी युरोपांतून मुंबईकर इंग्रजांस कैक वर्षें सारखी टोंचणी लागलेली होती. त्यावरून पुनः मुंबईकरांनीं दादाचे वकिलास नवीन अटी सुचविल्या व त्या त्यानें मान्य केल्या त्या अशा,—सुरतेजवळचा सालीना १८ लाख उत्पन्नाचा मुलूख दादानें इंग्रजांस द्यावा; तसेंच प्रथम सहा लाख रु. रोख व पुढें दरमहा दीड लाख खर्चासाठीं द्यावे. हीं व पहिलीं किरकोळ कलमें दादानें मान्य केलीं; पण तीं पुरेपूर पदरांत पडल्याशिवाय इंग्रज फौज जागची हालेना. तेव्हां वरप्रमाणें रकमेची भरती करून दादाचा वकील जात असतां त्यास हरिपंतानें अचानक पकडून कैदेंत ठेविलें; परंतु त्यापूर्वींच इंग्रजांचा करार पुरा झालेला असल्यामुळें, आणि आतांच निसटून न गेल्यास आपण हरिपंताचे हातीं खास पडूं, अशी भीति वाटून, १७७४ डिसेंबरचे आरंभींच हरिपंतास चुकवून दादा खानदेशांतून इंग्रज फौज सामील करून घेण्यासाठीं एकदम सुरतेकडे निघाला. वाटेंत आपले फौजेंत फितूर असल्याचें त्याचे नजरेस आलें. त्याबरोबर फितुरलेल्या लोकांस तसेच सोडून आणि अगदीं जिव्हाळ्याचे असे थोडे लोक बरोबर घेऊन दादा पुनरपि नर्मदेपार माळव्यांत गेला; आणि तेथें आसन्नप्रसव आनंदीबाईस धारेस ठेवून तेथून थेट पश्चिमेस पंचमहालांतून स. १७७५ च्या जानेवारींत गुजराथेंत उतरला. दादास आपल्याकडे आणण्याचा इंग्रजांचा कावा फार गुप्तपणें चालला; आणि त्यास आळा घालण्याचें सामर्थ्य बारभाईंत नव्हतें. या वेळीं इंग्रजांनीं दादास साह्य करण्याचें अंगावर घेतलें नसतें तर हिंदुस्थानांत त्यास कोठेंही मजबूद थारा मिळण्याचा संभव नव्हता.

दादा आतां आपल्या कबजांत पूर्ण आला अशीच हरिपंताची खात्री होती. 'दादा भितात, तुम्ही दूर असावें, मोठी फौज घेऊन जवळ येऊं नये,' असें सिंदे होळकरांनीं हरिपंतास बजावलें असल्यामुळें तो जरा दूर होता. इतक्यांत डिसेंबरांत हरिपंतास सिंदे होळकरांनीं लिहिलें, 'श्रीमंत पळूं लागले, तुम्ही सत्वर येणें. आम्ही थोडके आहों. तुम्ही आलां म्हणजे गांठ घालूं.' वास्तविक

दादास अडविण्याची ताकद सिंदे होळकरांस होती; परंतु दादास पकडण्याचें अपेश आपल्या माथीं नको, असें वाटून त्यांनीं कुचराई केली. यापूर्वींच दादाचा हस्तक राजाराम गोविंद यानें भेलशास जाऊन मोठा दंगा केला, त्याचें पारिपत्य सरकारांतून केलें. १५ डिसेंबर रोजीं दादा नर्मदेवर व हरिपंत तापीवर एवढें उभयतांत अंतर राहिलें. याबद्दल पटवर्धनांचा कारकून पांडुरंगरावास लिहितो,--'उभयतां सरदारांचें कृत्रिम परिच्छिन्न दिसलें. वामनराव पटवर्धन व हरिपंत लगोलग पाठीवर गेले. श्रीमंत नर्मदा उतरोन घाट चढोन धारेस गेले. गोपाळराव बऱ्यांचे विद्यमानें रोहिल्यांकडे जाण्याचा विचार आहे. डेरे वगैरे सामान वाटेनें टाकीतच गेले. मालोजी घोरपडे, लक्ष्मणराव पाटणकर, माने हे सरदार फुटून आले. मानाजी फाकडे, सखाराम हरि, आबाजी महादेव व सदाशिव रामचंद्र एवढे बरोबर आहेत.'

ता. २६-१२-१७७४ चें वर्तमान† "आनंदीबाई नर्मदेजवळ होती तीस घेऊन दादा धारेच्या रोखें उज्जनी उजवी टाकून गेले. त्यांस अडविण्याकरितां सिंदे होळकर सडे होऊन इंदुराकडून गेले. मागें १९ डिसेंबर रोजीं निजाम व कारभारी यांच्या भेटी झाल्या. त्यांस घेऊन हे नर्मदेपावेतों गेले. 'गुजराथेंत गोविंदराव गायकवाड दादाचे लक्षांत वागत होता, त्याची व फत्तेसिंगाची लढाई होऊन फत्तेसिंग कायम राहिला. भोसल्यांकडेही साबाजीची जरब मुधोजीवर आहे. साष्टीस इंग्रजांनीं मोर्चे लाविले आहेत. विसाजी केशव, बिनीवाले, शिवाजी विठ्ठल वगैरे साष्टीच्या मदतीस गेले आहेत.' अशीं अनेक नवीन कारणें उपस्थित झालीं, त्यांचा उल्लेख पुढें करावा लागेल.

ता. ८-१-१७७५ चें वर्तमान. 'खानदेशांत तारखेडयाचे माधवराव बांडे दादास सामील होते, त्यांनीं खरगसिंगास आश्रय दिला. तें ठाणें कारभाऱ्यांचे फौजेनें तोफ चालवून काबीज केलें. आतां पुढें जाण्यांत हांशील नाहीं असें समजून कारभारी परत बऱ्हाणपुराकडे आले. दादांनीं पवारांकडून धारेचें ठाणें मागोन घेऊन तेथें बंदोबस्त करून गरोदरपणाचे कारणानें आनंदीबाईस ठेविली. सिंदे होळकर पुढें गेले. गुरुजीही त्यांसमागमें होते. त्यांनीं पत्रें आल्यावरून हरिपंतही जलद जाऊन सरदारांस भेटले. दादांस हें वर्तमान कळतांच

† ख. १४१२, १४२१, १४२८, १४३०.

हिंदुस्थानचा रोख सोडून पावागडच्या मार्गे गुजराथेंत गेले. पाठीवर उभयतां सरदार व हरिपंत गुरुजीसह गेले. सुजाउद्दौल्याकडे जावें तरी पल्ला लांब, याजकरितां इंग्रजांचे राजकारणावरून गुजराथेंत गेले. ते सडे व आम्हांबरोबर तोफा, म्हणून गांठ पडत नाहीं. आज महिना सवा महिना दरमजल चालत आहोंत. श्रीमंत आम्हांपुढें ठरोन राहत नाहींत. आपल्यास काय करतील न कळे, हें भय धरून गोविंदराव गायकवाडाचे आश्रयास गेले. सिंदे होळकर त्यांस फितूर आहेत, म्हणून फडशा होत नाहीं. महीच्या तीरीं लढाईचें तोंड लागणार, इतक्यांत दादांस सूचना मिळून ते अमदाबादेकडे पळून गेले. फौजाहि मागें चालल्या. पुनः त्यांनीं महीचा घांट धरिला. फौजा तयार होऊन त्याजवर जाणार, तों त्यांजकडून आबाजी महादेव व सदाशिव रामचंद्र बोलीस आले, त्यामुळें सल्ल्यावर मसलत पडली. इकडील फौजा व माणूस फारच आहे. परंतु आंवळ्यांची मोट, त्यांत धन्याचा दाब नाहीं. हरिपंत मात्र कारस्थानीस चुकत नाहींत.' (ता. ५-२-१७७५). || ता ६-२-१७७५ चें सखारामबापूचें पत्र स्वारींतून पुण्यास उपलब्ध आहे, तें असें:—

"राजश्री नारोपंत नाना (तुळशीबागवाले) स्वामीचे सेवेसी विनंति उपरी छ ५ जिल्हेजचीं हरिपंताकडील पत्रें आलीं. होळकराचे विद्यमानें सला होत होता. वरकड करार झासी द्यावी हें ठरलें. शेवटीं तीस लाख रुपये सिबंदीस द्यावे हें काढिलें. तेव्हां सर्वांचे मतें जालें कीं, मही उतरून सडे होऊन जावें. त्यास बुनगे बडोदियास ठेऊन हे सडे जाले. नदी उतरून जाणार इतकें लिहिलें आलें. या उपरी सल्ला होऊन काम जालें तरी जालें. नाहीं तरी कजिया होईल, तुम्हांस कळावें. या उपरी डांकही बसत आली. वर्तमान वरिचेवरी येईल. सावकारींत वर्तमान येत असलें तरी समाचार घेत जावा हे विनंति. $

दादा गुजराथेंत निसटलेले ऐकून कारभारी तापी तीरावरून परत पुरंदरास आले; आणि पुढें पेंच वाढत जाणार त्याच्या तजविजीस लागले. त्यांनीं निजामशीं स्नेह दृढ करण्याकरितां त्यास ता. १५-१-१७७५ रोजीं पुरंदरास भेटीस आणिलें. डेऱ्यास भोजनास आणून वस्त्रें जवाहिर देऊन बहुमान केला;

|| खरे लेखांक १४४३. $अप्रकाशित. रा. स. ग. जोशी यांजकडून.

आणि त्याचें सख्य राखण्याकरितां दौलताबादचा किल्ला त्यानें मागितला तो त्यास दिला.$ दौलताबादेस तोतया अटकेस होता. त्यास मिरजेस पाठविलें. याच सुमारास म्हणजे जानेवारी १७७५ त शुजा उद्दौल्याचा त्याचे राजधानींत खून झाला. 'एका रोहिल्याच्या लेकीस घरांत घालून जुलूम जबरदस्ती करतांच तिनें कट्यार चालवून मारिला.† आपणही पोटकट्यारी करून मेली. अशा प्रसंगांत दहा हजार मराठी फौज हिंदुस्थानांत जाती तर बादशाही बंदोबस्त व मराठ्यांचा अंमल तिकडे पक्का झाला असता.' शुजाउद्दौला हुशार व पूर्वपरंपरा जाणणारा होता. त्याचे पश्चात् इंग्रजांनीं घरांत शिरून त्याचें सर्व घर पोकळ केलें.

धारेस खंडेराव पवार याचें अंतःकरण दादाचे बाजूस होतें म्हणूनच तेथें आनंदीबाईची सोय झाली. तेथें ता. १०-१-१७७५ रोजीं तिला पुत्र झाला, तोच बाजीराव होय. मातेच्या गर्भारपणचे संस्कार संततीवर होत असतील तर अकबर, शिवाजी व बाजीराव यांचीं उदाहरणें तुलनेकरितां ठळकपणें मनांत भरतात. शिवाजी बाजीरावांनीं राज्याच्या प्रचंड घडामोडी केल्या. एकानें राज्य स्थापिलें, दुसऱ्यानें घालविलें. पवारांचे दिवाण ओढेकर बारभाईंच्या पक्षांत होते, त्यांनीं लढून पुढें आनंदीबाईस हस्तगत केलें, तो प्रकार यथा-स्थलीं सांगण्यांत येईल.

लांब लांब मजला मारीत पळून जाण्याची दादाची बरोबरी करणारा दुसरा कोणी झाला नाहीं. म्हणून त्यास राघो भरारी हें टोपणनांव मिळालें. मराठमंडळाची त्या वेळची स्थिति आंवळ्याची मोट बांधण्यासारखी होती हें तत्कालीन लेखकांचें मत अत्यंत विचारणीय आहे. इंग्रजांची मदत घेतल्यानें मराठी राज्य खास बुडेल हें दादा पक्कें जाणून होता. त्याच वेळीं ठाण्याचा किल्ला इंग्रजांनीं घेतलेला पाहून तो इंग्रजांची मदत घेण्यास अत्यंत नाखूष होता. जिवावरच बेतलेली पाहून तो इंग्रजांचे आश्रयास गेला. धारेस गेल्यावर पुढें त्यास तसेंच उत्तरेंत भटकूं दिलें असतें, तर तो इतक्या तांतडीनें इंग्रजांचे हातांत गेला नसता. बारभाई त्याचे हाल करणार नव्हते. पण दादास त्यांचा भरंवसा येईना. सिंदे होळकरांची भावना हरिपंतासारखी असती तर त्यास तापीवरून निसटून

---

$ ख. १४३३, ३५. स. मा. रो. ३३१–३३४. † कोटेकर गुळगुळे दप्तर.

जातां आलेंच नसतें. कारभाऱ्यांस हें खूळ दक्षिणेंत नको होतें. सिंद्यांस हिंदुस्थानांत नको होतें. अशा भिन्न भावनांमुळें तो आयताच गुजराथेंत वाट सांपडली तिकडे इंग्रजांचे हातांत पडला, तेव्हां मात्र सर्व सरदार मंडळी चपापली. या वेळीं कारभाऱ्यांनीं एक जाहीरनामा काढून सर्व लोकांस व शत्रुमित्रांस आपल्या उद्देशांची योग्य समजूत दिली असती, तर हें प्रकरण मिटण्याचा संभव होता. नाना फडणिसानें अनेक अडचणींतून राज्याची निभावणूक केली, तरी ती केवळ तात्पुरती होती. सिंदे होळकरादि सरदारांसच बारभाईत समाविष्ट करून नानानें स्वतःचें प्रमुखपण जरा कमी केलें असतें तर मध्यवर्ती कारभारावर लोकांचा भरंवसा बसला असता. बारभाईच्या कारभाराबद्दल मराठमंडळांत अविश्वास उत्पन्न होऊन प्रत्येकाचें तोंड वेगळ्या दिशेस कां झालें आहे आणि त्याची एकवाक्यता कशी करावी, यासंबंधानें नानानें विशिष्ट इलाज योजिल्याचें आढळत नाहीं. सिंदे होळकर कुचराई करीत, प्रत्यक्ष पुरंदरावर बजाबा पुरंदरे व मोरोबा उघड रीतीनें दादास सामील; गायकवाड व भोसले घरगुती भांडणांत गुरफटलेले, आणि पुण्यास इंग्रजांचा मॉस्टिन, सुरतेस गंभीर व खंबायतेस मॅलेट डोळ्यांत तेल घालून आपला कावा साधण्यास टपलेले, अशी ही बिकट परिस्थिति होती.

तापीवर सर्व मुत्सद्दी सहज एकत्र जमले होते, त्या वेळीं राज्यव्यवथेची वाटाघाट त्यांच्यांत व्हावयास पाहिजे होती; पण चारचौघांनीं एकत्र खुल्या दिलानें उघड बोलणें केल्याचें एकही उदाहरण पेशवाईत आढळत नाहीं. त्या त्या वेळीं प्रमुख मानल्या जाणाऱ्या एकेका व्यक्तीच्याच अकलेवर सर्वांनीं मदार ठेवलेली दिसते. एकाच्या मुत्सद्दीपणानें दगा दिला कीं राज्याच्या सबंध इमारतीलाच धक्का पोंचावयाचा, असें जिकडे तिकडे सांपडतें. असो. तूर्त येथें गायकवाडांचा गृहकलह, भोसल्यांचा तंटा, वगैरे गोष्टींचा खुलासा आधीं करावयास पाहिजे.

**३. आनंदमोगरीची लढाई, (१७-२-१७७५), दादाचें पलायन.**—दमाजी गायकवाडाचे मृत्यूनंतर त्याच्या मुलांस माधवरावानें जरब दाखवून गोविंदरावास सरदारीचीं वस्त्रें देवविलीं हें मागें सांगितलेंच आहे.§ 'भावा-

§ म. वि. ४, पृ.१५४ व ३६५.

भावांत कलह करून सरंजामांत बखेडा कराल हें कार्यास नये; तरी सरकारांतून जप्ती करावयास माणसें पाठविलीं आहेत. तुम्ही त्यांचे स्वाधीन सर्व करून देखतपत्र हुजूर येणें. गोविंदरावही येथें आहेत. तुम्हीं सारे बंधूंनीं येथें यावें; ज्यांची जशी योग्यता असेल तशी आज्ञा केली जाईल. दौलतींत बखेडा कराल, तरी कार्यास येणार नाहीं, व वांकडी गोष्ट सांगाल त्याचें फळही समीप आहे. मुलाहिजा होणार नाहीं. आपलें बरें करून घ्यावें अशी इच्छा असली, तरी सयाजीराव व तुम्ही जलद हुजूर येणें. आज्ञा अमान्य केल्यास पारिपत्य होईल.' असें हें जळजळीत आगीचें व निस्पृहपणाचें पत्र ¶ माधवरावानें फत्तेसिंग गायकवाडास ता. २१-१२-१७६८ चें लिहिलेलें पाहतां, त्याची शिस्त किती कडक होती तें दिसतें. गोविंदरावास सरदारी मिळून वर्षसहा महिने लोटले तरी नजराणा व खंडणी मिळून त्यानें द्यावयाच्या पन्नास लाखांची भरती होईना. पुढें फत्तेसिंग पुण्यास आला. तेथें रामशास्त्री यांचेमार्फत गोविंदराव व सयाजीराव यांचे हक्काचा निवाडा करण्यांत आला.$ फत्तेसिंगानें नजराण्याची सर्व रक्कम देऊन वहिवाटीप्रमाणें चाकरी करण्याचें कबूल केल्यावरून माधवरावानें 'सेनाखासखेल' पद व सरदारीचा मान गोविंदरावाकडे कायम ठेविला, आणि त्यानें तीन लाखांची जहागीर घेऊन पुण्याजवळ दावडी येथें राहवें असें ठरविलें. फत्तेसिंगास 'सेनाकर्ते' पद देऊन वडील बंधु सयाजी याचा मुतालिक म्हणून सन १७७१ त बडोद्याच्या सरदारीवर बसविलें. कर्नाटकच्या स्वारींत फत्तेसिंगानें चांगलें काम करून माधवरावाची शाबासकी मिळविली होती. गोविंदरावहि दावडीस स्वस्थ होता; परंतु पूर्वीपासून गोविंदरावाचा ओढा दादाकडे असल्यामुळें नारायणरावाचे मृत्यूनंतर दादास पेशवाई मिळाली, तेव्हां त्यानें पुनरपि उचल घेतली. सन १७७३ चे अखेरीस दादानें गोविंदरावास सेनाखासखेली देऊन फत्तेसिंगाशीं लढण्यास गुजराथेंत पाठविलें. तेथें चुलता खंडेराव यानें गोविंदरावाचा पक्ष घेतला. पुण्यांतून निघाल्यावर गोविंदराव फौज जमवीत खानदेशांतून गुजराथेंत उतरून आपला अंमल बसवीत बडोद्यापावेतों गेला. मागाहून दौलतराव नांवाच्या दुसऱ्या एका सरदारास दादानें गोविंदरावाच्या मदतीस ता. ८-१-१७७४ रोजीं गुजराथेंत पाठविलें.|| फत्तेसिंगानें या वेळीं निकरानें सामना करून आपली बाजू राखिली.

---

¶ पे. द. पृ. १९८. $ डफ. || स. मा. रो. १२०८.

गोविंदरावानें आपल्या उद्योगाचें तपशीलवार वर्णन रघुनाथरावास लिहून कळविलें तें का. सं. प. या. १२० व १३१ या लेखांकांत वाचावें. हीं पत्रें पंत-प्रधान या नात्यानें राघोबादादास लिहिलेलीं आहेत हें ध्यानांत धरावें. ले. १२० ची तारीख ६-२-१७७४ असून ले. १३१ ता. १-४-१७७४ च्या सुमाराचा आहे. रघुनाथराव पळून इंग्रजांकडे गेला तेव्हां फत्तेसिंगाशीं लढून गोविंदराव गुजराथेंत अंमल बसवीत होता; आणि फत्तेसिंगाचा पाठपुरावा बारभाई करीत होते. नारो शंकरानें फत्तेसिंगाचे मदतीस गुजराथेंत फौज पाठविली, तिला दादाच्या तर्फेनें दौलत बाबूरावानें|| अडथळा केला. हें का. सं. प. या. ले. ५२ वरून उघड होतें. हें पत्र १ जूनच्या सुमाराचें आहे. पुढें नारो आनंदराव याचे हाताखालीं बारभाईनीं फत्तेसिंगाचे मदतीस आणखी फौज पाठविली, पण ती पोहोंचण्यापूर्वीच खुद्द दादांची स्वारी माळव्यांतून जानेवारी १७७५ त बडोद्यापाशीं येऊन पोहोंचली.§

इंग्रजांची मदत मिळविण्याच्या इराद्यानें दादा गुजराथेंत उतरला आणि गोविंदरावाचे फौजेशीं मिलाफ करून ३ जानेवारीस बडोद्यास आला. त्या वेळीं बडोदें हस्तगत करण्याकरितां गोविंदराव फत्तेसिंगास वेढा घालून लढत होता. आपल्या मागोमाग सिंदेहोळकरांसह हरिपंत चाल करीत आले आहेत असें वर्तमान येतांच दादा बडोद्याचे उत्तरेस महीनदीच्या पलीकडे जाऊन लढाईच्या तयारीनें वासदजवळ बंदोबस्तानें राहिला. हरिपंत फौजा तयार करून दादा-वर हल्ला करण्याकरितां पांच कोस पुढें गेला. तों दादा मही उतरून पलीकडे गेल्याची बातमी त्यास समजली. हरिपंताबरोबर वामनराव पटवर्धन होता. हरिपंतांचा तळ महीअलीकडे सावळी येथें होता. महीपलीकडे दादावर एकदम झडप घालून त्यास गांठण्याचा हरिपंताचा इरादा होता, इतक्यांत दादाकडून आबाजी महादेव व सदाशिव रामचंद्र बोलीस आले. परंतु सिंदेहोळकरांच्या मध्यस्थीमुळे या बोलीचा लगोलग निकाल लागला नाहीं. ता. ५-२-१७७५ रोजीं वामनराव लिहितो, 'दादांची गांठ महीपलीकडे पडली. खळ्या भारी खोल. वाट अडचणीची. इकडील व तिकडील मारगिरी चार घटका वरीच झाली. तीन कोसांच्या तफावतीनें सतरा दिवस मुक्काम जवळ होता. सलुखाचें बोलणें होळकराचे विद्यमानें होत होतें तें बनेना. हल्ल्यावर घालून दगा मात्र

|| सखारामहरीचा पुतण्या. § खंड १०-१५५.

न केला म्हणजे झालें.' ता. २१ रोजीं पुनः वामनराव पेटलादेहून लिहितो, 'श्रीमंतांची गांठ पडोन महिनाभर युद्धाचा योग नव्हता, म्हणून दिवस घालविले. ता. १७ रोजीं. योग होता म्हणून महीपार झालों. संध्याकाळचे सहा घटकांस श्रीमंत चालोन आले. तोफा सुरू करून सर्वांनीं घोडीं घातलीं. श्रीमंतांची लढाई बिघडली. मानाजी फाकडे, सखाराम हरि यांस जखमा लागल्या. फत्तेसिंगांनीं फार कत्तल केली. सर्व तोफा, हत्ती, निशाण आम्हांस सांपडलें. बाबुराव पाटणकर, गणेश विठ्ठल वगैरे दहा बारा माणूस पाडाव आले. अवघींचा काळोख, खळ्यांचें रान, आणखीं दोन घटका दिवस असता तर साराच उलगडा होता. श्रीमंत एकटेच दोनतीनशेंनिशीं खंबातकडे गेले. आम्ही त्यांचे पिच्छावर आहों.' 'भृगुवार माघ व॥ २ स युद्ध झालें. रात्र पडल्यामुळें ईश्वरें त्यांस पार केलें. पाठलागाच्या भीतीनें हत्तीच्या घांटा वर घेऊन पंचवीस राउतांनिशीं अंधारींत बसोन खंबातेस आले. बरोबर अमृतराव व नाटकशाळा सातजणी होत्या. पंचवीस चाळीस खितमतगार होते. खंबातवाल्यानें किल्ल्यांत घेतलें नाहीं. तेव्हां जहाजांतून मुंबईस जाण्यासाठीं इंग्रज वखारींत सांगोन पाठविलें. इंग्रज मॅलेट यानें आपल्या तरांड्यांस सांगून पायवाटेनें भावनगरास पोंचविलें. दर्याकिनाऱ्यानें धंदुकेस गेले. तेथून घोघा बंदरांत जहाजांत बसून ता. २३ फेब्रुवारी रोजीं सुरतेस पोंचले. वरील लढाई वासदजवळ नापार, आनंदमोगरी वगैरे नांवांनीं प्रसिद्ध आहे. $

युद्धाचे बाबतींत हरिपंतानें ज्योतिषावर विसंबून दोन आठवडे फुकट घालविले, याचें नवल वाटतें. ज्योतिषाचें हें खूळ मराठशाहींत नेहमींच होतें. लढाई आटपल्यावर दादाची राहिलेली फौज घेऊन सखाराम हरि कपडवंज येथें बंदोबस्तानें राहिला. सुरतेस गेल्यावर ता. ६ मार्च रोजीं दादानें इंग्रजांशीं तह करून त्यांची फौज मदतीस घेतली.

दादाच्या हालचालींची इत्थंभूत बातमी आनंदीबाईस कळत होती. लढाईच्या पूर्वी तीन दिवसांचें आनंदीबाईचें पत्र † सखाराम हरि वगैरे त्रिवर्ग सरदारांस आलें, त्यांत एकमेकांचीं पत्रें, बातम्या वगैरेसंबंधीं कित्येक महत्त्वाचे इशारे दिलेले आहेत. या वेळीं अमृतराव वडिलांबरोबर होता. बाजीराव लहान

$ ख. १४३०, १४३५, १४३८, १४४१, १४४३ व १४४८.

† ऐ. टी. १-६०.

एक महिन्याचा. 'चि० बाळ सुखरूप आहे. खेळत रांगत असतात.' या शेवटच्या उल्लेखावरून हें पत्र १८-२-१७७५ चें नसून, त्यापुढील एक वर्षाचें म्हणजे ८-२-१७७६ चें असावें. एक महिन्याचें मूल रांगत नसतें. असो. हरिपंताचे फौजेंत दादानें फितवे फार केले. 'होळकर सिंदे यांचा फितवा तर पहिल्यापासूनच आहे. सलुखाची बोली लागली त्यांतील अर्थ बत्तीस लक्ष रुपये फौजेचे चढले आहेत ते दादास द्यावे, अशी मागणी आली तेव्हां हरिपंतांनीं सिंदे होळकरांवर रुष्ट होऊन सांगितलें कीं, गुदस्तांपासून तुम्ही सलुख बोलतां, मनस्वी देवविलेत व पुढेंहि द्यावे म्हणतां, त्यास आम्ही फडणिसांचे कारकून, आमची योग्यता इतकी नाहीं; आपण सरदार, मनसबा, देणेंघेणेंची योग्यता आपली. आपणांस श्रीमंत पावले. आम्ही कूच करून जातों.' असें सांगून मागें बडोद्यास आले. मागाहून सरदारांनीं येऊन हरिपंताची समजूत काढिली, बोलले जे, आम्ही पुढें होतों, आपण पाठीवर असावें. त्यावरून सडे होऊन जाण्यास गेले. या भानगडींमुळें लढाई थांबून दादास पळून जाण्यास अवकाश मिळाला.

नापारच्या लढाईत दादाची अगदीं तारांबळ उडाली. त्याचें अरब पायदळ मध्यभागीं होतें, त्यावरच हरिपंतानें मुद्दाम हल्ला केला. तेव्हां अरब आयत्या वेळीं लढण्याचें नाकारून निघून गेले. आपण आतां खास हरिपंताचे हातीं पडतों, असें वाटून दादा पांचसातशें लोकांनिशीं रातोरात पळून खंबायतेकडे गेला. हरिपंतानें रात्र लढाईचेच जागीं काढून सकाळीं वामनराव व रास्ते यांस दादाचे पाठलागास व आप्पा बळवंत, आनंदराव गोपाळ, व मल्हारराव पानसे यांस गोविंदराव गायकवाडावर रवाना केले. मागाहून हरिपंतही सिंदे होळकरांस घेऊन खंबायतेकडे गेला. पाठलागानें भयभीत होऊन दादानें खंबायतचे किल्ल्यांत आश्रय मागितला, तो त्या नबाबानें दिला नाहीं. तेव्हां तेथील इंग्रज वखारीवर चार्लस मॅलेट होता, त्यास दादानें विनविलें कीं, कसेंही करून आम्हांस सुरतेस पोंचवा. 'श्रीमंत चतुष्पादाचा त्याग करून द्विपादांत जलामध्यें प्रायोपवेशन करून स्तंभन करणार.' ( आतां हत्ती, घोडे, वगैरे सरंजाम टाकून फक्त थोड्या माणसांनिशीं इंग्रजी जहाजांच्या कोटांत स्वस्थ राहणार. भीमापासून रक्षण व्हावें म्हणून ज्याप्रमाणें दुर्योधन पाण्यांत दडून बसला होता त्याप्रमाणें दादा करणार, असा भाव.) इंग्रजांचीं जहाजें भाव-

नगरचे बंदरांत घोघो येथें होतीं. तेथें मॅलेटनें दादाची व परिवाराची किनाऱ्याचे बाजूनें रवानगी करून दिली. घोघोहून इंग्रज जहाजांनीं त्यास ता. २३ रोजीं सुरतेस पोंचविलें. वामनरावानेंही भावनगरापर्यंत पाठलाग केला. दादा सुरतेस गेल्यावर सात हत्ती व शेपन्नास घोडीं भावनगरास होतीं तीं घेऊन वामनराव परत हरिपंताचे लष्करांत आला. मुंबईहून इंग्रजांकडून कर्नल कीटिंग फौज घेऊन तारीख २८ फेब्रुवारीस दादाचे मदतीस सुरतेस दाखल झाला.

नापारचे लढाईनें दादाची अगदीं गाळण उडाली. मुंबईकरांची मदत मिळाली नाहीं तर पुढें काय करावें हें त्यास सुचेना. तेव्हां त्यानें असोफ-उद्दौल्याकडे ताबडतोब माणसें पाठवून त्यास विनविलें कीं, कसेंही करून कलकत्त्याहून इंग्रजांची मदत मला मिळेल अशी तजवीज करा. असोफनेंही त्याप्रमाणें इंग्रजांकडे कलकत्त्यास जोराची शिफारस केली. ( ३१-५-१७७५ ).

**४. सुरतेचा तह व आडासची लढाई,** (६मार्च-१८ मे १७७५ ).—आनंदमोगरीची लढाई चालू असतां दादा एकदम कोणीकडे नाहींसा झाला, याची बातमी त्याच्या साथीदारांस नव्हती. त्या सर्वांची मिळून सोळा हजार फौज जमली व ते कपडवंजच्या गढींत जमून दादाच्या हुकमाची वाट पाहत राहिले. पण हरिपंत चालून येतो असें कळतांच ते उत्तरेस पालनपुरापावेतों गेले. तेथें दादानें लवकरच त्यांस कळविलें कीं, ' आपण सुरतेस आलों व येथें आम्हांस इंग्रजांची फौज मदतीस आली. तुमची आमची गांठ आतां कोठें व कशी पडावी तें ताबडतोब कळवावें. '

लढाईच्या पूर्वीपासून दादानें इंग्रजांकडे मदतीची याचना केली होती. त्यावरून मुंबईस वाटाघाटी चालून, इंग्रज फौज ता. १७-२-१७७५ रोजीं जहाजांतून निघाली ती ता. २८ ला सुरतेस पोहोंचली. तिजवर कर्नल कीटिंग नांवाचा अधिकारी होता. त्याची व दादाची गांठ पडून उभयतांमध्यें बोलणें होऊन १९ कलमांचा तह ठरला, तो ता. ६ मार्च रोजीं कायम झाला. त्यांतील मतलब असा:—

' १ पूर्वींचे सर्व करार मदार उभयतांनीं यथायोग्य पाळावे. २ इतउत्तर एकमेकांच्या शत्रूंस मदत करूं नये. ३ इंग्रजांनीं दादाचे मदतीस अडीच हजार फौज द्यावी; पैकीं निदान सातशें गोरे व पुरेशा तोफा असाव्यात.

४ या मदतीबद्दल दादानें इंग्रजांस साष्टी, वसई, मुंबईजवळचीं लहान बेटें आणि जंबुसर व ओलपाड हे तालुके कायमचे द्यावे; तसेंच अंकलेश्वर परगण्याबद्दल ७५,००० रु. सालाचे द्यावे. याशिवाय फौजेच्या खर्चाबद्दल दरमहा दीड लाख रुपये द्यावे; आणि सहा लाख रुपये रोख द्यावे अगर तितक्या किंमतीचें जवाहिर इंग्रजांपाशीं अनामत ठेवावें. ५ बंगाल व कर्नाटक येथील इंग्रजी मुलखांत दादानें कधींहि उपसर्ग लावूं नये.' या करारानें उत्तर कोंकणचा बहुतेक भाग व भडोचचा मोठा प्रदेश इंग्रजांस मिळावयाचा होता. सहा लाखांचें जवाहिर दादानें इंग्रजांस दिलें तें परत मागतां मागतां दादा मरून गेला. पुढें सन १८०२ च्या वसईतहानंतर तें त्यांनीं बाजीरावाचे हवालीं केलें.

तह कायम होतांच १५ मार्च रोजीं इंग्रज फौज पंचवीस तोफांनिशीं सुरतेहून दादास घेऊन गलवतांतून निघाली. ती पांच दिवसांत खंबायतला पोंचली. तेथें दादाचा मुक्काम जवळजवळ महिनाभर झाला. नंतर सखाराम हरि, मानाजी फाकडे, आबाजी महादेव व सदाशिव रामचंद्र हे आपल्या फौजा घेऊन ता. १९-४-७५ रोजीं खंबायतजवळ धर्मज येथें इंग्रज फौजेस सामील आले. या सर्वांची अत्यंत हलाकी झाली असून पगार न मिळाल्यामुळें सर्व लोक निघून जाण्याच्या बेतांत होते. सबब दादा इंग्रजांपाशीं खर्चास मागूं लागला. ते म्हणत, 'तुम्हींच आम्हांस पैसा दिला पाहिजे.' लवकरच गोविंदराव गायकवाडही येऊन दादास मिळाला. पुणेकरांची फौज जवळच सहा कोसांवर असून ती दादास त्रास देत होती. सिंदे, होळकर वगैरे प्रमुख सरदार लगोलग आपणांस येऊन मिळतील अशी आशा दादानें इंग्रजांस लाविली होती. पण तसें कांहींच घडून आलें नाहीं. जवळ जमाव मात्र वीस हजार लोकांचा; पण केवळ भोजनभाऊंचा जमला होता. लढाईस कुचकामी. या बाजारबुणग्यांस घालवून देण्याचीहि पण इंग्रजांस सोय नव्हती. उलट बाजूस हरिपंतानें यत्किंचित् न डगमगतां फत्तेसिंगास बरोबर घेऊन दादाचा सारखा पिच्छा पुरविला. खंडेरावास त्यानें गोविंदराव गायकवाडापासून फोडिलें आणि दादाची बाजू अधिकच लंगडी करून टाकिली.

दादास हस्तगत करण्याचा प्रयत्न निष्फळ होत चाललासें पाहून स. १७७५च्या उन्हाळयांत कारभाऱ्यांनीं खालील पत्र सिंदे होळकरांस लिहिलें. 'गुजराथेंत फौजेसह तुम्ही गेल्यास किती दिवस जाले? मनसबा लवकरच

शवटास नेण्याचें घडावेंच, असें दृष्टोत्पत्तीस येत गेलें असतां, निष्कारण मनसबा दिवसगतीवर पडत चालला. यावरून सर्वांचा एक विचार होऊन कजाखी होत नाहीं असें दिसोन येतें; परंतु असें नसावें. ज्या कामांत तुम्हासारखे कृतकर्मे, त्या कार्यास हे दिवस प्राप्त व्हावेसे नाहींत. मागें राज्यांत मोठमोठे प्रसंग प्राप्त जाले, तेथें तुम्ही लोकींच जीवाभ्य श्रमेंकरून यशच संपादिलेंत, त्यापेक्षां सांप्रतची मसलत अधिक आहे ऐसा प्रकार नाहीं. इंग्रजांचें साह्य करून दादा-साहेब मनसबा करतात त्याचा परिणाम कळतच आहे. अतःपर तुम्हीं सर्वांनीं एक विचार करून मनसबा अविलंबें शेवटास न्यावा. निर्गमांत आणून सर्वांचें येणें देशीं घडावें.' पण उभयतां सरदार हरिपंतास सोडून माळव्यांत स्वस्थानीं निघून गेले. महादजी सिंद्याकडचे हिशेब फार दिवस तुंबले होते. ते पुरे करण्यासाठीं सखारामबापूनें त्यास पुण्यास बोलाविलें, त्यामुळें रागावून तो परत निघून गेला असें म्हणतात. पुढें सखारामबापूचें व महादजीचें फारसें सख्य राहिलें नाहीं. दादानें मात्र इंग्रजांस सांगितलें कीं महादजी बारभाईंस सोडून आपल्या पक्षास सामील झाला आहे. पण तसा प्रकार बिलकूल नव्हता. या वेळीं दादा व बारभाई दोनही पक्ष नानाप्रकारच्या युक्त्यांनीं एकमेकांचा पाडाव करण्यांत खचून मेहेनत करीत होते. धारेस राहून सुद्धां आनंदीबाई फितूर वगैरे करण्यांत कमी तत्पर नव्हती.* 'आनंदीबाईनीं अशेरीच्या किल्ल्यास फितूर केला, त्यांत येसाजी विश्वासराव व रामचंद्र सावंत हे दोघे सांपडले. त्यांस व दुसऱ्या दहावीस जणांस जगन्नाथपंत किल्लेदारानें ठार मारिलें. ( १६-४-१७७५ ). बाजी गंगाधर हा पेशव्यांचा सरदार कोंकणांत बेलापुराकडे होता तो लिहितो, 'सरकारचे वकील रणछोड शेणवी मुंबईस होते, त्यांस सुरतेस रवाना करावें म्हणून दादांनीं मुंबईस लिहून पाठविलें. हें वर्तमान त्यांस मॉस्टिननीं सांगितलें, त्याजवरून चद्रंगमनी होऊन (=रातोरात) येथें प्रहर रात्रीस पावले. त्यांनीं सांगितलें, दादासाहेबांस सुरतेस जागा इंग्रजांनीं महंमुदी बागांत दिला आहे. बराबर अमृतराव, आठ नाटकशाळा व ४९ खिजमतगार आहेत. इंग्रज सर्व साहित्य करीत आहेत. बडोदें सर करून गोविंदरावास द्यावें, नंतर अमदाबाद घेऊन, हरिपंतांशीं लढून देशीं पुण्यास जावें, असा बेत

---

* खरे १४५२, स. मा. गो. १३०.

आहे. प्रस्तुत दादावांचून इंग्रजांस दुसरें दैवत नाहीं. सुरतेहून दर दोन दिवशीं फतेमार मुंबईस येते. इंग्रजांस प्रस्तुत स्वर्ग ठेंगणा झाला आहे. भूळपाचे आरमारार्ची मोठी मलामत इंग्रजांवर आहे. त्यास पुण्याहून मदत करून मुंबई लुटून फन्ना करावी म्हणजे इंग्रजांचा गर्वपरिहार होईल. श्रीमंतांस मुंबईस आणण्याचें मानस इंग्रजांचें नाहीं.'$

दादाच्या अव्यवस्थितपणामुळें कर्नल कीटिंगच्या हातून व्हावा तसा उद्योग झाला नाहीं. दादाची फौज पगार नसल्यानें बिथरली, तेव्हां कीटिंगनें त्यास कांहीं रक्कम कर्जाऊ दिली, त्याबद्दल मुंबईहून त्यास ठपका आला. तसेंच फत्तेसिंगास आपल्या बाजूस वळविण्याची खटपट कीटिंगनें केली ती त्याच्याच गळ्याशीं आली. एका मध्यस्थाच्या मार्फत फत्तेसिंगाशीं बोलणें चालू असतां, तहाचे मसुदे घेऊन कीटिंगचा वकील लव्हवांड त्याजकडे गेला. फत्तेसिंगानें त्यास नेऊन हरिपंताकडे रुजू केलें. तेव्हां त्याची फजिती करून हरिपंतानें त्यास घालवून दिलें. अशा अनेक खटपटींची हकीगत मजेदार आहे, ती येथें देण्यास अवकाश नाहीं. एप्रिलअखेर खंडेराव गायकवाड स्वतंत्र|| तह करून हरिपंतास मिळाला. इतकें होईतों पावसाळा डोकावूं लागला. तेव्हां पुढें अमदाबादेस छावणी करण्याचा दादाचा विचार होता, परंतु तो मुंबईस नापसंत होऊन लगोलग पुण्याकडे जाण्याविषयीं कीटिंग यास कौन्सिलचे हुकूम आले. हरिपंताची त्याजवर चांगलीच टेहळणी होती. इंग्रजांच्या तोफांमुळें त्यास त्वरेनें कूच करतां येईना. सभोंवार घिरट्या घालून हरिपंतानें त्यास जेरीस आणिलें. त्यासहि पुण्याहून निकडीचे हुकूम आले की, पावसाच्यापूर्वी एकवार गांठ घालून त्यांचा फन्ना उडवावा, त्यांस मही उतरूं देऊं नये. खंबायतपासून मही व साबरमती यांचेदरम्यान खेडानडियादपावेतों दोन फौजांचा खेळ सुमारें एक महिना चालला. २८ एप्रिल, आणि ५ व ८ मे या तीन दिवशीं उभयतांच्या लहानशा चकमकी झाल्या. पैशाची निकड लागली, तेव्हां दादानें नडियाद शहर लुटून आठ दिवसांत ४० हजारांची पैदास केली. नडियादेहून दादाची फौज दक्षिणच्याबाजूस महीकडे येऊं लागली असतां, वाटेंत आनंदच्या अलीकडे नापार येथें ता. २८ मे रोजीं हरिपंतानें एकदम

$ खं. १०-१५७.　||त. क. म. पृ. १७१.

इंग्रजांवर चाल केली. आणि चार तास पावेतों आपल्या सहा तोफांचा सडकून मारा केला. तो लिहितो. 'हुजरात व साऱ्या फौजांनीं घोडीं घातलीं. आम्ही व बाजीपंत अंणा पुढें होतो. लगेच मागें हरिपंत होते. बाजीपंतांनीं तोफा चालविल्या, तेव्हां इंग्रज चालून आले. त्यावरोबर हुजरात उठली व घोरपडेही उठले. तीनचारशें इंग्रज व गारदी जिवेंच मारिले. इंग्रजांची हिंमत मोडली. सरकारचे शंदीडशें जायां झाले. मालोजी घोरपड्यांनीं शिपाईगिरीची शर्थ केली. त्याचे बंधु राणोजी घोरपडे ठार झाले. यशवंतराव पानशांस गोळी लागली. इजा फार आहे. आनंदराव गोपाळांस गोळ्यांचा धक्का लागला आहे. दादाचा कट्टा अभिमानी हरि † भिडे व रामचंद्र तुळपुळे लढाई पाहण्यासाठीं आले असतां, आम्हांकडील स्वार झाडपाल्याचे तुरे लावून इंग्रजांचे फौजेंत शिरले. तेव्हां हे स्वार कोणाचे, म्हणून इंग्रजांनीं हरिपंतांस पुशिलें. हे आपलेच, मानाजी फाकड्यांचे असतील असें बोलले. तेव्हां भिड्यानें दगाबाजी केली, म्हणून श्रीमंतांचे समक्ष उभयतांचे गळे इंग्रजांनी कापिले. सय्यद हुसेन सरकारचा चांगला गोलंदाज होता तो ठार झाला. गोविंदराव गायकवाडांनीं इंग्रजांची कुमक कांहींच केली नाहीं, त्यामुळें इंग्रज रुष्ट आहेत. इंग्रजांची धमक बरीच होती, पण त्यांस आमच्या फौजेची कवाईत समजली. इंग्रजांचा रंच चांगलाच मोडला.' या लढाईंत एकंदर गोरे ८६ ठार झाले. पैकीं ११ अधिकारी होते. दोनहि बाजू आपलाच जय झाला असें मानतात. ही लढाई नापार येथें झाली, परंतु जवळच आडास गांव आहे त्यावरून तिला इंग्रज लेखक आरासची लढाई असें नांव देतात. बरोबर तीन महिन्यांपूर्वी 'महीनदीच्या कांठीं वासद येथें लढाई झाली, तीही जवळजवळ याच ठिकाणीं होय. फक्त भेद दाखविण्यासाठीं पहिलीस मराठी लेखकांचें नांव आनंदमोगरी व दुसरीस इंग्रजांचे नांव आडास हीं येथें स्वीकारलीं आहेत. मराठ्यांच्या बाजूचे लोक लढाईंत नदींत पडले, त्यांस काढून आणण्यासाठीं आणखी मागाहून पुष्कळ लोक धाडस करून गेले असतां तेहि मृत्युमुखीं पडले. या मराठ्यांच्या

† हरि भिडे हा दादांच्या मर्जीतला सरदार. याची हकीकत पूर्वी राक्षसभुवनचे लढाईंत व गोहदचे लढाईंत आली आहे. (खरे पृ. ३१९ व १२४३; फॉरेस्ट पृ. २२७; म. वि. ४ पृ. ५८, २०४; ख. ले. १४६२-७० ).

मर्दुमकीची इंग्रज लेखकांनीं फार तारीफ केली आहे. या लढाईंत सखाराम हरीनें पराक्रम केल्याबद्दल आनंदीबाईनें त्याचें अभिनंदन केलें आहे. ( ऐ. टि. १,६० ).

आडासच्या लढाईनंतर लगोलग इंग्रजांनीं दादासह दक्षिणेस कूच करून ता. २९ रोजीं भडोचचा आश्रय केला. 'श्रीमंतांस व आम्हांस तीन कोसांची तफावत होती. ते कूच करून भडोचचे सुमारें पाच कोस पुढें गेले. पुण्यास न जातां इकडेच राहिले तर आम्हांसही छावणी करून राहावें लागेल. भडो-चेस श्रीमंतांभोंवतालीं इंग्रजांची चौकी आहे. उभयतांखेरीज कोणाशीं गोष्ट बोलतां नये, असा बंदोबस्त आहे. श्रीमंत इंग्रजां सुद्धां सुरतेस जाणार. जवळ इंग्रजांचे दुभाष्ये असतात. त्यांशिवाय कोणाशीं बोलूं नये असें केलें आहे. लक्ष्मण अप्पाजी आंबेकर याचा पुत्र श्रीमंतांजवळ असतो, त्यानें दुभाष्यांस कळों न देतां पत्रांवर शिक्के केले. तें निमित्त ठेऊन इंग्रजांनीं त्याचा हात तोडिला. सारांश, श्रीमंत कैदेदाखल आहेत. इंग्रजांस विचार पडला आहे. पुढें हरिपंताच्या फौजेस बावा पीरावर नर्मदा उतरण्यास इंग्रजांनीं हरकत केल्यामुळें, पावागडच्या वाटेनें चोळी महेश्वराजवळ नर्मदा उतरावयास गेले. सोनगडास छावणीस जाणार. श्रीमंत सुरतेस राहणार.' परत येतांना दादानें व इंग्रजांनीं फत्तेसिंगापासून बडोदें घेण्याचा बेत केला. दादा बडोदें जिंकून पुढें इंग्रजांचे हवालीं करणार, असें गोविंदरावास कळल्याबरोबर त्यास घरचा कलह मिटविण्याची उमज पडली. एकदां इंग्रजांकडे ठाणें गेलें कीं तें परत मिळणें शक्य नाहीं अशी खात्री होऊन फत्तेसिंग व गोविंदराव यांनीं आपसांत तड-जोड केली. तेव्हां दादा व इंग्रज यांनीं पावसाळयाची छावणी डभईस केली. लगोलग पुण्यास जाऊन पेशवाई हस्तगत करण्याचा विचार तूर्त त्यांस सोडून द्यावा लागला. विचार करण्यास पावसाळयाचा अवधि मिळाल्यामुळें लढाई-पासून लभ्यांश काय, याची उमज दोनही पक्षांस पडूं लागली मुंबईकरांनीं व कौंटिंगनेंही पुणें दरबाराशींच तडजोड करावी असा उद्योग चालविला. इकडे पुणेकरांनीं कलकत्त्यास स्वतंत्र तहाची खटपट चालविली: आणि तूर्तचा पेंच टाळण्याकरितां बाहेरचा नाद सोडून शक्य तर दादाशींच समेट्न घ्यावें, अशा इरादानें त्यांनीं पावसाळयांत आपले वकील मुंबईस पाठविले. कारण सिंदे होळकर स्वस्थानीं जाऊन बसले. कदाचित् ते दादालाच मिळाल्यास सर्व डाव फसेल. ते निघून गेले यास कारण दादाचीच खटपट असेल, अशी कांहीं

काळ कारभाऱ्यांची समजूत झाली. इतक्यांत कलकत्याच्या कौन्सिलांत मुंबई-करांचा खटाटोप सर्व नामंजूर होऊन युद्ध तहकूब करण्यासंबंधीं खुद्द हेस्टिंग्सचें पत्र पुणेकरांस आलें, तेव्हां त्यांनीं घाईघाईनें आपले मुंबईस गेलेले वकील परत बोलाविले. ‡

महादजीवर कारभाऱ्यांचा मोठा रोष झाला. नानाफडणीस म्हणतो, 'गुदस्तां-पासून दादांचा बंदोबस्त करून देतील हा भरंवसा होता. त्यांनीं मागितल्या-प्रमाणें श्रीमंतांस देणें तें दिलें. गुजराथेंत गेल्यावरही हरिपंतांशीं एकरूप होऊन दादांचा पक्का बंदोबस्त न केला. आतां तरी त्यांनीं सर्व मसलतीचा भार घ्यावा. उगाच भांडावयास जागा करून ठेवूं नये. त्यांच्या एकनिष्ठतेची पत राहिली नाहीं.' होळकर तर सर्वथा महादजीचेंच अनुकरण करीत होता. पावसाळ्यांत अमदाबादच्या बंदोबस्तास बारभाईनीं गणेशपंत बेहेरे यास ठेविलें. *

ठाण्याचा किल्ला हातचा गेल्यानें अखिल महाराष्ट्रास मोठी हळहळ वाटत होती. स. १७७५ च्या पावसाळ्यांत हरिपंत नानास लिहितो, 'साष्टीची मस-लत पडली. चहूंकडे खर्चाची ओढ. अशानें साष्टी कशी येते ! इंग्रजांचा तह झाला तर बरें. नाहीं तर लांबेल. अथवा फ्रेंचांशीं राजकारण करून त्यांस आणलें तर तो इंग्रजांस भारी आहे. काम करील. हें होत नसल्यास इंग्रजांस कांहीं देऊं करून त्यांशीं सख्य करावें. फ्रेंच व हबशी यांशीं नीट असावें. पाण्यांतील कामांत सांप्रत काळीं इंग्रज अधिक आहे. उद्योग होत असेल तर करावाच करावा. दादांनीं इंग्रजांस गुजराथचे पंधरा लक्षांचे महाल व वसई, साष्टी लिहून दिली म्हणून ते जोरांत आहेत. शेवटीं एक वेडेपणाचा विचार मनांत येतो तो लिहितों. साष्टी इंग्रजांस देऊन दादांस हातीं देत असले तर खामखा करावें. ( खरे—नाना फ. च. पृ. ८३ ).

पावसाळ्यांत इंग्रजांचा मुक्काम गुजराथेंत झाल्यामुळें गोविंदराव व फत्तेसिंग-राव यांस नाना तऱ्हेचीं कारस्थानें करण्यास वाव मिळाला. सर्व मंडळी दोन दगडांवर पाय ठेवून आपला निभाव करीत होती. गायकवाडांच्या व इतर सर-दारांच्या अंतस्थ व्यवहारांत शिरण्याचें येथें प्रयोजन नाहीं. येथें एवढेंच

‡ [ War with the Maratha Nation—1781, P. 90. ]

* ख. १४७६ व १४८७–८९.

सांगणें जरूर आहे कीं, इंग्रजांनीं फत्तेसिगास अनुकूल करून घेतलें, तेव्हां गोविंदराव उघडा पडला. त्यावरून इंग्रजांचें व दादाचें बिनसूं लागलें. मात्र इंग्रजांच्या आश्रयानें दादाचे पक्षास जोर येऊन हरिपंत पराभव पावून परत आल्यानें बारभाईंची बाजू त्या मानानें खचल्यासारखी झाली. या वेळचे दादाचे मनसबे व्यक्त करणारीं शके १६९७ आश्विन म्हणजे ऑक्टोबर १७७५ चीं दोन पत्रें उपलब्ध आहेत, तीं अशीं:—

'श्रीसांबः सपुत्रो विजयते. रा. सखाराम हरि यांस. उपरि. लाल पाटलाची चिठी पाठविली ती पावली; व महादूचें पत्र पाठविलें तें पावलें. ऐशियास तुम्हीं लिहिलें तें सर्व यथार्थ आहे. त्याचअन्वयें कारभारास लागलों आहों. परंतु तुम्ही उगेच जाऊन बाळा (अमृतराव)सुद्धां बडोद्याजवळ राहिलां, याचें कारण नव्हतें. हुकमानें जावयाचें होतें. असो. त्यांत बहुत नासलें नाहीं. फत्तेसिंग इंग्रज व सदोबाचे मार्फतीनें बोलत आहे. तेच तोडजोडींत आहों. तुम्हीं लिहिलें कीं दोहींतून एक जलदीनें करावें. परंतु मोठे कारभार घटिकेंत कसे होतात ! आठचार दिवस पंधरा दिवस घेतीलच. त्यांत एकपक्षी कारभार केला तरी लौकर होईल, परंतु आम्हांस शब्द लागेल. तुम्हांसीं व गोविंदरायासीं ( गायकवाड ) बोललें पाहिजे. कोणताही प्रकार करणें तरी गोविंदरायास टाकून करतां नये. गोविंदराव तरी जवळ नाहींत, तेव्हां त्यांचेतर्फेचें बोलणें आम्हांसच पडतें. सारांश, थोरली मसलत साधावी, सबब गोविंदराव म्हणूं तसें कबूल करतील. पुढें गोविंदरायाचे अर्थ घडवावे. येविशीं तरी पक्केपण दिसलें पाहिजे. अंग्रेज मध्यें. तेव्हां तोड कशी पडेल ! यास्तव अंग्रेजाकडूनच गोविंदरायाचें समाधान करवावें, असेंही योजीत आहों. होईलसें दिसतें. जर फत्तेसिंग बहुत ओढितो तरी बडोदें घेऊं असें इंग्रज बोलतात. काम भारी आहे. गाडे तयार होत आहेत, दारू वाळत आहे. महादू वगैरे माणसें आणविलीं. बहुधा येतील. न पाठविलीं तरी काय मुजाका आहे ! सखाराम वारला (?) अशांत जलदीनें देशांत जावें. बजाबाचें नानाचें वांकडें दिसतें. बरेंच आहे. देशास लौकर पोंचलें पाहिजे. नारो गणेशास पाठविणें. तुमचीं पत्रें येतात तीं जाहीर करीत नाहीं. मजकूर थोडाबहुत सांगतों. आमचीं पत्रेंही जाहीर न करणें. कारभारांत मुलामा दृष्टीस पडल्यास फत्तेसिंग ओढील, अखेर इंग्रज रदबदलींत पडेल, तेव्हां कांहीं ठीक नाहीं. आम्ही

करावें तेंच इंग्रजांकडून कबूल करवूं. रा. सेनाखासखेलांनीं (गोविंदरावांनीं) ओढूं नये. सांगूं तसें ऐकावें यांतच त्यांचें कल्याण आहे. थोरली मसलत शेवटास गेलियास सर्व आहे. दहा बारा रोख आले तरी फत्तेसिंग बराबर आला तरी तोड काढावी. नाहीं तर काय प्रजोजन? जलदीनें बडोद्यास लागतों. कृपेनें सत्वरच काम होईल. रवाना शनिवार, तीन प्रहर.'*

दुसरें पत्र. 'राजश्री सखाराम हरि यांसी उपरि. येथें कित्येक कामें आहेत. बारीक मोठे मनसुब्याचे पीळ पेंच पडतात, याजमुळें अहर्निश तुम्हीं जवळच असावें अशी आमची मर्जी, हें तुम्हांसहि विदित आहे. तूर्त दोन दिवसांचे कामास गेलां, पंधरा दिवस लांब राहिलां. कामही दूर जाऊन विशेष नाहीं. जवळही लहान मोठी मसलत पुसावयास तुम्ही जवळ नाहीं. चिरंजिवासही लांब नेऊन उगेच बसलां. आमचें येणेंही लौकर होत नाहीं. इंग्रेजाशिवाय येणेंहि ठीक नाहीं. नाहक दूर राहून फळ नाहीं असें घडोन आलें. आमचे विचारें, आगत्यास कदाचित् एक दोन दिवस दूर जावें, नाहीं तरी अष्टौप्रहर जवळ असावें. तुम्हांस आमची मर्जी बहुत वाकीफ, म्हणोन जवळ चहातों. असो. आतां जलदी न करणें. सखाराम वारले हें खरेंच जाहलें. कृपेनें सर्व बरेंच आहे. तूर्त जसें कळेल तसें करीतच आहों. लौकरच जवळ यावें हें बरें आहे; परंतु मनसुबियाची चाल सोडून येऊं नये. जाणिजे. शनिवार संध्याकाळ. †

**५. साबाजीचा वध,** (२६-१-१७७५) **बारभाईंचें नुकसान.—** नागपुरास साबाजी व मुधोजी यांचा कलह बरेच दिवसांचा होता. तो दादांच्या या प्रकरणानें जास्त निकरावर आला. कारभाऱ्यांनीं साबाजीस हाताशीं धरावें तों दादानें मुधोजीची बाजू धरावी; अशामुळें उभयतां बंधूंत युद्धप्रसंग आला.

---

* खंड १२. १००,१०२,१०३ चा मतलब या पत्रास अनुलक्षून असल्यामुळें व गाडे तयार होऊन दारू वाळत असल्यामुळें पत्राची मिति स. १७७५ आश्विनची ठरते. ले. १०४-१०७ पर्यंतसुद्धां यासंबंधांत पहावें. ले. १०९ मधील सदाशिव महादेव हा वरील पत्रांतील सदोबा असावा.

† या व वरील पत्रांत 'सखाराम वारले' याचा उलगडा झाला पाहिजे. 'वा' च्या जागीं 'ह' वाचतां येईल. सखाराम हरि स. १७७६ सप्टेंबरपासून कैदेंत असल्यामुळें हीं पत्रें स. १७७५ चींच असलीं पाहिजेत. हीं पत्रें वि. ज्ञा. वि. मार्च १९२६ च्या अंकांत छापलीं असून पुढील जूनच्या अंकांत विवेचन आहे.

नागपुरच्या दक्षिणेस १० मैलांवरील पांचगांवीं साबाजीवर मुधोजी व महंमद इसफ चालून गेले. ' साबाजीनें बहुत चतुराई करून मुधोजीस मोडून दोन हजार गारदी व दोन हजार फौज मारली. दोन प्रहर युद्ध झालें. साबाजी-बोवाकडील लोक लुटीस लागले. साबाजी हौद्यांत बसून आवाडीस चालले. सेनाधुरंधर यांजवर चालून प्रथम सांग चालविली. तें सेनाधुरंधर यांचे हत्ती-वरील माहूत नूर महंमद यानें गजबागानीं सांग टाळिली. मग तीर चालविला. तो मुधोजीबोवा सेनाधुरंधर यांचे हातास लागला. मग सेनाधुरंधरांनीं बंदूक जोडगोळ्या घालवून चालविली. गोळी साबाजीबोवाचे मस्तकास लागली. तसेंच खेलोजी पाटील यांनीं खवाशींतून बंदूक चालविली. ती गोळी साबाजीचे कानसुलाजवळ लागली. साबाजी ११८४ चे पौष मासीं वद्य दशमीस ठार आले ' ( ना. भो. ब. ११३-११७ ). महंमद इसफ यासहि लढाईत जखमा लागल्या. साबाजीनें पराक्रमाची शर्थ केली पण ती व्यर्थ गेली. साबाजी व मुधोजी दोघेही सारखेच महत्त्वाकांक्षी व पराक्रमी, त्यांपैकीं साबाजी खपल्या-बरोबर भोसल्यांचे घरांत एकी होण्याची सोय झाली. मुधोजीचा ओढा दादाकडे असल्यामुळें साबाजीच्या मृत्यूनें बारभाईची बाजू विशेष खचली. साबाजी जिवंत असता तर पुढें हेस्टिंग्सनें जें कारस्थान मुधोजीकडे केलें, तें सिद्धीस न जातां इंग्रजांच्या वाढत्या शत्तीस कायमचा आळा बसण्याचा संभव होता. यास्तव साबाजीचा आकस्मिक मृत्यु ही मराठशाहीवर एक मोठी आपत्तिच गणली पाहिजे. पुणेकरांचा वकील बाबूराव वैद्य मुद्दाम या वेळीं नागपुरास गेला होता. त्यावरून एकदां सोक्षमोक्ष करून मुधोजीस दूर करावें, आणि साबाजीस बारभाईत कायम करावें असा व्यूह होता. प्रथम बारभाईचें कारस्थान उभारण्यांत साबाजीनें पुढाकार घेतला होता, आणि त्याचा पक्षही दांडगा होता. मुधोजी कबजांत आल्यावर विश्वासघातानें साबाजी मारला गेला. लगोलग बारभाईनीं सेनासाहेबसुभा पदाचीं वस्त्रें छत्रपतींकडून शिवाजी भोसले उमरावतीकर म्हणून एक दूरचा आप्त होता, त्याचे नांवें देवविलीं (६-४-१७७५); आणि मुधोजीचा उच्छेद चालविला. निजामा-कडे संधान चालवून त्याजकडून मुधोजीचे वऱ्हाड प्रांतावर स्वारी करविली. त्यांत इब्राहीम धौशा यानें मुधोजीस इतकें जेरीस आणिलें कीं मुधोजीनें बारभाईस दहा लाख रुपये दंड भरून आपला बनाव करून घेतला. त्या वेळीं निजाम-

भोसल्यांचा तह झाला, ( ता. ३०-६-१७७५ ) तो 'तह व करारमदार' या पुस्तकांत शेवटच्या पृष्ठावर आहे. नंतर दिवाकरपंतचारेघोडमार्फत मुधोजींची समजूत करून, त्याजकडून दादांचा पक्ष सोडण्याबद्दल ता. २१-८-१७७५ रोजीं करार लिहून घेतला. ( इ. ऐ. वि. वि. २-३२ ) यापूर्वी व्यंकटरावकाशी नारायणरावाचे वधानिमित्त कैदेंत होता, त्यास बारभाईंनीं सोडून दिलें; भोसल्यांचे दौलतीची जप्ती केलेली होती ती उठविली, आणि रघूजीस सेनासाहेबसुभा नेमून, त्याचा कारभार मुधोजीनें करावा असें ठरविलें, ( ता. २४-६-१७७५ ). मुधोजीजवळ महंमद इसफ, बाबूराव हरि ( सखाराम हरीचा बंधु ) वगैरे दादाचे साथीदार होते, ते बारभाईंच्या हवालीं केले; आणि बाबूराव हरीचा आप्त महिपतराव दिनकर यास गावीलगडावर कैदेंत ठेविलें. नागपुरकरांच्या या भानगडींचें या वेळच्या प्रकरणांत अत्यंत महत्त्व आहे. मुधोजी पुष्कळसा दुसऱ्याचे तंत्रानें चालणारा व अस्थिर वृत्तीचा होता. त्यास पुढें हेस्टिंग्सनें कसें फोडलें तो प्रकार मागाहून सांगण्यांत येईल. प्रस्तुतच्या खटपटींसंबंधानें ना. भो. का. ७ व ४८, स. मा. रो. २२६-२३१, खं.१०.१५४, का. सं. प. या. पृ. ४४३, व इ. ऐ. वि. वि. २-३२ हे सर्व कागद एकमेकांच्या मेळानें वाचले पाहिजेत. भोसल्यांच्या व बारभाईंच्या आणाशपथांचा त्यांत सुकाळ आहे.

प्रतिनिधि भवानराव बारभाईंचे वाजूस होता. 'ते पुरंदराहून कारभाऱ्यांचा निरोप घेऊन आजच क्निहईस गेले. नारोशंकरांस देवाज्ञा जाली. ( जानेवारी १७७५ ) स्त्री समागमें गेली.‡ मातबर मनुष्य गेला.' अव्वल पेशवाईपासून मराठशाहींत उद्योग करीत असलेला हा पुरुष वृद्ध होऊन वारला. तो मल्हारराव होळकराप्रमाणें बहुधा दादाचे पक्षांत असे. पण माधवरावानें त्याजकडून चांगलीं कामें घेतलीं. त्याचा मुलगा रघुपत नारायण यास २०-४-१७७५ रोजीं जहागिरीची सनद देण्यांत आली, पण भावांत तंटे उपस्थित होऊन भयंकर बखेडे माजले, त्याचे कागद पुष्कळ छापलेले आहेत. साबाजी भोसले, नारोशंकर व सुजाउद्दौला यांचे मृत्यु हिंदी राजकारणांत ध्यानांत ठेविले पाहिजेत.

**६. कलकत्तेकर वकील अप्टन याचें पुण्यास आगमन,**(जुलई-डिसें. २८-१७७५).—बंगालचा गव्हर्नर वॉरन हेस्टिंग्स याची गव्हर्नर जनरल म्हणून

‡ स. मा. रो. १-८, ख. १४६०, ऐ. टि. १-१२.

नेमणूक ता. २० ऑक्टोबर १७७४ रोजीं होऊन त्याचा कारभार कौन्सिलच्या मदतीनें चालू झाला. याबद्दलचा हेस्टिंग्सचा खलिता ७ डिसेंबर रोजीं मुंबईस पोंचला. त्या वेळीं ठाण्यावर फौजा पाठविण्याची मुंबईस गडबड चालू असल्या-मुळें हेस्टिंग्सच्या पत्राकडे मुंबईकरांनीं लक्ष दिलें नाहीं. ठाणें हस्तगत केल्याची खबर मुंबईहून ३१-३-१७७५ रोजीं कलकत्त्यास पाठविण्यांत आली. पण त्यापूर्वीच ती तेथें बाहेरून पोंचली असल्यामुळें गव्हर्नर व कौन्सि-लर यांनीं ३ फेब्रुवारीं रोजीं पत्र पाठवून मुंबईकरांस टपका दिलाः आणि त्या-नंतर राघोबाचा पक्ष मुंबईकरांनीं स्वीकारला, ही बातमी कलकत्त्यास पोंचल्या-वर, ' ही गोष्ट तुमच्या अधिकाराबाहेरची असून, पेशव्यांशीं चालू असलेल्या पूर्वीच्या कराराविरुद्ध आहे. सबब राघोबाचा पक्ष एकदम सोडावा' असें कल-कत्तेकरांनीं ८ मार्चच्या पत्रानें लिहून कळविलें. तें पत्र २१ मे रोजीं मुंबईस पोंचलें. लगोलग दुसरा हुकूम कलत्त्याहून ३१ मे रोजीं रवाना झाला कीं, ' तुम्ही राघोबांशीं जो तह केला आहे तो आम्हांस बिलकूल मान्य नाहीं. त्यायोगानें मराठी राज्याशीं निष्कारण युद्ध सुरू झालें आहे, तें अन्याय्य, अप्रशस्त, अहितकारक व अनधिकृत आहे. ( unjust, impolitic, dangerous and unauthorised ). यापासून आम्हांस धोका मात्र आहे. युद्ध पुकारण्यास तुम्हांस अधिकार पोंचत नाहीं. तें सर्वथैव अन्यायाचें आहे. राघोबाचे द्वारा तुम्हांस कांहीं एक फायदा नसून मराठ्यांचें राज्य जिंकण्याचें साहस तुम्ही विनाकारण अंगावर घेतलें आहे. तुमच्यापाशीं नाहीं पुरेशी फौज, नाहीं पैसाः निष्कारण अडचणी येतील. त्यांतून निभाव-ण्याचें साधन तुमचे हातांत नाहीं. पुणें दरबारानें तुमचें कांहीं एक वांकडें केलें नाहीं; किंवा रघुनाथरावांस मदत करण्याची तुमच्यावर फरज नाहीं. सबब तुम्ही आपल्या फौजा एकदम परत बोलावून युद्ध बंद करा. यासंबंधानें पुणें दरबाराशीं बोलणें करण्याकरितां आम्ही इकडून आमचा स्वतंत्र वकील पाठ-विण्याची तजवीज करीत आहों.' हें पत्र मुंबईस ता. १२-८-१७७५ रोजीं पोंचलें. याच मतलबाचें पत्र हेस्टिंग्सनें ता. १०-७-१७७५ चें पुणें दरबारास पाठविलें, त्यांतील मतलब.‡ ' रघुनाथरावाचे मदतीस मुंबईहून फौज गेली ही हकीकत मुंबईकरांचे पत्रांवरून आम्हांस कळली. हा प्रकार इकडील हुकमां-

‡ फॉरेस्ट पृ. २३८, फा. प. व्य. ले. १३.

शिवाय झाला असून, फौज परत बोलवावी, आणि स्वसंरक्षणापलीकडे मराठ्यांशीं लढाईचा प्रसंग आणूं नये, असें त्यांस आम्हीं लिहून फर्माविलें आहे; तसेंच आमचा एक इतबारी हुशार वकील तुमच्याशीं तह ठरविण्यासाठीं पुण्यास पाठवावा अशी आमची तजवीज चालू आहे. '

यावर सखाराम बापूनें हेस्टिंग्स यास ता. २९-७-१७७५ चा खलिता पाठविला, त्याचें इंग्रजी भाषांतर उपलब्ध आहे, त्याचा मतलब. ' आपलें शहाणपण, धूर्तता व हुशारी यांचीं अनेक उदाहरणें माझ्या ऐकण्यांत आल्यावरून, आपल्याशीं स्नेह जोडावा अशी फार दिवसांपासून इच्छा होती, परंतु त्याचा योग आला नव्हता. कोणतीही गोष्ट वेळ आल्याशिवाय घडून येत नसते. ईश्वरकृपेनें याच संधीस माझ्या इच्छेनुरूप आपलें पत्रही आल्यानें हा योग जुळून आला. आपलें पत्र वाचून संतोष वाटला आणि स्नेहाबद्दल खात्री झाली. आपण मुंबईकरांस राघोबास मदत न करण्याविषयीं लिहिलें, आणि कंपनीच्या हुकमाशिवाय त्यास मदत दिली, ती परत न्यावी, श्रीमंतराव प्रधानांचे राज्यास उपद्रव देऊं नये, असा हुकूम त्यांस पाठविला आहे, हें वाचून फार फार संतोष झाला. मुंबईकर अधिकारी व पेशवे सरकार यांचा पूर्वापार स्नेहसंबंध असून तो अनेक तह व करारांनीं बळकट झालेला आहे. इतक्यांत दुर्दैवानें श्री० नारायणरावांस राघोबानें ठार मारिलें, ती हकीकत जगजाहीर आहे. आतां नारायणरावांचे कुटुंबास पुत्र झाल्यानें सर्वांस उल्लास व उमेद प्राप्त होऊन त्यांस मसनदीवर स्थापिलें आहे. कै० माधवरावसाहेबांचे वेळीं मी व नाना कारभार पाहत होतों, त्याचप्रमाणें आतां सुद्धां पेशवाईचीच चाकरी आम्ही मनःपूर्वक करीत आहों. याबद्दल सर्व अबालवृद्ध संतोषित आहेत. नबाब निजामांची ही दोस्ती आमच्याबरोबर पूर्वीप्रमाणेंच कायम आहे.

' असा प्रकार घडतांच रघुनाथराव हिंदुस्थानाकडे पळाले, त्यांच्या पाठीवर सरकारची फौज गेली. इतक्यांत मुंबईकर इंग्रजांनीं या सरकाराबरोबर असलेला पुरातन स्नेह व अनेक तह एकीकडे ठेवून, लबाडीनें साष्टी वगैरे सरकारचीं ठाणीं हस्तगत केलीं आणि परागंदा झालेल्या राघोबाबरोबर तह केला. इंग्रजांच्या राज्यांत तहनामे यथायोग्य पाळले जातात, ठरलेले तहाविरुद्ध ते मरेपर्यंत वागत नाहींत असें असतां, मुंबईकरांनीं सर्व स्नेह तोडून विरुद्ध वर्तन चालविलेलें पाहून फार आश्चर्य वाटलें. याबद्दल यांचा बंदोबस्त करणें जरूर

पडल्यावरून आमची फौज मोठ्या तयारीनें त्यांच्यावर चालून गेली आहे. माझा उद्देश एवढाच आहे कीं, धन्याचा अधिकार बळकट करावा, प्रजेचें संगोपन करावें आणि मातबर लोकांतील तंटे तोडून ऐक्य करावें. आपलीहि अशीच इच्छा आहे. बाळाजीपंतांनीं आपल्यास निराळें पत्र लिहिलेंच आहे तरी पत्राचें उत्तर पाठवून दोस्ती कायम ठेवावी.' [ Secret Committees Fifth Report P. 80–नातूकृत महादजी सिंदे. P. 280.]

हेस्टिंग्सच्या या दरम्यानगिरीनें मुंबईकर अत्यंत चिडून गेले. उभयतांचे दरम्यान वर्षसहा महिने पुष्कळच भवति न भवति झाली. मुंबईकरांनीं आपला एक प्रतिनिधि मि० टेलर मुद्दाम सर्व हकीकत निवेदन करण्यासाठीं कलकत्त्यास पाठविला. परंतु कलकत्तेकरांनीं आपलें म्हणणें सोडलें नाहीं. टेलरनें शेवटीं सर्व हकीकत लेखी कळविली, ती फॉरेस्टच्या पुस्तकांत छापलेली आहे. मुंबईकरांना हेस्टिंग्सचें हें कृत्य अतिशय झोंबलें. विशेषतः हेस्टिंग्सनें पुणें दरबाराशीं परभारें पत्रव्यवहार करून आपला वकीलहि तिकडे पाठविला, ही गोष्ट तर मुंबईकरांस अतिशय दुःसह वाटली. तहच करावयाचा तर तो आम्हीं योग्य मार्गानें करूं. असेंहि मुंबईकरांनीं कळविलें; पण तें हेस्टिंग्स व कौन्सिल यांनीं मान्य केलें नाहीं. कलकत्त्याच्या ह्या निषेधांत प्रसिद्ध कौन्सिलर फिलिप फ्रॅन्सिस यानेंच पुढाकार घेतलेला होता. बारभाईस याप्रमाणें कलकत्त्याहून पाठबळ मिळालें नसतें तर राघोबाचेविरुद्ध त्यांचा टिकाव बहुधा लागला नसता.

कलकत्तेकर वरिष्ठांचा हुकूम मुंबईकरांस मान्य करणें भागच होतें; पण तो त्यांच्या मनाविरुद्ध असल्यानें त्याचा अंमल त्यांनीं दिरंगाईनेंच केला. पावसाळा कमी झाल्यावर त्यांनीं कीटिंग यास फौजे मुद्धां सुरतेस परत बोलाविलें. एकमेकांच्या पत्रव्यवहारांत पुष्कळशी संदिग्धता उत्पन्न होऊन, पुणेकरांच्या मागण्या, मुंबईकरांचा हट्ट व कलकत्तेकरांचे खुलासे इत्यादि कारणांनीं भानगडी उपस्थित झाल्या, त्या फॉरेस्टच्या पुस्तकांत वगैरे पुष्कळ पाहण्यास मिळतात. ऐ. टि. ४-२५ चीं दोन पत्रें वाचली असतां मासला कळेल. रघुनाथराव व कीटिंग यांचें पटेना, तेव्हां मुंबईकरांनीं मॉस्टिन यास दादाजवळ सुरतेस पाठविण्याचें ठरविलें; परंतु ती गोष्ट कलकत्त्याहून मना होऊन रहित झाली. जुलईचे आरंभीं कर्नल अप्टन याची पुण्याचे कामगिरीवर नेमणूक झाली; त्यानें

काल्पी येथें मुक्काम करून सखारामबापूचा परवाना येतांच पुढें पुण्यास जावें, असा त्यास हुकूम होता.

हेस्टिंग्जनें पुनः १२-७-७५ रोजीं पुण्यास पत्र पाठवून सखाराम बापूस कळविलें कीं अलाहबाद कुडाचे मार्गें हे कर्नल अप्टन पुण्यास जातील, तर त्यांचे बंदोबस्तासाठीं काल्पी येथें परवाना व हस्तक पाठवून द्यावे. त्यांस तह करण्याचे संपूर्ण अधिकार देण्यांत आले आहेत. त्याच वेळीं हा मजकूर हेस्टिंग्जनें दादासही स्वतंत्र पत्रानें लिहून कळविला, कीं 'आम्ही व्यापारापुरतें पाहतों. आम्हांस युद्धाची गरज नाहीं, कर्नल अप्टन तहाकरितां जात आहेत, त्यांजकडे तुम्हांस काय कळविणें असेल तें कळवावें.'$ हेस्टिंग्जच्या या कबुलीवरूनच मुंबईकरांचें कृत्य किती अन्यायाचें होतें हें दिसतें.

कलकत्त्याच्या या ढवळाढवळीनें हिंदुस्थानांत सर्वत्र एकदम मोठी चळवळ उडून गेली. इंग्रजांचा पाठिंबा पुणेकर पेशव्यांस मिळाल्यावर ते जोरांत येऊन आपली सर्वांची हड्डी नरम करतील असें पेशव्यांचे शत्रूंस भय पडलें. अर्काटचा नबाब महंमदअली यानें मद्रासचे गव्हर्नरास लिहिलें कीं, 'मराठे आम्हांस वारंवार चौथाईबद्दल त्रास देतात, तर या तहांत आम्हांस या त्यांच्या जाचांतून कायमचें मुक्त करून चौथाईची सूट देववावी. तसेंच कर्नल अप्टन यांस सर्व व्यवहारांची चांगलीशी माहिती नाहीं. सबब त्यांस मद्रासच्या मार्गानें जाण्यास सांगावें, म्हणजे आम्ही त्यांस भेटून सर्व प्रकारची माहिती देऊन आमचा मनुष्य त्यांजबरोबर पुण्यापावेतों देऊं.' परंतु ही विनंति हेस्टिंग्जनें मान्य केली नाहीं. त्यानें इतकेंच नबाबास कळविलें, कीं 'तुमचा मनुष्य पुण्यास अप्टनकडे पाठवा म्हणजे ते तहाचे वेळीं सर्व बाबतींचा विचार करतील.' हिंदुस्थानचीं राजकारणें त्या वेळीं पुण्यांतून कशीं खेळत होतीं हें यावरून दिसतें. निजामाचा सरदार झाबीतजंग धौशा यानेंही हेस्टिंग्ज यास लिहिलें कीं, 'बऱ्हाणपुर व दौलताबाद हीं दोन स्थळें आम्हांस परत देण्याचें पुणें दरबारानें कबूल केलेंच आहे, पण तहाचे वेळीं ही गोष्ट पक्की करून घ्यावी. बाकी रघुनाथराव सर्वथैव नालायक व व्यवहारशून्य असल्यामुळें त्याचा पक्ष इंग्रजांनीं सोडला हें चांगलेंच केलें.' (सेप्टें. ७५). सखाराम

$ प. कॅ. ४-१८९८.

बापूनें हेस्टिंग्स यास जबाब पाठवून युद्ध बंद केल्याबद्दल आनंद प्रदर्शित केला. पुनः १३-१०-७५ रोजीं बापूनें हेस्टिंग्स यास पत्र लिहून कळविलें, कीं मुंबईकरांनीं कलकत्त्याचा हुकूम बिलकूल मान्य केला नाहीं. त्यांनीं आपल्या फौजा परत बोलावल्या नाहींत. आम्ही मात्र आपल्या फौजांस युद्ध बंद करण्याची सक्त ताकीद केली आहे. या वेळीं सर्व हिंदुस्थानांत सारखीं कारस्थानें व पत्रें खेळत होतीं. अर्काटच्या नबाबानें तर इतकें सुद्धां कळविलें कीं, 'मराठ्यांशीं तह ठरविणें झाल्यास तो माझ्या मार्फत ठरवा. ते फार लबाड आहेत. त्यांचे कावे अप्टन यास कळणार नाहींत. निजाम व हैदर यांस तर या तहाची वार्ता सुद्धां कळवूं नका, व त्यांस त्या वाटाघाटींत घेऊं नका; कारण हे दोघेही इंग्रजांचा पाडाव करण्याची उमेद बाळगितात. हैदरानें तर इकडे कहर उडवून दिला आहे. हिंदुस्थानांत बाहेरून घोडे येतात, त्यांची सुद्धां त्यानें बंदी केली आहे. फ्रेंचांशीं त्याचें सूत असून, इंग्रजांस तर त्याजकडून मोठाच खो बसेल' ( १४-१०-१७७५ ).

सखारामबापूनें कर्नल अप्टन यास काल्पीवर परवाना वगैरे पाठवून त्याच्या प्रवासाचा बंदोबस्त केला. अप्टनचा सत्कार करून त्यास वाटेनें व तहाचे बाबतींत सर्वांनीं मनापासून साह्य करण्याबद्दल हेस्टिंग्सनें निजाम, अयोध्येचा वजीर, नागपुरकर भोसले, काशीचा चेतसिंग वगैरे सर्वांस गौरवपूर्ण पत्रें पाठवून विनविलें. ही त्याची व कौन्सिलची भावना पुढें कायम राहती तर अप्टनच्या या तहानें हिंदुस्थानचें राजकारण चांगलेंच स्थिरावलें असतें. परंतु मुंबई-करांच्या हट्टानें इंग्रजांस स्वस्थ बसूं दिलें नाहीं. या वेळीं फ्रेंचांनीं सुद्धां बरीच उचल केली. मिदनापुरजवळ मोहनपुर येथें त्यांनीं एक नवीन वखार घातली. त्यामुळें इंग्रजांचे पोटांत विशेषच दुखूं लागलें. सखाराम बापूनें हेस्टिंग्स यास चक्ख विचारलें कीं, ' अप्टन यास कांहीं स्वतंत्र अधिकार आहेत कीं तो नुसती माहिती मिळवून परत जाणार ? तसें असेल तर त्याच्या येण्यापासून कांहीं उप-योग नाहीं, पुनः सर्व घोंगडें भिजत राहील.' हेस्टिंग्सनें परत लिहिलें कीं, ' अप्टन यास संपूर्ण अधिकार दिलेले आहेत कोणतीहि दिक्कत त्यासंबंधानें घेऊं नये. ' याच वेळीं दादानेंही कलकत्त्यास पत्रांवर पत्रें पाठवून इंग्रजांच्या त्रिस्कालित कारभाराचा बोजवारा उडवून दिला. ' मुंबईकर इंग्रज माझ्याशीं तह करतात काय, व तुम्ही तो धाब्यावर बसवितां काय ? इंग्रजांचीं वचनें

अढळ समजतात तीं हींच कीं काय? लुच्चा लोकांनीं तुमची चांगली फजिती चालविली आहे, याचा परिणाम ठीक नाहीं. विचार करा.' असें त्यास दादानें लिहिलें, (२७-१०-१७७५). हेस्टिंग्सनें मात्र त्यास व बारभाईंस वारंवार पत्रें लिहून सर्वांची समजूत काढिली. या वेळीं हेस्टिंग्सकडे चाललेल्या ठिकठिकाणच्या शिफारशी व निरनिराळ्या सत्ताधीशांच्या मनाची चलबिचल या गोष्टी ध्यानांत आणिल्या असतां, माधवराव पेशव्याचे पश्चात् हिंदुस्थानची सार्वभौम सत्ता मराठ्यांचे हातांतून निसटून इंग्रजांचे हातीं कशी स्थिरावत चालली होती याची अटकळ होते.||

मुंबईकरांनीं अप्टन यास काल्पीवरच सेप्टेंबरांत लिहून कळविलें, कीं तहाच्या वाटाघाटींत आपल्या बाजूची सर्व माहिती तुम्ही प्रथम ऐकून घ्यावी. महादजी शिंद्यावर कारभाऱ्यांची इतराजी झाली होती, सबब त्याची समजूत करण्याकरितां त्यानें आपला वकील बाळाराव गोविंद यास पुण्यास पाठविलें. महादाजी बल्लाळ गुरुजीही महादजीशीं बोलून पुण्यास आला. नोव्हेंबरांत इंग्रज वकील अप्टन काल्पीस आला, त्याच वेळीं दादा सुरतेहून सोनगडाकडे हरिपंताचे मुकाबल्यानें येऊं लागला. त्या वेळीं पुनरपि बारभाईंवर संकटदशाच आली होती.$ 'हिंदुस्थान सहजच गेलें, गुजराथ इंग्रजांनीं आटोपली. देशचे महाल निजामानें घेतले. कर्नाटक राहिलें होतें, त्यास पाय फुटले. सारांश, बुडता पाया दिसतो.' डिसेंबरचे आरंभीं दादा सोनगडापलीकडे तीन कोसांवर दहाहजार फौजेनिशीं, व हरिपंत सोनगडाअलीकडे पंचवीस कोसांवर तीसहजार फौजेनिशीं, अशी स्थिति होती. इंग्रज वकील त्या वेळीं बऱ्हाणपुरापावेतों आला. त्याबरोबर सहा पालख्या, बारा हत्ती, तीस उंट, शंभर इंग्रज व दुसरा लवाजमा मिळून एकंदर दीडहजार लोक होते. एवढ्या थाटानें त्या वकिलाची मोठीच छाप लोकांवर पडली. पुरंदरास येण्यापूर्वीं कारभाऱ्यांनीं व बाळपेशव्यांनीं डेरेदाखल होऊन राहवें असें ठरलें. भेटीसमयीं जवळ फौज व सरदार मोठमोठे जमविले. कांहीं उणें पडूं नये असें कारभाऱ्यांनीं केलें. अप्टन २८ डिसेंबर

|| प. कं. ४-१९१६, १९२५, १९४४, १९५९, १९६४-६५, १९७८, १९८२, २००९, २०११, २०२४, २०३९, २०४१.

$ ख. १५४५, १५४६, १५५०.

गेर्जी पुण्यास येऊन ३० डिसेंबर रोजीं करा नदीवर पुरंदराखालीं दाखल झाला. ता. ३१ रोजीं त्याची व बालपेशव्याची भेट तंबूंत झाली.

अप्टन येण्यापूर्वी मुंबईकरांशीं सलोख्यानें मिटतें घेण्याचा कारभाऱ्यांचा विचार चालूच होता. दोनहि पक्ष बलाबलाच्या व नफानुकसानीच्या विचारांत रेंगाळत होते. दादांबद्दल इंग्रजांस मोठासा उमाळा होता असें नाहीं; पण जेणेंकरून आपला लाग साधेल, तो डाव ते उचलीत. गुजराथप्रांत जवळजवळ इंग्रजांचे हस्तगत झाला, तरी पण स्वतःचे फौजेचा खर्च करून शिवाय दादाचा खर्च चालविणें त्यांस जड होऊन पुढें कलकत्तेकरांकडून विरोध झाल्यामुळें मुंबईकरांसहि हिय्यानें उद्योग करवेना. पुणें दरबारानें मुंबईचा व्यापार सक्तीनें बंद केला. पावसाळ्यांत हरिपंताची छावणी खानदेशांत होती. दसऱ्यानंतर त्यानें सोनगडच्या रोखानें कूच करण्यास आरंभ केला. त्याच्या फौजेची इंग्रजांसहि केवढी दहशत वाटत होती हें त्यांच्या पत्रव्यवहारा-वरून स्पष्ट दिसून येत. आश्विन वद्यांत ता. २-१०-१७७५ रोजीं अनाबाद येथें असतां हरिपंताचा मोठा साथीदार, गोपाळराव पटवर्धनाचा भाऊ वामनराव, आजारी पडून मरण पावला. नेहमीं अशक्त असतांही त्यानें उन्हापावसाची परवा न करिता त्या संकटकालीं मोठ्या निष्ठेनें नोकरी केली. पुढें त्याचा भाऊ पांडुरंगराव याच्या नांवें सरदारी झाली, तरी चुलतभाऊ परशुरामभाऊ हाच यापुढें त्या घराण्यांत प्रमुख झाला. नारायणरावाचे वधा-पासून निजामाचें अंतरंग बारभाईच्याच बाजूचें असून त्याचा मुख्य कारभारी रुक्नुदौला त्यांचा स्नेही होता, तो याच सुमारास औरंगाबाद येथें मारला गेला. तेव्हां निजामानें दुसरा कारभारी न नेमतां स्वतःच काम चालविलें. तरी मत-लब साधून बारभाईकडून शक्य तितका फायदा करून घेण्याची संधि निजा-मानें फुकट घालविली नाहीं. हरिपंताचे मदतीस निजामाची फौज जावयाचा करार होता, परंतु 'पुरंदरावरील मूल खरा कीं खोटा याची खात्री नाहीं. सबब अमृतरावास पेशवाई द्यावी, असा नवीनच बूट काढून निजामानें तिकडे दादाशीं सूत्र चालविलें आणि गोदावरीच्या कांठचे गांडापुर, बैजापुर, जालना, पैठण, आंबेड वगैरे व औसा, आळंद, गुंजोटी हे प्रांत त्यानें बारभाईकडून परत मागितले.' यांतले कांहीं प्रांत बिनीवाले व धायगुडे यांच्या जहागिरींतले होते, तरी ते निजामास या वेळीं परत देणें कारभाऱ्यांस भाग पडलें. प्रांत

ताब्यांत आले तेव्हां धौशास हरिपंताचे मदतीस पाठविण्याचें निजामानें कबूल केलें. हरिपंत मालेगांवच्या पश्चिमेस २५ मैलांवर होता. लोकांस पगार न मिळाल्यामुळें पुष्कळ निघून गेले, त्यामुळें हरिपंताची कुचंबणा झाली. शिवाय सातपुड्याच्या बाजूस दादांच्या उठावणीनें पांच सात वर्षें कोळ्यांनीं सारखे दंगे चालविले. गुलजारखानानें खानदेशांत बंडावा केला, त्यांच्या हकीकती वाचण्याजोग्या आहेत. अशा अनेक बाबती या वेळीं बारभाईस कशा जाचक झाल्या, त्या सर्व येथें तपशीलवार देतां येत नाहींत. दौलताबादचा किल्लेदार नारो बाबाजी नगरकर हा एक जुना भरंवशाचा हरकामी गृहस्थ स. १७७५ च्या नोव्हेंबरांत मृत्यु पावला. दादाचा एक प्रभु सरदार त्रिंबक सूर्याजी प्रांतांत धुमाकूळ उडवीत त्रिंबकपावेतों आला. अशा संकटावस्थेंत हरिपंत फडक्यानें अत्यंत स्वार्थत्यागपूर्वक कामगिरी बजावली. म्हणूनच बारभाईचा निभाव लागला. हरिपंताचा स्वभाव मनमिळाऊ, सोशिक व तडजोडीचा होता. इंग्रजांस सुद्धां विशेष धास्ती या वेळीं वाटत असेल तर ती हरिपंताची होय. हरिपंताची आडकाठी नसती तर आपण केव्हांच दादास नेऊन पुण्यास स्थापिलें असतें, असे इंग्रजांचे उद्गार अनेकवार निघालेले आहेत. त्याच्या हाताखालचा सरदार नरसिंगराव धायगुडे याचा महाल अंबें निजामाकडे गेला, म्हणून तो रुसून निघून जाणार होता, त्याची समजूत हरिपंतानें काढिली. खालील पत्र त्यास हरिपंतानें लिहिलें, त्यांत त्याचा स्वभाव चांगला ओळखतां येतो. ' रा. नरसिंगराव बावा स्वामींस विनंति. आपणांस राग आला, बोलणें जालें, त्या-जवर मी संध्येस गेलों. आपण तेथें आले. मी बसा म्हणोन सांगितलें असतां न पुसतां उठोन गेलां. ही गोष्ट चांगली कीं काय ? कित्येक गोष्टी आपणाशीं बोलणें आहेत. आपण गेले, राग पुरता आला. ऐशीयास, अस्मान कडाडलें तरी आपण धास्ती खाऊं नये. आम्ही आपल्यास वडील म्हणतों. आम्हांस सल्लामसलत पुसणें ती आपणासच पुसावयाची. असें असतां आम्हांस रानांत टाकून जावें हीच गोष्ट वडीलपणास उचित असली तर ईश्वरी इच्छा म्हणावी. उतावळी कोणे गोष्टीची न करावी. मी सकाळीं येतों. कित्येक गोष्टी बोलणें आहेत, माझी भेट झाल्याखेरीज उतावळी कराल तर तुम्हांस कुलस्वामीची व श्री. रावसाहेबांचे पायांची शपथ असे, ही विनंति.' या पत्रांत हरिपंताचा मृदु स्वभाव भरपूर दिसतो. या वेळीं म्हणजे डिसेंबरचे आरंभीं हरिपंत छानी-

वर असल्यामुळेंच दादाची व इंग्रजांची पुढें येण्याची ताकद झाली नाहीं. निजामाचा धौशा येऊन न मिळाल्यामुळें हरिपंतानें इंग्रजांशीं गांठ घातली नाहीं. इतक्यांत अप्टन पुरंदरास दाखल होऊन दोन महिने वाटाघाट झाल्या-वर ता. १-३-१७७६ रोजीं तह कायम झाला, त्यामुळें चालू राजकारणास निराळें वळण लागलें. तहाची वाटाघाट चालू असतांही दादा स्वस्थ बसला नव्हता. त्यानें मानाजी फाकड्यास पाठवून नवापुरचें ठाणें जाळिलें, तेव्हां हरिपंतानें पंधरावीस हजार फौज तोंडावर पाठवून आपण खानदेशांतच वास्तव्य केलें.$ रास्ते सोनगडाजवळ होते, त्यांजवर इंग्रजांकडील दोन हजार गारद्यांनीं ऑक्टोबरांत छापा घातला. त्याची बातमी रास्त्यांनीं आगाऊच राखून रातोरात इंग्रजांचे तळावर त्यांस गांठून हजार दीडहजार गारदी कापून काढिला. खासा जखमी ओळख न पुरतां पळोन गेला. यावरून वाटतें कीं पुरंदरचा तह न होता तर याच वेळीं इंग्रजांची खोड हरिपंतांनीं मोडली असती. परशुरामभाऊ सुद्धां हरिपंतासारखेच कष्ट करीत होता. निजामाचा सरदार इब्राहीम जानेवारींत हरिपंतास येऊन मिळाला. पुरंदरास अप्टनचा तह न बनता तर इंग्रजांशीं लढण्याची कडेकोट तयारी बारभाईंची होती. तहाच्या वाटाघाटीस तरी त्यामुळेंच जोर आला; नाहीं तर इंग्रजांनीं तह फिसकटवून आपला शह कायम केला असता.

इंग्रज जरी दादाचा पाठपुरावा करीत होते तरी त्याची अंतःस्थिति अत्यंत खालावलेली होती. 'आमचें सामान थोडें, त्यांत भक्षावयास नाहीं. लोक सर्व बेदील, यश अपयश मनुष्याचे आधीन नाहीं. लोकदृष्टीनें आमची बाजू हलकी दिसते. इंग्रज थोडे, कसें होईल तें पाहवें. उपाय कांहीं सुचत नाहीं. इंग्रज शहाणे म्हणोन वाटत होतें, पण या वेळेस आमची फजिती जाल्यास त्यांचीही झालीच. अब्रूशीं व प्राणांशीं गांठ आहे. कांहीं एक दोन लक्ष तरी खर्चास आल्यास शत्रूचीं पारपत्यें होतील. हरिपंत परिच्छिन्न गांठ घालतो. केवळ बारभाईंचें पुण्य, दुसरें कारण नाहीं.' ही आपली स्थिति दादानें २३-१-१७७६ च्या पत्रांत मुंबईस आपल्या वकिलास लिहिलेली आहे. सखारामहरीनेंही असेंच केविलवाणें लिहिलें—' मसलत पेंचांत पडली; सारे अर्थ

$ खं. १५२७, १७६६, १७६७, १७६९.

विलग झाले; त्यांतही आपआपल्यांत विरुद्धें वाढलीं. बुडत्याचा पाय खोलीं. येथें मुलेंमाणसें सुद्धां आहों. प्राणरक्षण कसें होईल हेंच संकट आहे. नाना-प्रकारचे पेंच व कटकटी. इतकेंही सोसून आमचा निश्चय खंबीर, प्राण जाईतों सुटणार नाहीं. प्राणाचा संकल्प घालोन श्रीमंतांची सेवा आरंभिली आहे. एक वेळ श्रीमंत दौलतीवर बसले म्हणजे कृतकृत्य झालों. जेथवर होईल तेथवर प्रयत्न सेवकांनीं करावा, हेंच श्रेयस्कर जाणून श्रम, साहस करतों.' सखाराम हरीसारखा मोहरा भलत्याच कामीं फुकट गेलेला पाहून फार वाईट वाटतें. नुसतें साहस कामास येत नाहीं. काळवेळेचेंहि तारतम्य पाहिजे.

**७. पुरंदरचा तह** (१-३-१७७६).—कलकत्तेकरांनीं अप्टन यास पुण्यास पाठविलें, त्या वेळीं ता. १७-७-१७७५च्या लेखानें त्यास त्यांनीं आपल्या अटी सांगितल्या; त्यांत मुख्य अट अशी होती कीं, साष्टी व वसई हीं बेटें पुणेकरांनीं कायमचीं आपणांस द्यावीं; आणि भडोच परगणा द्यावा. हा भडोच परगणा तेथील मोगल नबाबाच्या भांडणांत इंग्रजांनीं मध्यस्थी करून ता.१५-११-१७७२रोजीं म्हणजे माधवराव पेशव्याच्या ऐन मृत्युप्रसंगीं हस्तगत केला होता. वास्तविक तो गायकवाडांच्या कक्षतला होता. तेथें इंग्रजांची वखार होती व अंतर्गत व्यापारासाठीं सुरत, भडोच, खंबायत वगैरे ठिकाणें इंग्रजांस फार सोयीचीं होतीं. पूर्वकिनाऱ्यावर इंग्रजी सत्ता स्थिर होतांच, पश्चिम किनारा ताब्यांत घेण्याची हांव इंग्रजांस सुटली. तिचे मुख्य पुरस्कर्ते मुंबईचा गव्हर्नर हार्नबी व त्याचाच हस्तक पुण्यास येऊन राहिलेला इंग्रज वकील मॉस्टिन हे होते. हॉर्नबीनें मुंबईचा कारभार सन १७७०–१७८३ अखेर केला. त्याचा मुंबईचा कारभार व त्याच्याच तोडीचा वॉरन हेस्टिंग्सचा कल-कत्त्याचा कारभार हे अगदीं समकालीन आहेत. हॉर्नबी १-१-१७८४ रोजीं व त्याच्यापासून एक वर्षानें हेस्टिंग्स आपापला कारभार सोडून स्वदेशीं गेले. भडोच परगणा पुढें इंग्रजांनीं महादजी सिंद्यास देऊन त्यास आपले लक्षांत ओढिलें. अप्टन यास शिकवण अशी होती कीं, 'तहाची वाटाघाट सखाराम बापूशीं करावी, दुसरे कोणास ओळखूं नये. तसेंच युक्तीच्या वाटेनें रघुनाथ-रावाची योग्य व्यवस्था तहांत लावून द्यावी. अमुकच इसमास पेशवाई द्यावी असा आग्रह आपण धरण्याचें कारण नाहीं.' नाना व बापू यांजमध्यें हळू-हळू तेढ कशी उपस्थित होत गेली हें या वेळेपासून लक्षांत घेतलें पाहिजे.

झालें तें विसरून व परिस्थितीकडे लक्ष देऊन रघुनाथराव, इंग्रज, महादजी वगैरेंशीं पडतें घेऊन प्रकरण मिटवावें, अशी बापूची इच्छा. उलट पक्षीं रघुनाथरावास आपल्या ताब्यांत घ्यावें, महादजी वगैरे बेमानगिरी करतील त्यांस वठणीस आणावें. आणि इंग्रजांचा गर्व हलका करावा, ही नानाची इच्छा. हरिपंताचे जोरावर हें आपण करूं शकूं, अशी धमक नानास होती. इकडे बापूस असें वाटे कीं, याप्रमाणें नाना व हरिपंत वरचढ झाल्यास ते पुढें आपणां सर्वांसच गुंडाळून ठेवतील. मुंबईच्या प्रेसिडेंटाप्रमाणें बापू हा एकटा प्रमुख समजला जात असे, तें नानानें मानलें नाहीं. प्रत्येक तपशिलांत आपण दोघे तंतोतंत बरोबर अशी नानाची पद्धत होती. वास्तविक सखारामबापूनें या वेळीं कारभारांतून निवृत्तच झालें पाहिजे होतें. संकटकाळीं एकमुखी कारभार असेल तरच तो यशस्वी होतो.

औपचारिक भेटी उरकतांच वकील व कारभारी तहाच्या खलबतास बसले. त्यांत बापू व नाना आणि कृष्णराव बल्लाळ काळे हे प्रमुख असत.† अप्टन व त्याचे दोन सोबती इंग्रज व एक दुभाष्या, याप्रमाणें सायंकाळीं कामास बसत, तीं खलबतें मध्यरात्रीपर्यंत चालत. दोनहि पक्ष आपापल्या अंतस्थ मतलबांचा एकमेकांस थांग लागूं देत नव्हते. इंग्रजांच्या बोलाचालीचा मुख्य भाग असा कीं, इंग्रज वकील पूर्ण अखत्यारी आहेत. ते करतील तें मुंबई, सुरत, मद्रास वगैरेकडील सर्व इंग्रज मान्य करतील. कोणेविशीं गुंता पडणार नाहीं. त्या प्रमाणेंच सर्व ठिकाणच्या इसमांस हेस्टिंग्सनें पत्रें पाठविलीं, आणि आपापलीं माणसें पुण्यास पाठवून जें काय कळविणें असेल तें आपणास कळवा असें लिहिलें. अप्टननें असा भाव कळविला कीं, 'दादासाहेब राज्याचे खावंद. त्यांस तुम्ही कारभाऱ्यांनीं बाहेर घालविलें. याजकरितां आम्हांस तपास करावा लागला. राज्यास बालपेशवे अधिकारी झाले हें वर्तमान आम्हांस ठाऊक नाहीं. आतां खरें लटकें पाहून खरें असल्यास पक्का सलूख करितों.' कारभाऱ्यांनीं उत्तर केलें, 'राज्यास अधिकारी जाल्याचें वर्तमान आम्ही मुंबईवाल्यांस कळविलें असतां, त्यांनीं दादांचा पक्ष सोडला नाहीं, त्यावरून सवाई माधवरावास पेशवाईचीं वस्त्रें झाल्याचें वर्तमान तुम्हीं मुंबईस कळविलें

---

† ख. १७६१, १७६४.

म्हणतां, तें पत्र काढून दाखवा. कारण दादासाहेबच राज्याचे मालक, दुसरा नाहीं, असें मुंबईकरांनीं अद्यापपावेतों कलकत्त्यास कळविलें आहे.' परंतु त्या पत्राची नक्कल आयत्या वेळीं सांपडेना. मागाहून सांपडली. पुढें अप्टन बोलला, 'तें कसेंही असो. परंतु दादाचा पक्ष आम्ही धरला तो वाजवी असो कीं गैरवाजवी असो. आम्ही व्यापारी, नफातोटा पाहतों. तेव्हां आमचा सर्व खर्च भरून द्या, आणि दादांचा बंदोबस्त माधवरावाचे वेळेप्रमाणें ठरवून द्या. आम्ही त्यांस जामीन राहतों.' असे नानातऱ्हेचे मुद्दे निघून बोलणें पुष्कळच वाढलें. इंग्रज वकिलानें श्रीमंतांस नजर जवाहीर वगैरे दिलें. यांनीं त्यांस मेजवान्या व नजर केली. वरील मतलबावरून, सवाईमाधवराव खरा की खोटा याचा अप्टननें तपास करून खात्री करून घेतली, तेव्हांच त्यानें पुढील बोलणें चालविलें हें उघड आहे. 'किल्ल्याखालीं कोडीत येथें मुक्काम आहे. मध्यान्ह रात्रपर्यंत खलबतें रोज होतात. इंग्रजांकडील मंडळींत दोन असामी फार शहाणे थोर आहेत. मुद्दाम खुर्च्या आणल्या आहेत, त्यांजवर वकील व कारभारी बसतात. खुर्चीवर बसून थकले म्हणजे भुईवर बसतात. वकिलांच्या व श्रीमंतांच्या भेटी व्हावयाच्या, त्या समयीं भितील, यास्तव अगोदरच टोप्या कुडतानें घालून माणसें पुढें बसविलीं होतीं. अशा रीतीनें धीट करितात. श्रीमंतांस पागोटें शिरपेंच वगैरे घालतात.'

बंगालेवाल्यास कारभाऱ्यांनीं समजाविलें, कीं हाच मूल वडील घरचा, टिक्याचा खावंद. $ अप्टनानें म्हटलें, मूल तरी लहान, दौलत चालवावयास दादाच योग्य, थोर कृतकर्मे हजर आहेत. कारभाईंनीं उत्तर केलें, त्यांनीं नारायणरावास चांगलें न पाहिलें, ते या मुलास व आम्हांस कसे चांगलें पाहतील? त्यांस मुलूख लावून देतों, तेथें त्यांनीं असावें. किल्ला देणार नाहीं. किल्ला दिल्यानें खूळ करितील. अप्टनानें सांगितलें, पूर्वीचा स्नेह एकीकडे ठेवून साष्टी घेतली ही गोष्ट आम्हां चुकलों. तुमची तुम्हांस माघारी देतों. कारभारी म्हणाले, खर्च देतां, साष्टी माघारी द्यावी, व चंदावरचें राज्य भोसल्यांचें, त्यास राजा कैदेस आहे त्यास सोडावें व त्याचें राज्य त्यास द्यावें; आणि तुम्हीं दादांचा पक्ष घेऊं नये. ते व आम्ही समजोन घेऊं. याप्रमाणें ठरून पक्कें

$ खं. १२-२८७.

करण्यासाठीं दोन इंग्रज मुंबईस गेले. अप्टनाकडे बोलणें करावयास माधवराव जाधवराव जातात. सखारामबापूचे मनांत दादा नसावे असें नाहीं, पण पुण्यांत कामाचे नाहींत. येथें आपणास दगा करतील. नाना बापूंचें अंतर्याम शुद्ध नाहीं. बाह्यरंग एक आहे. अप्टनचें म्हणणें तुमचीं कलमें कबूल आहेत; पण श्रीमंतांस आम्ही तुमचे हातीं देणार नाहीं. गुजराथचे पार करून देऊं, मग तुम्हीं व ते समजून घेणें. वडील घरचा मूल म्हणतां, त्यास दादाही बाजी-रावाचे पुत्र असतां मुलास दौलत द्यावी हें ठीक नाहीं. तेच योग्य आहेत. (जानेवारी १७७६). अर्काटच्या महंमदअलीनें तंजावरचें राज्य इंग्रजांचे मदतीनें घशांत घातलें, म्हणूनच या तहाचे वेळीं त्याचें पोट दुखूं लागलें, हें ध्यानांत ठेविलें पाहिजे. तंजावरचें राज्य पुढें मोकळें झालें. मराठशाहीच्या सर्व पृथक अवयवांस पेशवे कसे जपत होते हेंही यावरून लक्षांत येतें.

तहाच्या वाटाघाटींत दिवसगत फारच झाली. साष्टी व दादा यांच्याच संबंधानें विशेष पेंच पडला. अप्टन साष्टी परत देण्यास कबूल होता, पण मुंबईकर ती गोष्ट बिलकुल मान्य करीनात. ¶

कारभारी म्हणाले, साष्टी तुम्हांस देऊन तह करावा ही गोष्ट परिच्छिन्न घडत नाहीं, पैसे जास्त मागितलेत तरी त्याचा विचार होईल. शिंदे होळकर तहाच्या वाटाघाटीवर नजर देत माळव्यांत स्वस्थानीं होते. जाबसालांत उभयतां कारभारी, कृष्णराव काळे व माधवराव जाधवराव असे चौघे असत. चौघांखेरीज बाहेर कळों नये असा करार व आणशपथ प्रथमच जाली होती. ता. २२ फेब्रुवारीस कारभाऱ्यांच्या मागणीप्रमाणें बहुतेक तह ठरला. दादांच्या राहण्यासंबंधानेंच काय तो प्रश्न होता. निजामाशीं बारभाईचें किती सख्य आहे हें अप्टनच्या नजरेस आलें. त्याचा सरदार वखारुद्दौला तहाचे वाटाघाटी-साठीं पुरंदरास येऊन भेटला. करवीरकर व इतर पुंडांचें पारिपत्य उभयतांनीं मिळून करण्याचा बेत ठरला. फाल्गुन शु॥ ५ स श्रीमंत किल्ल्यावरून खालीं आले. डेऱ्यांत इंग्रज वकिलानें त्यांची भेट घेतली. साष्टीसंबंधानें मोठाच आग्रह उभयपक्षांचा व विशेषत: मुंबईकरांचा पडला. 'साष्टी घेतलीच आहे. वसई द्यावी. दादांचे खर्चास चाळीस पन्नास लक्ष रुपये खर्च झाले आहेत, ते द्यावे.'

¶ ख. १७९२, १८०३, १८०६, १८२२.

असा फारच रुसवा झाला. मध्यें वकिलानें निरोपही मागितला. कारभाऱ्यांनीं निरोप दिला. तह मोडला म्हणून अप्टनानें ता. ७ फेब्रुवारी रोजीं कलकत्त्यास लिहूनही कळविलें. आरंभीं अतिशय ओढतें धरून तहाचा जम बसल्याशिवाय अप्टनास परत जाऊं देण्याची कारभाऱ्यांची तयारी दिसली. अप्टननें तसें हेस्टिंग्सला कळविलेंसुद्धां. इतक्यांत डोळ्यांत लख्ख उजेड पडण्याजोग्या कित्येक गोष्टी कानांवर आल्यामुळें लगोलग माघार घेऊन कारभाऱ्यांनीं ता. १ मार्च रोजीं तह कबूल केला. सबब खालील महत्त्वाच्या गोष्टी अभ्यासकांनीं ध्यानांत ठेवल्याशिवाय बारभाईचें फिरलेलें धोरण चांगलें लक्षांत येणार नाहीं.

( १ ) दादा पुण्यावर येण्यासाठीं खानदेशच्या बारीवर टपून बसल्यामुळें आणि त्यानें कोळी वगैरे सातपुड्यांतील लोकांस चिथावून दिल्यामुळें, त्यास धाकांत ठेवण्यास पेशव्यांची मुख्य फौज हरिपंत व परशुरामभाऊचे हाताखालीं खानदेशच्या हद्दीवर अडकून पडली होती.

( २ ) सिंदे, होळकर दोघेहि तटस्थ वृत्तीनें बारभाईच्या कारभाराची मजा पहात स्वस्थानीं जाऊन बसले होते.

( ३ ) हैदरानें जानेवारी व फेब्रुवारी या दोन महिन्यांत गुत्तीस वेढा घालून मुरारराव घोरपड्यास इतकें जेरीस आणलें, कीं तो खंबीर योद्धा नाहींसा होतांच कृष्णेपलीकडील समग्र मुलूख पेशव्यांचे ताब्यांतून गेल्यासारखा होता. ता. १५ मार्चचे सुमारास गुत्तीचें संस्थान हैदराच्या हस्तगत झालें.

( ४ ) ऑक्टोबर १७७५ त वामनराव पटवर्धन मरण पावला, तेव्हांपासून पटवर्धन सरदारांत फूट पडली. पांडुरंगराव व कोन्हेरराव आणि रामचंद्र गणेश कानडे व पानशे हे दुय्यम प्रतीचे चार सरदार कोल्हापुरकरांवर रवाना झाले होते. त्यांस कोल्हापुर प्रकरण, दोघां प्रतिनिधींचा दंगा, व कित्तूरकर देसायाची बंडखोरी यांनीं इतकें अडकवून टाकलें, कीं त्यांचाच निभाव कसा लागतो याची पंचाईत पडली. ३१ जानेवारीस बागेवाडीनजीक करवीरकरांनीं त्यांचा पराभव केला. हैदरानें करवीरकरांस पैसा व मदत पाठविली, तेणेंकरून पेशव्यांचें दक्षिणेकडील राज्य तर गेल्यासारखेंच झालें. अशा समयीं कोन्हेर-रावाच्या हातून मुराररावाची मदत कशी व्हावी !

( ५ ) याच संधींत पेशव्यांचा भरंवशाचा सरदार रामचंद्रपंत परांजपे यास अवदशा आठवून त्यानें ता. १८-२-१७७६ रोजीं तोतयास रत्नागिरीचे किल्ल्यां-

तून सोडून देऊन बारभाईंचे छातीवर आणखी एक धोंड आणिली. हैदर, करवीरकर व तोतया हे एकजीव झाले.

(६) दोन वर्षेपावेतों राज्याचा वसूल बंद पडून फौजेचे पगार तुंबले होते, त्यामुळें बारभाईंची कोणतीच मोहीम सिद्धीस जाईना. अशा अनेक पेंचांमुळें थोडी माघार घेऊन कारभाऱ्यांनीं एकदांचा तह पदरांत पाडून घेतला, तेणेंकरून इंग्रज हा एक तरी शत्रु कमी झाला; आणि पुढील वर्ष-सहा महिन्यांत सर्व जम नीट बसविण्यास त्यांस अवकाश मिळाला. तहाच्या नादांतून मोकळे होतांच त्यांनीं वरील सर्व अरिष्टांचें निरसन पुढील वर्षसहा महिन्यांत करून, ताज्या दमानें फिरून इंग्रजांस नरम करण्याची सिद्धता केली. ज्या दिवशीं पुरंदरचा तह सिद्धीस गेला, त्याच दिवशीं वडगांव येथें खडाजंगीचा संग्राम होऊन कोल्हापुरकरांचा वरचष्मा संपला. एक महिन्यानें प्रतिनिधि जाग्यावर बसले, कित्तूरकरांचें बंड मोडलें, मुधोळकर घोरपडे पेशव्यांचे स्नेही बनले, आणि कोन्हेरराव पांडुरंगराव पटवर्धन यास हैदरावर चालून जाऊन त्यास अडवून धरण्याची शक्ति आली. हे सर्व प्रकार काला-नुक्रम ध्यानांत धरून जोडले तरच त्या काळच्या गुंतागुंतीचा इतिहास कळून येईल.

इकडे तह मोडला असें समजून हेस्टिंग्सनें युद्ध पुढें चालू ठेवण्याविषयीं मुंबईकरांस ता. ७ मार्च रोजीं लिहिलें. उभय पक्षांनीं ओढून धरण्याची शिकस्त केली. कारभाऱ्यांनीं थांग लागूं दिला नाहीं. परंतु वाटाघाटींत फार दिवस गेले, फौजेस पोटास नाहीं, दुसरा पावसाळा येत चालला, असें पाहून साष्टी म्हणजे ठाण्याचा किल्ला तेवढा इंग्रजांकडे ठेवून शेवटीं ता. १-३-१७७६ रोजीं तह कायम झाला, त्यास पुरंदरचा तह † असें नांव आहे. त्यांतील कलमें:— १ साष्टी म्ह० ठाणा किल्ला इंग्रजांकडे राहवा. २ दादाबद्दल झालेल्या खर्चा-साठीं १२ लक्ष रुपये इंग्रजांस द्यावे. ३ फत्तेसिंगानें गुजराथेंत भडोच व इतर परगणे पांच लक्षांचे इंग्रजांस दिलेले त्यांजकडेच राहवे, आणि गोविंदरावास आसरा न देतां इंग्रजांनीं फत्तेसिंगाचें साहित्य करावें. बाकीचीं गुजराथेंतील सर्व ठाणीं इंग्रजांनीं मोकळीं करावीं. ४ दादांस दरसाल तीन लक्ष पंधरा हजार

† ख. १८२२, फारेस्ट पृ. २७७.

नेमणूक देऊन त्यांनीं दंगाधोपा किंवा फितूर न करितां गंगातीरास राहवें. आबाजी महादेव, तुळाजी पवार, खरगसिंग व गारद्यांचा जमादार नूरखान यांस दादांनीं घालवून द्यावें, जवळ बाळगूं नये. ५ इंग्रजांनीं दादाचें साह्य करूं नये.

याप्रमाणें तह होऊन लोकांस क्षणभर सुटका झालीशी वाटली. परंतु वास्तविक पाहतां या तहानें कोणताच निकाल लागला नाहीं. मुख्यतः दादा इतका हट्टी, अविचारी व धाडसी होता कीं, निकरावर आलेला गृहस्थ सर्व संग सोडून वाटेल तें करण्यास प्रवृत्त होतो, तशी त्याची स्थिति झाली. जवळची मंडळी तुळ्या पवार वगैरे यांस राज्याची किंवा नफानुकसानीची चाड कसली असणार! त्यांनीं दादास पाहिजे तसें बळवून इरेस चढविलें, व हरयत्नें करून त्यानें कारभाऱ्यांचे स्वाधीन होऊं नये असें निश्चित केलें. इतकी यातायात करून शेवटीं वसई व साष्टी बेट आपणास मिळालीं नाहींत म्हणून मुंबईकर इंग्रज इतके रुष्ट झाले, कीं त्यांनीं दादास आश्रय दिला व युद्ध कांहीं मनापासून थांबविलें नाहीं. हेस्टिंग्सचा पहिला उत्साह कमी होऊन, त्यानेंही मला हा तह बिलकूल पसंत नाहीं असेंच लिहून कळविलें. परंतु अप्टनची न्यायबुद्धि तीव्र असल्यामुळें शेवटीं कंटाळून त्यानें केलेला तह हेस्टिंग्स यास पुढें मान्य करणें भाग पडलें. एकंदरींत शस्त्रयुद्धाप्रमाणें, वाग्युद्धांतहि या वेळीं कारभारी मंडळी इंग्रजांस पुरी पडली. हा तह झाला नसता तर आणखी वर्ष सहा महिने तरी एकंदर प्रकरणाचा सोक्षमोक्ष झाला नसता, आणि निदान सालबाईच्या तहापेक्षा तो मराठ्यांस जास्त बाधक झाला नसता हें निश्चित आहे. बहुधा मराठ्यांस चांगलाच जय मिळून इंग्रजांचा गर्व साफ उतरला असता, आणि पुढील सहा सात वर्षे हें युद्धाचें घोंगडें भिजत न राहतां, एकंदर राजकारणास निराळें वळण लागलें असतें. कारण पुढें कडेकोट तयारी करूनहि व हार्टले गॉडर्डसारखे रथी महारथी योद्धे पुढें येऊनही जर इंग्रजांचा अखेरीस निभाव लागला नाहीं, तर या वेळीं तो बिलकूल लागला नसता असें म्हणावें लागतें. शिंदे होळकरांस बाजूस ठेवूनहि हरिपंत या वेळीं इंग्रजांशीं सामना करण्यास पूर्ण समर्थ होता. म्हणून पुरंदरच्या तहानें कोणाचाच फायदा न होतां, मराठ्यांचें मात्र विशेष नुकसान झालें हें उघड आहे.

तह झाल्याची खबर उभय सेनापतींस मिळाल्याबरोबर दादाची अत्यंत

त्रेधा उडाली. त्यास ताब्यांत घेण्याकरितां हरिपंत पुढें सोनगडास गेला, तों दादा मागें हटून सुरतेजवळ अश्विनीकुमार येथें राहिला. तेथें इंग्रज सेनापति कर्नल कीटिंग होता तो त्याचा बचाव करूं लागला. त्याच्या पुढील व्यवस्थे-संबंधानें दादाचे तर्फेनें सखाराम हरि व सदाशिव रामचंद्र आणि हरिपंताचे तर्फेनें आपा बळवंत यांचा पत्रव्यवहार सुरू झाला.† सदाशिव रामचंद्रास दादानें आपला दिवाण नेमिलें. प्रसिद्ध धनवान रामचंद्र बाबा शेणवी याचा हा मुलगा मोठा पैसेवाला होता. त्यानें आठ लाख रुपये दादास दिले. गोविंदराव गायकवाडाकडे त्यानें संधान चालविलें. मुंबईकरांचा हुकूम कीटिंग यास जाऊन त्यानें तो एकदम मान्य करून हरिपंतास लिहिलें, 'आतां लढा नाहीं. आम्ही दादांचा पक्ष सोडतों.' हरिपंताचा तळ सुरतेजवळ सहा कोसपावेतों आला महादजी उज्जनीस सर्व प्रकार पाहत स्वस्थ होता. होळकर मात्र चांदवडास आला. सखाराम हरीनें दादाचे तर्फेनें हरिपंताची गांठ घेतली. 'श्रीमंतांनीं तूर्त सुरतेंतच राहावें, त्यांस जिवाचें भय, कारभाऱ्याचा विश्वास पुरत नाहीं. परंतु भटकल्यानें परिणाम नाहीं,' हें त्यांस पुरतें समजलें. सखाराम हरि व मानाजी फाकडे हरिपंतास येऊन मिळाले. त्यास घेऊन मेअखेर हरिपंत गुजराथेंतून परत निघाला, तो जून १८ रोजीं पुरंदराखालीं दाखल झाला. दादासहि पुण्यास आणावयाविशीं सखाराम हरीनें पुष्कळ खटपट केली. परंतु वर तहांत सांगितलेले चार इसम, सातआठ हत्ती, कांहीं उंट, शागीर्द वगैरे सातआठशें माणसें घेऊन ता।सुरतेंत राहिला. त्या ठिकाणास रघुनाथपुरा असें नांव पडलें. एवढा घोळका ठेवणें इंग्रजांनीं मान्य केलें नाहीं; तेव्हां फक्त दोनशें लोक जवळ ठेविले. दोनशेंचा शिधा इंग्रज देतात. हरिपंताबरोबर फौजा व सरदार आले; पेशव्यांच्या त्यांच्या भेटी जून ता. १९ रोजीं किल्ल्याखालीं डेऱ्यांत झाल्या. श्रीमंतांनीं लहान मोठयांस आपल्या हातीं विडे दिले. मुजरा सर्वांचा घेतला. ब्राह्मणमंडळीस नमस्कार करावा म्हटलें म्हणजे नमस्कार करावा. एक प्रहरपावेतों मोठी दाटी झाली. सर्वत्रांस पहावें अशी आस्था. मध्यें उठावें किंवा मातुश्रीकडे जावें तें नाहीं. एक आसनीं प्रहरपावेतों बसले. अवतारी होत. अंतर्ज्ञान. मानाजी फाकडे, सखाराम हरि व सदाशिव रामचंद्र

† ख. १८४०, १८४२, १८४६, १८४९, १८५३.

यांच्या भेटी दाटींत ठीक नाहीं समजून मागाहून स्वतंत्र घेतल्या. याबद्दल त्या सरदारांस फार वाईट वाटलें. लष्करासमागमें आपणहि आलों असतां समारंभाचे वेळीं निवडानिवड केली, म्हणून फार श्रमी झाले. मुधोजी भोसले येऊन भेटले. त्यांच्या नजरा झाल्या. सखारामबापूनें सर्वांस बजाविलें कीं राज्याच्या या संकटसमयीं साऱ्यांनीं श्रीमंतांच्या पायाशीं निखालसपणें वर्तावें. श्रीमंतांनीं कोणासहि उणें केलें नाहीं. आहे नाहीं पाहून जें योग्य तें करावें. आम्हांस कारभाराची इच्छा नाहीं. समजून बोलेल त्याशीं समजून उत्तर करूं, न समजून बोलेल त्यास तसेंच उत्तर केल्याखेरीज परिणाम नाहीं.' याप्रमाणें एकंदर प्रकार घडून तूर्त स्थिरता झाली. कारभाऱ्यांचा वचक कायम राहिला. घेतलेलें कृत्य तडीस गेलें. दादा हातीं आला नाहीं तरी तो जगासमोर बंडखोर व भांडखोर ठरला. यामुळें ठिकठिकाणचे बंडावे तूर्तातूर्त मोडले, कोळयांचाहि बंदोबस्त झाला. यापूर्वीं सखारामबापूनें कारभारांतून निवृत्त होण्याचा विचार दर्शविला होता. तो लगोलग अंमलांत आणिला असता तर त्याचा स्वतःचा बोज राहून मराठशाहींत एक नमुनेदार उदाहरण निर्माण झालें असतें. तसेंच 'दादांस आमच्या स्वाधीन करा' असा हट्ट नानानें धरून मुंबई, कलकत्ता, यूरोपपावेतों पत्रांची झोड उठविली, त्याचा परिणाम उलट होऊन, हे दादाच्या जिवास अपाय करणार, अशी पुष्कळांची भावना झाली. त्याऐवजीं तो बंडखोर म्हणून जाहीरनामा काढून कारभारी आपल्या उद्योगास लागते तर दादा आपोआप ठिकाणीं बसला असता. वास्तविक त्यास नसतें महत्त्व या वेळीं कारभाऱ्यांनीं दिलें. तसेंच शिंदे होळकरांची समजूत काढून बारभाईमंडळ नवीन रचनेनें कायम करणें अत्यंत जरूर होतें. मोरोबा, बजाबा पुरंदरे, शिंदे, सखारामबापू, मुधोजी, फत्तेसिंग, तुकोजी वगैरे किती तरी प्रमुख मंडळी नाराज होऊन हरघडी विघ्नें उपस्थित करीत होतीं. त्यांची समजूत काढून सर्वांचा एकत्र सल्ला घेऊन राज्याची घडी नवीन बसविण्यास ही संधि फार चांगली होती. परंतु त्यांच्या एकवाक्यतेचा प्रयत्न न करितां, नानानें सर्व सत्ता स्वतः एकट्याचेच हातीं आणण्याचा आपला बेत हळूहळू सिद्धीस नेला. बाकी मराठी राज्याचें हित आत्यंतिक निष्ठेनें पाहणारा दुसरा कोणी नाहीं, अशी समस्त महाराष्ट्राची व प्रत्यक्ष त्याचा प्रच्छन्न प्रतिस्पर्धी महादजी यांचीहि खात्री होती. महादजीनें नानाबद्दलचा आपला आदर अनेक पत्रांत व्यक्त

केलेला आहे, त्या वेळीं मराठ्यांच्या कारभारापेक्षां इंग्रजांच्याच कारभारांत मतभेद, अव्यवस्था, अंतस्थ भांडणें, यांचा सुकाळ अधिक होता, हें हेस्टिंग्सच्या कारभाराचे परराष्ट्रव्यवहारासंबंधीं फॉरेस्टनें छापलेले तीन भाग पाहिल्यास सहज नजरेस येईल. हेस्टिंग्स यास मुंबईच्या हॉर्नबीचें करणें बिलकूल पसंत पडलें नाहीं. पण फ्रॅन्सिससुद्धां सर्व इंग्रजांची निष्ठा कंपनीचा फायदा करण्याची होती हें निर्विवाद दिसतें. महादजीची समजूत काढतां काढतां नानास पुढें नाकीं नव आले.

वरील सरदारांच्या व बालपेशव्यांच्या भेटींतच सखाराम हरि, मानाजी फाकडे, वगैरेंच्या भेटीचे, त्यांच्या पत्रव्यवहाराचे व राजद्रोही वर्तनाचे मासले अन्यत्र उल्लेखलेले असल्यामुळें, त्याचा विस्तार येथें करण्याचें कारण नाहीं. इंग्रजांचा आच मिटतांच तोतयाचें खूळ उद्भवलें, त्याचाहि संदर्भ दुसरीकडे आला आहे. सन १७७६ सालच्या फेब्रुवारीपासून डिसेंबरपावेतों तोतयाचा उपद्व्याप सर्व मराठमंडळास भोंवला.

---

प्रकरण तिसरें

# बारभाईच्या कारभारांतील विघ्नें

[ स. १७७६–७७ ]

१. दादासंबंधानें इंग्रजांची टाळाटाळ.
२. प्रकरणांची गुंतागुंत, हेस्टिंग्सच्या कारभाराची सनवारी.
३. दादाचें सुरतेहून मुंबईस प्रयाण ( ११-११-१७७६ ).
४. बारभाईचा बेबंदशाही कारभार, दादाचे साथीदार व तोतया.
५. पुरंदर-तहाचे विपरीत परिणाम.
६. सरदारांचे रुसवे व फितूर.
७. रामराजाचा मृत्यु ( ९-१२-१७७७ ), व शाहूचें राज्यारोहण.

* * * *

**१. दादासंबंधानें इंग्रजांची टाळाटाळ.**—स. १७७५ च्या पावसाळ्यांत लढाई बंद करण्याविषयीं कलकत्याहून मुंबईकरांस प्रथम हुकूम आला, तेव्हांपासून दादा व मुंबईवाले यांचे व्यवहार कसकसे घडले, त्याचा भरपूर पत्रव्यवहार १२ व्या खंडांत ( ले० ९५–२३७ ) आहे तो लक्षपूर्वक वाचला पाहिजे. पुरंदरचे तहाचे वेळीं मॉस्टिन मुंबईस बसून हॉर्नबीच्या तंत्रानें दादाचा बचाव शक्य तितका करीत होता. 'हॉर्नबीनें श्रीमंतांचा हात धरला आहे, तो कदापि सोडणार नाहीं,' असें दादाचा वकील लक्ष्मणपंत आंबेकर ७-९-१७७५ रोजीं मुंबईहून लिहितो, आणि म्हणतो 'आपलें काम विलायतेशिवाय होणार नाहीं, खुष्कीचे वाटेनें कोणी शहाणा मनुष्य पाठविल्यास आठ दहा महिन्यांत बंदोबस्त पक्का होऊन येईल.' या वेळीं आनंदीबाई धारेस असून अमृतराव बापाबरोबर गुजराथेंत होता. रघुनाथरावाचें व कीटिंगचें चांगलें जुळत नव्हतें. मॉस्टिन व इतर कौन्सिलदार त्यांस वस्त्रें, बहुमान वगैरे पाठवून वश करण्याचा प्रयत्न दादानें लक्ष्मण आपाजीचे मार्फत पुष्कळ केला. हा लक्ष्मणपंत अत्यंत कुशलतेनें व धूर्ततेनें वागून दादाची सेवा एकनिष्ठपणें करीत होता, ही गोष्ट या पत्रव्यवहारांत उघड दिसते. मुंबईस दादाचें संधान हरप्रयत्नानें जुळविणारा हाच इसम होय. दादाची मात्र धरसोड व लटपट पदोपदीं दिसते. स. १७७५ च्या नोव्हेंबरांत दादा रेवातीरीं रणगडास असतां चिरंजीव बाळ ( बाजीराव ) त्याचे भेटीस आणला होता. 'इंग्रजांचें एकही बोलणें शाश्वत दिसत नाहीं, काय करावें तें लिहिणें,' असें दादा लक्ष्मणपंतास विचारतो. 'अण्णा, हरतऱ्हेनें लढाई सुरूची परवानगी येई ते गोष्ट करावी.' शिंदे होळकर स. १७७५ च्या उन्हाळ्यांत हरिपंतास सोडून स्वस्थानीं गेले, तें दादाचें कारस्थान असें दिसतें. तसेंच 'कलकत्तेकरांस दहा पांच लाख कबूल केल्यानें लढाई सुरू होऊन फितुरियांचें पुरतें पारिपत्य होत असल्यास, मुंबईकरांचे विचारें कबूल करून मसलत शेवटास न्यावी, तसेंच अप्टनाची कांहीं दुराशा आढळल्यासही कबूल करावें.' म्हणजे या मंडळीस पैसे चारून वश करावें असें दादानें लिहिलें. कर्नल कीटिंगचें व सखाराम हरीचें वांकडें आलें होतें. 'श्रीमंतांनीं सखाराम हरीस घालवून द्यावें, पारिपत्य करावें, नाहीं तर आम्ही करितों, हेच आमचे मर्जीप्रमाणें घडूं देत नाहींत, असें निमित्त ठेवून हल्ला करून मारूं,' असें कीटिंगनें दादास कळविलें,

श्रीमंतही लाचार झाले. ही हकीकत स्वतः सखारामानेंच लक्ष्मण आपाजीस कळविली; आणि पुनः लिहिलें, कीं 'गंगाबाईचें मूल खरें, यावर इंग्रज भांडण भांडतील तर इंग्रजांनीं मुलाविशीं जामीन राहून त्यासच श्रीमंतांचे ओटींत घालावें, म्हणजे दगापेंच त्यास होणार नाहीं. परंतु फितुऱ्यांचें पारिपत्य करावें.' असा दादाचा गोंधळ चालू असतां पुरंदरचा तह होऊन आपणांस गंगातीरीं राहवयाचें ठरलें अशी बातमी त्यास पोंचली, त्यामुळें त्याची अत्यंत निराशा झाली. त्यानें आपले वकिलामार्फत मुंबईकरांकडे लगोलग पत्रांची झोड उठविली कीं, 'दारमदारांचें बोलणें हें केवळ एक पक्ष समजोन होत नाहीं. अप्टन यांणीं त्यांचें वर्तमान ऐकिलें, तसेंच येथें येऊन आमचें ऐकावें. पल्ला लांब, सबब अशी तोड काढावी कीं आम्ही सारे इंग्रज सुद्धां फौजांसह कूच करून खानदेशांत गंगातीरपर्यंत जावें, तेथें अप्टनांनीं तिकडोन यावें, सर्व मजकूर समजावें, उपरांतिक त्यांचे आमचे विचारें होईल तसें करूं. नाहीं तरी आम्हांस मुंबईस पोंचवावें. फितुरी लबाड, कृत्रिमी, आम्हांस कैदेदाखल ठेवावयाची योजना करतात. त्यांचे आंतले बारीक अर्थ अप्टनाचे ध्यानांत आले नाहींत. इंग्रजांचे घरास आम्ही आलों असतां, त्यांचे स्वाधीन आम्हांस कैदेदाखल करवितात हें इंग्रजांचे अभिमानास उचित कीं काय? खर्च ते चालविणार म्हणून उपकार. धर्मादायाप्रमाणें देतील ऐसा सलूख आम्हांस काय कर्तव्य! दौलत करावी म्हणोन अंगरेजांचा आश्रय धरिला, त्यास कैद प्राप्त होणार, तेव्हां दैव म्हणावें. सारा दावा दौलतीचा आहे, हें हॉर्नबीच्या हस्तें विलायतेस कळवावें. पातशहा व कंपनी राजी करून त्यांचा हुकूम यांस आणावा. त्यांनीं लिहिला प्रकार तर होणेंच नाहीं. यापेक्षां मरण कबूल, पण कैद पुरवत नाहीं. निदानपक्षीं रेवातीरीं भडोचेपासून १७ कोस रणगडास राहूं. हा केवळ कनिष्ठाहून कनिष्ठ प्रकार. तुटोच लागलें तरी जडावें. तोंडाची वाफ गमाऊं नये. शिबंदीचें देणें पंनास साठ लाख आहे, त्याची वाट जाली पाहिजे. खजाना नाहीं. लाचार आहों. इंग्रजांनीं सारीच दौलत आमची कायम करून द्यावी, म्हणजे त्यांचे व आमचे दोघांचेंहि नफे आहेत. उलट पक्षीं, दोघांचेंहि नुकसानच. अबरूवर आलें, त्यापक्षीं प्राण जातील तर बरें. अबरू शत्रूचे हातीं न जावी. निदान आम्हांस हैदराकडे होनावराकडून पावतें करावें. तूर्त जनरलाचे म्हणजे हॉर्नबीचे भेटीसच मुंबईस येतां, चौकीचीं माणसें देऊन आम्हांस

पुण्यास पाठवावें असा हुकूम देखील आला. अष्टनानें साऱ्यांचीच अबरू घेतली. गुजराथ सोडविलेली हातची गेली. परम दुःख, काय लिहावें ! अंगरेजां-प्रमाणें दुसरा कोणी थोर बळकट नाहीं, म्हणोन आसरा केला. शेवटीं आमचे कपाळानें घालविलें. दैव आपलें, त्यांस काय बोल ! निदानीं काशीप्रयागाकडे लावून द्यावें. श्रीजवळ चित्तास येईल तेथें राहूं. मारवाडांत निघोन गेल्यास वाट फुटेल. इंग्रज सुद्धां आमचेजवळून कूच करून जातात. फिरंगी गोवेकरां-कडेहि राजकारण आहे. बनलें तर तेंही करतों. सर्वांमध्यें अंग्रेज श्रेष्ठ, त्यांज-कडोन हिसका बसला, तेव्हां वैराग्यच प्राप्त. आम्हांस पटकी बसविली. केवळ विश्वासघात, इंग्रज मोठे दगाबाज बेइमानी होत गेले. मुंबईस निघून यावें तर शिबंदीनें प्राणाशीं गांठ घातली आहे. फडके वगैरे फौजा घेऊन आम्हांवर येतात, आमचे भरंवशावर राहूं नये, वाट फुटेल तिकडे कूच करून जावें, असें आम्हांस सुरतवाले सांगतात. त्यांचा आसरा करून प्राण रक्षावयाकरितां त्यांजकडे गेलों, त्याची ही गत ! त्यांजकडे जवाहीर आहे तें तरी परत द्यावें, तें देत नाहींत. तोंडानें देखील गोड बोलत नाहींत. बापू व नाना दोघांनींच तह केला. सिंदे, होळकर, भोसले, नारोबा वगैरे कोणी राजी नाहींत. सलु-खाचें बोलणें कृष्णराव बळवंतांनीं सखाराम हरीचेमार्फत लाविलें आहे. मेस्तर शहास विलायतेस पाठवावा. त्याचे हातून धरबंद केला जाईल.' अशा तळ-तळाटांत सर्व जगास शिव्याशाप देत दादानें पावसाळा कसाबसा सुरतेस काढिला. त्याची बुद्धि किती वांकडी व क्षणभंगुर होती हें त्याच्याच वरील उद्गारांत व्यक्त होतें. जिवाचे बचावासाठीं इंग्रज गृहस्थ स्वतः त्याचेजवळ पाहऱ्यास राहणार होते; सखाराम हरीनेंही तीच सल्ला दिली, पण कोणाचेंही दादानें ऐकलें नाहीं. पेशवाईपद मिळविण्याची हाव त्यानें अखेरपर्यंत सोडिली नाहीं. पेशवाई म्हणजे मराठी राज्याची जोखीमदारी ही त्याची भावना नव्हती. राज्य भोगण्यासाठीं आहे असेंच तो समजे. (खं. १२–९८, १०६, १०९, १२४, १२९, १३७–१६४).

**२. प्रकरणांची गुंतागुंत, हेस्टिंग्सच्या कारभाराची सन-वारी.**—माधवरावाचे मृत्यूनंतर मराठेशाहींत जी फूट पडली ती उत्तरोत्तर वाढतच गेली, मुख्य ठिकाणच्या या फुटीचें अनुकरण सहजच इतर अनुयायांनीं केलें. जिकडे तिकडे आपसांतील बेबनाव सुरू झाले; गायकवाडींत गोविंदराव

व फत्तेसिंग, नारोशंकराचे पश्चात् त्याचे पुत्र, होळकरांच्या घरीं अहिल्याबाई व तुकोजीराव, प्रतिनिधींपैकीं भवानराव व भगवंतराव, नागपुराकडे साबाजी व मुधोजी, पटवर्धनांचे घरांत चुलते पुतणे, यांच्यांत चहूंकडे गृहकलह पेटले. असल्या स्थितींतच करवीरकर छत्रपति, निजाम, हैदर, इंग्रज, इत्यादिकांचे मराठेशाहीवर बाहेरून धक्के बसले. मराठशाहीच्या इतिहासांत या सर्व प्रकरणांची गुंतागुंत एवढी मोठी आहे, कीं त्यांच्या तपशिलांत शिरून हा इतिहास बनविला तर त्याची मर्यादा भलतीकडे वाढेल. शिवाय वरील प्रकरणांतील गृहकलह केवळ कौटुंबिक स्वरूपाचे आणि आपमतलबाचेच असल्यानें, त्या त्या घराण्याच्या इतिहासांत त्यांस महत्त्व असलें तरी त्यांचा संपूर्ण वृत्तान्त येथें देणें अयुक्तच होईल. मराठी राज्याच्या मुख्य घडामोडींशीं त्यांचा जेवढा संबंध असेल तेवढ्यापुरताच त्यांचा उल्लेख--तोहि संक्षेपानें--मी करणार आहें. खरें म्हटलें तर मराठशाहीचा हा अधःपात उत्तरोत्तर वाढतच गेला. फक्त सालबाईच्या तहापासून सवाईमाधवरावाच्या मृत्यूपर्यंतच्या बारा वर्षांत राज्यकारभाराचें स्वरूप अल्पांशानें निवळलें होतें.

व्यवहार भानगडीचे होण्याचें दुसरें एक कारण म्हणजे कलकत्त्याच्या कौन्सिलांतील भांडाभांडी होय. मराठ्यांचे व्यवहारांत ह्या भांडाभांडीचा संपर्क अतोनात पोंचतो. मराठी पत्रव्यवहारांत ठिकठिकाणच्या व्यक्तींमार्फत इंग्रजांचीं प्रकरणें पुढें येतात, तीं समजण्यास कलकत्त्याच्या कौन्सिलांतील वादविवादांची माहिती दृष्टीपुढें पाहिजे. त्यासाठीं स. १७७२ पासून १७८५ पावेतोंच्या हेस्टिंग्सच्या कारभाराचे खालील टप्पे ठोकळ मानानें ध्यानांत ठेवणें सोयीचें होईल.

स. १७७२–७४ हेस्टिंग्स केवळ बंगालच्या गव्हर्नरीवर होता.

ऑक्टो० १७७४–सेप्टेंबर १७७६ हेस्टिंग्सच्या विरुद्ध कौन्सिलांत मताधिक्याचा जोर.

स. १७७७–१७८२ हेस्टिंग्सला मनमुराद स्वातंत्र्य प्राप्त झालें.

स. १७८२–१७८५ फेब्रुवारी पावेतों हेस्टिंग्सच्या कारभारास कंपनीच्या डायरेक्टरांचा तीव्र विरोध झाला. २८ फेब्रुवारीस मॅक्फर्सनकडे हवाला सोंपून हेस्टिंग्सनें मार्च ता. ८ स.१७८५ रोजीं युरोपास प्रयाण केलें.

कौन्सिलच्या सभासदांची नांवनिशीही दृष्टीसमोर ठेवल्यानें इंग्रजी राज-कारणाचे हेलकावे कळून येतील. जनरल क्लॅव्हरिंग, क० मॉन्सन व फिलिप फ्रॅन्सिस हे सभासद इंग्लंडाहून आलेले हेस्टिंग्सच्या विरुद्ध होते. चवथा बार्वेल हिंदुस्थानांतला त्यास अनुकूल होता. स.१७७६ च्या सेप्टेंबर ता. २५ रोजीं मॉन्सन मरण पावला, त्याची जागा न भरल्यानें तेव्हांपासून हेस्टिंग्सला अध्यक्षाच्या जादा मताचा लाभ मिळूं लागला. पुढें ता. ३०-८-१७७७ रोजीं क्लॅव्हरिंग मरण पावला, तेव्हां हेस्टिंग्सचे दोन प्रतिपक्षी कमी झाले. त्या सालच्या डिसेंबरांत इंग्लंडाहून व्हेलर हा नवीन इसम नेमून आला, तो हेस्टिंग्सच्या विरुद्ध असे. ही स्थिति स.१७८० पावेतों चालली. त्या सालच्या १५ ऑगस्टास बार्वेल परत गेल्यानें हेस्टिंग्सचा एक पक्षपाती कमी झाला, पण पुढील नोव्हेंबरांत फ्रॅन्सिस परत गेल्यानें हेस्टिंग्सची सरशी झाली. या पूर्वीच सेनापति आयरकूट याची नेमणूक कौन्सिलांत झाली, पण त्याला पुष्कळदां बाहेर मोहिमांवर राहवें लागे.

यानंतर हेस्टिंग्सच्या कारभारांतील ठळक प्रकरणें खालीं तारीखवार दिलीं आहेत तीं ध्यानांत ठेवल्यास मराठ्यांच्या कागदांत त्यांचा केव्हां कसा उल्लेख येता तें समजून येईल; आणि हेस्टिंग्सचा एकंदर आयुष्य क्रम नजरेसमोर राहिल्यानें हिंदी राजकारणाचे पल्ले कसे बदलत गेले तें कळेल. मराठी कागदांत हेस्टिंग्सचें नांव 'इस्टिन' असें येतें.

स. १७३२ हेस्टिंग्सचा जन्म.

स. १७५० कारकून म्हणून प्रथम कलकत्त्यास दाखल झाला.

स. १७५६ सिराज उद्दौल्यानें कासीम बाजारच्या वखारींत त्यास कैद केलें.

स. १७५७ प्लासीचे लढाईनंतर मीरजाफराजवळ रेसिडेंट म्हणून नेमणूक झाली.

स. १७६० कलकत्त्याचे कौन्सिलचा सभासद झाला.

स. १७६४ इंग्लंडास परत गेला.

स. १७६६ ता. २६ नोव्हेंबर रोजीं कंपनीचे एकंदर कारभारावर पार्लमेंटाची देखरेख राहवी असा ठराव मंजूर झाला.

स. १७६८ मद्रास कौन्सिलांत सभासद होऊन हेस्टिंग्स परत इकडे आला.

स. १७७२ बंगालचे गव्हर्नरचे जागीं त्याची नेमणूक झाली ( ता. २८ सेप्टेंबर ). या पूर्वींच जून महिन्यांत मराठ्यांस रोहिलखंडांतून हांकलून देण्यासंबंधानें वजीर व रोहिले यांचा तह होऊन त्यावर ब्रिटिश सेनापतीची साक्ष होती. हेस्टिंग्ज कारभार करूं लागला तेव्हां बंगालचे इंग्रजांस १२० लक्ष रुपये कर्ज होतें.

स. १७७३ ता. २४ जून रोजीं रोहिल्यांचें प्रकरण तोडण्यासाठीं हेस्टिंग्स कलकत्त्याहून बनारसला गेला.

ता. २६ नोव्हेंबर रोजीं रोहिल्यांवर स्वारी करण्याचा ठराव बंगाल कौन्सिलच्या गुप्त समितीनें केला.

१-७-१७७३ रेग्युलेटिंग ॲक्ट पार्लमेंटांत मंजूर.

स १७७४ रोहिल्यांवर इंग्रजांची चढाई.

ता. २ फेब्रुवारी रोजीं कर्नल चंपियन यास रोहिलखंडांत जाण्याचा हुकूम सुटला; आणि त्याप्रमाणें २४ फेब्रुवारी रोजीं तो रोहिल्यांचे हद्दींत शिरला.

ता. १७ एप्रिल रोजीं युद्ध सुरू झालें.

ता. २३ एप्रिलला लढाई झाली तींत हाफीझ रहमत मारला गेला

ता. ९ मे रोजीं या लढाईची हकीकत कलकत्त्यास कौन्सिलला जाहीर झाली. पुढें मिडलटनची नेमणूक अयोध्येच्या रेसिडेन्सीवर झाली.

ता. ६ ऑक्टोबर रोजीं फैजुल्लाखान रोहिला याजबरोबर तह झाला.

ता. २६ ऑक्टोबर रोजीं रेग्युलेटिंग ॲक्टाप्रमाणें कलकत्त्यास कौन्सिलची पहिली बैठक झाली.

स. १७७५ जानेवारी सुजाउद्दौल्याचा मृत्यु.

ता. ६ मे, नंदकुमारास पकडलें.

ता. ८ जून, त्याचा खटला कोर्टांत सुरू झाला.

ता. ५ ऑगस्ट, नंदकुमारास फांशीं दिलें.

स. १७७६ सेप्टेंबर २५ मॉन्सन मरण पावला. इंग्लंडांत हेस्टिंग्सच्या वकिलानें कंपनीचे कोर्टास कळविलें कीं हेस्टिंग्सची इच्छा नोकरी सोडावी अशी आहे. त्यावरून तेथें ऑक्टोबरांत व्हेलरची गव्हर्नर जनरल म्हणून नेमणूक झाली.

स. १७७७

ता. ८ ऑगस्ट, हेस्टिंग्सनें मिसेस इमॉफशीं लग्न लाविलें. या लग्नास सर जॉन क्लॅव्हरिंग प्रकृति नादुरुस्त असतांही हजर राहिला, त्यायोगानें आजार वाढून ३० ऑगस्ट रोजीं तो मरण पावला. पुढें डिसेंबरांत व्हेलर येऊन दाखल झाला, तेव्हां हेस्टिंग्सनें आपण गव्हर्नर जनरलचा राजिनामा देत नाहीं असें त्यास कळविलें, म्हणून व्हेलर कौन्सिलर होऊन राहिला. बहुधा त्याचें मत फ्रॅन्सिसच्याच बाजूचें असे.

ता. १४ ऑक्टोबर, अमेरिकेंत इंग्रजांविरुद्ध युद्ध सुरू होतें, त्यांत से० बर्गायन सर्व फौजेसह अमेरिकन से० गेटच्या स्वाधीन झाला. इंग्रजांच्या पराजयाची ही बातमी पुढें मुंबईवरून कलकत्त्यास ११-६-१७७८ रोजीं पोंचली.

स. १७७८

ता. ३० मार्च, इंग्लंड फ्रान्सचें युद्ध सुरू झालें; बातमी पुढें इकडे आली.

ता. १० जुलई, कलकत्तेकर इंग्रजांनीं चंद्रनगर काबीज केलें.

ता. १६ ऑक्टोबर, पांदिचरी इंग्रजांनीं हस्तगत केली.

ता. १३-५-१७७९ रोजीं पश्चिम, किनाऱ्यावरील फ्रेंच बंदर माहे इंग्रजांस हस्तगत झालें, त्यामुळें हैदरअलीचा दारूगोळयाचा पुरवठा बंद पडून तो इंग्रजांचा वैरी बनला.

स. १७७९

ता. १४ जानेवारी, तळेगांवावर इंग्रज फौज पेशव्यांस शरण गेली.

स. १७८०

फेब्रुवारी, गोहदचा राणा इंग्रजांनीं मिळवून घेतला, त्याचे मदतीस मेजर पॉफम ग्वाल्हेरवर चढाई करून गेला.

ता. ३० ऑगस्ट रोजीं कर्नल कामकच्या खर्चास स्वतःचे पैसे दोन लाख हेस्टिंग्सनें पाठवून दिले.

ता. १५ ऑगस्ट, बार्वेल इंग्लंडास परत गेला.

ता. १७ ऑगस्ट रोजीं हेस्टिंग्स व फ्रॅन्सिस यांचें द्वंद्वयुद्ध झालें. पुढें ११ सेप्टेंबरपर्यंत फ्रॅन्सिस आजारामुळें कौन्सिलला गेला नाहीं. ता. १४ नोव्हेंबरच्या सभेस फ्रॅन्सिस हजर राहून लगेच तो इंग्लंडास परत गेला. तिकडे त्यानें हेस्टिंग्सविरुद्ध जोराची चळवळ सुरू केली. १ डिसेंबरचें त्याचें बोटीवरचें पत्र इंपेच्या विरुद्ध लिहिलेलें मोठें मजेदार आहे. हेस्टिंग्सचे पश्चात् व त्यापुढेंही अनेकवार गव्हर्नर जनरलची जागा आपणास मिळावी म्हणून फ्रॅन्सिसनें अंगजंग पछाडले, पण त्याचा मनोरथ सिद्धीस गेला नाहीं.

स. १७८१

ता. ७ जुलई, हेस्टिंग्स कलकत्त्याहून निघून बनारसला १४ ऑगस्टला पोंचला.

ता. १६ ऑगस्टला त्यानें चेतसिंगास कैद केलें. त्यावर लोकांनीं २० ऑगस्टला राजास सोडविण्यासाठीं बंडावा केला.

ता. २२ ऑगस्ट रोजीं हेस्टिंग्सला भोसल्यांचा वकील वेणीराम यानें आपल्या पालखींत वेष पालटून बसवून गंगा नदीपलीकडे चुनारगडला सुखरूप पोंचविलें.

ता. ४ सेप्टेंबरला लढाई होऊन चेतसिंग परागंदा झाला.

ता. २५ सेप्टेंबरला हेस्टिंग्स चुनारगडाहून परत बनारसला आला, आणि ता. ३० रोजीं चेतसिंगाचे जागीं महीपनारायण यास त्यानें गादीवर बसविलें. पुढें हेस्टिंग्स लखनौस गेला. तो पुढील एप्रिलांत परत कलकत्त्यास गेला.

स. १७८२

ता. ३० मे रोजीं डंडासनें हेस्टिंग्सला परत बोलावण्याचा ठराव पार्लमेंटांत मंजूर करून घेतला.

स. १७८२

ता ३० ऑक्टोबर, आयरकूट अशक्त होऊन मद्रासेहून कलकत्त्यास परत आला.

स. १७८३
ता. २७ एप्रिल, सर आयरकूट युरोपास परत जात असतां समुद्रांत मरण पावला. व्हेलरही याच सालीं मरण पावला.

स. १७८४ फेब्रुवारी, हेस्टिंग्स कलकत्याहून लखनौस जाण्यास निघाला.
ता. २ एप्रिल, हेस्टिंग्सनें कौन्सिलला लखनौहून खलिता लिहिला, त्यांत दिल्लीच्या बादशहास मदत करण्यासंबंधीं सूचना होत्या, पण त्या कौन्सिलनें मंजूर केल्या नाहींत.
नोव्हेंबरांत हेस्टिंग्स लखनौहून परत कलकत्त्यास गेला.

१-२-१७८५ हेस्टिंग्सनें कौन्सिलची शेवटची बैठक करून गव्हर्नर जनरलचा कारभार सोडला.

१७८८–९४ हेस्टिंग्सच्या कारभाराची पार्लमेंटांत चौकशी झाली.

२५-३-१८०७ फ्रॅन्सिसची पार्लमेंटांत शेवटची हजिरी व पुढें लगेच मृत्यु.

२२-८-१८१८ हेस्टिंग्सचा मृत्यु, वय ८६ वर्षें.

**३. दादाचें सुरतेहून मुंबईस प्रयाण** ( ११-११-१७७६ ).— पुरंदरच्या तहानें दादाचें प्रकरण कारभारी मिटवूं पाहणार, तोंच त्यांची हिंमत कसास लावण्यास तोतयाचें प्रकरण उत्पन्न झालें. पुरंदरचा तह ६ मार्चला झाला, त्या पूर्वींच १८ फेब्रुवारी रोजीं रत्नागिरीस तोतयाची सुटका झाली; आणि पुढील चार पांच महिन्यांत त्यानें कोंकणच्या भागांत मोठी धामधूम उडवून दिली. हें विघ्न दादाच्या चांगलेंच पथ्यावर पडलें. तो मुंबईस आपल्या वकिलास लिहितो, 'भाऊचें बंड बळावलें आहे. तिकडे एखादा शहाणा मनुष्य पाठविणें. काय चरित्र आहे तें मनास आणावें. केवळ आम्ही पाठविलें हा भाव दर्शवूं नये. मधाचें बोट तोंडाजवळ न्यावें, तोंडांत तर सांपडूं देऊं नये. दाखवावें मात्र. भावगर्भ मनास आणावा.' आपली व्यवस्था ठरवून द्या अशी टोंचणी दादानें कर्नेल कीटिंगला लाविली. अद्यापि सुरतेस इंग्रज फौज दादाजवळ होती. दादानें आग्रह केल्यावरून कीटिंग मुंबईस गेला. इकडे इंग्रज त्यास सुरतेच्या बाहेर फिरकूं देईनात. तोतयावर पुणेकरांच्या फौजा पावसाळ्यांतच चालून गेल्या, त्या सर्वांस ताकीद होती, कीं दादासही पकडून हस्तगत करावें. तहाप्रमाणें मुंबईकर त्यास कारभाऱ्यांचे हवालीं करीनात. ते म्हणत, 'दादा कांहीं आमचा कैदी नाहीं, किंवा तुमचे हवाली त्यास करण्यास आम्ही बांधले

गेलों नाहीं. तुम्ही त्यास पाहिजे तसा आपल्या स्वाधीन करून घ्या.' असें बोलणें आल्यावर त्याजवर फौजा पाठवून हस्तगत करणें ओघास आलें. तोतयावर फौजा चालून गेल्या त्यांनाच ही कामगिरी सांगण्यांत आली. इंग्रजांनीही दादास कळविलें, कीं तुम्ही आतां आपला बचाव पाहिजे तसा करा. त्यांनीं त्याचा तनखाही बंद केला. तेव्हां एक तर एकठ्यानें कैद्यासारखें इंग्रजांजवळ पडून राहवें, किंवा अन्यत्र खटपट करून पुढील मार्ग पाहवा. असा विचार ठरवून दादा तीर्थस्नानास जाण्याचें निमित्त करून बाहेर पडला.

'सुरतेंतून आश्विनीकुमारास स्नानास येणार होते. स्वारी तयार असतां इंग्रजांनीं सांगोन पाठविलें कीं बाहेर परिच्छिन्न जाऊं नये. त्यांनीं दरवाजाचाही बंदोबस्त केला; बाहेर जाऊं दिलें नाहीं. तेव्हां फार श्रमी झाले.' तेव्हां कदाचित् हेच आपणास बारभाईंचे हवालीं करतील या भीतीनें त्यानें पोर्तुगीझांशीं संधान बांधिलें; आणि त्यांच्याशीं तह ठरवून ऑगस्टांत दादा उदवाड्यास व सेप्टेंबरांत दमणास आला. त्याचे पाठीवर गणेशपंत बेहेरे व अंताजी नागेश वगैरे सरदार बातमी काढून येत होते. दमणाहून त्यानें तोतयाची विचारपूस केली. तोतयाकडून नृसिंहाचार्य व यज्ञेश्वर दीक्षित दादाकडे बोलणें करण्यास आले. दमणास दादास आश्रय मिळाला, ही बातमी पुण्यास कळतांच पोर्तुगीझ वकील पुण्यास होता, त्यास बारभाईंनीं तंबी दिली, तेव्हां पोर्तुगीझांनीं दादास घालवून दिलें. 'फिरंगी लबाड व नाकुवत, आपणास हैदराकडे पोंचवीत सुद्धां नाहींत,' असें पाहून दादा तेथून तारापुरास गेला. 'दादासाहेबांजवळ चहूंकडून फौजा गेल्या. पळावयास वाट नाहीं, तेव्हां कारभाऱ्यांस पत्रें पाठविलीं कीं सलूख करावा, अतिशयास न पडावें; आमची सोय करून द्यावी, रेवातीरीं राहूं.' याप्रमाणें फारच पाणउतारा होऊन लिहिलें व मुंबईस गेले. होळकरामार्फत बोलणें लागलें आहे.(खरे–१८७९, १९१८, १९३८).

महादजी सिंदे तोतयावर चालून गेला, त्या वेळींच दादासही पकडून आणावें, अशी त्यास नानाची ताकीद होती. त्यावर महादजी ८-११-१७७६ रोजीं नानास लिहितो, 'दादासाहेब तारापुरास दीडशें माणसांनिशीं आहेत. आम्ही येथून फौज घेऊन गेल्यास भडकून पळून जातील. पाण्यांत पळोन गेल्यास उपाय काय? त्यांजपाशीं सामान भारी असतें तर आम्हींच जातों. फौज सुद्धां गेल्यानें मुलखाची खराबी होईल. यास्तव भिवराव पानशे व विसाजीपंत

लेले यांस रवाना करतों. श्रीमंत प्रतापी आहेत. सर्व खुळें दूर होऊन बंदोबस्त होईल.' महादजीनें तर्क केल्याप्रमाणेंच दादा पळून मुंबईस गेला. (ऐ. टि. २-२५).

इकडे तहांतील अटी विल्हेस लावून दादास ताब्यांत दिल्याशिवाय बारभाईंनीं अप्टनास सोडलें नाहीं. ता. २२-८-१७७६ रोजीं त्यास बारभाईंनीं पत्र लिहिलें, त्यांत दादाचा काशीस राहण्याचा उल्लेख खालीलप्रमाणें आहे. 'रघुनाथरावाची निशा शुद्ध हृदयापासून आम्ही कबूल करितों, कीं त्यांनीं श्रीबनारसमध्यें राहवें. त्यांस पांच लाखांचा करार करतों, परंतु त्यांहीं फितुर किंवा हंगामा न करावा, व आमचे परवानगीशिवाय मुक्काम फिरवूं नये. त्यांहीं नवीन तह कोणाशीं करूं नये. बनारसची तजवीज लागेपर्यंत सुरतेस राहवें.' परंतु सुरतेस आपणास बारभाई पकडतील या भीतीनें दादा लगोलग तेथून निसटून दक्षिणेस दमणास गेला; नोव्हेंबरचे आरंभीं तो तारापुरास होता. 'पाठीवर गणेश विश्वनाथ आहेत. वसईकडून भिवराव पानशे गेले. त्रिंबकाकडून शिवाजी विठ्ठल जाणार. वसईंचे आरमारही सिद्ध आहेत. चोरून पळून गेले तर न कळे. सावधतेविषयीं सर्वांस पत्रें गेलीं आहेत.' पण पळून जाण्यांत दादाइतका पटाईत बहुधा दुसरा कोणी सांपडणार नाहीं. इंग्रजांनीं जहाजें देऊन त्यास तारापुराहून मुंबईस नेलें. ता. ११-११-१७७६ रोजीं तो मुंबईस पोंचला. मुलगा अमृतराव बरोबर होता तो तारापुरासच थोडी फौज घेऊन राहिला. दादा लिहितो, 'पूर्वीं हत्तीवर बसलों होतों, सांप्रत लहानशा घोड्यावर आहों. कारण कीं हत्ती मातबर खरा, परंतु पायास आजारी, मार्ग न चालवे, तेव्हां घोड्यावर बसणें प्राप्त आहे. हत्तीचे पाय शाबूद होऊन मार्ग चालतोसें समजल्यास फिरोन हत्तीचीच स्वारी करूं. तूर्त चार दिवस पोट भरतों. मुंबईकर आम्हांस दरमहा पंधरा हजार देतात, ते आम्हांस थोडे, त्यांस बहुत.' (खरे-१९१४, खं. १०-१७४, १७८-८०, १९१).

अमृतराव तारापुरास राहिला, त्यास भीवराव पानशानें लुटलें. तो स्वतः मात्र निसटून मुंबईस व तेथून सुरतेस गेला. 'श्रीमंत मनसब्याचे खटपटीस चुकत नाहींत. इंग्रज ऐकत नाहींत. आपण पंतप्रधान म्हणून हिंदुस्थानांतील तमाम प्रमुखांस पत्रें लिहून त्यानें बाहेर नानाप्रकारच्या खटपटी चालविल्या. इंग्रज बादशहासही पत्रें लिहिलीं. अप्टन व हेस्टिंग्स यांजवर तर सारखा

पत्रांचा पूर पसरला, तथापि इकडे बारभाईसही पत्रें लिहून सलूख करावा, अतिशयास न पडावें, आमची सोय करून द्यावी, रेवातीरीं राहूं.' असें फारच पाणउतारा होऊन लिहिलें. पुढें होळकराचे मार्फत पुरंदरास त्यानें बोलणें लाविलें. शिंदेही त्यांत आहेतच. मिळून दादाची खटपट कधीं बंद पडली नाहीं. ( ख. १९१८, १९३४, १९३८ ).

दादा हातचा निसटल्यावर कारभाऱ्यांनीं आनंदीबाईचा उच्छेद आरंभिला. नोव्हेंबर सन १७७५ त दादाचा बेत पुण्यावर चालून जाण्याचा असतां, धारेहून आनंदीबाई व बाजीराव त्याचे भेटीस थोडे दिवस सुरतेस गेलीं होतीं. पुढें अप्टननें इंग्रजांचें युद्ध थांबविलें, तेव्हां तीं दोघें फिरून धारेस गेलीं. तेथें बाईनें फौज ठेवून भेलसा वगैरे महालांत दंगे फार केले, ते विसाजी गोविंद आठवले व खंडेराव त्रिंबक ओढेकर यांनीं जाऊन मोडले; आणि अप्टनचा तह झाल्यावर बाईस पकडण्यासाठीं धारेस वेढा घातला.‡ स. १७७६ च्या जुलईपासून नोव्हेंबरपर्यंत बाईनेंही मोठ्या शौर्यानें लढून कांहीं काळ टिकाव धरिला. दादास हकीकत मुंबईस कळली. 'लढणें अगर बोलणें आम्हासीं करावें, बायकामुलांस तसदी द्यावी हें योग्य कीं काय ?' असें दादा अप्टनास लिहितो. मुंबईहून त्यानें ता. २६-११-१७७६ रोजीं महादजीस लिहिलें, 'प्रस्तुत सुरतेहून बातमी आली कीं पातशहा व वजीर असोफ फौज सुद्धां दक्षिणचे मोहिमेस येणार, त्यास आपला जोर असल्यास त्यांनीं काय कर्तव्य आहे ! धारेस चिरंजीव आहे त्या किल्ल्यास फौजेनें वेढा घातला, सबब तसदी फार होते. याकरितां चिरंजिवास आम्हांजवळ पोहोंचवून किल्ला ज्याचा त्यास द्यावा. आम्हांस अंगरेजांखेरीज दुसरा आश्रय नाहीं. तुम्हांसारखे मातबर सरदार असतां आमचें राहणें परके स्थलीं व्हावें, तस्मात् कालापुढें उपाय काय ! धारेचा किल्ला खंडेरायाचे हवालीं करितों. चिरंजिवास व कबिल्यास पाठविणें. दौलत कपाळीं असेल तेव्हां मिळेल. तूर्त येथें अबरूनें आहों. कोणाचे पेंचांत नाहीं इतकेंच सुख. आंगरेज मैत्रिकीस बहुतच उत्तम. याची तारीफ काय लिहावी !' यानंतर लवकरच धारच्या किल्ल्यांतील सामान सरलें तेव्हां बाईनें बोलणें लाविलें कीं 'आम्हांस अहल्याबाईजवळ किंवा पुण्यास पोंचविणें.' यानंतर ती स्वाधीन झाली. तिला आणून देशीं ठेवावें तर

‡ ख. १८१४ व खं. १२, १०९, १७२, १८९.

अल्पवयी माधवरावास अपाय करील या भयानें कारभाऱ्यांनीं तिला स. १७७७ च्या मार्चांत नर्मदातीरीं मंडलेश्वर येथें बंदोबस्तानें ठेविलें. 'सामान्य माणूस नव्हे. चांगल्या स्थळीं लांब ठेविल्यास क्षेम आहे, म्हणून तूर्त पुण्यास आणवीत नाहींत.' पुण्यास जाण्यास तिची कबुली होती. " आम्हांस मुंबईस जाण्याविषयीं ओढेकरास पत्र लिहिणें ( ऐ. टि. १-१९ ), अशी मागणी तिनें २५-९-१७७८ ची नाना फडणिसाकडे केली. मंडलेश्वर नर्मदेच्या उत्तर कांठीं महेश्वरच्या पूर्वेस १२ मैल आहे. अहल्याबाई महेश्वरास राहत असे. मंडलेश्वरास आनंदीबाईचा बंदोबस्त खंडेराव ओढेकर याजकडे होता. स. १७७८ चे मे महिन्यांत मोरोबादादास कारभार प्राप्त झाला, तेव्हां आनंदीबाई व बाजीराव यांस पुरंदरास पेशव्याजवळ आणून ठेवण्याचा त्याचा विचार होता, पण तो सिद्धीस गेला नाहीं. स. १७७९ च्या उन्हाळ्यांत तिला बारभाईंनीं बऱ्हाणपुरावर नवऱ्याकडे पोंचविलें. तेथून ती पुढें नवऱ्याबरोबर सुरतेस गेली, ती साल-बाईच्या तहानंतर जुलई १७८३ त नवऱ्याबरोबर कोपरगांवास येऊन राहिली. ( खरे १९५८, १९८१; स. मा. रो. १३७ व म. द. बा. पृ. २२, ३२, ७० ).

धारच्या किल्ल्यांत आनंदीबाईस आश्रय मिळण्याचें कारण असें, कीं यशवंतराव पवार पानिपतावर पडला त्यास खंडेराव म्हणून एक अल्पवयी मुलगा व महिपतराव नांवाचा एक दासीपुत्र होता. स. १७६८ त उत्तरेकडे मराठ्यांची स्वारी झाली त्या वेळीं खंडेरावास त्याच्या मातुश्रीनें स्वारींत पाठविलें नाहीं त्याचे ऐवजीं महिपतराव गेला; तेव्हांपासून खंडेरावाचें लक्ष माधवरावाकडे न राहतां, तें चुलता रघुनाथराव याजकडे लागलें; आणि नारायणरावाचे वधानंतर दादा पळून माळव्यांत गेला, तेव्हां तर खंडेरावानें त्याचाच पक्ष उघड स्वीकारिला. परंतु दिवाण ओढेकर व यशवंतरावाची स्त्री सकवारबाई यांनीं बारभाईंच्या पक्षास पाठिंबा दिला. खंडेरावानें आनंदीबाईस धारेस आणून तेथील किल्ल्यांत तिच्या बाळंतपणाची सोय केली. पुढें बारभाईंचे सांगण्यावरून ओढेकरांनीं निराळी फौज जमवून धारेस वेढा दिला. पुरंदरचा तह होऊन सरदार परत आले, तेव्हां खंडेराव पवारही बारभाईंस येऊन मिळाला, आणि त्याचे जप्त जाहलेले महाल मोकळे करण्यांत आले. तरी आनंदीबाईनें कांहीं दिवस किल्ला लढविला. स. १७७७ च्या मार्चांत ओढे-करांनीं तो हस्तगत केला. ( का. सं. प. या. १२६ व स. मा. रो. ११, १३, १३५ ).

**४. बारभाईंचा बेबंदशाही कारभार, दादाचे साथीदार व तोतया.**—दादा मुंबईस जातांच त्याचे साथीदार ठिकठिकाणीं पांगले. सखाराम हरि व मानाजी फाकडे हरिपंताबरोबर पुरंदरास येऊन हुजरातींत दाखल झाले. पैकीं सखाराम हरीचा फितूर पुढें लवकरच उघडकीस येऊन त्यास व त्याच्या कुटुंबास पकडून नानानें कैदेंत घातलें. मानाजी फाकड्यानें पुढें कर्नाटक स्वारींत फितूर केला, त्याची हकीकत मागाहून येईल. बाजी गोविंद बर्वे, आबाजी महादेव व तुळ्या पवार हैदराजवळ नोकरीस राहून कारस्थानें करूं लागले. सदाशिव रामचंद्र पुनः दादाकडे पळून गेला. सखाराम हरि व सदाशिव रामचंद्र हे नारायणरावास पकडण्याचे कामांत अग्रगण्य होते, पण खुनाशीं त्यांचा संबंध किती होता हें समजलेलें नाहीं, तथापि त्यांच्यावर बारभाईंचा कटाक्ष विशेष होता. बाल पेशव्यास अपाय करतील, या भीतीनें ही मंडळी बंदोवस्तांत ठेवावी लागली. खरगसिंग मुंबईसच दादाजवळ होता, असें १२-१९० वरून दिसतें. स. १७७७च्या जानेवारींत आनंदीबाईनें मुंबईतील खरगसिंग वगैरेंस मकरसंक्रमणाचे तीळ व पत्र पाठविलेलें आहे. तळेगांवच्या पराभवांत खरगसिंग ताब्यांत आला, तेव्हां त्यास देहान्त शिक्षा झाली.* तोतयाप्रमाणें आपणही पकडले जाऊं असें दादास वाटत असल्यामुळें तो मुद्दाम मुंबईस इंग्रजांचे आश्रयास गेला. तेथें स्वतंत्र वाडा बांधून त्यानें दोन वर्षे वास्तव्य केलें. त्या ठिकाणीं लक्ष्मण आपाजी आंबेकर हा दादाचा कारभारी पूर्वी दोन वर्षे मुंबईकर इंग्रजांपाशीं दादाची वकिली करीत होता, त्याचा पत्रव्यवहार राजवाड्यांनीं आपल्या १२ व्या खंडांत छापला आहे. दादाचा हा वाडा || मुंबईस वरळी येथें होता. तेथचा नित्य खर्च दरमहा एक हजार रुपये होता. येथेंही अनुष्ठानें, नमस्कार, समुद्रस्नानें

* खरे १८९४; खंड १२-१९२ १९५-२२०.

|| हा वाडा थोड्या वर्षांपूर्वी इंप्रूव्हमेंट ट्रस्टनें पाडला असें समजतें. दुसरें असें सांगतात कीं, मुंबईस वाळकेश्वराच्या डोंगरी खडकांत श्रीगुंड नांवाचें एक गोलाकार उंच भोंक होतें, त्यांतून जीं माणसें वर चढून जात तीं यशस्वी होत. शिवाजी त्यांतून जाऊं शकला, परंतु दादानें अनेक वार प्रयत्न केला असतां तो सिद्धीस गेला नाहीं. ( Bombay City gazetteer V. 3. P. 291. )

नवस वगैरे इष्ट हेतुसिद्धीचे प्रकार दादानें चालू केले. मुंबईच्या कारभारावर देखरेख करणारा कारकून सदाशिव धोंडदेव नातू म्हणून होता.

अप्टनचे तहानंतर दादानें माधवराव नारायणाचें नांव पत्रव्यवहारांत दाखल केलेलें आढळतें. म्हणजे त्यापूर्वी त्याचें अस्तित्वच त्यास मान्य नव्हतें. मात्र पंतप्रधान किताब दादा स्वतःचे नांवास लावी. त्यानें मुंबईस तोफांचा कारखाना सुद्धां स्वतःचा काढिला होता. तळेगांवच्या मोहिमेपावेतों म्हणजे स. १७७८ अखेर दादाचा मुक्काम मुंबईस झाला. तळेगांवावर तो महादजीचे स्वाधीन झाल्यावर फिरून पलायन करून सुरतेस गेला, तो प्रकार पुढें येईल. ( खरे १८०४; खं. १२–१९२, १९४–२२०, २२७, २२८, २३४).

सखाराम हरीस प्रथम स. १७७६ च्या सेप्टेंबरांत कैद झाली. ता. ४-१०-१७७६ रोजीं त्यास नगरचे किल्ल्यावर पोंचविलें. तेथून एक वर्षानें ता. १८-१०-१७७७ रोजीं त्यास पुरंदर येथें रवाना केलें, व तेथून लवकरच घनगडास पोंचविलें. हा घनगड किल्ला पुण्याचे पश्चिमेस मुळशीपासून आठ मैलांवर एकान्तांत अवघड जागीं आहे. सखाराम हरीनें वरील सर्व ठिकाणीं दादाशीं अनुसंधान ठेवून कांहीं ना कांहीं फितूर केला, त्यामुळें त्याची फिरवाफिरव करावी लागली. ता. २५-७-१७७८ रोजीं घनगडावर त्यास मातुश्रीच्या श्राद्धाची व्यवस्था करून देण्यांत आली. पुढील सालीं तळेगांवावर दादा कबजांत आल्यावर सखाराम हरीची सुटका करण्याचा निश्चय ठरला होता, इतक्यांत दादा पुनरपि पळून सुरतेस गेला, आणि त्याच वेळीं सखाराम हरीनें घनगडावर फितवा करून पळून जाण्याची सिद्धता केली, तेव्हां ता. ८-५-१७७९ रोजीं त्यास नवीन भारी बेडी व कदन्न देण्याची कडक शिक्षा झाली. त्या योगें तो तत्काळ हैराण होऊन मरावयास टेंकला. त्याच्या बायकोनें ही स्थिति ऐकून बारा हजारांचा जामीन देऊन भेटीची परवानगी मिळविली. ता. २४-१०-१७७९ रोजीं परवानगी मिळाली व त्याची बेडी काढण्याचा हुकूम झाला. पण बायको जाऊन भेटण्यापूर्वीच त्यानें पायांतील बेडीवर कपाळ आपटून प्राणत्याग केला; बायकोची गांठ पडली नाहीं. पुढें बारा हजार दंड भरण्याचा बायकोस सरकारांतून तगादा लागला. तेव्हां महादजी सिंद्यानें ता. १६-११-१७७९ च्या पत्रांत नानास टोंचून लिहिलें, कीं ज्या भेटीसाठीं बायकोनें रक्कम भरण्याची कबुली दिली, ती भेट तर झाली नाहीं. भेटी-

पूर्वीच सखाराम हरि मरून गेला, असें असतां पैशाचा तगादा होतो याचा अर्थ काय? पुढें रक्कम माफ करण्यांत आली कीं नाहीं तें समजत नाहीं. वरील पत्रांत महादजी सखाराम हरि मेल्याचें कळवितो, यावरून तो नुकताच मेला असावा असें सिद्ध होतें. हा पुरुष मोठा शूर व करारी होता, परंतु दादाचे नाकर्तेपणामुळें त्यास हाल अपेष्टा सहन कराव्या लागल्या. सखाराम हरीची मुलगी बखरकार चिटणीस मल्हार रामराव यास दिलेली होती. लक्ष्मण आपाजी आंबेकराशीं सखाराम हरीचा पत्रव्यवहार झाला, तो १२ व्या खंडांत आहे. हा अंबेकर देशस्थ ब्राह्मण चिंतो विठ्ठलामार्फत दादाचे नोकरींत आला. त्याचे वंशजांस मौजे साकुरें ता. पारनेर जि. नगर हा गांव इनाम आहे तेथें ते राहतात. ( खरे ले. २३०८; ऐ. टि. १-१५; स. मा. रो. ८७२, ९७८–९८८ ).

तोतया जरी दादाचा प्रत्यक्ष साथीदार नसला, तरी त्याचा बंडावा दादास अप्रत्यक्षपणें उपयोगी पडला. त्याची हकीकत पूर्वी म. वि. ४ यांत येऊन गेली आहे. त्याची सुटका रत्नागिरीचे किल्ल्यांतून कशी झाली तें खालील पत्रांत दिसून येतें. हें पत्र रत्नागिरीहून मिरजेस पटवर्धनास ता. ९-२-१७७६ रोजीं लिहिलेलें आहे. 'मिरजेंतून गृहस्थ ( तोतया ) रत्नागिरीस आणिला तो खरा, यांत संशय नाहीं. इंग्रजांची सावकारी गलबतें सुभेदार परांजप्यांनीं धरून आणिलीं. दोन लक्षांचा माल वर सांपडला. रत्नागिरीचे कारभारी सकारनामकाच्या कारभारांत आहेत. सुभेदार किल्ल्याबाहेर येत नाहींत. दोनचार रोजांनीं चतुर्थ प्रहरीं वरचेवर येतात. किल्ल्यांत प्रवेश कोणासही नाहीं. बैरागी पांच सात आले होते, त्यांची व सकारनामकाची$ भेट जाली. पुण्याहून दोन गृहस्थ आले होते, ( त्यांस ) तोतयानें खूण मुद्रा सांगितल्या त्या उतरल्या, तेव्हां तो गृहस्थ खरा असाच ठराव झाला. ऐसें वर्तमान होतांच रामचंद्र नाइकांचे पुत्र आले कीं ( तोतयाची ) शृंखला काढावी. मुहूर्त पाहिला, तों त्या गृहस्थानें ( तोतयानें ? ) साफ सांगितलें कीं हा कारभार तुमच्यानें तडीस जावयाचा नाहीं. तुम्हीं या विचारांत न पडावें. त्यावरून रामचंद्र नाइकाचा पुत्र पुण्यास

$ सकारनामक कोण? सखारामबापू कीं काय? ( खंड १२–१७८–१८०, १८४.)

गेला.' त्यानें पुण्याहून परत रत्नागिरीस येऊन ता. १८-२-१७७६ रोजीं तोतयाची बेडी काढून त्याचा बडेजाव चालू केला. पुढें 'रामचंद्र नाईक व सदाशिव भट दात्ये (पुण्यास) आले. नाइकास पहिला संशय होताच. त्याजवरून पुण्यांतील वारासार करून त्यांनीं आपलें कुटुंब देखील रत्नागिरीस नेवविलें. पुढें विचारें प्रगट करावें असें (त्याचें मनांत) होतें. परंतु चिरंजिवानें व स्त्रीनें जलदी केली. हें वर्तमान नायकांस पुण्यास कळल्यावर ते रत्नागिरीस गेले नाहींत. कारण भ्रांतीमुळें पुरंदरास येऊन कारभाऱ्यांच्या बोलण्यांतील भाव पाहून मग जावें असें होतें. इतक्यांत तोतयाचींच पत्रें आलीं तीं अनन्वित. याजकरितां कोंकणांत जाऊन खातरजमा करून घ्यावी तों त्यांनीं संगमेश्वरींच (नायकांस) कैदेंत ठेविलें. कांहीं दिवसांनीं तोतयाजवळ गेले. स्त्रीचें व चिरंजिवांचें दर्शन त्यांस दरोबस्त नाहीं. नाइकांनीं तेथील विचार पाहतां तोतयाचा खोटा प्रकार दिसोन आला. त्याजवरून चिरंजिवास भेद करावयास पाहत होते. चिरंजिवांनीं स्पष्टवादें सांगितलें, कीं आम्हीं तुम्हांस जाहलोंच नाहीं असें म्हणावें, आम्ही म्हणतों कीं नाईक मेले. स्त्रीचेंही भाषण तसेंच. नाइकांस कोठेंच थांग न लागे. महत्संकटांत पडले. उपाय नाहीं. नाइकांसच अपाय करावा हें मानस चिरंजिवांचें यांस दिसोन आल्यावर या युक्तीनें निकाल काढला. रा. वासुदेव बावा (प्रतिनिधीचा मुतालिक पेशव्यांचे कैदेंतून पळून बाणकोटास इंग्रजाकडे गेला होता) लबाड असें त्याचे निदर्शनास आणून दिल्हें. नाईक क्रिया करतात व सदाशिव भटानीं शपथ वाहून सांगितलें. त्यावरून कारभाऱ्यांस खरें वाटतें. नाईक तोंडानें स्त्रीचा घटस्फोट करणार असें म्हणतात. परिणामीं पाहवें. गृहस्थ (तोतया) लबाड, असें पुरतें सर्वांस समजलें. संशय राहिला नाहीं. नाइकामुळें सर्व फसले. नाइक येण्यापूर्वीं बहुतांस भ्रम होता तो आतां गेला. पार्वतीबाईस नायकाचे स्त्रीनें निरोपीं शिरोपीं खातरजमा केली त्यावरून किंचित् डावडौल तर जाहलीच, परंतु शहाणी बायको, लौकिकांत दाखविलें नाहीं.' पुढें सेप्टेंबरांत सिंहगडावर सिंद्याची व तोतयाच्या लोकांची लढाई झाली, तींत रामचंद्र नाइकाचा लेक ठार झाला. सिंहगडाच्या बंदोबस्तास हरिपंत राहिले. शिंदे व भीमराव पानशे भिन्न घाटांनीं कोंकणांत तोतयावर उतरले. पानशांनीं बोरघाटांत तीनचार लढाया चांगल्या मारिल्या. हजार दीडहजार

तोतयाकडील माणूस ठार व जखमी केले. सिंद्यांनींही सिंहगडाखालीं दीडशें ठार व कांहीं जखमी केले. रयत मात्र खेरीज करून जे माणूस तोतयाकडे चाकरीस गेले, त्यांचीं ब्राह्मणांचीं देखील रांडापोरें लुटून जप्त केलीं. ( खरे १७७७, १८७८–७९, १९०१,१९०५–६,१९१८, १९४७, १९५७, २०६८, २१४४ ).

तोतयास रघूजी आंगऱ्यानें कसा पकडला व इंग्रजांनीं त्यास अंतस्थ पाठिंबा कसा दिला हे अन्यत्र सांगितलेंच आहे. महादजी सिंदे त्याजवर चालून गेला, तेव्हां रघूजी आंगऱ्यानें त्यास पकडिलें. त्यास आणण्यास महादजी कुलाब्यास गेला. ता. ८-११-७६ च्या पत्रांत तो नानास लिहितो,—

‘ तोतयास आणावयास बाळाराव गोविंद, राणेखान, सदाशिव दिनकर वगैरे पाठविलें. वासुदेव बावा, त्रिंबक सूर्याजी व घोरपडे यांनीं मुंबईस जाऊन इंग्रजांस गैर वाका समजावून आंगरे यांजकडे वकील पाठविला, त्यामुळें आंगरे अंदेशांत पडले. बाळाराव व राणेखान यांस नागोठण्याहून बोलावून कुलाब्यास नेलें. त्यांच्या चार पांच भेटी जाल्या. आंगरे पुण्यास आल्यास मागें इंग्रज त्यांचे स्थळास उपद्रव करतील, तरी त्यासंबंधानें मुंबईस सत्वर पत्रें लिहून बंदोबस्त करावा. सरखेल यांची खातरजमा आम्हीं केली ते आज कुलाब्याहून निघून तोतयास पिंजऱ्यांत बंदोबस्तानें आणतील.’ ( ऐ. टी. २-२९. )

‘ तोतया काल तळेगांवाजवळ सिंदे, आंगरे सुद्धां आले. समागमें तोतया व दौलतगीर व शिवाजी आपाजी व धोंडोपंत व लक्ष्मणराव कोल्हटकर आहेत. इचलकरंजीकर, हरबा अंणा व रघुनाथराव कोल्हटकर आंगऱ्यानें काना डोळा केल्यामुळें सुटून मुंबईस गेले. त्याची चौकशी खरोखर असेल तशी करावी म्हणोन रघूजी आंगऱ्याची वचनक्रिया त्याजपाशीं गुंतली होती, त्यावरून आठ दिवस चौकशी झाली. रामशास्त्री, काशीनाथशास्त्री, गोपीनाथ दीक्षित, कृष्णराव काळे, धोंडोबा पुरंदरे, हरिपंत तात्या, महादाजी बल्लाळ गुरुजी, बाबूजी नाईक वगैरे मातबर सरदार, सावकार व वाणी ऐसे बसोन चौकशी केली. अवघा खोटा प्रकार ठरला. कनोजा ब्राह्मण आहे. नांव ठिकाण सांगितलें. भावाबंदाचा कजिया जाहला, त्यांनीं मारलें त्यांत जखमा लागल्या त्या त्रासें करून बाहेर नरवराकडे आलों म्हणोन सांगितलें. बापाचें, आईचें, बहिणीचें, सर्व नांवें सांगितलीं. पार्वतीबाईचे दृष्टीस घालोन संन्यास देऊन जलसमाधि

देण्याचें ठरलें. बरोबरचे शिवाजीपंत व धोंडोपंत रत्नागिरीचे कारभारी यांणीं करीना लिहोन दिला जे, आपण कांहीं हें कर्म केलें नाहीं. रामचंद्र नाईकच करावें म्हणोन आम्हांसी वरचेवर लिहीत गेले, त्याप्रमाणें आम्ही केलें. जे समयीं नाईक करवीराकडे गेले, तेव्हां आपणांस पत्र लिहिलें जे तोतयास बाहेर काढोन किल्ल्याची मजबुती करावी. आम्ही रामचंद्र गणेश सुद्धां दहा पांच हजार फौजेसह तिकडे येतों. येविशींचे दस्तैवज नानासही एक दोन सांपडले आहेत. सारांश नाईक सर्वस्वें बुडाला. अन्नपूर्णाबाई रत्नागिरीसच होती तिला कैद करून पुण्यास आणली. पायानें चालवीत आणिली. आपा भटास मार तेथें दिला. अन्नपूर्णाबाईची अप्रतिष्ठा बहुतां प्रकारें करावी असें नाना स्वमुखें बोलतात. ईश्वरानें तिजवर कहर आणिला. याउपर जीव ठेवणार नाहीं.'

'ता. १८-१२-१७७६ रोजीं गाड्यावर घालून बाजारांतून फिरविला. ज्यांस संशय राहिले होते त्या सर्वांस दाखविलें. शेवटीं उंटावर बसवून फिरविला. आणि चार घटका दिवसास मेखसूनें डोकें फोडून मारिला. दौलतगीर यास तोफेच्या तोंडीं दिलें. रामचंद्र नाईक रुजवातीसाठीं पुण्यांत आणिले होते. शिवाजीपंत व धोंडोपंत यांची रुजुवात झाली. त्यांस बेड्या घालून फरासखान्यांत ठेविलें. नाइकापासूनच सारा ग्रंथ झाला. ता. ८-१-१७७७ रोजीं पतित तोतयाचे पंक्तीस अन्नव्यवहार केल्याबद्दल व त्यामुळें झालेल्या संसर्गदोषाबद्दल सर्व प्रांतांत एकाच दिवशीं प्रायश्चित्तें करण्यांत आलीं.' पुढें गंगाबाईनें मरतांना रामचंद्र नाइकाचा गुन्हा माफ करण्याविषयीं सांगितलें, त्याप्रमाणें पुढें सन १७७७ च्या जुलईत त्यास पुण्यांत आणून पूर्वीचें काम दिलें असावें. त्याचा भाऊ परशुराम नाईक याजवरही इतराजी होती असें दिसतें.

तोतयास पकडला, त्याच वेळीं दादाहि सुरतेहून मुंबईस येत असतां पुणेकर फौजेच्या हस्तगत होण्याच्या बेतांत होता. त्याजकडेहि तोतयाचीं पत्रें गेलीं होतीं. गोपाळ धोंडदेव व नृसिंहाचार्य हे दोन गृहस्थ तोतयाकडून दादाकडे दमणास गेले होते. दादा म्हणतो, 'तोतया खरा नाहीं. अक्षर पाहिलें तें मिळत नाहीं. उगाच भोळ्या माणसांच्या जबानीवर न जाणें. अवदुल गनी वृद्ध, परीक्षा करून आले म्हणोन लिहिलें, तरी प्रायः वृद्ध पुरुष व वृद्ध स्त्रिया व भट आश्रित मंडळी यांस खराच वाटेल. गंगाधरपंत भट

फर्वे देखील संशयाची गोष्ट सांगतात, अशांच्या बुद्धी किती! यांजवर कांहीं जादू असेल, अथवा कांहीं द्रव्य मिळालें तरी हेहि मोठी जादूच. खाणाखुणाच हव्या तर त्यास विचारा, भाऊसाहेब स्वारीस हिंदुस्थानांत गेले, तेव्हां मजपाशीं अगोदर काय बोलिले? नानासाहेबांचीं, त्यांचीं व आमचीं भाषणें कशीं कशीं जाहलीं? त्या वेळेस विठ्ठल शिवदेव व फडणीस व दादू फौजदार वगैरे कोणते कोणते मागून घेतले, व कोण दिले, तें सविस्तर पुसावें. विसाजी केशवास वसईची सुभेदारी भाऊसाहेबांनीं सांगितली, ते समयीं उभयतां तीर्थरूपांचीं व माझीं भाषणें कशीं झालीं? दोनच जाबसालावर कळेल. हा प्रसंग परीक्षा करावयाचा नव्हे. परीक्षा आम्हांस पुरती कळलीच आहे. आम्हांस संशय नाहीं. तुम्ही नवे म्हणोन तुम्हांस संशय. पत्रावरून तर पुरतीच परीक्षा कळली. पवमान दीड अध्याय येतो, तर अलीकडे शिकले असतील. असो.' यावरून तोतयाचा प्रकार झाला तो अगदीं यथान्याय झाला, याविषयीं संशय नाहीं. मात्र तोतयासंबंधानें महाराष्ट्राची सामान्य वृत्ति किती विचित्र झाली होती हें, रामाजी नारायण गोखले नामक पटवर्धनाचे पदरांतील एका आचरट व्यक्तीच्या उल्लेखावरून दिसून येईल. 'तोतया धरल्याचें वर्तमान ऐकून तुम्हीं श्रीविष्णूच्या देवालयांत भक्तिपुरःसर प्रेमयुक्त नग्न नृत्य केला, म्हणोन एका गृहस्थांनीं लिहिलेवरून कळलें. असा नवस हरएक अन्य स्थळीं केल्यास कोण नको म्हणत नव्हतें. देवाच्या संनिधानींच केलेंत त्यावरून भाऊ तुम्हांस सहस्रनामें वाहतात तीं योग्यच. त्यांनीं पत्रांत तुमची पूजा यथासांग केलीच असेल.' असें पत्र त्या गोखल्यास पांडुरंगराव पटवर्धनानें लिहिलेलें आहे. तोतयाची हकीकत हेस्टिंग्सनें एका पत्रांत दिलेली पुढें येईल. ( खरे १९२५ ).

तोतयाचे प्रकरणापासून महादजींची छाप मराठमंडळावर विशेष बसली. 'सिंहगड तोतयाचे लोकांनीं घेतल्यावर सर्वत्र गडबड झाली होती. यजमान (महादजी) या प्रसंगीं नसते तर हें खूळ कोणास तुटावें असें नव्हतें. केवळ बुडावयाची वेळ आली होती. यजमानांनीं मसलत उचलली हें शेवटास जाईल असें कोणी मानीत नव्हता. महादजींनीं कोणाची प्रतीक्षा न करितां यश संपादिलें. सर्वत्र लौकिक जाहला. सोबती ( होळकर ) फार खिन्न झाले. असें दैव कोणाचेंही सांप्रत पाहण्यांत येत नाहीं.' ( कोटा दप्तर ).

तोतयाच्या बंडाव्याचें शिक्षासत्र दहा पंधरा वर्षें चालूच होतें, त्याच्या

कागदपत्रांचा नुसता उल्लेख सुद्धां थोडक्यांत होऊं शकणार नाहीं. नमुन्या-दाखल खं. १०-३०७ वीस पृष्ठांचा कागद, खरे ले. २२१८ व स. मा. रो. ५९८-६३० हे कागद तपासून पाहवे. परशुरामभाऊचा चुलतभाऊ तोतयास सामील होता, त्याचा जीव मात्र द्रव्यदंड भरून वांचविला. इचलकरंजीकर त्र्यंबकरावाकडून साठ हजार नजर व सवालक्ष गुन्हेगारी घेऊन सरंजाम मोकळा केला. पार्वतीबाईनें रदबदली करून आपल्या भावाचा जीव वांचविला. रामचंद्र नाईक याची सर्व मत्ता सरकारांत जाऊन सर्वांचे पायांत बिड्या पडून डोंगरी किल्ल्यांवर जन्मभर कैदेंत रखडावें लागलें. सांसर्गिक प्रायश्चित्तांचा धडाका तर कैक वर्षें चालला. ( खरे १७४७, ऐ. टि. २.२५ ).

स. १७७४ च्या आरंभीं गंगाबाईस पुरंदरास नेल्यापासून तोतयाच्या वधापर्यंत जीं तीन सालें गेलीं, त्यांत नाना फडणिसाची लायकी सर्वांस कळून चुकली. दादाचे विरुद्ध कारस्थान रचून अडीच वर्षें झगडून इंग्रजांवरही त्यानें दबाब बसविला, आणि रामशास्त्री यानें शिक्षा सांगितल्याप्रमाणें दादाचें दर्शनाचा विटाळ पुण्यास होऊं दिला नाहीं. एकंदरींत पुरंदरच्या तहानें मोटाच कार्यभाग होऊन पुण्याचा कारभार सुरळीत चालूं लागला. महादजीस कारभारांत प्रमुखपण गाजविण्याची हाव होती ती पुढें त्याच्या तलवारबहादुरीवर त्यास प्राप्त झाली. पुरंदरचा तह जसा नानाच्या कर्तबगारीचा निदर्शक, तसाच वडगांव व सालबाईचे तह महादजीच्या कर्तबगारीचे निदर्शक आहेत. मात्र नाना महादजीहून पंधरा वर्षांनीं लहान, हें ध्यानांत घेतल्यास इत-उत्तर आपली प्रतिष्ठा वाढविण्यास महादजी कां आतुर झाला तें कळून येतें. राज्याच्या दृष्टीनें सखारामबापूचाही उपयोग अतिशय झाला. कांहीं ठिकाणीं सखारामबापूचा धिमा तडजोडीचा स्वभाव उपयोगी पडे, तर कांहीं प्रसंगीं नानाचें कडक व निश्चयी धोरण कामास येई. मोरोबाचे अंगीं मात्र कोणताच गुण असल्याचें दिसलें नाहीं. शिंदे, होळकर, बापू, नाना व हरिपंत यांनीं या वेळीं कारभाराची कायम रचना एकत्र वाटाघाट करून ठरविली नाहीं, याबद्दल त्यांस दोष द्यावा तितका थोडाच आहे. स. १७७६ च्या अखेरीस तोतयाचा निकाल लागून राज्यांत बरीच स्थिरता झाली. हैदरअली व दादा एवढीं दोन शल्यें उरलीं होतीं; तरी पण इंग्रजांचें मुख्य संकट आलें होतें तें तूर्तातूर्त निभावलें. मात्र कारभारांत सर्वत्र बजबजपुरी माजली होती, ती दूर

करण्याचा विचार सर्वांनीं एकत्र जमून केला नाहीं. नानास बुद्धीची धमक व कामाची उरक होती, परंतु सर्व सत्ता स्वतःचेच हातीं असल्याशिवाय कारभार नेटानें उलगडत नाहींत असें अनुभवास आल्यानें इतउत्तर तो इतरांस दूर सारून स्वतःचेच हातीं सर्व सत्ता आणण्याचा झटून प्रयत्न करूं लागला. त्यामुळें सरदार व कारभारी पुष्कळसे नाराज झाले. या बाबतीचा खुलासा विशिष्ट उदाहरणांनीं स्पष्ट होत जाईल.

महादजी सिंदे व तुकोजी होळकर स. १७७५ च्या उन्हाळ्यांत हरिपंतास गुजराथेंतून सोडून माळव्यांत गेले, ते पुढें पुरंदरचा तह होईपर्यंत वर्ष सवावर्ष तिकडेच होते. दादाचे प्रकरणीं त्यांनीं मनापासून मदत केली नाहीं, व पुढें कारभाऱ्यांनीं सर्वांपासून दहक पट्टी वसूल केली, त्यामुळें रुष्ट होऊन ते अलग होते. पुढें सर्व फौजा व सरदार पुण्यास येऊन नूतन पेशव्याच्या भेटी होणार त्यासाठीं होळकर सहा हजार फौज घेऊन स. १७७६ च्या उन्हाळ्यांत वाफगांवास येऊन राहिला. तेथून कारभाऱ्यांशीं बोलणीं होऊन त्याची समजूत झाली. 'दहक पट्टीच्या ऐवजाविशीं होळकरांकडील बोलणें झालें. किल्ल्यावर जाऊन कारभारी व हरिपंत यांचीं खलबतें होऊन इमान प्रमाण झालें, ( २७ जुलई ). नारोगणेशामार्फत समजूत झाली.'

बापूनें सर्वांस एकच उत्तर दिलें, कीं 'राज्याचा विचार हल्लीं या प्रकारचा आहे. साऱ्यांनीं श्रीमंतांकडे पाहून निखालसपणें त्यांच्या पायाशीं वर्तावें. श्रीमंतांनीं कोणासही उणें केलें नाहीं. त्यांनींच तुम्हांस आपल्या बरोबरीस आणिलें. तुम्हींच येऊन काय तो बंदोबस्त करावा. आहे नाहीं पाहून जें करणें तें करावें. आम्हांस इच्छा कारभाराची नाहीं.' होळकर पुरंदरास आल्याचें ऐकून निवडक दोन हजार माणसांनिशीं शिंदेही लगबगीनें अहल्याबाईची भेट घेऊन नर्मदा उतरून लांब मजला करीत गोदावरीवर आले. श्रावण अखेर ( १७ ऑगस्ट ) भेटी झाल्या. किल्ल्यावरच भोजनास राहून चार घटका रात्र पर्यंत खलबत झालें. दिलसफाई होऊन लगोलग महादजीनें तोतयाची मोहीम अंगावर घेतली. सिंहगडाखालीं त्यानें तोतयाचे दोनशें लोक कापून काढिले व कांहीं जखमी केले. नानाची सक्त ताकीद कीं, 'मारून कापून टाकावें. मारावयाविशीं आळस करूं नये. एक दोन चौक्या कापून

काढल्यानें दबाव चांगला पडेल. रयत खेरीज करून बाकी तोतयाकडे गेले असतील त्यांची रांडापोरें लुटून जप्त करावीं. ब्राह्मण सुद्धां लढाईंत सांपडतील त्यांचे शिरच्छेदच करावे. भूतदया, सात्त्विकपणा धरूं नये. घरें दारें लुटून जाळून टाकावीं. आम्हीं शास्त्रार्थ मात्र लिहितों, परंतु आमच्या सरदारांची सत्त्वेंच जात चालली, त्यास उपाय काय? ( खरे–१८५३, १८८३, १८८४, १८९४, १९०५, १९०६ ).

या वेळेपासून बापूनानांत चुरस वाढूं लागली. स्वभावभेदानें ती तीव्र झाली. बापूचा स्वभाव दुटप्पी आणि नानाचा करारी व जहाल. बाहेर परकीयांशीं युद्धें चालू, फौज बिथरलेली, मुलखांत बंडें झाल्यामुळें वसूल येण्याची मारामार, लोकांच्या देण्याचे तगादे, दादांचीं कारस्थानें व फितूर, आणि शिंदे होळकरांचे रुसवे, अशा नानाविध अडचणींतून नानानें एकनिष्ठेनें सर्व सांवरून मराठी राज्याची अबरू बचाविली, ही त्याची मोठी कामगिरी होय. कामाच्या सवडीसाठीं नाना आतां बहुतेक पुण्यांतच राहूं लागला. आठ पंधरा दिवसांनीं बापूच्या भेटीसाठीं तो पुरंदरास किंवा सासवडास जाई. मिळून बापू व नाना या दोघांपलीकडे बारभाई शब्दाचा व्याप आतां उरला नाहीं. बारभाईच्या पहिल्या रचनेचा उल्लेख आरंभींच केला आहे. त्यांत आठांचीं नांवें आहेत. त्यांशिवाय हरिपंत फडके, बजाबा पुरंदरे, भवानराव प्रतिनिधि, कृष्णराव काळे वगैरे कित्येकांचा सल्ला जरुरीप्रमाणें घेण्यांत येई. परंतु मंडळाची रचना किंवा सभासदांची संख्या कधींच मुक्रर झालेली नव्हती. रामचंद्र गणेश, त्रिंबकजीपंत बिनीवाले, परशुरामभाऊ पटवर्धन, फत्तेसिंग गायकवाड, मुरारराव घोरपडे वगैरे पुष्कळ सेनानींचा विचार कारभारी घडो-घडी घेत, परंतु त्यांस मंडळांत स्थान नव्हतें. वास्तविक हल्लींच्या मनूंत कौन्सिलची कल्पना लोकांत रूढ झाल्यामुळें, तोच अर्थ बारभाईच्या कारभारांत आपण शोधूं लागल्यास चूक होईल. तसा बहुमतानुवर्ती कारभार त्यांनीं स्थापिला नाहीं. ही आपण त्यांची चूक म्हणूं. परंतु उत्तरोत्तर नानानें सर्व कारभार स्वतःचेच हातीं घेतला. आरंभीं वयोमानामुळें बापू श्रेष्ठ समजला जात असे इतकेंच. सर्व कारभार बापू व नाना हे दोघे मिळूनच करीत. हेस्टिंग्स वगैरे परदरबारांत पत्रें जात व जबाब येत ते या दोघांच्या नांवें निरनिराळे जात येत. म्हणजे एकाच कागदावर दोघांच्या सह्या असत असें

नव्हे. पुढें मोरोबा कारभारांत थोडे दिवस आला, तेव्हां एकाच मजकु-राचीं तीन पत्रें तिघांच्या सह्यांचीं वेगवेगळीं जात व जबाबही वेगळेच येत.

**५. पुरंदर तहाचे विपरीत परिणाम.**—बारभाईंशीं तह करण्यासाठीं अप्टन निघाल्यापासूनच दादाचें धाबें दणाणूं लागलें. त्यानें प्रथम अप्टन यास आपल्या भेटीस सुरतेस बोलावलें. तो भेटीस गेला नाहीं तेव्हां दादानें आपले वकील त्याचे भेटीस पुण्यास पाठविले. त्यांच्या भेटी अप्टननें घेतल्या तरी आपल्या लाभांत प्रकरण उतरत नाहींसें पाहून दादानें लगोलग कलकत्त्यास हेस्टिंग्सकडे तक्रार केली. तथापि शेवटीं तह कायम झाला, आणि त्यांत अप्ट-ननें दादाची व्यवस्था शक्य तितकी समाधानकारक लावून घेतली. पुढें तहाप्रमाणें दादास मुंबईकर बारभाईंचे हवालीं करीनात. आणि गायकवाडाचा मुलूख, भडोच, व साष्टींचा प्रांत सोडीनात, त्याबद्दल सखारामबापू व नाना यांनीं लगोलग कलकत्त्यास पत्रें पाठवून तक्रारी चालविल्या. हा सर्व पत्रव्यव-हार पार्श. कॅ. भाग ५ यांत आहे.

तह झाल्यानंतर त्याप्रमाणें अंमल होत नाहींसें पाहून सखारामबापूनें हेस्टिंग्स यास एक खरमरीत पत्र लिहिलें, आणि तहाचे विरुद्ध इंग्रज कसें वर्तन करितात याचें माप त्यांचे पदरांत घातलें. महंमदअली याजकडे आमची चौथाई सरदेशमुखी आज कित्येक वर्षे तुंबली आहे, ती वसूल करण्यास आमच्या फौजा गेल्या असतां, उलट इंग्रज त्यासच मदत करितात. नागपुरकर भोंस-ल्यास बंगालची खंडणी इंग्रज देत नाहींत, वगैरे अनेक आगळिकी बापूनें ग. ज. चे पदरांत घातल्या. त्यावर हेस्टिंग्सनें १४-५-१७७६ चा तर्कटी जबाब बापूस पाठविला कीं, तुम्ही अशा अप्रयोजक तक्रारी करितां हें तुमच्या आमच्या स्नेहास शोभत नाहीं. एकदां गोडी ठरली म्हणजे या सर्व तक्रारी मिटल्या पाहिजेत. त्यानंतर ता. २२-१०-१७७६ रोजीं बापू हेस्टिंग्स यास लिहितो, 'आपलें उत्तर पावलें. हळूहळू तहांतील सर्व कलमें क. अप्टन पुरीं करून देतील, त्याबद्दल धास्ती ठेवूं नये, हें आपलें आश्वासन वाचून संतोष वाटतो. तर मग साष्टीचा कबजा सोडूं नये असें आपण मुंबईकरांस कळवितां तें कां? साष्टीचा प्रदेश पेशव्यांनीं मोठ्या कष्टानें संपादिलेला, त्यांच्या जिल्हा-ळ्याचा आहे, तरी तो सोडून देण्याविषयीं आपण मुंबईकरांस त्वरित हुकूम पाठवावा. तंजावरचा प्रदेश महंमदअलीस देण्यांत आला होता, तो परत

राजा तुळजाजीस देण्याचा हुकूम आपण ग. लॉर्ड पिगट यांस पाठविला, हें पाहून आम्हांस फार फार संतोष होत आहे.'

पुरंदरच्या तहाइतका अव्यवस्थित व संदिग्ध तह कधींच झाला नसेल. उभय पक्ष तह करण्यासच बसलेले; दोन महिन्यांच्या वाटाघाटींत नाना तऱ्हेचे मुद्दे निघाले, त्यांची वासलात कशी तरी लावण्यांत येऊन एकदांचा तो तह सह्याशिक्क्यांनिशीं पूर्ण झाला. दोनही पक्ष अगदीं टेंकीस आले होते, त्यामुळें पुष्कळ तपशील कसेबसे कोंबून भरण्यांत आलेले संदिग्धच होते. अर्थात् तहानें प्रत्यक्ष कोणाचेंच समाधान झालें नाहीं. मुंबईकरांस तर तो बिलकूल पसंत न पडतां प्रथमपासूनच तो मान्य न करण्याचा त्यांचा निश्चय होता. हेस्टिंग्सलाही तो पसंत नव्हता, पण त्यानेंच मुद्दाम सर्वाधिकार देऊन वकील पाठविला, त्याचा तह अमान्य करावा तर गैर दिसतें, म्हणून शक्य तितका तो अंमलांत आणण्याचाच त्यानें प्रयत्न चालविला. शिवाय कौन्सिलांत त्याचें बहुमत नसल्यानें स्वतःचीं मतें त्यास बाजूस ठेवावीं लागत. परंतु त्याची मनोवृत्ति तह मोडण्याकडेच होती. सारांश, तहाप्रमाणें इंग्रजांनीं आपलें वर्तन ठेविलें नाहीं. रघुनाथरावास सोडून न देतां 'उलट आपलीं जहाजें पाठवून त्यास त्यांनीं मुंबईस नेऊन आसरा दिला. तसेंच तोतयाचे हजारों साक्षीदार सरकारची मालमत्ता घेऊन इंग्रजांकडे गेले, त्यांसही त्यांनीं आपल्या आश्रयाखालीं ठेवून घेतलें.' रघूजी आंगऱ्यानें तोतयास पकडिलें म्हणून मुंबईकरांनीं त्यास तंबी दिली कीं, 'त्यास लगोलग आमचे हवालीं करा, नाहीं तर आम्ही तुमचेवर चालून येतों.' या सर्व तक्रारी बापूनें अत्यंत तीव्र भाषेंत कलकत्त्यास व खुद्द बादशहास लिहून पत्रांची झोड उठविला. तेणेंकरून हेस्टिंग्स रडकुंडीस आला. त्यानें या आगळिकींबद्दल मुंबईकरांस जबाब विचारिला आणि मराठ्यांशीं विरोध करूं नये असें फर्माविलें; व बापूस परत लिहिलें कीं, 'लबाड लोक नाहीं नाहीं त्या कंड्या उठवितात त्या तुम्हीं खऱ्या मानूं नयेत. झाल्या गोष्टी आतां सर्व विसरून जाव्या. त्या पुनः पुनः उकरून काढण्यांत हांशील नाहीं. त्यामुळें युद्धाची खुमखुम मात्र वाढत जाते. दुसरा कोणी इंग्रज ओलीस ठेविल्याशिवाय तुम्ही कॅ० अपटनास तेथून सोडीत नाहीं. यावरून तुम्हीं त्यास जबरदस्तीनेंच ठेवून घेतला आहे असें आम्ही समजतों. 'बेलाशक निघून या' असें त्यास आम्ही आतां कळवीत आहों.' अशा

प्रकारचीं किती तरी पत्रें उभय पक्षीं गेलेलीं पर्शियन कॅलेंडर्सच्या पांचव्या भागांत आहेत. तहाचे विरुद्ध ठिकठिकाणचे इंग्रजांनीं कसें वर्तन केलें त्याचें उत्कृष्ट विवेचन बापूचे पत्रांत आहे.

दादास इंग्रजांनीं मुंबईस येथें आश्रय दिल्याची बातमी कळतांच कारभाऱ्यांनीं जें पत्र क. अप्टनच्या मार्फत मुंबईस पाठविलें त्याचें इंग्रजी रूपांतर फॉरेस्टनें दिलें आहे. त्याचा तर्जुमा असाः—

पेशवे माधवराव नारायणराव यांजकडून ले. क. अप्टन यांसः—

आतांच आम्हांस असें कळतें कीं ता. ११ नोव्हेंबर १७७६ रोजीं दादासाहेब मुंबईच्या बंदरांत दाखल झाले, आणि त्यांस तेथील गव्हर्नरांनीं आपल्या आश्रयाखालीं ठेवून घेतलें आहे. तसेंच सदाशिव रामचंद्र वगैरे त्यांच्याबरोबर असलेल्या बंडखोरांस ठाण्याच्या किल्ल्यांत आश्रय देऊन सरकारचे हत्ती घोडे व सामान त्यांनीं आपल्यापाशीं ठेवून घेतलें आहे. ह्या गोष्टी उभयतांमध्यें झालेल्या तहास सर्वथैव विरुद्ध आहेत. यापूर्वींच कलकत्त्याच्या कौन्सिलकडून आम्हांस असें लिहून आलें होतें, कीं कंपनीच्या ताब्यांतील कोणत्याहि ठिकाणीं दादासाहेबांस आश्रय देण्यांत येणार नाहीं; आणि तहाचीं कलमें सर्व ठिकाणीं यथायोग्य पाळलीं जातील.

हल्लींच्या व पूर्वींच्या तहांत सुद्धां असें स्पष्ट कलम आहे, कीं एकमेकांच्या विरुद्ध बंडखोरी करून गेलेल्या इसमास एकमेकांनीं लगोलग परत हवालीं करावें. असें असतां मुंबईच्या गव्हर्नरांनीं वरील वर्तन केलेलें पाहून आम्हांस मोठें आश्चर्य वाटतें. सरकारचे शत्रूंस ते आश्रय देतात, याचा अर्थ काय? यामुळें आमच्या मुलुखाचा नाश होऊन नवीन नवीन बंडें उत्पन्न होत असून आमच्या राज्यांत अव्यवस्था माजत आहे. या बाबतींत दरम्यानगिरी करण्याचें मुंबईकरांस बिलकूल प्रयोजन नाहीं. आमच्या व मुंबईकरांच्या दरम्यान युद्धप्रसंग चालू असतां तुम्ही कलकत्त्याच्या वरिष्ठ अधिकाऱ्यांकडून प्रमाणपत्र आणिलें त्यावर पूर्ण विश्वास ठेवून तुमच्यामार्फत कंपनीसरकाराशीं आम्ही कायम दोस्तीचा तह ठरविला. असें असून त्या तहाच्या विरुद्ध आतां मुंबईकर असें वारंवार वर्तन करतात. अशा स्थितींत इंग्रजांच्या लेखावर किंवा शब्दावर आम्ही इतःपर भरंवसा कसा ठेवावा? या संबंधानें तुम्ही ताबडतोब

मुंबईकरांस स्पष्ट लिहून जबाब मागवावा. म्हणजे तदनुसार आम्हांस पुढील विचार पाहतां येईल.

'बरें झालें कीं मुंबईकरांचें हें कृत्य तुम्ही येथें समक्ष हजर असतांच घडून आलें. आमच्याकडून तहाच्या विरुद्ध अद्यापपावेतों यत्किंचित् आचरण घडलेलें नाहीं. अब्रूदार इसम असें विरुद्ध आचरण सहसा करीत नसतात. या पूर्वीही मुंबईकरांनीं तह मोडण्याजोगीं कृत्यें अनेक केलेलीं आहेत. पूर्वीच्या गव्हर्नरांनीं केलेले करार मोडून त्यांनीं साष्टी व ठाणें काबीज केलें; गुजराथेंत व इतर ठिकाणीं सरकार मुलखास उपद्रव दिला; दादांचा पक्ष घेऊन आम्हांस कोट्यावधि रुपयांच्या खर्चांत आणिलें. परंतु कलकत्तेकरांच्या इभ्रतीकडे नजर देऊन या गोष्टी आम्हीं सोडून दिल्या. तथापि मुंबईकरांचा पूर्वीचा क्रम अजून चालू आहे. ते जर असले प्रकार ताबडतोब बंद करणार नाहींत तर मग इंग्रजांशीं असले तह करण्यांत अर्थ तरी काय ?

'दादांची व्यवस्था यथास्थित ठेवण्याची तजवीज झालेली असल्यानें हा कौटुंबिक कलह संपला असें आम्ही समजत होतों. इतक्यांत दादांनीं कोणासही न कळवितां मुंबईचा रस्ता धरिला. त्यांना आनंदानें सुखांत राहतां यावें यासाठीं आम्ही इतकी मेहनत घेतली. असें असतां हा उलट प्रकार होतो यास काय म्हणावें ? त्यांस त्रास देण्याची आमची इच्छा असती तर आमच्या फौजांनीं त्यांस साफ घेरून टाकिलें होतें. जिवास अपाय होईल म्हणून ते मुंबईस गेले असें कोणी म्हणतील तर तें सब झूट आहे. त्यांत कांहीं अर्थ नाहीं. तरी याचा जबाब ताबडतोब पाठवावा. बहुत काय लिहिणें. तारीख १९ नोव्हेंबर १७७६.'

दादानें कारस्थानें उठविलीं, त्यांचा निरास करण्यास नानास महा प्रयास पडले. सिंदे होळकर पुणेकरांस अनुकूल नाहींत असा सर्वत्र बोभाटा झाल्यामुळें राज्यांत भयंकर अस्थिरता उत्पन्न होऊन बंडखोरांस फावलें. नुकसान सोसून पुणें दरबारास इंग्रजांशीं तह करावा लागला. निजामास गप्प बसविण्यासाठीं त्यास अठरा लाखांचा मुलूख त्यांनीं दिला. हैदरअलीनें कर्नाटक बळकावलें, तेव्हां त्यावजर स्वारी करणें भाग झालें. कोल्हापुरकरांनीं पेशव्यांचे मुलखांत सारखा दंगा चालविला. सुरापुरकर व कित्तुरकर देसाई यांचा दंगा, प्रतिनिधींचा व कोळ्यांचा दंगा, असे किती तरी प्रकार चालू होऊन त्यांतच

तोतयाच्या बंडाची भर पडली. या अडचणीच्या प्रसंगीं नानानें तुकोजी व महादजी यांच्यांत भेद करून महादजीस आपल्या बाजूस वळविलें. सिंदे होळकरांची जोईजड झालेली जोडी फोडून त्यांच्यांत तेढ उत्पन्न केली, याबद्दल खऱ्यांनीं नानाची प्रशंसा केली आहे $ शिंदे होळकरांच्या वैरामुळेंच मराठशाहीचें नुकसान झालें ही गोष्ट नानासाहेबाच्या वेळेपासून प्रसिद्ध होती. पानिपतचें संकट त्यामुळेंच उद्भवलें, आणि याच तेढीमुळें शेवटीं मराठशाहीचा अंत झाला. महादजी व तुकोजी यांचें भांडण मिटविण्याऐवजीं नानानें तें सदैव जागृत ठेवलें ही केव्हांही प्रशंसनीय करामत नव्हे. तुकोजी व अहल्याबाई यांचा बेबनाव असून त्यांत महादजीनें बाईचा व नानानें तुकोजीचा पक्ष घेतला, तेणेंकरून उत्तरहिंदुस्थानचें राजकारण समग्र बिघडलें, ही गोष्ट पुढें निदर्शनास येणार आहे. या सिंदे होळकर प्रकरणावरच तत्कालीन पत्रव्यवहार पुष्कळसा माजलेला आहे. बापू व महादजी यांचें मन मुळपासून शुद्ध नव्हतें. महादजीच्या पेशव्यांकडे पुष्कळ मागण्या होत्या. स. १७७६ च्या पावसाळ्यांत शिंदे होळकर पेशव्याच्या भेटीस आले, त्या वेळीं नानानें महादजीस असें भासविलें कीं, ' तुम्ही जें जें मागतां, त्यास बापू अडवितात, तर तुम्ही आमचीं कामें करवून द्यावीं म्हणजे सोयीसोयीनें बापूस वळवून तुमच्या मागण्या आम्ही सर्व पुऱ्या करून देऊं.' नानाच्या शब्दावर महादजीचा अत्यंत विश्वास अखेरपर्यंत होता. शिंद्याच्या सरंजामाच्या हिशेबासंबंधीं अनेक भानगडी होत्या. त्याबाबत नानानें तूर्त पडतें घेऊन महादजीस आपल्या बाजूस वळविलें. म्हणूनच तोतयाचा पाडाव होऊन पुढील युद्धांत मराठ्यांची बाजू टिकली.

अप्टनास कारभाऱ्यांनीं जबरदस्तीनें पुण्यास ठेवून घेतलें. तह पुरा करून दिल्याशिवाय ते त्यास पुण्यांतून जाऊं देईनात. पुढें अप्टन जाऊं लागला तेव्हां दुसरा कोणी इसम पुण्यास पाठवा अशी मागणी कारभाऱ्यांनीं केली. ती हेस्टिंग्सनें मुंबईस कळविल्यावर आगलाव्या मॉस्टिनच पुनः पुण्यास आला. हा पुण्यास नको अशी नानानें पुष्कळ तक्रार केली, पण मुंबईकरांनीं ती ऐकिली नाहीं. सन १७७७ च्या मार्च महिन्यांत मॉस्टिन पुण्यास येऊन अप्टन लगोलग निघून कलकत्त्यास गेला. बेलापुरचा पेशव्यांचा अंमलदार

$ अधि० योग पृ. ४६.

१७-३-१७७७ रोजीं नानास लिहितो, 'मॉस्टिननें पुण्यास जाऊं नये, परभारें पुरंदरास जावें. फारच आग्रह धरल्यास एक दिवस पुण्यास सरंजाम ठेवून मग पुरंदरास यावें, अशी सूचना प्रथमच मीं त्यांसीं बोललों आहें. थोडयांत त्याचा संतोष होत असेल तर बहुमान करावा.' अशा या कागदांवरून कारभाऱ्यांचे पेंच व परिस्थिति लक्षांत येतात. दादा मुंबईस आल्यावर त्याचे मागोमाग आबाजी महादेव दमणाहून मुंबईस गेऊन कारस्थानें करूं लागला. मुंबईची बातमी बिलकूल बाहेर समजेनाशी झाली. 'टोपीकरांचा विश्वास नाहीं. सबब पानसे, विसाजी कृष्ण, घुळप व आंग्रे यांस सावध राहून आरमारसुद्धां जाऊन बंदोबस्त करण्याचे हूकुम सुटले होते.' (ता. ९-३-१७७७)$ दादाच्या कारस्थानांस मुंबईकरांनीं जोराचें प्रोत्साहन दिलें. मोरोबा फडणिसाच्या पुढील सालच्या भयंकर कारस्थानाचा पाया या वेळीं मुंबईस रचला गेला. दादाचें मोरोबास गेलेलें खालील पत्र ता. ११-४-१७७७ चें आहे. ( ऐ. टि. ५-१२ ).

'तुम्हीं पत्र पाठविलें तें प्रविष्ट जालें. सरदारांची अनुकूलता करून त्यांचें पत्र शपथपूर्वक पाठविलें आहे. तरी स्वामींनीं या कालीं यावें, फौज पुढें पाठवितों म्हणोन लिहिलें तें कळलें; व दादोभास्कर यांचे जबानीं सविस्तर विदित जालें. त्यावरून बाहेर निघावयास चैत्र व॥ १ स ( २३-४-१७७७ ) मुहूर्त पाहिला आहे. तरी तुम्हीं आपली हजार फौज व तुकोजी होळकरांची हजार फौज कल्याणनजीक पाठवून देणें. तुम्ही कारस्थानी व हिंमत धरून काम केलें, येणेंकरून बहुत खुषी झाली. स्वरूपाप्रमाणें करून दाखविलें. सेवा कराल हा भरंवसा आहे. कोणेविशीं फिकीर न करणें. निजाम अलीखान बारभाईंची कुमक करूं लागेल तरी त्यासुद्धां पारिपत्य होय ऐसा हुकमी सरंजाम बरोबर घेऊन येतों.' अशाच मजकुराचें दुसरें पत्र ता. ७ मे रोजीं दादानें मोरोबास लिहिलें. त्यांत आणखी मजकूर असा कीं, 'खासा स्वारी येण्याचा गुंता नाहीं. सर्व मजकूर दादो भास्कराजवळ आज्ञा केली आहे ते जबानीं सांगतील. काशीबा होळकर, चिंतो विठ्ठल व गोपाळ नाईक तांबवेकर यांस फौज सुद्धां इकडे पाठविणें. सारांश, तुम्ही व होळकर एकनिष्ठ असल्यास येण्याचीहि दिक्कत नाहीं. मग बहुत इंग्रजांचेंही काम नाहीं. संशयानें संशय वाढतात. त्याहीमध्यें तुम्हीं पूर्वी माधवरायाचे

$ का. सं. प. या. ४७७; ऐ. टि. ४-८.

कारकीर्दीत शपथ केली होती, तेव्हांपासून ती कायम आहे. मग संशय धरूं नये असें आमचे नजरेस येतें. परंतु तेथील मंडळी तुमचे व आमचे माहितीची आहे, यामुळें हजार दिक्कती येतात. तरी वरील गृहस्थ जलदीनें पोंहचत ऐसें करणें.'

पुरंदरचा तह १-३-१७७६ रोजीं झाला, आणि त्यानंतर दोन वर्षांनीं म्हणजे २३-३-१७७८ रोजीं मराठ्यांशीं पुनः युद्ध चालू करण्याविषयीं हेस्टिंग्सनें हुकूम सोडले. या दोन वर्षांतील भानगडींचे व्यवहार व त्यांचें भारूड एवढें प्रचंड आहे कीं तें संगतवार उलगडण्यास फॉरेस्टनें छापलेले मुंबई सेक्रेटरियटचे व कलकत्त्याच्या सेक्रेटरीयटचे कागद व हेस्टिंग्सचीं पत्रें वगैरे सर्व वाचले पाहिजेत. त्यांची थोडीबहुत तुटक व अंधुक वासलात डफनें लाविली आहे. हीं दोन वर्षें म्हणजे रघुनाथरावाच्या खटपटींच्या परमावधीचीं होत. त्यानें हरतऱ्हेनें बारभाईंचा उच्छेद चालविला. इंग्रजांकडून तोतयाचे साथीदारांस पाठिंबा दिला; कलकत्तेकरांस व विलायतेस नाहीं नाहीं तीं पत्रें पाठवून दर्मावलें; पोर्तुगीज, हैदर, निजाम, शिंदे, होळकर, भोसले वगैरेंस नानाप्रकारें चिथावून दिलें; कोल्हापुरकर छत्रपतींकडून पुण्याचे कारभाऱ्यांचा उच्छेद चालविला; हिंदुस्थानांतून विजयसिंगाची मारवाडी फौज मदतीस आणण्याची खटपट केली; पण याशिवाय प्रत्यक्ष पुण्यांत मोरोबा व सखाराम बापू यांस भेदनीतीनें वश करून बारभाईंचा मुख्य आधारच डळमळीत केला. त्याच्या या दांडग्या उपद्व्यापाची कल्पनासुद्धां कोणास सहसा होणार नाहीं. हा एवढा प्रचंड उद्योग राष्ट्रहिताचे कामीं खर्च झाला नाहीं याबद्दल अत्यंत खेद वाटतो. दादाच्या इतक्याही खटपटीस फ्रेंचांचे नवीन दबकावणें उभें करून नानानें तोंड कसें दिलें, हें ध्यानांत आणिलें म्हणजे त्याच्याही कर्तबगारीबद्दल तसाच अचंबा वाटतो. मॉस्टिन पुण्यास राहून दादाचाच पाठपुरावा करूं लागला. शिवाय आबाजी महादेव, मानाजी फाकडे, तुळ्या पवार व बाजीपंत बर्वे हे आपापल्यापरी त्याची साथ करीतच होते.

पुरंदरचा तह नामंजूर करावा, आणि दादास पुण्यास नेऊन स्थानापन्न करण्याचा हुकूम कलकत्त्यास पाठवावा, अशी मागणी दादांचे पत्रासह मुंबईकरांनीं इंग्लंडांत कोर्ट ऑफ डायरेक्टरांकडे अगोदरच केली होती. त्यावर पुरंदरचा तह नामंजूर व दादाशीं सुरतेस झालेला तह मंजूर, अशा मतलबाचा

जबाब इंग्लंडाहून ता. १६-४-१७७७ चा प्रथम इकडे आला. पण मागाहून उलट बाजूच्या हकीकती व विशेषतः कलकत्त्याचे कौन्सिलानें रुजू केलेलीं कारणें डायरेक्टरांचे नजरेस आल्यावर ते जास्तच बुचकळ्यांत पडले. त्यांच्या हुकमांचा अर्थ मुंबईस व कलकत्त्यास भिन्न भिन्न होऊन, त्या अर्थावरही कलकत्त्याच्या कौन्सिलांत कडाक्याचे वाद झाले. शेवटीं स. १७७८ त इंग्लंडचे हुकमाचा अर्थ कलकत्तेकरांनीं नक्की ठरवून दिला, तो असा. अप्टनचा तह तंतोतंत पाळावा. बारभाईंचे विरुद्ध यत्किंचित् हालचाल करण्यास मुंबई-करांनीं राघोबास सवड देऊं नये; शिवाय त्यास कोणतीही मदत करणें झाल्यास त्याजबद्दल कलकत्त्याहून स्पष्ट हुकूम आणवून मग ती करावी. परंतु हा इत्यर्थ ठरून येण्यापूर्वीच दादानें मुंबईस अनेक कारस्थानें सुरू केलीं होतीं. त्यांचा मेहुणा बाजीपंत बर्वे यास ता. १६-४-१७७८ रोजीं त्यानें खालील मतलबाचें पत्र लिहिलें.

'विलायतेचा ठपका कलकत्तेकरास आला, त्यावरून ते शुद्धीवर येऊन, त्यांनींच आमचे कुमकेविषयीं हुकूम मुंबईकरांस पाठविला. इतक्यांत पुण्या-कडूनही कित्येक सरदार व मुत्सद्दी यांनीं मसलत केली. त्यास चैत्र व॥ १ स (१२ एप्रिल)* स्वारी डेरेदाखल झाली. खर्चास ऐवज इंग्रज सावकारीदाखल देत आहेत, परंतु आम्ही तो घेत नाहीं. हैदर बहादुर यांजकडूनच ऐवज घेऊन तुम्हीं हुजूर पाठवून देणें. त्यांनीं पूर्वी ऐवज पाठविण्याचें कबूल केलेंच आहे. दोन वर्षें मसलत थंड झाली होती, ती सांप्रत श्रीकृपें सुरू जाली. नबाबा-कडून ऐवज आला कीं कार्यसिद्धि जालीच समजणें.' हैदरानें दादाकडे अनु-संधान लाविलें हें अगोदरच ताडून नानानें हरिपंत फडके व पांडुरंगराव गोविंद यांस हैदरावर पाठवून त्याचा बंदोबस्त केला, याची संगति ह्या प्रक-रणांत ध्यानांत ठेविली पाहिजे. हरिपंततात्याची छावणी स. १७७७ च्या पाव-साळ्यांत तुंगभद्रेपलीकडे झाली. (स. मा. रो. १२,१४).

६. दहकपट्टी.—बारभाईंनीं दादाविरुद्ध कारस्थान रचिलें, तेव्हां त्याचा परिपाक पुढें कसा होईल याची त्यांस बिलकूल कल्पना नव्हती. कासेगांवच्या

* ऐ. टि. ५-२२. हें पत्र २६-५-७७ चें नसून १६-४-७८ चें आहे. पहा ऐ. टि. २-४.

लढाईत त्रिंबकराव पडल्याची बातमी येतांच नाना फडणिसाची तिरपीट उडाली, तेव्हां सखारामबापूनें नानास सांगितलें, 'अहो अंगीकृत कार्याचा हा नुसता आरंभ आहे. अजून पुढें असे प्रसंग पुष्कळ यावयाचे आहेत.' अशा आशयाची जी आख्यायिका प्रचलित आहे, तिजवरून बापूची धूर्तता चांगलीच व्यक्त होते. गुजराथची मोहीम झाली, पुढें पुरंदरचा तह झाला, तरी दादा थंड पडेना. उलट सर्व देशभर दंगल सुरू राहिली. खजिन्यांत पैसा बिलकूल येईना आणि फौजांचे व कारभाराचे खर्च मात्र चालूच राहिले. पटवर्धन, फडके, शिंदे, होळकर वगैरे सर्व कर्जानें बेजार झाले. फौजा उपाशी राहून धरणीं धरून बसत, तेव्हां सरदारांस दिवसांचे दिवस उपास पडत. पैसा पैदा करण्याच्या नाना युक्त्या त्या वेळीं कारभाऱ्यांनीं केल्या. सर्व सरंजामदारांचे निमें ऐवज सालोसाल सरकारांत घेतले. शिवाय दादाचे कर्जाची पट्टी, सवाई माधवरावाचे लग्नाची पट्टी, भिल्लांचे व कोळ्यांचे देण्याची पट्टी, वगैरे किती तरी कर लोकांवर बसवून कारभाऱ्यांनीं पैसे वसूल केले. जहागिरींच्या मोबदल्याचे नजराणे व शत्रुपक्षास सामील झालेल्या इसमांच्या तमाम जिंदग्या या सर्व उत्पन्नाच्याच बाबी होऊन बसल्या. याशिवाय दहकपट्टी म्हणून एक विशिष्ट बाब या वेळीं कारभाऱ्यांकडून सर्व सरदारांवर व लोकांवर बसविण्यांत आली. तिला हक्क रसूम असेंही नांव होतें. (खरे ले. १५१८, १५३३, १५३४, १५४५, १५४८, १५५५, १५५७, १७५९, १७६२, १८६८.)

जमीन महसूल दर शेंकडा दहा रुपये जास्त वाढविला. गांवगन्नाचे पाटील कुलकर्णी, चौगुले, शेट्ये, महाजन यांना आपल्या हक्काबद्दल जो मुशाहिरा मिळे तो सर्व अजीबात एक वर्ष सरकारांत घ्यावा. इनामदारांच्या इनामाचें एक सालचें उत्पन्न सर्व घ्यावें. सरदार, दरकदार, तैनातदार यांच्या तैनाती एक सालच्या घ्याव्या, वाणी उदमी वगैरेंच्या प्राप्तीवर शेंकडा एक रुपया घ्यावा, असे ठराव करून पैसा जमा केला. हा एक प्रकारचा हल्लींच्यासारखा प्राप्तीवरचा करच होय. दहकपट्टी म्हणजे दशक किंवा दशांश वसूल जास्त घेणें व हक्क रसूम म्हणजे एक साल सर्वांचे हक्क सरकारांत घेणें, असा यांचा अर्थ आहे. पटवर्धन वगैरे कित्येकांनीं हे कर देण्यास फारच हरकती घेतल्या. वर्ष सहा महिने नाना भानगडी त्यासंबंधानें झाल्या, पण शेवटीं नाना फड-

णिसानें जिकिरीनें सर्वांपासून पैसा वसूल केला. दहकपट्टीप्रमाणेंच सर्व सावकारांवर कारभाऱ्यांनीं एक कर्जपट्टी बसविली. या दोनही पट्ट्यांच्या संबंधांतील पत्रव्यवहार पुष्कळसा उपलब्ध झाला आहे. त्यांतून एक मासलेवाईक उतारा येथें देतों.

"सांप्रत पुण्यांत कर्जपट्टीचा कडाखा जाला आहे. चौसष्ट लक्षांची पट्टी सराफ वदंता, परंतु तास चाळीस पावेतों असेल. वल्लभसुंदर याची तीन लक्षांची निशा जाली. बाळोबा नाईक लक्ष देतो. मातुश्री अम्माजवळ लाख मागतात, पंचवीस पावेतों कबूल जाली, परंतु ऐकत नाहींत. चौकी बसली आहे. याप्रमाणें जोग, गद्रे, ताटक्ये, थत्ते, भावे, रामाजी नाईक दातार, त्रिंबक विनायक चाबूकस्वार, तापीदास काशीदास, राघोजी बागडे, भुतकर, कहानदास यांच्या घरीं चौक्या आहेत. कारभारी यांच्या आपल्या द्रव्यास धक्का नाहीं. दुसऱ्यावर तंबी बसवितात." डिसें. १७७६ (खरे ले. १९२८).

**७. सरदारांचे रुसवे व फितूर** (स. १७७७).—पुरंदरचा तह ता. १-३-१७७६ रोजीं होऊन पावसाळ्यांत फौजा ठिकठिकाणीं गेल्या. पुढें लगेच तोतयाचें प्रकरण उद्भवलें. तें पुरें झाल्यावर स. १७७७ चें प्रथमार्ध सरदारांचे रुसवे काढण्यांत गेलें. पुरंदरच्या तहाचे वेळीं सिंदे होळकर बारभाईंस अनुकूल नाहींत असा बोभाटा सर्वत्र झाल्यानें थोडेंबहुत नुकसान सोसून कारभाऱ्यांस इंग्रजांशीं तह करावा लागला. निजामअलीच्या दरडावणीस भिऊन त्यासही त्यांनीं अठरा लक्षांचा मुलूख दिला. महादजीची मर्जी सांभाळून नानानें त्यास आपल्या बाजूस वळविलें आणि होळकरास त्याजपासून अलग केलें. होळकरानें तर सरकारकाम एकहीं मनापासून केलें नाहीं. सिंद्यानें तोतयाचा पाडाव केला, तशी ठळक कामगिरी तुकोजीची कांहींच नव्हती. खानदेशांत कोळ्यांचा दंगा चालला, त्याजवर होळकराचा कारभारी नारो गणेश गेला, पण त्याचे हातून बंडाचा निकाल लागला नाहीं. कर्नाटकांत होळकरास पाठविण्याचा विचार ठरला, पण त्याचें तिकडे पाऊल पडलेंच नाहीं. नरसो गोविंद,¶ पांढरे व उंब्रजकर तेली यांनीं दगा करून पटवर्धनाचें

¶ हा नरसो गोविंद बोधले, भट उंबऱ्याचा पाटील, ऋग्वेदी देशस्थ ब्राह्मण, याचें घराणें थोरल्या बाजीरावापासून मराठशाहींत वावरत होतें. हा

करकंबचें ठाणें २९-५-१७७७ रोजीं घेतलें व तेथचे अंमलदार कैद केले. या वेळीं सर्व पटवर्धन हैदराकडे गुंतल्यामुळें तुकोजी होळकर देवदर्शनाकरितां तुळजापुरास गेला होता, त्यासच कारभाऱ्यांनीं करकंबची कामगिरी सांगितली. त्यानें फौज वगैरे जमवून वेढा घालून २५ जुलई रोजीं तें ठाणें परत घेतलें आणि नरसो गोविंदास कैद करून त्याची सर्व मत्ता लुटून घेतली. परंतु लगोलग करकंब पटवर्धनांकडे परत न देतां, उलट तें होळकर आपणच दाबून बसला आणि प्रांतांतील वसूल व लूट घेऊन ती त्यानें स्वतःकडे ठेविली. कित्येक दिवसपर्यंत त्यानें कारभाऱ्यांचे हुकूम माळ्यावर बसविले. शेवटीं निकडीची ताकीद आली, तेव्हां करकंबचें ठाणें पटवर्धनास देऊन ऑगस्टअखेर तुकोजी जेजुरीस आला. रघूजी भोसले पुरंदरावर आला होता त्यास मे महिन्यांत निरोप होऊन पुढें लवकरच तो स्वदेशीं नागपुराकडे गेला. भोसल्याची समजूत झाली. ( खरे ले. २१०८, २१५८ ).

स. १७७७ त मानाजी फाकडे दादाचा पक्ष सोडून हरिपंताबरोबर कर्नाटकांत हैदरावरच्या मोहिमेंत होता. त्यानें अंतस्थ रीतीनें हैदराशीं संधान करून हरिपंताचा घात करण्याची पाळी आणिली होती. हरिपंत सावध होता म्हणून प्रसंग निभावला. हैदराजवळ तुळाजी पवार, आबाजी महादेव व बाजीराव बर्वे होते, 'त्यांनीं मानाजीच्या हातीं सूत्र केलें कीं, पैका पाहिजे तो पाठवितों, हरिपंताची फौज फोडावी, हैदरखान लढाईस उभे राहतील ते समयीं सर्वांनीं येऊन त्यांस मिळावें. मानाजींनीं कबूल केलें, कीं आम्ही अडवून बसतों, तुम्हीं चालून यावें.' त्याप्रमाणें मानाजींनीं हैदराकडून एक लक्ष अकरा हजार होन घेऊन हरिपंतांचे सैन्यांतील यशवंतराव माने,

---

स्वतः स. १७७३ पासून दादाचे पक्षांत असून हरतऱ्हेनें कर्नाटकांत दादाचें साह्य करीत होता. कैदेंत पडल्यावर त्याचे दिवस फार विपरीत गेले. पालीच्या किल्ल्यावर कैदेंत असतां त्याची आई मरण पावली. तेव्हां उत्तरक्रियेसाठीं त्यास थोडा वेळ मोकळा करून पुनः पूर्ववत् बेडी घालून ठेवावा, असा हुकूम ता. २६-३-१७७८ चा स. मा. रो. ले. ९८० चा आहे. यास पुढें मोरोबा दादानें थोडा वेळ सोडिलें, पण पुनः दंगा केल्यामुळें तो कैदेंत पडला. ( तृ. सं. वृ. पृ. २८ व ५७. खरे ले. २८९४ व २९७५ ) वंशावळ पहा.

निळकंठराव थोरात व महादजी भोसले मुंगीकर वगैरे मराठे सरदार फितविले, आणि हैदरास बल्लारीहून अकस्मात् हरिपंतावर गुंटकळजवळ आणून दग्याचा बेत केला. हरिपंतानें मानाजीस बोलावूं पाठविलें. त्यांनीं उशीर केला. लबाडी असें समजतांच हरिपंतानें सांभाळून तजविजीनें नदी पार होऊन मानाजीचा बंदोबस्त करावा म्हणून सुरापुरचे बाजूस पिछेहाट केली. इतक्यांत हैदरखानाचा कागदच अस्सल सांपडला कीं 'तुम्हीं पत्र पाठविल्याप्रमाणें हरिपंतांस अडवून बसवावें, तोंपर्यंत इकडील फौज चालून येत आहे.' त्यावरून खात्रीच झाली. तेव्हां हरिपंत व परशुरामभाऊ यांनी पहांटेसच मानाजीचे गोटावर हल्ला केला. (६-१-१७७८). त्यांत त्याचे लोक आडून पाडाव झाले. कोणी फितुऱ्यानें खुद्द मानाजीस इशारा दिल्यावरून तो दहापांच स्वारांनिशीं घोड्यावरून पळून गेला. त्याची बायको व मालमत्ता सरकारांत आली. हैदरखानाचा अस्सल कागद हरिपंतानें पुण्यास पाठविला. इकडे हरिपंताचे फौजेचा संहार करावा, व तिकडे दादांनीं मालवणावरून कोल्हापुरास यावें असे मनसबे घाटत होते. हैदरानें मानाजीस दिलेले एकलक्ष होन हरिपंताचे हातास लागले. गाड्यांचा जमादार व खिजमदगार फितव्यांत सांपडले, त्यांचीं डोकीं उडविलीं. म्हसवडकर यशवंतराव माने फितुरांत उमगला, त्यासीं तोफेच्या तोंडीं बांधून उडवून दिलें. मानाजीची अब्रू गेली. त्यास राज्यांत तोंड दाखवावयास सोय राहिली नाहीं. सर्व लीन झाले. मानाजीची बायको व सासू महादजी सिंद्यानें ओलीस दाखल आपले कबजांत घेतलीं. मानाजी व महादजी यांचें अत्यंत वैर होतें हें सुप्रसिद्धच आहे. पुढें मानाजी पळून हैदरकडे गेला, तिकडे त्यानेंही त्यास कैदेंतच ठेविलें. तेथून निसटून तो कांहीं काळानें कोल्हापुरास येऊन तेथील छत्रपतीचे आश्रयास राहिला. तेथेंही जेव्हां महादजीनें त्याचा उच्छेद केला, तेव्हां मानाजी कांहीं काळ पन्हाळ्याचे बाजूस लुटालूट व बंडाळी करूं लागला. तेथून पुढें त्याचा उठावा होतांच तो स. १७८० त वाडीकर सांवतांचे आश्रयास गेला. सालबाईच्या तहानंतर तो पुनः सरकारांत आला. तो दुसऱ्या बाजीरावाचे अव्वलीपर्यंत हयात होता. सामान्यतः अस्सल मराठा पाणी कसें असतें याचा उत्कृष्ट मासला हा मानाजी होय. त्याचें इतिवृत्त पुढें येणार आहे.

सखारामबापू, तुकोजी होळकर व महादजी सिंदे हीं मंडळी तरी सिध्या मार्गानें जाणारी होती असें नाहीं. कबूल केलेली गोष्ट किंवा दिलेलें वचन पार

पाडलेंच पाहिजे अशी भावना एकाचीही नव्हती. नानाफडणिसाचे अंगीं इतर कोणतेही दोष असोत, परंतु आधीं शक्य नसेल तें कबूल करायचें नाहीं, आणि एकदां जी गोष्ट कबूल केली ती कसाही प्रसंग आला तरी तडीस न्यावयाची, हा त्याचा निश्चय बहुधा कायम असे. म्हणून त्याच्या शब्दावर शत्रुमित्राचा विश्वास असे. कोल्हापुरकर छत्रपति दादास साह्य करून पटवर्धनांचा व बारभाईंचा उच्छेद करूं लागले, तेव्हां त्यांचें बंदोबस्तास नानानें महादजीस जाण्यास सांगितलें. त्या वेळीं दक्षिणेंत दहा लक्षांचा मुलूख व अशीरगड किल्ला आपणांस द्यावा अशी महादजीनें कारभाऱ्यांकडे मागणी केली. त्याशिवाय तो कोणतीही काममिरी पत्करीना. शेवटीं माळव्यांत दहा लक्षांची जागीर देण्याचें नानापासून कबूल करून घेऊन महादजी स. १७७७ च्या एप्रिलांत जांबगांवाहून कोल्हापुरावर जाण्यास निघाला. ता. २७ एप्रिल रोजीं त्याचा मुक्काम नीरेवर होता. जून महिन्यांत तो रहिमतपुरास पोंचला आणि तेथेंच पावसाळ्यांत छावणी करून राहिला. त्याची समजूत पुरती पडली नसून नानाचा महादाजी बल्लाळ गुरुजी व शिंद्याचा बाळाराव गोविंद सारखे त्या वाटाघाटींत होते. प्रथम महादाजी बल्लाळ व नंतर नारो शिवदेव आणि सदाशिव दिनकर असे नानाचे विश्वासु गृहस्थ महादजीजवळ राहून बोलाचालीचें काम करीत होते, हें पत्रव्यवहार वाचतांना लक्षांत ठेविलें पाहिजे. हरिपंत फडके स. १७७७ च्या उन्हाळ्यांत पुणें सोडून कर्नाटकांत गेला. याप्रमाणें फौजबंद सरदारांस कांहीं ना कांहीं कामगिरी देऊन नानानें राज्याचे कामीं गुंतवून टाकिलें. शिवाय हैदरअली व इंग्रज यांच्याशीं टक्कर देण्यास मोठ्या फौजांची जरूर होतीच. पण सरदार लोक घरीं बसल्यानें बखेडा करणार, त्यापक्षीं परमुलखांत मोहिमीवर त्यांस गुंतवून ठेवून तिकडेच त्यांनीं मुलूखगिरीवर आपला खर्च परभारें भागवावा, अशी योजना कारभाऱ्यांस करावी लागली, तीच उत्तरोत्तर बाधक झाली.

परंतु तुकोजी होळकराची तऱ्हा कांहीं निराळीच होती. मोरोबाचे कारस्थानांत बारभाईंविरुद्ध तो सामील झाला, म्हणूनच त्या प्रकरणास रंग चढला. तुकोजीची हालत पुढें एका स्वतंत्र प्रकरणांत येईल. दहकपट्टीचा ऐवज सिंदे, पटवर्धन वगैरे सर्वांनीं दिला, परंतु तुकोजीनें कैक वर्षें टाळाटाळ चालविली. पुढें नऊ लाखांवर दहकपट्टीची तोड होऊन तें प्रकरण कसेंबसें मिटलें. परंतु

सिंद्यास मुलूख देतात, आपणही त्याच्याबरोबरीचे सरदार, तेव्हां आपणासही तसा मुलूख व किल्ला पाहिजे असा त्यानें हट्ट धरिला. कारभाऱ्यांनीं सांगितलें सिंद्याप्रमाणें तुम्ही कामें करून दाखवा म्हणजे मग जागीरही देऊं. यामुळें त्याचे मनांत हळुहळू वितुष्ट येत चाललें. इतक्यांत फत्तेसिंग व गोविंदराव गायकवाड यांजमध्यें बडोद्याचे गादीविषयीं कलह लागला असतां फत्तेसिंगानें अठरा लाख रुपये नजराणा देण्याचें कबूल करून बडोद्याचा कारभार आपल्या नांवें करून घेतला. त्या बाबतींत तुकोजीनें गोविंदरावाचा पक्ष घेऊन हट्ट धरिला कीं त्यासच बडोद्याचा कारभार द्या. कारभाऱ्यांनीं सांगितलें कीं गोविंदरावानें पुण्यास यावें, अठरा लाख नजराणा द्यावा, शिवाय तो दादाच्या पक्षाला न मिळेल याविषयीं तुकोजीनें जामीनगिरी द्यावी. या गोष्टी गोविंदरावाकडून घडल्या नाहींत तरी तुकोजी आपला हट्ट सोडीना. तुकोजीच्या दरम्यानगिरी-मुळें फत्तेसिंगही नजराणा देईना. नारोशंकराच्या मुलांत असाच तंटा सरदारी-संबंधीं लागला असतां, त्यांतही तुकोजीनें अशीच निष्कारण मध्यस्थी चालविली. अशा उठाठेवींमुळें कशा भानगडी राजकारणांत उपस्थित होत याची कोणासही कल्पना होईल. पुढें हरिपंताचे मदतीस कर्नाटकांत जाण्याबद्दल कारभाऱ्यांनीं तुकोजीस तगादा लाविला; पण सिंदे बरोबर येतील तर आपण जाऊं, एकटे जाणार नाहीं, असें सांगून तुकोजी रुसून वाफगांवास जाऊन बसला. त्याची समजूत काढण्यासाठीं कारभाऱ्यांनीं विसाजी कृष्णास पाठविलें, पण त्याचा उपयोग झाला नाहीं. मोरोबा फडणीस तुकोजीस अंतस्थ फूस देत होता. असल्या अनेक कारणांनीं तो विरुद्ध कारस्थानांत सामील झाला, हें पुढें दिसून येईल.

८. **रामराजाचा मृत्यु** (ता. ९-१२-१७१७) **व शाहूचें राज्यारोहण.**—स. १७७७ सालीं मुंबईस दादाच्या नानातऱ्हेच्या खटपटी सुरू असतां सातारा येथें रामराजाची प्रकृति दिवसेंदिवस फार बिघडत चालली. ‘ कोण समयीं काय होईल भरंवसा नाहीं. तसें झाल्यास नवे खुळास जागा होईल. याजकरितां भोसल्यांचे वंशांतील मुलगा पाहून महाराज जिवंत आहेत तों तख्तावर बसवावा, असा विचार बापूनानांनीं ठरवून ज्येष्ठांत ते साताऱ्यास जाणार होते. महाराजांचे विचारें, वावीकर त्र्यंबकजी राजे यांचे पुत्र तीन, विठोजी, परशुराम व चतरासिंग. त्यांतले वडील विठोजी यांस भाद्रपद

शु० १३ ता. १५ सप्टेंबर रोजीं विधिपूर्वक दत्तक घेतलें. नांव धाकटे शाहूराजे ठेविलें. पश्चात् रामराजे यांनीं मार्गशीर्ष शु० ११ ( ९-१२-१७७७ ) रोजीं कैलासवास केला.'

रामराजाच्या बायका दोन, थोरली दुर्गाबाई शिर्के यांजकडील, धाकटी सगुणाबाई आईसाहेब मोहिते यांजकडील. रामराजे यांस तीन कन्या झाल्या. मुलगा झाला नाहीं. शाहूराजांचा राज्याभिषेक लगोलग झाला नाहीं. अतिचारामुळें मुहूर्त नव्हता. मंगळादि पंच ग्रह दुसऱ्या राशीस गेले म्हणजे तो काळ राज्याभिषेकास निषिद्ध मानला आहे. पुढें एक वर्षानें हा अभिषेक मार्गशीर्ष व० ८ ( ता. ११-१२-१७७८ ) रोजीं सातान्यास मोठ्या समारंभानें झाला. अमृतराव पेठे व बाबूराव आपटे यांनीं सर्व सिद्धता केली. गोविंदराव व रामराव चिटणीस, अमात्य व मुत्सद्दी सर्व समारंभास आले होते. छत्रपतींच्या खर्चाची वगैरे व्यवस्था नीट बांधून कारभाऱ्यांनीं सर्व बंदोबस्त आपल्या हातांत ठेविला. दत्तविधानसमयीं शाहूचें वय १८ वर्षांचें होतें. त्यांचीं एकंदर चार लग्नें झालीं, पैकीं शिर्के यांजकडील आनंदीबाई ऊर्फ माईसाहेब यांचे पोटीं ३ पुत्र झाले. वडील प्रतापसिंग राजे ( ज. १८-१-१७९३ ). दुसरे रामचंद्र ऊ० भाऊसाहेब ( ज. ८-६-१७९९ ) व तिसरे शहाजी ऊ० आपासाहेब ( ज. २१-८-१८०१ ). यांचा संबंध मराठशाहीच्या उत्तरइतिहासाशीं येतो. ( पे. अ. ब., धा. शा. च.: खरे ले. २१३०, २२०२: ऐ. स्फु. ले. व. ८ पृ. २८ ).

पेशव्यांचे हातांतील मुख्य डाव हे छत्रपति होत. सातारा व छत्रपति यांचा बंदोबस्त नानानें अगदीं डोळ्यांत तेल घालून ठेविला. दादा, इंग्रज, नागपुरकर मुधोजी भोसले वगैरे अनेक मंडळी नानाफडणिसाच्या हातचा हा डाव हिसकून घेण्यास टपली होती. हेस्टिंग्सनें तर नानाचा पाडाव करण्यासाठीं मुधोजीस नेऊन सातान्यास छत्रपति करावें, अशी सिद्धता केली होती. सातान्यास छत्रपतिपद मिळविण्यासंबंधानें मुधोजीची खटपट खरोखरीच जोरानें चालली होती, याचा पुरावा खालील एका अप्रसिद्ध पत्रांत मिळतो. हें पत्र मुधोजीनें नागपुराहून सातान्यास रामराव जिवाजी चिटणीस यास लिहिलेलें आहे. आंतील मजकुरावरून तें बहुधा छत्रपतिपदासंबंधीं

असावें. व्यंकटराव काशी यास या कामासाठीं मुधोजीनें साताऱ्यास पाठविलें. तें पत्र असें—

श्रीसीताकान्त

राजश्री रामराव चिटनीवीस गोसावी यांसी. सकल गुणालंकरण अखंडित लक्ष्मीआलंकृत राजमान्य. स्नो। मुधोजी भोसले सेनाधुरंधर रामराम विनंति उपरी. येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लेखन करीत जावें. विशेष. पेशजी इकडोन राजश्री व्यंकटराव यांसी तुम्हाकडे रवाना केलें आहे. त्यांचे भेटी-नंतर सविस्तर अर्थ श्रवण जालेच असतील. सारांश, इकडील लक्ष ज्याप्रमाणें तुमचे ठायीं आहे त्याप्रमाणें कलकल भरून उचितार्थ निश्चयास आणून उत्तरें पाठवावीं, त्याप्रमाणें घडणुकेंत येईल. रा। छ ५ रमजान, बहुत काय लिहिणें. लोभ असो दीजे हे विनंति. मोर्तबसुद. श्रीशाहूराज प्रसादेन रघूजस्य यशोधना तत्सूनोस्तु मुधोनाम्नः मुद्रामुद्राविराजते ॥ †

मुधोजीस रामराजानें दत्तक घेतलें आहे, आणि तोच छत्रपतींचा खरा वारस होय, असा पुकारा करून हेस्टिंग्सनें मुधोजीस कळविलें कीं तुम्ही आपला हक्क बजावण्यासाठीं साताऱ्यावर चालून जा, आणि त्या कामीं तुम्हांस आमचें साह्य पाहिजे असेल तर मागा, आम्ही आनंदानें देऊं. परंतु मुधोजीचें दत्तविधान झाल्याचा पुरावा उपलब्ध कागदांत बिलकूल आढळत नाहीं. हा केवळ हेस्टिंग्सच्या मनांतला उद्देश दादानें उपस्थित केलेला असावा. नानाच्या खबरदारीपुढें हेस्टिंग्सचें कांहीं चाललें नाहीं. नानानेंच त्यास खडे चारले.

यासंबंधानें पेशव्यांच्या बखरींत विवेचन आहे तें असें—

'शाहू महाराजांच्या मागें राजारामसाहेबीं राज्यासनीं आरूढ झाल्यावर नानासाहेब व माधवराव यांनीं शत्रू पादाक्रान्त करून राज्याची वृद्धि अधिक केली. राजारामसाहेबीं २७ वर्षे राज्य केलें. व्यथित होते. पोटीं पुत्रसंतान नाहीं. वंशवृद्धि चालून राजमुद्राविराजित राज्य शोभिवंत असलें पाहिजे, याजकरितां स्वामींनीं विचार करून त्रिंबकजी भोसले वावीकर यांचा पुत्र

† हें पत्र रा. य. रा. गुप्ते यांजकडून मिळालें. पत्रावर साल नाहीं. स. १७७८ धरल्यास ५ रमजान रोजीं २५ सप्टेंबर तारीख येते. अप्रसिद्ध म्हणून सबंध दिलें आहे.

आणून सुमूहूर्ती दत्तविधान करून शाहूराजे नांव ठेविलें. उपरांत कैलासवासी जाले. त्यानंतर शके १७०० मार्गशीर्ष व॥८सुमुहूर्ते राज्याभिषेक करून राज्यारूढ केलें. त्यास आतां स्वामी प्रतापी आहेत. इंग्रजांनीं हिंदुस्थानांत व दाक्षिणेंत पैरवी केली. गर्व होऊन सरकारांत अमर्यादा करून लढाईस सन्मुख जाले. त्यांचें पारिपत्य स्वामींनीं सरदार फौज पाठवून करविलें. इंग्रजांनीं तह करावयासी वकील पाठविले. हात जोडून अर्जमात केला. घेतलेले किल्ले, वसई व बेलापुर व कल्याण व अमदाबाद देखील मुलुख सरकारांत दिल्हा. यास्तव महादजी सिंदे यांनीं त्यांचे बाजिर्दीवर चोहोंकडील बखेडा तोडून सरकारचा दाब बसवून तह केला.'*

छत्रपतींच्या अवदशेबरोबर त्यांच्या तैनातींतील जुन्या कुटुंबांची सुद्धां अवनतीच झाली. ज्या चिटणीस कुटुंबाचा शाहूच्या अखेरीपर्यंत एवढा उत्कर्ष होता, तिला सर्व राज्यकारभार पुण्यास चालूं लागल्यामुळें, कामच उरलें नाहीं. आपल्या धन्यास सोडून चिटणिसांना पुण्यास जातां येईना; आणि पुण्यास दुसरे चिटणीस त्याच कुटुंबांपैकीं होते, त्यांचेंही आनुवंशिक काम फडणीस वगैरे कुटुंबांकडे गेलें आणि भानु घराण्याचा उदय झाला. या परिवर्तनामुळें मनुष्यस्वभावानुरुप पेशव्यांच्याबद्दल चिटणीसांसारख्या जुन्या कुटुंबांत अनादर उत्पन्न झाला, आणि रघुनाथरावानें दुहीचा प्रकार आरंभिल्यामुळें ही जुनी मंडळी बारभाईच्या विरुद्ध वागूं लागली. गोविंदराव चिटणीस शाहूच्या वेळेस एवढा प्रसिद्ध पुरुष, पण आतां अगदीं निरुपयोगी बनला. त्याचा मुलगा लक्ष्मण गोविंद थोडाबहुत नाना फडणिसाच्या मर्जींत होता. स. १७७९ च्या पावसाळयांत गॉडर्डकडून तहाचें बोलणें सुरतेहून आलें त्या वेळीं नानानें मुद्दाम दादाची व गॉडर्डची समजूत पाडून युद्ध मिटविण्याकरितां लक्ष्मण गोविंदास‡ सुरतेस पाठविलें. पण त्याजकडून तह बनला नाहीं. 'सरकारचे वकील लक्ष्मण गोविंद सुरतेस होते, त्यांस हुजूर आणविलें. पुण्यास येऊन पोंचले. इंग्रजांशीं बिघाड हें साफ समजलें. [ जाने० १७८० ] 'इंग्रजांकडील बातमी लक्ष्मणराव यांचे पत्रावरून समजली ' असें सदाशिव दिनकर

*पे. ब. पृ. ६७. ‡ खंड १०–२३० व २४९; ग्वा. ४-२; खरे ३५१४; खंड १९-४१; भा. व. २ प. या. ७२ धा. शां. च. पृ. ५० भा. व. श. पृ. ७५.

स. १७७९च्या डिसेंबरांत लिहितो. यावरून नानाची मर्जी लक्ष्मणरावावर होती असें दिसतें. 'त्याचा चुलतभाऊ रामराव जिवाजी यांणीं दादासाहेबांकडे सुरतेस फितूर चालविला, ऐसें निमित्य ठेवून चौकशीस आणून पुण्यास कैदेंत ठेविलें. दस्तऐवज कागदपत्र कांहीं सांपडलें नाहीं. परंतु सुरतेस जाऊन कारस्थान केलें. इंग्रज फौज पुणें साताऱ्यास यावी, शाहू महाराजांस फौजेंत नेऊन मसलत बळकट करावी, अशा लोकांच्या जबानीवरून रुजुवाती करून दोष लावून सरंजामाची जप्ती केली. रामराव व गोविंदराव पुण्यास गेले, तेथें त्यांचे घरीं चौकी बसविली; आणि लाख रुपये दंडाचा ठराव करून गुन्हा माफ करून, दंड घेऊन मग सरंजामाची मोकळीक केली.' [ स. १७८२ ] अशीच हकीकत दुसऱ्या अनेक जुन्या कुटुंबांची आहे. रामरावाचा मुलगा मल्हारराव, छत्रपतींच्या बखरींचा लेखक हा सखाराम हरीचा जावई, म्हणून त्याचेंही उत्पन्न नानानें जप्त केलें. एकंदरींत नानाच्या अंमदानींत या कर्तबगार चिटणीस घराण्यास अन्नान्न दशा आली, त्यांतून पुढें प्रतापसिंहानें त्यांचा बचाव केला. गोविंदराव चिटणीस ता. १३-८-१७८४ रोजीं मेले, लक्ष्मण गोविंद यांस दुखवटा पाठविला असा उल्लेख भा. व. शकावलींत आहे.

---

प्रकरण नववें

# मोरोबादादांची बंडखोरी

## मार्च–जुलई स. १७७८

१. युरोपीय राजकारणांत हिंदुस्थानची गोवण.

२. मोरोबाच्या नाराजीचें कारण.

३. मोरोबास अधिकारप्राप्ति, नानाचा पाडाव ( मार्च २६–जुलई ११ ).

४. महादजीच्या धूर्ततेनें मोरोबाचा पाडाव ( ११-७-१७७८ ).

५. मोरोबाच्या प्रकरणाचें राजकीय व ऐतिहासिक महत्त्व.

* * * *

**१. युरोपीय राजकारणांत हिंदुस्थानची गोवण.**—अठराव्या शतकाच्या उत्तरार्धांत पाश्चात्यांच्या उपद्व्यापामुळें युरोपीय राजकारणांत हिंदुस्थान देश कसकसा गोवत गेला तें ध्यानांत आणणें बोधप्रद आहे. प्राचीन कालापासून जरी हिंदुस्थान व यूरोप यांचें दळणवळण सारखेंच चालू होतें, तरी सोळाव्या शतकांत युरोपियन राष्ट्रांनीं समुद्रमार्गानें हिंदुस्थानांत येऊन व्यापाराच्या वसाहती घातल्या. त्या योगानें येथील राजकारणास निराळें वळण लागत चाललें. त्याचा दृश्य परिणाम प्लासीच्या लढाईपासून सुरू झाला. क्लाइव्हनें बंगाल प्रांत हस्तगत केल्यावर इंग्रज पार्लमेंटास हिंदुस्थानच्या कारभाराची जबाबदारी वाटूं लागली; आणि स. १७६६ त त्यानें विशेष ठराव करून इकडच्या प्रदेशावर आपलें स्वामित्व जाहीर केलें. तरी इंग्रजी सत्तेची हाव सार्वभौमत्वास पोंचण्यास बराच कालावधि लागला. त्या सार्वभौम सत्तेसाठीं इंग्रजांनीं पहिला जोराचा झगडा सुरू केला, तो मराठ्यांशीं होय. कारण समस्त हिंदी सत्ताधीशांत मराठेच वरिष्ठ होते. मराठ्यांचा पाडाव केला कीं बाकीच्यांस कबजांत आणणें दुर्घट नाहीं, असा अंदाज बांधून रघुनाथरावास मदत करण्याच्या निमित्तानें इंग्रजांनीं मराठमंडळाशीं युद्ध पुकारलें आणि रणसंग्रामाचे व मुत्सद्देगिरीचे अनेक डावपेंच आरंभिले, त्यांत मोरोबादादा फडणिसास बारभाईंच्या पक्षांतून त्यांनीं फोडिलें त्या कारस्थानास विशेष महत्त्व आहे.

स० १७६३ त मद्रास व त्यानंतर १७६५ त दिवाणी वसुलाच्या हक्कानें बंगाल, हे दोन प्रांत इंग्रजांच्या पदरांत पडले. पण ते तुटक असून दोहोंच्या दरम्यान उत्तर सरकार व ओढ्या हे दोन प्रदेश होते ते कबजांत घेण्याची तीव्र उत्कंठा त्यांस भासूं लागली. हे दोनही प्रदेश ताब्यांत आल्यानें हिंदुस्थानचा पूर्वकिनारा सलग इंग्रजांचा झाला असता. ओढ्या हा नागपुरकर भोसल्यांचे क्षेत्रांतील भाग असल्यानें क्लाइव्हनें आपला वकील टॉमस मॉट यास त्या भागाची मागणी करण्यासाठीं स. १७६६त नागपुरास पाठविलें; परंतु माधवराव पेशव्यानें या वेळीं जानोजीस मराठशाहीच्या कर्तव्यांत पूर्णपणें मिळवून घेतल्यामुळें मॉटचें संधान सिद्धीस गेलें नाहीं. मॉटनें परत आल्यावर लिहून पाठविलेला रिपोर्ट वाचण्यालायक आहे. या प्रसंगीं क्लाइव्हनें इंग्लंडांतील वरिष्ठांस लिहून कळविलें कीं, 'जानोजी भोसले चौथाई घेऊन ओढ्या प्रांत आमचेकडे देईल तर तो घेण्यांत आमचा फायदा असून आमच्याशीं सख्य

ठेवण्यांत त्याचे अनेक फायदे आहेत. त्याला वर्षाचे १६ लाख चौथाईबद्दल द्यावे लागले तरी त्यांत आमचें नुकसान नाहीं. कारण कलकत्यापासून मद्रासपावेतों सबंध किनारा आमचे ताब्यांत आल्यानें आमची व्यवस्था चांगली लागेल, मात्र हा घाट जानोजीशीं कसा घडवून आणावा यासंबंधानें मी विचार करीत आहें.' पुढें क्लाइव्ह निघून गेल्यावर गव्हर्नरचे जागीं व्हेरेल्स्ट आला, तेवेळीं ओढ्याचा कारभार शिवभट साठे करीत होता. त्याचें व जानोजीचें वाकडें येऊन त्यांत इंग्रजांनीं जानोजीच्या मदतीस फौज पाठविली. या निमित्तानें जानोजीचा वकील उदेपुरी गोसावी हा इंग्रजांकडे राहूं लागला. ही वाटाघाट दोन वर्षें चालली; पण त्यापासून इंग्रजांस लभ्यांश असा कांहींच झाला नाहीं; आणि याच भानगडी चालू असतां स. १७६९त माधवरावानें कनकापुरचा तह करून जानोजीस मराठमंडळांत सामील करून घेतल्यानें इंग्रजांचा भोसल्यास फोडण्याचा डाव बंद पडला. तेव्हांपासून जानोजीनें इंग्रजांकडे चौथाईची मागणी चालू ठेविली. पण इंग्रज म्हणत, 'अलिवर्दीखानानें तुम्हांस चौथाई देण्याचें कबूल केलें तें कां? तर तुम्हीं फौजेनिशीं येऊन बंगाल बहार प्रांतांचें संरक्षण करावें म्हणून! परंतु आतां हे प्रांत इंग्रजांकडे आलेले असून त्यांचें संरक्षण करण्यास ते समर्थ आहेत. त्यास भोसल्यांची जरूर नाहीं; अर्थात् खंडणी देण्याचेंही कारण राहत नाहीं.' पुढें पंधरावीस वर्षें ही चौथाईची मागणी भोसले सालोसाल इंग्रजांकडे करीत होते. पण त्यांनीं ती मनावर घेतली नाहीं. उघड आहे, लष्करी जोराचें सामर्थ्य अंगांत असल्याशिवाय अशा मागण्या कोण मान्य करणार? तथापि जानोजीच्या हयातींत इंग्रजाचा कावा बिलकूल साधला नाहीं, याचें कारण भोसल्यांचा मराठशाहीशीं झालेला एकजीव होय. जेंकिन्सनें || नागपूरच्या राज्याची हकीकत लिहिली आहे तींत त्यानें जानोजीच्या कारभाराची वाखाणणी केली आहे. तो लिहितो, 'कारभार न्यायानें चालतो; लोक सुखी आहेत. त्यांची दाद लगोलग लागते. गुन्हे फारसे घडत नाहींत. सरकारी नोकरांस पगार वेळचे वेळीं मिळतो.' जानोजी व माधवराव हे दोघेही कर्ते पुरुष स. १७७२ त दिवंगत झाल्यानें नागपुरकरांशीं नवे डाव खेळण्यास हेस्टिंग्स यास संधि मिळाली. ती कशी त्याचा उल्लेख पुढें येईल.

---

|| जेंकिन्सचा रिपोर्ट १८२६, Wills' Nagpur P. 30.

पूर्व किनाऱ्याप्रमाणें पश्चिम किनाऱ्याबद्दलही इंग्रजांची कारवाई चालूच होती. ता. १८-११-१७६७ रोजीं इंग्रजांनीं आपला वकील टॉमस मॉस्टिन प्रथम पुण्यास पाठविला, त्यास कामाची ताकीद देतांना मुंबईच्या अधिकाऱ्यांनीं कळविलें कीं, 'मराठ्यांची सत्ता वाढत चाललेली पाहून आम्हांस फार दुःख होतें, आणि त्या संबंधानें मद्रास व बंगाल येथील अधिकाऱ्यांस सुद्धां आमच्याच सारखी चिंता लागून राहिली आहे. या त्यांच्या वाढत्या सत्तेस आळा घालण्यासाठीं जें जें म्हणून शक्य असेल, तें सर्व ते व आम्ही करण्यास चुकणार नाहीं.' या वकिलातीची डाळ स. १७६८ त माधवरावपेशव्याच्या रासवटींत शिजूं शकली नाहीं, तरी मुंबईकरांनीं मराठ्यांचा पाडाव करणें आपलें कर्तव्य मानून, त्या निमित्तानें आपला तोच वकील स. १७७२ त पुण्यास ठेवून दिला. या चंचुप्रवेशाला नारायणरावाच्या वधानें मुसलप्रवेशाची संधि मिळाली. पण या सुमारासच युरोपांत दुसऱ्या भानगडी उपस्थित झाल्यामुळें त्या संधीचा फायदा इंग्रजांस मिळूं शकला नाहीं.

हिंदुस्थानच्या इतिहाससंबंधीं राजकीय घडामोडींचा विचार करितांना पाश्चात्यांचा संबंध जेथें जेथें येतो, तेथें त्यांच्या युरोपांतील परिस्थितीचा संदर्भ अवश्य मनांत आणला पाहिजे. अठराव्या शतकाच्या उत्तरार्धांत तर युरोपांतील घडामोडींचा परिणाम हिंदुस्थानच्या राजकारणावर पुष्कळच घडला. सन १७५० च्या पुढें इंग्रज फ्रेंचांची चुरस सुरू झाली ती स. १८१५ त नेपोलियनचा पाडाव झाल्यावर संपली. एवढ्या अवधींत १७५६ पासून १७६३ पर्यंत सप्तवार्षिक युद्ध, स. १७७४ पासून १७८२ पर्यंत अमेरिकन राज्यक्रान्तीचें युद्ध, आणि तदनंतर स. १७८९ पासून १८१५ पावेतों फ्रेंच राज्यक्रान्तीमुळें उद्भवलेलीं युद्धें, यांचा हिंदुस्थानच्या राजकारणाशीं निकट संबंध आलेला आहे. उत्तरपेशवाईचा इतिहास वाचतांना या युरोपीय परिस्थितीचा विचार ध्यानांत आणिला पाहिजे.

इंग्लंडचा सुप्रसिद्ध नाविक योद्धा होरेशिओ नेल्सन हा याच वेळीं म्हणजे स. १७७५ त मुंबईस आला होता ही गोष्ट सामान्यतः कोणासहि ठाऊक नाहीं. एकंदर इंग्रजी राज्याचा बंदोबस्त व हालहवाल स्वतः पाहून, तदनुसार पुढें आपलें धोरण त्यानें ठरविलें असें दिसतें. मुंबईस आला तेव्हां तो अवघा १७ वर्षांचा होता. परंतु त्याच्या बुद्धीचें तेज आरंभापासूनच झळकूं लागलें होतें.

लहानपणापासून सर्व साधकबाधक गोष्टींचा आणि शत्रूंच्या व आपल्या बलाबलाचा मनांत अजमास बांधून त्याप्रमाणें पुढें त्यानें एक एक साहसाचें काम करून दाखविलें. म्हणूनच सन १८०५ सालीं आरमारी युद्धांत फ्रान्सचा पाडाव करून त्यानें आपल्या राज्यास अनुपम विजय संपादन करून दिला, आणि त्यांतच त्यानें आपल्या प्राणांची आहुति दिली. ता. १७ ऑगस्ट सन १७७५ रोजीं त्यानें मुंबईच्या बेटावर दुसऱ्यांदां पाय ठेविला. म्हणजे त्यापूर्वींहि एकदां तो इकडे आलेला होता असें दिसतें. तो लिहितो, ‘ सीशोअर नांवाचें बादशहाचें वीस तोफांचें लढाऊ जहाज इकडे आलें. त्यावर कॅप्टन फार्मरच्या हाताखालीं मी क्वार्टरडेकवर नाविक म्हणून काम करीत असतां बसऱ्यापासून बंगालपर्यंतचा सर्व समुद्रकिनारा मी फिरून पाहिला. ’ हें जहाज प्रथम मुंबईहून अरबस्तानांत मस्कतला जाऊन मग तेथून इराणी आखातांत बुशायरला गेलें. तेथून पुनः मस्कतला जाऊन परत मुंबईस आलें. मुंबईच्या बंदरांत या बादशाही जहाजाला सलामी मिळाली. मस्कतहून मुंबईस येतांना त्यास वादळाचा भयंकर त्रास सहन करावा लागला. कारण पावसाळ्यांत आरबी समुद्र फार खवळलेला असतो. तशांत तापाच्या सांथीनें जहाजावरील बहुतेक लोक अतिशय आजारी झाले. जहाजावर डॉक्टर होता त्याचाहि या सांथीपुढें कांहीं इलाज चालेना. नेल्सन आजारी पडून त्यास हात पाय हालविण्याची देखील शक्ति राहिली नाहीं. परंतु मुंबईस आल्यावर त्याची प्रकृति लगोलग सुधारली, आणि त्यानें तेथचा एकूण एक कोनाकोंपरा तपासून पाहिला. मुंबई आरमाराच्या सुपरिंटेंडेंटची जागा मिळविण्याची नेल्सननें मुंबईस असतां खटपट केली; पण तो वयानें लहान या सबबीवर ती त्यास मिळाली नाहीं. त्या आरमारांत त्याचा भाऊ होता, त्याचा पुढें खून झाला. आपल्या राष्ट्राची महती चहूंकडे वाढावी या उत्कट आस्थेनें इंग्लंडांतील लहान मोठीं कर्तृत्ववान माणसें किती झटत व त्या हेतूच्या सिध्यर्थ इतरांशीं वागण्याचें आपलें धोरण प्रसंगाप्रमाणें कसें आंखीत हें कोणासही कौतुकास्पद वाटेल.

स. १७७४ त इंग्लंडचें अमेरिकन वसाहतींशीं भांडण लागलें. स. १७७६त वसाहतींनीं आपलें स्वातंत्र्य पुकारलें. फ्रेंच राष्ट्राचा पाठिंबा वसाहतींस होता. स. १७७८ च्या मार्चांत म्हणजे मोरोबाचें कारस्थान सिद्धीस जाऊन नानाचा कारभार लंगडा पडला, त्याच वेळीं युरोपांत फ्रान्सनें इंग्लंडविरुद्ध युद्ध पुकारलें.

तदनुसार हिंदुस्थानांतील इंग्रज व फ्रेंच वसाहती यांचा युद्धप्रसंग सुरू झाला. त्यांत फ्रेंचांचा पाडाव करण्यास कलकत्ता, मद्रास व मुंबई येथील इंग्रज झटून उद्योग करूं लागले. हेस्टिंग्सनें तर अमेरिकेंतील वसाहती हातच्या गेल्यानें झालेलें नुकसान हिंदुस्थानांत नवीन प्रदेश जिंकून भरून काढण्याचा निश्चयच केला. इकडे नाना फडणिसाला या युरोपीय परिस्थितीची भरपूर माहिती होती; कारण आलेल्या संधीचा शक्य तितका फायदा मराठ्यांच्या सत्तेस करून देण्याचा त्यानेंही सडकून प्रयत्न केला. पुरंदरचा तह मुंबईकर अंमलांत आणीनात. दादास हवाली करण्याऐवजीं त्यास मुंबईत आश्रय देऊन इंग्रजांनीं मराठ्यांची पोटदुखी कायम ठेविली. हा पेंच त्यांस उलट शह दिल्याशिवाय वारणार नाहीं अशी नानाची खात्री होऊन चुकली. फ्रेंचांचेंहि राजकारण हिंदुस्थानांत होतेंच. त्यांचा एक वकील सेंट ल्यूबीन पश्चिम किनाऱ्यावर मुंबईच्या दक्षिणेस चौल येथें व्यापारी माल विकण्यासाठीं आला तेव्हां, त्यानें चौलच्या बंदरांत उतरण्याची परवानगी पुण्यास नानाकडे मागितली; आणि 'आपण फ्रान्सच्या बादशहाकडून तुमच्याकडे वकील म्हणून आलों आहों, इंग्रजांचा वकील तुमच्याकडे असतो, तसाच मी तुमच्याकडे पुण्यास येतों, व्यापारानिमित्त तुमच्याशीं बोलणें करावयाचें आहे,' असें त्यानें नानास कळविलें. इंग्रजांस दबकावण्याची चालून आलेली ही संधि नानानें लगोलग साधली. चौल बंदरांत उतरण्याची परवानगी नानानें सेंट ल्यूबिन यास पाठवून वाटेनें त्याची बरदास्त ठेवून त्यास गौरवानें पुण्यास आणिलें. पुरंदरावर त्याची बालपेशव्यानें भेट घेतली. त्या भेटींत सेंट ल्यूबिननें फ्रान्समधून बरोबर आणिलेलें एक उत्कृष्ट रंगांत चित्र दरबारांत दाखविलें. शनिवारवाड्यांत नारायणरावाचा वध झाला त्याचा हृदयभेदक देखावा या चित्रांत काढिलेला असून, तें पाहिल्यावर सर्वांच्या डोळ्यांतून अश्रुधारा वाहल्या. वधाचे सर्व तपशील नानानेंच बहुधा पांदिचरीमार्फत फ्रान्सांत पाठविले असावे. ऐ. टि. भाग १ यांत या वधाचें एक चित्र पारसनीस यांनीं प्रसिद्ध केलें आहे तें हेंच कीं काय न कळे. ( मॅक्डोनल्ड कृत नाना फ. च. ).

ता. १५-३-१७७७ रोजीं सेंट ल्यूबीन चौलास उतरला आणि ता. १ मे रोजीं पुण्यास दाखल झाला. पुण्यास त्याची नानानें एवढी प्रतिष्ठा वाढविली, कीं त्यामुळें मॉस्टिनास अत्यंत दुःख झालें. त्यानें त्याबद्दल विशेष तिखटमीठ

लावून मुंबईस व कलकत्त्यास तक्रार केली; त्यावरून फ्रेंचांनीं आपल्या हातचा डाव उचलला, आतां फ्रेंचांच्या मदतीनें नाना इंग्रजांस हिंदुस्थानांतून साफ उखडणार, असा बोभाटा इंग्रजांनीं सुरू केला. वास्तविक हा ल्यूबिन फ्रेंच बादशहाकडून राजरोस आलेला नव्हता ही गोष्ट इंग्रजांस व नानास माहीत होती. परंतु दोघांनींही आपापल्यापरी चालू कामांत त्याचा उपयोग करून घेतला. फ्रेंच वकील आणल्याचें निमित्त पुढें करून पुरंदरचा तह मोडून मराठ्यांशीं पुनः युद्ध चालू करावें, असे हुकूम हेस्टिंग्सनें रागारागानें ता.२३-३-१७७८रोजीं मुंबईकरांस पाठविले. या बाबतींत हेस्टिंग्सची कौन्सिलांत खूपच भवति न भवति झाली. महादजीनेंही नानास असा सल्ला दिला कीं फ्रेंच वकील पुण्यांतून काढून द्यावा. पुढें मोरोबाचे हातीं कारभार जाऊन नाना नरम पडला तेव्हां त्यानें पडतें घेऊन सेंट ल्यूबिन यास रजा दिली. सुमारें एक वर्ष हा ल्यूबिन पुण्यास राहून ता.१-७-१७७८ रोजीं निघून गेला. यावरून युरोपीय राजकारणाच्या भोवऱ्यांत या वेळेपासून हिंदुस्थान कसें सांपडूं लागलें तें दिसून येतें. स. १७७९ पासून दोन तीन वर्षे फ्रेंच आरमाराची इंग्रजांवर सरशी होऊन, इंग्रज कसे नरम झाले त्याचें वर्णन लायल, व्हिन्सेंट स्मिथ वगैरेंनीं केलेलें पाहण्यालायक आहे. यामुळेंच पुढें मराठ्यांशीं वाटेल त्या तऱ्हेनें तह करून युद्ध मिटवा, असे सरकारचे हुकूम इंग्लंडांतून हेस्टिंग्सला आले, म्हणूनच सालबाईचा तह घडून आला. हेस्टिंग्स हा आगलाव्या राष्ट्रावर काय आपत्ती आणील कोणास ठाऊक, अशी त्याजबद्दल इंग्रज राष्ट्राची समजूत झाली होती. तो इंग्लंडास परत गेल्यावर तेथें त्याजवर गुन्हेगारी ठेवून जी सात वर्षे पार्लमेंटपुढें चौकशी चालली, ती त्याच्यासंबंधानें झालेल्या राष्ट्रमताचा परिणाम म्हटल्यास चालेल. तूर्त नानानें आपला शह साधून मराठ्यांची इभ्रत शक्य तितकी कायम राखिली. मात्र हा विजय क्षणिक होता. पुनः दुसरा जहांबाज इंग्रज लार्ड वेल्स्ली अधिकारावर येऊन नेपोलियनच्या निमित्तानें त्यानें हिंदुस्थानास युरोपीय राजकारणांत पूर्णपणें गुंतविलें, तें अद्यापपर्यंत त्यांतच जास्त जास्त गोते खात आहे. पेशव्यांच्या रोजनिशींत वरील फ्रेंच वकिलाचे कांहीं उल्लेख लक्षांत ठेवण्याजोगे आहेत. 'फरासीकडील मातबर माणूस हुजूर येत आहे त्यास रेवदंड्याचे बंदरांतून भाड्याचे बैल व बिगारी देऊन पुण्यास रवाना करणें. भाड्याचा

ऐवज हिशेबीं खर्च लिहिणें, असा ता. २२-३-७७ चा हुकूम स. मा. रो.५४४ वर आहे. त्यास जकात माफ करण्यांत येऊन परत जाते वेळींही कल्याणावरून दमणपावेतों भाड्याचे बैल वगैरे सरकारी खर्चानें देण्यांत आले.(ता.८-८-१७७८ स. मा. रो. ५४७.) या वकिलास आणण्याकरितां अंबारीचा हत्ती, स्वार, नौबत, निशाण वगैरे स्वारीचा लवाजमा बोरघाटाच्या पायथ्यापर्यंत पुणें दरबारानें पाठविला. भाड्याचा खर्च सरकारांतून देवविला; अंबारींत बसून तो थाटानें दरबारास आला. मुख्य कारभाऱ्यांनीं त्यास पुढें सामोरे जाऊन दरबारांत आपणाजवळ बसविलें. इंग्रज वकील मॉस्टिन दरबारास जाई, तेव्हां त्याचा मानमरातब कांहींच न ठेवतां, त्यास कोणी तरी तिसऱ्या प्रतीचा मुत्सद्दी सामोरा जाऊन दरबारांत दूर कोठें कोपऱ्यांत बसवीत, आणि घटकाभरानें बोळवण करून परत पाठवीत. हा पंक्तिप्रपंच मॉस्टिनच्या अंतःकरणास विशेष झोंबला, आणि त्यानें नानाबद्दल भयंकर कागाळी आपल्या वरिष्ठांकडे केली. त्यामुळें नानास खाऊं कीं गिळूं असें कांहीं काळ सर्व इंग्रजांस होऊन गेलें.

**२. मोरोबादादाच्या नाराजीचें कारण.**—पुरंदरच्या तहानें इंग्रजांबरोबरचें युद्ध मिटलें तर नाहींच, पण त्यांत ठरल्याच्या उलट त्यांनीं दादास आश्रय दिला; त्याचा सूड म्हणून पुणें दरबारानें फ्रेंच वकील पुण्यास आणिला; यामुळें उभय पक्ष एकमेकांविरुद्ध उत्तरोत्तर चिडत व गेले आणि प्रत्यक्ष युद्धास उभें राहण्यापूर्वी नाना तऱ्हेच्या कारस्थानांनीं एकमेकांस त्रास देऊं लागले. त्यामुळें या वर्ष सहा महिन्यांत म्हणजे विशेषतः स. १७७८ त इतक्या कांहीं भानगडी उपस्थित झाल्या कीं त्यांची गुंतागुंत सोडवून प्रकरणांची संगति लावण्यास जड जातें. तसेंच या बाबतींतील कागदपत्रही बेसुमार मिळत असल्यानें तें काम अधिकच अवघड झालें आहे. नानानें इंग्रजांचे नाकांत काड्या घालण्यासाठीं फ्रेंच वकील पुण्यास ठेविला, त्यास तोड म्हणून मॉस्टिननें पुण्यास बसून मोरोबादादाचें कारस्थान उभें केलें. त्यांतील सगळे मुद्दे संगतवार जोडूं लागल्यास त्यांचा स्वतंत्र ग्रंथ होईल. 'अधिकारयोग' या पुस्तकांत कै० खऱ्यांनीं त्याचें विवेचन स्वतंत्रच केलें आहे. येथें फक्त त्यांतील मुख्य मुद्दे एकंदर विषयाच्या संगतीपुरते घेतां येतील. मराठ्यांचा आपमतलबी स्वभाव, तडजोडीस न येतां उलट विघ्नें उपस्थित करण्याची त्यांची सवय व

एकंदर राजकीय उद्योगाची बाचाबाच वगैरे अनेक राष्ट्रीय दोष या एका मोरोबाच्या प्रकरणांत उत्कट दिसून येतात.

मोरोबादादा व नाना फडणीस हे चुलतबंधु. बाळाजी विश्वनाथाचे वेळेपासून या भानूंकडे फडणिसी म्हणजे हल्लींच्या हिशेबी खात्याचें काम होतें. पेशव्यांशीं यांचा पिढीजाद घरोबा व आप्तसंबंध असून, या घरोब्यामुळेंच त्यांस नारायणरावाचे पश्चात् एवढें




महत्त्व प्राप्त झालें. नाना वयानें मोरोबाहून किंचित् वडील होता. तसेंच बुद्धिमत्ता, हुशारी, टापटीप, दूरदृष्टि, दृढनिश्चय व कामाचा उरक या सर्वांत तो मोरोबाहून पुष्कळच सरस होता; पण मोरोबास स्वतःच्या कर्तबगारीबद्दल मोठी घमेंड असे. राक्षसभुवनाच्या लढाईपासून माधवराव पेशव्यानें राज्यकारभार आपले हातीं घेतला. तेव्हांपासून नाना व मोरोबा यांच्या अंगांतील गुणावगुणांची पारख केली, आणि टापटिपीनें दूरवर नजर पोंचवून चोख काम करणाऱ्या नानास पुण्यास फडावर ठेविलें व मोरोबास आपल्याबरोबर स्वारींत बाळगून त्यास स्वतंत्र काम न देतां भलते फांटे फोडण्याच्या त्याच्या प्रवृत्तीस आपल्या देखरेखीची वेसण घातली. माधवरावाचा गूढ हेतु मोरोबाच्या ध्यानांत न आल्यानें आपण नानापेक्षां शहाणे म्हणून सल्लामसलतीसाठीं आपल्यास पेशव्यानें जवळ केलें अशी त्याची. भलती समज होऊन, त्याच्या मूळच्या घमेंडखोर मनोवृत्तींत विशेषच भर पडली. माधवरावाच्याबरोबर नेहमीं असल्यामुळें व भानु घराण्यांवरील पेशव्यांच्या लोभामुळें मोरोबास नसतें महत्त्व आलें होतें. पण आरंभीं दादाचे चाळे बंद करण्याच्या कामीं नानाचा सल्ला पेशव्यास जास्त उपयोगी पडे. माधवरावानें अखेरच्या दुखण्यांत जी पुढची व्यवस्था केली त्यांत राज्याचा कारभार त्यानें बापू व नाना यांजवर सोंपविला. त्या वेळेस मोरोबाचा भ्रम थोडासा दूर झाला, पण तेव्हांपासून नानाबद्दल त्यास हेवा वाटूं लागला. पुढें पुढें तर दोघांत उघड वैषम्य आलें. तथापि नारायणरावाचे वधानंतर दोन

पक्षांत युद्ध सुरू होईपर्यंत मोरोबाच्या हालचालींस स्वतंत्र अवकाश मिळाला नाहीं. बारभाईंचे घटनेंत मोरोबाचा अंतर्भाव होता, पण हळू हळू त्यांत नाना व बापू यांसच पुढारपण मिळून मोरोबा मागें पडला. त्या दोघांनीं जी तडफ व धमक दाखवून दादाचे विरुद्ध कारस्थान रचिलें, ती मोरोबाचे ठिकाणीं नव्हती. निश्चयानें एक पक्ष स्वीकारून त्यालाच चिकटून तो राहिला नाहीं. नानाच्या बोलण्यावर सर्वांचा विश्वास बसे; मोरोबावर कोणाचाच विश्वास नव्हता.

मुंबईच्या व कलकत्त्याच्या दप्तरांतील पुष्कळसा इंग्रजी पत्रव्यवहार या वेळच्या इतिहासास अत्यंत उपयोगाचा आहे. मात्र तेथें बसून उद्योग करणारे अभ्यासक पाहिजेत. मुंबईच्या दप्तरांत मॉस्टिनची रोजनिशी आहे, त्यावरून नारायणरावाचे मृत्युनंतर झालेल्या घडामोडी मॉस्टिननें मुंबईस लिहून कळविलेल्या दिसून येतात. उदाहरणार्थ, ता. ३०-८-१७७३ रोजीं नारायणरावाचा वध झाल्यानंतर ता. ५-९-१७७३ ची मॉस्टिनची नोंद पहा. 'मी आज राघोबास भेटलों. थोडें बोलणें होऊन परत आलों. आमची मदत त्यांस पाहिजे कीं काय, यासंबंधानें राघोबानें बिलकूल थांग मला लागूं दिला नाहीं, म्हणून माझी अत्यंत हिरमोड झाली. कारण त्यानें बोलावणें पाठविल्यावरूनच मी भेटीस गेलों होतों. तेव्हां माझी अशी अटकळ होती कीं प्रस्तुतच्या परिस्थितींत आमच्या मदतीसंबंधानें तो कांहीं तरी प्रश्न मला टाकील. आणि त्यांत मी कंपनीचा थोडाबहुत फायदा करूं शकेन. परंतु त्या बेट्यानें बिलकूल सुगावा लागूं दिला नाहीं.' या रोजनिशीवरून दुसरी एक गोष्ट दिसते कीं मॉस्टिननें मोरोबा फडणिसास सर्वथा आपल्या तंत्रांत घेतलें होतें. हरएक बाबतींत तो मोरोबाचा सल्ला घेई; आणि मोरोबाही बारभाईंचे बेत मॉस्टिनास निःशंकपणें कळवून इंग्रजांचा फायदा करून देई. याचा संपूर्ण सुगावा नाना फडणिसास लागलेला होता, म्हणूनच त्यास इतकें कडक शासन झालें. राजद्रोही इसमांवर बिलकूल दयामाया करायची नाहीं असा नानाचा कृतसंकल्प होता, तो राज्यहिताच्या दृष्टीनें गैर म्हणतां येत नाहीं.

उघडपणें दादास तरी सामील व्हावें किंवा अंतर्यामापासून बारभाईंना साह्य करावें तें न करितां, उलट नाराज व कष्टी होऊन दरएक कामांत मोरोबाची धरसोडच चालू राहिली. हा केव्हां कोणत्या पक्षास मिळेल किंवा काय उपद्-

व्याप करील याचा इतरांस भरंवसा नसल्यामुळें त्याला सर्वच लोक शक्य तितके दूर ठेवीत. नानाच्या बरोबरीनें आपण कारभारांत असावेंसें त्यास वाटे, पण लायकी दिसल्याशिवाय काम तरी त्यास कोण देणार ! पुरंदरचा तह होई-पर्यंत त्यानें कसाबसा दम धरला, पण त्याचें बस्तान बसेना. दादानें नाहीं नाहीं ते फंद चालू केले, त्यांत मोरोबा गुरफटला गेला. चिंतो विठ्ठल, किंवा बाजीराव बर्वे हे उघडपणें दादास सामील होते, त्याप्रमाणें मोरोबा स्पष्टपणें कोणत्याच पक्षास मिळाला नाहीं. बारभाईकडील सर्व बेत त्यास समजत असल्यामुळें तो दादाकडील फंदांत चोरटेपणानें पडूं लागला. होतां होतां त्यानें नानास कैद करून दादास पेशवाईवर आणण्याचें भयंकर कारस्थान रचिलें, तें सिद्धीस न जातां नाना व महादजी या दोघांनीं त्यास पकडून कैदेंत घातलें, त्यामुळें पुढील पंचवीस वर्षें त्याचें आयुष्य कैदेंत कुजून फुकट गेलें. बजाबा पुरंदरेही त्याच्याच जोडीस कैदेंत गेला.

दादास आणण्यासंबंधानें मोरोबा-मॉस्टिनचें संगनमत होऊन स. १७७७च्या पावसाळ्यांत मॉस्टिन मुंबईस गेला. मागें पुण्यास त्याचें काम कांहीं दिवस लुई पाहत होता. मुंबईंत ता. १०-१२ रोजीं कौन्सिलची बैठक होऊन ठरलें कीं बापू, मोरोबा, बजाबा व तुकोजी होळकर हे सर्व आपण होऊन स्वदस्तुरच्या लेखानें इंग्रजांची मदत मागतील तरच आपण दादाबरोबर आपली फौज देऊन त्यास पुण्यास न्यावें. मॉस्टिन सहा महिने मुंबईस बसला, पण त्यानें कोणतीच तड लावली नाहीं. ता. ३-१-१७७८ रोजीं त्यास कौन्सिलनें हुकूम केला कीं तुम्हीं पुण्यास जाऊन वकिलातीवर हजर व्हावें. फ्रेंच वकिलाप्रमाणेंच तुमचाही मानमरातब पुणें दरबार न ठेवील तर पुरंदरचा तह मोडला असें समजून आम्ही तुम्हांस लगेच परत बोलावूं, असें तुम्ही निक्षून दरबारास कळवावें. त्याप्रमाणें मॉस्टिन ता. १०-१-७८ रोजीं पुण्यास पोंचला. त्यानें नानाची भेट घेतली, पण त्याच्या तक्रारींचा निकाल लागला नाहीं. त्यानें मोरोबाचीही भेट घेतली. पुढें २६ मार्च रोजीं जेव्हां मोरोबाचे हातीं पेशवाईचा कारभार आला तेव्हां मुंबईकरांची थोडे दिवस दादास पुण्यास आणण्यासंबंधीं पुष्कळच चलबिचल झाली. ( इंडिया ऑफिस पेपर्स ).

इतर उलाढालींबरोबर पुण्यांत कारभाऱ्यांस दगा करण्याचे दादाचे फितूर अव्याहत चालू होते. विष्णु नरहर व खंडेराव निंबाजी यांनीं नानाबापूंस

दगा करावयाची मसलत केली, ती उघडकीस येऊन, त्यांस बिड्या घालून सिंहगड व रुद्रमाळ या किल्ल्यांवर रवाना केलें व घरेंदारें जप्त केलीं, ( एप्रिल १७७६ ). याच वेळीं मोरोबाबद्दल कारभाऱ्यांचे मनांत संशय आला. रत्नागिरीस तोतया मोकळा झाला त्यांतही त्याचें अंग असावें. 'अतःपर राजकारणाचे प्रकार आढळल्यास चित्तास येईल तें करूं,' अशी ताकीद मोरोबा व बजाबा पुरंदरे वगैरेंस देण्यांत आली. सर्वांस धास्ती बसली. मोरोबानें शिवनेर किल्ला आपले ताब्यांत देऊन आपणास कारभारांत घ्यावें अशी मागणी केली. सहा महिने वर्तणूक पाहून मग विचार करूं, असा जबाब त्यास कारभाऱ्यांनीं दिला. ( खरे ले. १८३७, १८३९, १८४३ ).

रघुनाथरावा इतका उपद्व्यापी पुरुष मराठ्यांच्या इतिहासांत दुसरा कोणी झाला नाहीं. कसेही प्रसंग किंवा अडचणी आल्या तरी नाना प्रकारच्या हिकमतींनीं त्यांस तोंड देऊन प्रतिपक्षास गोत्यांत आणण्याची दादाची करामत एकट्या शिवाजीच्या अंगीं आढळते. ही करामत सत्कारणीं लागती तर राज्याचें कोट कल्याण झालें असतें. त्याचे साथीदार सर्व हिंदुस्थानभर खटपटी करीत होते. जेथें जेथें बारभाईचे उद्योग चालू होते, त्या सर्व ठिकाणीं त्यानें नाहीं नाहीं तीं विघ्नें आणिलीं. बारभाईच्या विरोधकांस चिथवून दिलें. 'दादांस आपल्याजवळ बिलकूल आश्रय देऊं नये, निरोप द्यावा,' अशीं पत्रें मुंबईचे अधिकाऱ्यांस कलकत्त्याहून व इंग्लंडाहून आलीं, तेव्हां जलमार्गें हैदरखानाकडे जावें किंवा मालवणास जावें. करवीरावर महादजी शिंदे होते, तेव्हां तिकडे जाणें शक्य नाहीं. मग हैदरखानाशिवाय दुसरी जागा राहिली नाहीं. वसईतही फितवा केला होता, पण विसाजी केशवांनीं लगोलग बंदोबस्त केला. पुण्यास एक वैदिक ब्राह्मण काल मालवणाहून आला, त्यानें सांगितलें कीं इंग्रजांचा वकील व कारकून मालवणास आले आहेत. मुंबईहून श्रीमंत आठचार दिवसांत मालवणास येणार, नंतर तिकडून करवीरकरांस जाऊन मिळणार, मंडप घातले आहेत, असें वर्तमान स. १७७७ च्या डिसेंबरांत पुण्यास आलें. मालवण बंदर कोल्हापुरचें असून पटवर्धन व पेशवे यांजबरोबर कोल्हापुर छत्रपतींची लढाई चालू होती, तीस दादा कोल्हापुरास आल्यानें विशेष रंग चढला असता. कर्नाटकांत पटवर्धन व हरिपंत यांच्या फौजा हैदरअलीशीं लढत होत्या, त्यांत फितूर करून, त्यांचा अगदीं संहार करण्याचा योग त्यानें

आणिला होता. दादाचा दुसरा साथीदार बाजीराव बर्वे हैदराचे नोकरींत राहून हरतऱ्हेनें त्याची बाजू राखीत होता. स. १७७७ च्या आरंभीं सावशीचे लढाईत पटवर्धनांचा पाडाव होऊन बरीच मंडळी कैद झाली, त्यांचा बाजी-रावानें योग्य परामर्ष घेतला आणि त्या निमित्तानें परशुरामभाऊशीं पत्रव्यव-हार सुरू करून समेटाचेंही बोलणें चालविलें. ता. २२-२-७७ च्या पत्रांत तो लिहितो, 'श्री. दादासा० स्वामी धणी आहेत. त्यांचें साहित्य करून त्यांस पदावर बसवून त्यांची सेवा करावी हें उत्तम. अतःपर विरुद्ध वाढवूं नये. पुरतेपणें मनन करून उत्तर पाठवावें.' दादास पेशवेपद पाहिजे होतें, नेमणूक घेऊन स्वस्थ बसण्यास तो कबूल नव्हता. बाजीराव बर्व्यानें पांड्या नांवाचा एक आपला विश्वासु इसम परशुरामभाऊकडे यासंबंधीं बोलणें करण्यास पाठ-विला आणि लिहिलें, 'घरांतील विरुद्धानें राज्य विध्वंस झालें, यास्तव आमचे विचारें आहे जे आपण श्रीमंत राज्यावर येत अशी योजना करावी: श्रीमंतां-कडील संशय निवृत्त आपण करूं. तुम्हीं ही गोष्ट दृढतर चित्तावर धरल्यानें बंदोबस्त होईल. पुर्ते मनन करून उत्तर पाठवावें. मजकूर प्रगटांत येतां नये. राज्याचा नाश होतो, पाहवत नाहीं, आपण सुज्ञ, दीर्घदृष्टि आहेत, म्हणून लिहिलें आहे. विचारास येईल तसें उत्तर पाठवावें. वर्तमान पांडबा सांगतां कळेल.' ता. १३-२-१७७७ ( खरे २१९६, २००५-६, २०२४ ).

शिंदे होळकरांस वश करण्याचे दादाचे प्रयत्न तर सारखे चालू होते, आणि त्यांच्या समजुती काढतांना कारभारी रडकुंडीस आले. पुढें नाराज झालेल्या मोरोबास हाताशीं घेऊन खुद्द पुण्यांतच दादानें प्रचंड कारस्थान उभारलें. स. १७७७ च्या जून महिन्यांत पुण्यांत गारद्यांनीं दंगा केला; त्यांत नानांस ठार मारण्याचा त्यांचा बेत होता, पण 'वर्तमान आगाऊ कळोन सावध झाले. ईश्वर रक्षणार, तेव्हां मनुष्ययत्न चालत नाहीं. कोणीं करविलें, काय वर्तमान याचें ठिकाण लागलें नाहीं; या मंत्रांत दामोदर मंडळीच फार करून आहेत. नांवें लिहितां नयेत व पुर्ता पत्ता ही पाहिजे.' ( ९ जून ).दामोदर मंडळी कोण? दाम म्हणजे पैसा, यावरून पैसेवाली. अशा अनेक उलाढाली फुकट गेल्याच. पुढें मोरोबाचें बाहुलें दादास आयतें मिळालें. त्याच्यामार्फत चिंतो विठ्ठल, बजाबा पुरंदरे व शेवटीं सखाराम बापू यांस व तुकोजी होळकरास सामील करून घ्यावयाचें आणि मुंबईहून दादास आणून पेशवाईवर स्थापावयाचें असें कारस्थान उभें झालें.

स. १७७८ च्या उन्हाळ्यांत हरिपंत व पटवर्धन मंडळी कर्नाटकांत व महादजी कोल्हापुरास होते ही संधि मोरोबास सांपडली. तिचा त्यानें उपयोग करून घेतला. नानानें आपल्या आयुष्यांतील कठिण प्रसंगांत या कारस्थानाची गणना केली आहे. येईल तें काम करून दाखवावें, काम हीच आपली उत्कृष्ट शिफारस हें तत्त्व मोरोबानें ध्यानांत ठेविलें नाहीं. नानाच्या बरोबरीनें आपला बडेजाव पाहिजे ही त्याची महत्त्वाकांक्षा होती. बारभाईच्या कारभारांत आपणास कोणी विचारीत नाहीं, हा त्याच्या मनांतील मोठा दंश. तीन वर्षे सर्व कामें आपल्या-शिवाय उलगडत चाललेलीं पाहून मनाच्या असंतुष्ट स्थितींत तो दादाच्या भुलथापांस बळी पडला. त्याची समजूत काढण्याचे कारभाऱ्यांचे प्रयत्न चालूच होते. आपणा दोघांबरोबर हा तिसरा कारभारी असावा, नानाकडे मुलकी कारभार, मोरोबाकडे फौजेची आणि दोघांवरही बापूची देखरेख, अशी योजना ठरत होती. पण सखारामबापूस ती पसंत पडली नाहीं. अलीकडे पुष्कळ कामें बापूस विचारल्याशिवायच नाना उलगडीत होता; त्यामुळें बापूहि थोडासा नाराज होता. नाना व मोरोबा एक होऊन आपणांस उडवून देतील ही त्यास भीति असून सुरळित कारभारांत कांहीं तरी आपला शह ठेवून द्यावयाचा हा त्याचा स्वभाव होता. त्यानेंच मोरोबास प्रथम चिथावून दिलें, त्याबरोबर मोरोबानें भलत्याच मागण्या सुरू केल्या.

स. १७७८ च्या आरंभीं याच वाटाघाटीसाठीं नाना पुण्याहून पुरंदरास गेला. सासवडाहून बापूही तेथें आला. हरिपंताचे मदतीस कर्नाटकांत तुकोजी होळकर जाईना तेव्हां त्यांनीं आपाबळवंत व बाजीपंत अंणा जोशी (वसईकर) यांस सात आठ हजार फौज देऊन तिकडे रवाना केलें. इतक्या अवधींत मोरोबाचें मान फार चढलें. त्यास तुकोजीचा पाठिंबा मिळाला. चिंतो विठ्ठलानें दादास पुण्यास आणण्याची मोरोबास व तुकोजीस भर दिली. नारो गणेश शौचे हा तुकोजीचा कारभारी व केवळ आत्मलिंग. त्यानें तुकोजीस वाटेल तशी भर दिली. जेवढे म्हणून कारभाऱ्यांवर रुष्ट होते तेवढे सगळे या वेळे-पुरते एक झाले. बजाबा पुरंदरे त्यांस मिळाला. मोरोबा व मॉस्टिन यांचें संगनमत झालें. इंग्रजांची मदत घेऊन लगोलग दादानें पुण्यावर यावें. बार-भाईच्या फौजा बाहेर पांगलेल्या असल्यामुळें मोरोबास ही संधि योग्य वाटून त्यानें नानास निक्षून कळविलें, कीं 'सर्व कारभार मी एकटा करणार.'

मोरोबाची ही चढाई पाहून, होळकराचें व त्याचें कांहीं कारस्थान असून त्यांस बापूचेंही अंग थोडेंबहुत आहे असा नानास सुगावा लागला. बापूच्या अंतः-करणाचा ठाव घेण्याचा नानानें प्रयत्न केला, पण बापूनें दाद लागूं दिली नाहीं. नुसता नानाचा पगडा कमी करण्यास बापूचा पाठिंबा मोरोबास होता. परंतु दादाची स्थापना पुण्यास झाल्यावर आपली काय अवस्था तो करील याचीही जाणीव बापूस पुरेपुर होती. प्रत्येक इसम केवळ आपल्यापुरतें पाहत होता. पुरंदरच्या वाटाघाटींत मोरोबाची समजूत न होतां, नाना शिवरात्री-साठीं मेणवलीस व बापू सासवडास गेला. मागें सर्व रान मोरोबास मोकळें सांपडलें. यापूर्वीच नानानें महादजीशीं कांहीं विशिष्ट करार करून त्यास वश करून घेतलें होतें. ता. १५-१-१७७८चा त्यांचा एक करार पे. द. पु. २०० वर नमूद आहे. मोरोबा ज्याप्रमाणें नानाच्या बरोबरीनें स्वतःचा मान राखण्याचा प्रयत्न करी, तसाच तुकोजी होळकर प्रत्येक गोष्टींत महादजीची बरोबरी करण्याची धडपड करी. आपण दोघे सरदार बरोबरीचे, हें तत्त्व होळकराचे मनांत कायम होतें. मग कर्तृत्वांत बरोबरी नसली तरी चिंता नव्हती. नाना व महादजी एकमतानें वागूं लागले, ही गोष्ट होळकरास झोंबली. बापूसही ती जाचक वाटली, कारण ते दोघे कारभार उलगडूं लागले, म्हणजे आपली जरूर त्यांस राहणार नाहीं अशी त्याची खात्री होती.

**३. मोरोबास अधिकारप्राप्ति, नानाचा पाडाव** ( मार्च २६–जुलई ११, १७७८ ).—सिंद्याचे बळावर नाना आपणास वाटेल तेव्हां उडवून देईल अशी बापूस भीति होती. ' बहिःसर्वाकार ' या भवभूतीच्या उक्तीस अनुसरून त्याचें वर्तन होतें. ' स्वतः अलिप्त राहिल्यासारखें करून दुसऱ्यास उत्तेजन देऊन त्याजकडून परस्पर बखेडे न कारस्थानें करावयाचीं, वचनें आणाशपथांची रगड करावयाची, टांकानें सहसा गुंतावयाचें नाहीं, मसलत अंगावर आल्यास, बचावाची योजना अगोदरच करून ठेवायाची, ही बापूची नेहमींची पद्धत.' सारांश, तूर्त मोरोबास हाताशीं घेऊन नानाचा पाडाव करण्याचा डाव त्यानें आरंभिला. जेजुरीस जाऊन मोरोबानें तुकोजीस वश करून घेतलें; आणि घाट रचला तो असा कीं, पेशवाईचा मालक सवाईमाधवरावच समजावा, मात्र तो वयांत येईपर्यंत दादांनीं सर्व कारभार वडीलकीच्या नात्यानें करावा. कार-भारी सखारामबापूच राहवा. दुय्यम कारभारी मोरोबा. नानाचा त्यांत कांहीं

संबंध असूं नये. बापूस हें कारस्थान टाऊक होतें. तरी त्यानें होस हो म्हणून वेळ मारून नेली. नाना मेणवलीस असतां मोरोबा व बापू गुप्तपणें भेटले. दोघांचे करार व शपथा झाल्या. फौज आणण्याचें काम तुकोजीनें अंगावर घेतलें. त्याबद्दल मोरोबानें त्यास शिंद्याप्रमाणें जहागीर व किल्ला देण्याचें वचन दिलें; आणि पांच लक्ष रुपये रोख खर्चास दिले नरसिंगराव धायगुडे यास वश करून त्याच्यामार्फत हरिपंताचे फौजेंत फितूर उत्पन्न केला. दादासाहेबानें मॉस्टिनचे मार्फत मुंबईकरांस छत्तीस लाख रुपये देऊं केले. सखारामबापूनें खोटीच हूल उठविली कीं, आपण कर्नाटकांत जाणार. तयारी केली पण अपशकुनाचें निमित्त करून गेला मात्र नाहीं. ( खरे. अधि. यो. ६८ ).

पुढें फाल्गुनांत नाना पुण्यास आला. इतक्यांत गुप्तपणें नोकरीस ठेवलेले गारदी व पठाण दस्तकाशिवाय औरंगाबादेहून पुण्याकडे येत असल्याची बातमी नानास कळली. त्यानें पुरंदराहून फौज पाठवून त्यांस घोडनदीवर लुटलें, गारदी मारले, घोडे पाडाव झाले. तपासांत मोरोबाचे लोक असा छडा लागला. त्याबरोबर बापूनें मोरोबास इशारा पाठविला कीं, 'मंत्र फुटला, त्वरा करावी.' तेव्हां मुलें माणसें बारामतीस ठेवून मोरोबा, पांडुरंगराव बारामतीकर दादाचा जांवई यास बरोबर घेऊन वाफगांवास होळकराकडे गेला, ( २२-३-१७७८ ). चिंतो विठ्ठल, बजाबा पुरंदरे, गोपाळ नाईक तांबवेकर, सदाशिव रामचंद्र वगैरे मंडळी लगोलग तेथें जमली. सर्व मिळून सोळा हजार फौजेनिशीं पुण्यावर चालून आले. नाना ताबडतोब पुरंदरास गेला आणि पांच हजार फौज जमवून तेथें लढाईच्या बंदोबस्तानें राहिला. आपा बळवंत व बाजीपंत अंणा कर्नाटकांत निघाले होते. त्यांस त्यानें वाटेत थांबविलें. २६ मार्च रोजीं मोरोबानें पुणें ताब्यांत घेतलें; नानाच्या चौक्या उठवून आपल्या बसविल्या; पार्वतीबाईकडून दिवाणगिरीचीं वस्त्रें, शिक्केकट्यार, जरीपटका व नौबत घेतली; आणि पुरंदरावर चाल केली. इकडे हे प्रकार चालू असतां बापू सासवडाहून पुरंदरास येऊन नानास भेटला; आणि म्हणाला, या अडचणींत कसं करायचें! आपणच जाऊन मोरोबास भेटावें हें चांगलें. नानानें ती गोष्ट कबूल केली. नंतर बापू, कृष्णराव बळवंत व माधवराव सदाशिव जाधव *

* माधवराव जाधव नानाचा वकील मॉस्टिनजवळ. पहा कैफीयती व गार्डी पृ. ५९–६३ व फॉरेस्ट.

यांसह जाऊन मोरोबास भेटला आणि म्हणाला, ' पुरंदरचा बालपेशव्याचा बंदोबस्त नानाकडे ठेवाल, तर नाना कारभार सोडण्यास कबूल आहेत. तूर्त एवढें कबूल करा. पुरंदर व पेशवे हातीं घेऊं म्हणाल तर ती गोष्ट नाना कधीं होऊं देणार नाहीं. जोंपर्यंत पेशवे व छत्रपति त्यांचे हातीं आहेत, तोंपर्यंत तुमचें कांहीं चालणार नाहीं. फौज, पैका, सरदार, निजाम, भोसले, बहुधा नानाचे लगामीं आहेत. दादास व इंग्रजांस एकदमच आणाल तर रणकंदनें माजतील. तेव्हां असा प्रकार होऊं न देतां हलके हलके सर्व करावें. अगदीं निर्वाणीचा प्रसंग आल्याशिवाय इंग्रजांस आणूं नये, मोरोबास हें म्हणणें पटलें आणि उभयतांनीं चार कलमांची याद ठरविली. १ बापूकडे वडीलकीचा अधिकार राहवा; २ नानांस कारभारांत घ्यावें; ३ सर्वांचे सरंजाम यथापूर्व चालवावे; ४ दादांस तूर्त आणूं नये, पुढें आणलें तर आणावें. ही याद घेऊन मोरोबा व बापू पुरंदरावर नानाचे भेटीस गेले. मागाहून चिंतो विठ्ठल व बजाबा पुरंदरेही गेले. ता. ३-४-१७७८ रोजीं पाचांनीं श्रीमंतांस भेटून नजरा केल्या. नंतर श्रीमंतांनीं किल्ल्याखालीं येऊन होळकराची भेट उभ्याउभ्या घेतली. याप्रमाणें बापूनें सामदामानें सर्वांची समजूत केली. ( खरे २२६६ व ७५ ).

हा एकंदर प्रकार त्या वेळच्या शब्दांत खालीलप्रमाणें वर्णिलेला आहे. ' मोरोबांनीं नाना प्रकारचीं राजकारणें केलीं, पण साधलें नाहीं. तेव्हां करणारांनीं होळकरांकडे अनुकूल करून दिलें. पांच लाख कर्ज म्हणून मोरोबांनीं दिल्हे. पांडुरंगराव बारामतीकर यांस अनुकूल करून घेऊन मुलें माणसें त्यांजकडे ठेवून वाफगांवास होळकराकडे निघाले. रस्त्यांत बजाबा येऊन भेटले, ता. २२-३-१७७८ रोजीं वाफगांवास सर्वांच्या भेटी झाल्या. चिंतोविठ्ठल व बाळाजीपंत दामले त्याच दिवशीं पुण्याहून पळोन वाफगांवास गेले; आणि नाना पुण्याहून पुरंदरास आले. किल्ल्यावर जाऊन तेथील बंदोबस्त करून स्त्री किल्ल्यावर ठेवून आपण खालीं फौजेंत येऊन राहिले. बापूही तेथें येऊन त्यांस भेटले. बोलणें चालणें जाहलें. तों होळकर वगैरेंची बारापंधरा हजार फौज पुण्यावर चालून आली. पुढें कांहीं राऊत पाठवून मोरोबांनीं शनिवारवाड्याचा बंदोबस्त केला. नानाचे गाडदी वाड्यांतून काढून आपले ठेविले. शहराचा बंदोबस्त केला. नंतर वाड्यांत जाऊन पार्वतीबाईची भेट घेतली. शिक्केकटार,

जरीपटका व नौबद घेतली. मागाहून होळकर आले त्यांस वस्त्रें बाईकडून देववून पुण्याजवळ राहिले, ( फाल्गुन व॥ १३, २६-३-१७७८ ). नंतर पुरंदरावर चालून यावेंसा मनसबा ठरला. तेव्हां बापू व नाना, कृष्णराव काळे व इंग्रजांकडे वागणारा माधवराव जाधवराव यांस घेऊन कवडीच्या मुक्कामीं मोरोबा होळकरांस भेटले. दुतर्फा लढून नाश, त्या पक्षीं विवेक करावा, म्हणून तहाची यादी केली. बापूंकडे वडीलपण आहे तसें राहवें. मोरोबांकडे सर्व अखत्यारीचा कारभार असावा. नानाचा इतल्ला सर्व कामकाजांत असावा. देशस्थ, कोंकणस्थ मुद्दां एकरूप, द्वेष करूं नये. दादांस तूर्त आणूं नये. पुढें विचार पाहून आणणें ठरल्यास आणावें. तदनंतर होळकर मोरोबा व कारभाऱ्यांच्या भेटी जाहल्या. दुसरे दिवशीं मोरोबा, बजाबा व नाना यांनीं किल्ल्यावर जाऊन श्रीमंतांच्या भेटी घेतल्या, श्रीमंतांस खालीं आणून त्यांजकडून होळकरांची भेट उभ्या उभ्या घेतली. श्रीमंत किल्ल्यावर गेले. पुढें दसरें मोरोबाकडे कारकून सुद्धां गेलीं. कारभार चालीस लागला. राज्याचा नाश न व्हावा अशी कारस्थानी दूरंदेशी चित्तांत आणून बापूंनीं केली. खुळाचें निवारण झालें. सर्वत्र संशयमय आहे. आपल्या वस्त्राचा देखील विश्वास नाहीं.' ( ता. ८-४-१७७८, खरे-२२९३ ).

ता. २६-२-१७७८ रोजीं शिवरात्र होती. त्यासाठीं नाना मेणवलीस गेला असतां मागें मोरोबानें होळकराचा मिलाफ करून हा सर्व थाट रचिला, हें मागें सांगितलेंच आहे. नाना मेणवलीहून पुण्यास परत येतांच पंढरपुरच्या यात्रेस कुटुंबसह जाण्याचा निरोप मोरोबानें नानापासून घेतला. मुलेंमाणसें मागें नानाच्या हातांत ओलीस राहूं नयेत म्हणून ही मोरोबाची क्लृप्ति होती. पुढें मोरोबा पंढरपुरास न जातां बारामतीस गेला. तेथें त्यास पकडण्याचा नानानें प्रयत्न केला तो साध्य झाला नाहीं. फाल्गुन वद्य १२स म्हणजे २५ मार्च रोजीं मोरोबा व होळकर यांनीं पुण्यास माणसें पाठवून नानास पकडण्याचा प्रयत्न केला. पण तो निष्फळ होऊन नाना पळून त्याच रात्रीं पुरंदरास पोंचला: तेव्हां दुसरे दिवशीं पुणें मोरोबाच्या कबजांत आलें. तेव्हांपासून जूनच्या आरंभीं हरिपंत व महादजी दक्षिणेंतून येऊन दाखल झाले तों पावेतों नानाचे जिवांत जीव नव्हता. 'नानाचें चित्त प्रशस्त नाहीं. होळकरांनीं दगाबाजीच केली होती, पण नाना क्षेमरूप किल्ल्यावर गेले ही मोठी गोष्ट जाहली.' दादास

आणण्याबद्दल मॉस्टिनचा तगादा अतिशय होता. मोरोबानें त्यास सभेटाची हकीकत सांगितल्यावर तो फार खट्टू झाला. त्याला वाटलें मोरोबाही इतर कारभाऱ्यांसारखाच फसव्या आहे. बरीच वाटाघाट होऊन मॉस्टिन, चिंतो विठ्ठल व गोपाळ नाईक तांबवेकर दादास आणण्यास २० एप्रिल रोजीं मुंबईस गेले. परंतु अखेरचे दिवस असल्यामुळें मुंबईकर इंग्रजांनीं या वेळीं स्वारीचें जोखीम अंगावर घेतलें नाहीं; आणि महादजी शिंदे येतांच मोरोबाची आँट घटकेची सद्दी संपली. तथापि २६ मार्चपासून दीड दोन महिने दोहोंच्या-ऐवजीं पुण्याचे मंडळांत तीन कारभारी झाले. 'दप्तर कारकून सर्व पुण्यांत मोरोबांचे घरीं जाऊन बसूं लागले. बापूचे कारखानीस जोडा नाहीं. दादांची समजूत करून आणण्यासाठीं गोपाळ नाईक तांबवेकर व मॉस्टिन मुंबईस जातात. समजूत होऊन येतील किंवा काय पाहवें. एक किल्ला व जहागीर घेऊन स्वस्थ बसावें. सखाराम हरीस मुद्दां सोडावें, नरसो गोविंदास सोडलें. बाल पेशव्यास कमाबाचे हातीं देतील इतकाच खेद.' अशा रीतीनें एप्रिल महिना संपला. मोरोबाच्या घरीं दररोज दरबार भरूं लागले. त्याची अधिकाराची हौस फिटली. ( खरे २२९२-९३-९३-९९, २३२५-३७ ).

नानानें सेंट ल्यूबिन यास पुण्यास आणलें ही गोष्ट महादजीस बिलकूल पसंत पडली नाहीं. त्यांत आपल्या राज्यास कांहीं एक फायदा नसून उलट इंग्रज चिडीस जाऊन हात धुऊन मराठ्यांच्या पाठीस लागले. त्याचें निरसन करण्यासाठीं मोरोबाचे हातीं अधिकार येतांच तिघां कारभाऱ्यांनीं खालील आशयाचा करार ता. २९-५-१७७८ रोजीं मॉस्टिनजवळ लिहून दिला. 'आमचा सें. ल्यूबिनबरोबर करार वगैरे कांहीं एक झालेला नाहीं. फ्रेंचांशीं आम्ही कधींही दोस्ती ठेवणार नाहीं.' ( ऐ. टि. १-५० ). त्यास कारभाऱ्यांनीं २५ जून रोजीं कायम रजा दिली, परंतु गाड्या वगैरे मिळण्यास विलंब लागल्यामुळें तो ता. १२-७-१७७८ रोजीं पुणें सोडून दमणास निघून गेला. ऑगस्ट आरंभीं त्याचा मुक्काम कल्याणास होता.

मोरोबाचे हातीं कारभार येतांच त्यानें दादाला पुण्यास आणण्याची त्वरा चालविली. त्यानें दादास लिहिलें कीं, 'सरदारांची वगैरे अनुकूलता करून शपथपूर्वक पत्र पाठविलें आहे. स्वामींनीं यावें. फौज पुढें पाठवितों.' त्यावरून 'चैत्र व० १ स. ( १२ एप्रिल ) स्वारी मुहूर्तकरून निघेल. तुमची व होळ-

कराची फौज कल्याणनजीक पाठवून देणें.' असें दादानें १-४-१७७८ च्या पत्रानें मोरोबास कळविलें. पुनः २८-४ च्या पत्रांत दादा लिहितो, 'खासा स्वारी येण्याचा गुंता नाहीं. काशीबा होळकर, चिंतो विठ्ठल व गोपाळ नाईक यांस फौजसुद्धां पाठविणें. तुम्ही व होळकर एकनिष्ठ असल्यास इंग्रजांचेंही काय काम?' असा हा पत्रव्यवहार सारखा चालू होता. (ऐ. टि. १-५०, ५-१२, स. मा. रो. ५४४-५४७).

मराठ्यांना गोत्यांत आणून इंग्रजांचें राज्य वाढविण्याचा उपद्व्याप करणारे इंग्रज गृहस्थ मुख्यतः दोन. मुंबईस गव्हर्नर हॉर्नबी व पुण्यास राहणारा त्याचा हस्तक मॉस्टिन. हे दोघेही हळूच कळ काढून ठिणगी सोडून देत, त्याचा निस्तार करावा लागे कलकत्त्यास हेस्टिंग्सला व पुण्यास बापू-नानांना. मद्रास व बंगाल या प्रांतांच्या इंग्रज अधिकाऱ्यांनीं मोठमोठीं राज्यें कमावलीं, आणि मुंबईकडे आपण कोरडेच राहिलों याचें मोठें वैषम्य हार्नबी यास वाटे. लायल म्हणतो, या वेळीं मद्रास व मुंबई या दोन भागांवर दोन उतावळे नालायक गृहस्थ कारभारावर होते, एक हॉर्नबी व दुसरा रंबोल्ड.$ त्यांजला वरून कोणाचेंही नियंत्रण खपत नव्हतें, वरिष्ठांचे हुकूम धाब्यावर बसवून त्यांच्या व्यवस्थेंत अडथळे उपस्थित करणें हेंच त्यांस भूषण वाटे. रंबोल्ड तर अगदींच कुचकामाचा व शिवाय लांचखाऊ होता. पुरंदरचा तह हॉर्नबी अंमलांत आणीना, म्हणून नानानें सेंट ल्यूबिनचें बुजगावणें पुढें आणिलें, त्याबरोबर मॉस्टिननें पुण्यास बसून मोरोबा व सखारामबापू यांस फितवून नानांसच कारभारांतून काढून त्यास कैदेंत अडकवून टाकण्याचा घाट रचिला.

वास्तविक या वेळचा आणीबाणीचा प्रसंग सखारामबापूच्या शहाणपणानें निभावला. नानास कारभारांतून काढून आपला वर्चष्मा स्थापण्यासाठीं बापूनें ही सर्व कपटाची कारवाई केली, असें रा. खरे अधिकार योगांत प्रतिपादितात तें सर्वथैव योग्य वाटत नाहीं. बापू वृद्ध व वडील होता. सर्व पक्षांची समजूत काढून राज्याचें गाडें सामोपचारानें हांकण्याचें कसब नानास नव्हतें. एक नाना तेवढा कारभारांत नसावा, अशी दादा, मोरोबा, होळकर व इंग्रज वगैरे अनेक पक्षांची तक्रार होती. इंग्रजांनीं तर नानास काढून टाकण्याचा विडाच उचलला होता. या वेळीं नाना कारभारांतून निघाला असता तर मोरोबाचे

$ Lyal's Br. Dom. in India.

मार्फतीनें इंग्रज व दादा पुण्यास येऊन मराठी राज्याची इतिश्रीच व्हावयाची असा हा योग होता. म्हणून पुरंदरे व सवाई माधवराव यांचा बंदोबस्त बापूनें नानाकडेच ठेविला; मोरोबास कारभारांत घेऊन त्याची समजूत काढिली; आणि मॉस्टिन यास साफ तोंडघशीं पाडून दादाचें पुण्यास येणें बंद पाडिलें. मुंबईच्या इंग्रजांस कलकत्त्याचा सक्त हुकूम होता कीं, 'दादांस घेऊन तुम्हीं पुण्यास यावें,' अशी दस्तुरची सखारामबापूची लेखी मागणी आल्याशिवाय तुम्हीं फौज घेऊन पुण्यास स्वारी करूं नये. बापूचीच मुख्य कारभारी म्हणून पुरंदरेचे तहावर सही आहे; तेव्हां बापूच्या मागणीशिवाय या नवीन साहसांत तुम्हीं पडूं नये. अशी लेखी मागणी बापूनें मॉस्टिन यास दिली नाहीं; मोरोबानें दिली होती, पण मोरोबास कायदेशीर रीतीनें इंग्रज ओळखीत नव्हते. शिवाय आतां मोरोबानें बापूनानांशीं मिळवून घेऊन दादांस आणण्याचा नाद सोडून दिला, त्यामुळें मॉस्टिनचे सर्व मनोरथ वायां गेले. 'तुम्हीं दादांस घेऊन फौजेसह मुंबईहून निघा मात्र, की बापूसुद्धां सर्व कारभारी व सरदार लगोलग तुम्हांस येऊन मिळतील' असें मॉस्टिननें पूर्वीच मुंबईचे गव्हर्नरास लिहून कळविलें होतें. हा सर्व व्यूह एकट्या बापूनें हाणून पाडला आणि मोरोबाची समजूत करून कारभाराची पुढील व्यवस्था चालू केली. सारांश, एवढा आणीबाणीचा प्रसंग रक्तपाताशिवाय केवळ चार दोन दिवसांच्या धूर्त कारवाईनें ज्यानें निभावला त्याच्या शहाणपणास मोल नाहीं व कारस्थानांस जोड नाहीं असे जे त्या वेळचे लौकिक उद्गार आहेत ते अगदीं यथार्थ आहेत. कारण इंग्रज पुण्यास येते तर मराठ्यांचें राज्य संपलेंच होतें. एतद्देशीयांत मराठे व युरोपियनांत फ्रेंच एवढे दोनच काय ते इंग्रजांच्या सत्तेस विरोध करणारे शत्रू हिंदुस्थानांत असून त्या दोघांत सलोखा होऊं न द्यावा, व झालाच तर तो हरप्रयत्नानें विसकटावा असें कलकत्त्यास कौन्सिलचें पूर्णपणें एकमत होतें. ( फॉरेस्ट पृ. ३१३ ).

चैत्र व० १ म्हणजे १२ एप्रिल रोजीं रघुनाथराव मुंबईत डेरेदाखल झाला. 'समागमें इंग्रज व मुबलक सरंजाम आहे. विलायतेहून बंगालकरांस टपका आला त्याजवरून शुद्धीवर येऊन आमचे कुमकेविशीं मुंबईस हुकूम पाठविला, असें दादा १६-४-१७७८ रोजीं लिहितो. लगेच दोन दिवसांनीं त्यानें महादजीसही पत्र लिहिलें, कीं होळकर, मोरोबा, बजाबा वगैरेंनीं निष्ठा धरून

सरकार सेवा केली, पुण्यांत बंदोबस्त केला. मद्रासेहून जाजती फौजेची प्रतीक्षा करीत आहों. तुम्हांस आगाऊ सूचना केली जाईल त्याप्रमाणें तुम्हीं हुजूर येऊन पोंचावें.' पण महादजीचा बिलंदर स्वभाव व खरें कर्तृत्व पहिल्या प्रथम राष्ट्राचे निदर्शनास याच प्रसंगीं आलें. त्यानें आपल्या अंतःकरणाचा थांग कोणासच लागूं दिला नाहीं. एवढी राज्यक्रांति पुण्यास झाली, दोहों पक्षांकडून निकडीचे संदेश येत होते, पण आपण कोणत्या पक्षास मिळणार व पुढें काय करणार याची यत्किंचित् कल्पना त्याच्या संनिकट राहणाऱ्यांस सुद्धां झाली नाहीं. अगदीं शांतपणें परंतु सावधगिरीनें कोल्हापुरची मोहीम आटपून १५ मेच्या सुमारास महादजी पुण्याकडे येण्यास निघाला. 'बहुतच त्वरा सांगितली, पण अद्यापि कूच होत नाहीं. आम्हीं त्यांची वाट पाहत बसलों आहों' असे नानाचे निकडीचे निरोप त्यास जात होते. हरिपंत कर्नाटकांतून परत येत होता, त्याची व महादजीची भेट मिरजेजवळ जाहली. तेथून भिन्न मार्गांनीं ते पुण्याकडे येऊं लागले. ठिकठिकाणीं मुक्काम करीत, प्रतिनिधि वगैरे मंडळीच्या गांठी घेत, परशुराम भाऊ, हरिपंत वगैरेंची वाट पाहत आणि एकंदर प्रकरणाचा अंदाज काढीत महादजीनें पुरंदरास येण्यास एक महिना लाविला. शिंदे आपणास अनुकूल आहेत अशीच मॉस्टिनची सुद्धां समजूत होती. कारण याच वेळीं लेस्लीची फौज काल्पीहून दक्षिणेंत येत होती, तिला आपल्या मुलखांतून वाट देण्याचा परवाना मॉस्टिनच्या मार्फतच महादजीनें कोल्हापुर स्वारींतून पाठवून दिला होता. महादजी उतावळीनें आला असता तर कारस्थानास निराळें वळण लागून कदाचित् रक्तपात झाला असता. इंग्रज व दादा येऊन दाखल झाले असते, तर पुढील विचार त्यास निराळाच काढावा लागता. म्हणून बापू, नाना, होळकर, वगैरे व्यक्तींस पृथक्पणें पुढें बोलावून एक एक काम ठीक करीत व जम बसवीत तो पुढें आला, ही त्याची धूर्तता त्याच्या स्वभावाची निदर्शक आहे. त्याच्या कर्तबगारींतील पहिला मोठा डाव हाच होय. यापूर्वीचे त्याचें वर्तन गुळमुळीत होतें. दादास सुद्धां तो आपल्या पक्षांत आहे असें वाटे. परंतु निक्षून एक पक्ष स्वीकारण्याची अशी ही आणीबाणीची वेळ होती. अशा प्रसंगीं त्यानें नानाचाच पक्ष हिंमतीनें स्वीकारिला, यांत मराठी राज्य नानाचेच हातून चालेल, मोरोबा किंवा दादा यांचे हातून चालणार नाहीं, असा त्याचा आशय व्यक्त होतो.

त्याच्या फौजेची जूट व तयारी इतरांहून अतिशय व्यवस्थित होती. राणेखान, हरि बाबाजी, इंगळे, बाळाराव गोविंद वगैरे त्याचे हस्तक कर्तबगार व त्याची आज्ञा उठविण्यास तत्पर होते. बलाबल नीट ओळखून हातीं घेतलेलें काम सिद्धीस जाईल अशी खात्री असल्याशिवाय उगीच लोकांचे आग्रहास व भरीस तो सहसा पडत नसे. या बाबतींत तुकोजी होळकराची वागणूक अगदीं निराळी होती. ( ऐ. टि. २-४, १-३८; खरे २३३६ ).

मोरोबाचे हातीं कारभार येतांच त्यानें एकदम तो गाजविण्यास सुरुवात केली. नरसिंहराव गोविंद, सखाराम हरि वगैरे दादांच्या हस्तकांस त्यानें बंधमुक्त केलें. नानानें केलेल्या गोष्टी उलटवून त्याचे नाकांत काड्या घालण्याचा शक्य तितका प्रयत्न त्यानें केला. नानानें मात्र वेळ पाहून अगदीं पडतें घेतलें आणि सिंदे दाखल होईपर्यंत यत्किंचित् हालचाल केली नाहीं. होळकरापाशीं तर त्यानें अगदींच मान वांकविली. मात्र पुढील बचावाची अंतस्थ तजवीज सर्व कांहीं केली. भोसल्यांची फौज बोलावून माहूरपर्यंत आणिली, निजामासही आपले पक्षांत पक्कें केलें. महादजी किंवा हरिपंत यांस पत्रें न लिहितां, केवळ तोंडी निरोप तो पाठवी. इकडे मोरोबानेंही नानावर पाळत ठेवून दादास आणविण्याची त्वरा केली. पुरंदराखालीं नानाची फौज होती, तींत मोरोबानें फितूर केला, तेव्हां नाना बहुतेक किल्ल्यावरच राहूं लागला. पुरंदरचें दळणवळण बाहेर बहुतेक बंद पडलें.

तथापि मोरोबाचा व्यूह तडीस जाण्यास पुष्कळच अडचणी होत्या. त्याच्या पक्षांतील मंडळी निरनिराळ्या हेतूंनीं प्रेरित झाल्यामुळें त्यांच्यांत एकवाक्यता होणें अशक्य झालें. सखारामबापूस कारभारांत प्रमुखपण हवें होतें, पण दादा नको होता. स्वतः मोरोबाची मोठी इच्छा कारभारांत प्रमुख होण्याची असून, दादा त्यासही नकोच होता. परंतु दादास आणिल्याशिवाय आपणास अधिकार मिळत नाहीं असें दिसून आल्यावर त्यानें ती गोष्ट मान्य केली. होळकरास फक्त नाना नको होता. कारण नाना सिंद्याकडून आपला पाडाव करील ही त्यास भीति होती. चिंतो विठ्ठलास तर दादाशिवाय दुसरें कोणीच नको होतें. बजाबा पुरंदऱ्यास फक्त साताऱ्च्या छत्रपतींचा कारभार हवा होता. सदाशिव रामचंद्रास अंमदाबादचा सुभा पाहिजे होता. गोपाळनाईक तांबवेकरास पेशव्यांची पोतदारी पाहिजे होती. शेवटच्या तिघांकडे सद्रचे तीन

अधिकार पूर्वी एकदां होते. मॉस्टिनची इच्छा एकच कीं इंग्रजांचा वैरी जो नाना तो कारभारांत नसावा. दादाचे पाय एकदां पुण्यास लागले, कीं आपण मुंबईकर कंपनीवर द्रव्याचा पूर वाहवूं असें त्यास वाटत होतें. मोरोबानें हरिपंत व परशुरामपंत यांस निरोप पाठविला, कीं तुम्हीं आपल्या फौजेस रजा देऊन सडे पुण्यास यावें.

मॉस्टिनच्या बेसुमार लोभामुळेंही मोरोबाचें कारस्थान थंडावलें. आगाऊ करार न करितां या वेळीं इंग्रज दादास घेऊन लगोलग पुण्यास येते तर त्यांचा जम हळू हळू बसला असता. कारण पुण्यांत प्रचंड रक्तपात व युद्ध करण्याची कोणाचीच इच्छा नव्हती. परंतु मॉस्टिननें अशा अटी घातल्या कीं, 'नानास कारभारांतून काढावें; फ्रेंचांस राज्यांत आश्रय देऊं नये; दादांस पुण्यास आणल्याबरोबर इंग्रज फौजेस परत जाऊं द्यावें; खर्चाबद्दल छत्तीस लाख रक्कम द्यावी, आणि सर्वांत महत्त्वाचें कलम म्हणजे सखारामबापूचे हातची चिठ्ठी आपणास बोलावण्याबद्दल द्यावी.' हेतु असा कीं राज्याच्या बचावासाठीं मुख्य कारभारी म्हणून तुम्हीं आम्हांस बोलावलेंत तर आम्ही मागूं तो खर्च व मुलूख आम्हांस द्या. या मागणीवरून बापूस दुहेरी पेंच पडला. इंग्रजांस चिठ्ठी द्यावी तर नाना व शिंदे आपला प्राण घेणार; आणि इंग्रजही आपणांस कायमचे छळणार. असें सर्व भाकित मनांत आणून बापूनें चिठ्ठी दिली नाहीं, आणि चैत्र व० १० च्या मुहूर्तानें मुंबईहून निघून अक्षय्य तृतीयेस (२९ एप्रिल) पुण्यात प्रवेश करण्याचा दादाचा बेत जागच्या जागीं जिरला. तेव्हां मॉस्टिनला मुंबईस परत जावें लागलें, त्याचें कारण असें.

स. १७७७ त रघुनाथरावाची कांहीं तरी कायम व्यवस्था लावून देण्यासंबंधानें पुणें दरबार व मुंबईकर यांजमध्यें सारखी वाटाघाट चालू होती. मुंबईहून दादाच्या मागण्या येत त्या पुण्यास नापसंत होत, व पुण्याहून ज्या अटी मुंबईस जात त्या दादा धुडकावून देई. सखाराम बापूनें कैक वेळां मॉस्टिनयास कळविलें कीं तुम्हींच मुंबईस जाऊन समक्ष बोलून दादाची काय ती व्यवस्था लावा. दादा ठिकाणीं लागल्याशिवाय उभयतांस निश्चिंतता वाटणार नाहीं. निदान मॉस्टिनला कोणत्या तरी निमित्तानें पुण्यांतून घालवावें अशी कारभाऱ्यांची सारखी खटपट चालू होती. मॉस्टिन रोज जातों जातों म्हणे, गेला मात्र नाहीं. पुढें मोरोबाचा पाडाव होऊन नानाची छाप कारभारांत

बसली, तेव्हांच पुढील विचार ठरविण्यासाठीं मॉस्टिन ता. ६-७-१७७८ रोजीं पुणें सोडून मुंबईस गेला. ( पर्शियन कॅ. भा. ५ )

ता. १०-७-१७७८ रोजीं माधवराव पेशव्याचे नांवें खालील पत्र हेस्टिंग्स यास गेलें. 'आतां आमचा कारभार मोरो बाबूराव, सखाराम बापू व बाळाजी पंडित असे त्रिवर्ग एकविचारानें पाहूं लागले आहेत. म्हणून आजपावेतों आपलेकडील पत्रें जशीं पूर्वी दोघांचे नांवें पृथक् येत होतीं, तशीं आतां तीं तिघांचे नांवें पाठविण्याची तजवीज ठेवावी.' मोरोबानेंही अशाच आशयाचें पत्र कलकत्त्यास लिहिलें. अगदीं आरंभीं कलकत्त्याहून येणारे खलितें एकट्या सखाराम बापूचे नांवानें येत. पुढें कर्नल अप्टन याच्या मध्यस्थीनें ते बापू व नाना या दोघांचे नांवें स्वतंत्र येऊं लागले. स. १७७७ त मॉस्टिननें खालील पत्र हेस्टिंग्स यास लिहिलें होतें. 'आपलं पत्र ता. १४ ऑक्टोबरचें सखाराम बापूचे नांवें आलें तें त्यांस पोंचून आनंद झाला. परंतु तसेंच स्वतंत्र पत्र बाळाजी पंडितांचे नांवें पाठविण्याचें आपणांस विस्मरण कसें झालें समजत नाहीं. कार-भाऱ्यांनीं त्या संबंधानें मला विचारिलें, तेव्हां मी कांहीं तरी सबब दाखवून वेळ मारून नेली. हे कारभारी एके ठिकाणीं राहत नाहींत. वीस पंचवीस मैल दूर राहतात. म्हणून त्यांस स्वतंत्र पत्रें आलीं पाहिजेत. शिवाय ते दोघेंहि सारख्या दर्जाचे असल्यामुळें, दोघांचे मानमरातब सारखे न ठेवल्यास निष्का-रण वैषम्य उत्पन्न होण्याचा संभव असतो.'

**४. महादजीच्या धूर्ततेनें मोरोबाचा पाडाव** ( जुलई १७७८ ).— एप्रिल अखेर दादा पुण्यास येणार होता, त्याची मजल ठाण्यापर्यंतच आली. कारण इंग्रजांस एकदम पुण्यावर चाल करून जाण्याची छाती झाली नाहीं. त्याचे मदतीस हेस्टिंग्सनें काल्पीवरून कर्नल लेस्लीचे हाताखालीं फौज रवाना केली, ती काल्पीवरच अडकून पडली. बाळाजी गोविंद खेरानें त्यांस काल्पीवर अटकाव केला, तेव्हां त्याच्याशीं बरेच दिवस झगडून त्यांनीं काल्पीचें ठाणें कसेंबसें हस्त-गत केलें, पण पुढें चाल करण्यांत त्यांस भारी अडथळा झाला. इकडे मोरोबा फार घाबरा होऊं लागला. हातीं अधिकार होता, पण त्याचा पाडाव करणार प्रतिपक्षी जोराची तयारी करीत होते. पुण्यांत अस्वस्थता होऊन उघडपणें लिहिण्याची किंवा बोलण्याची कोणास छाती होत नसे. या संबंधानें खरे ले. २३३२ चें खालील सांकेतिक पत्र तत्कालीन स्थितीचें निदर्शक आहे.

'तिमराव यांजकडील लग्नाचा निश्चय समजण्यांत आला. उत्तम आहे. वैशाख शुद्धांतच लग्नकार्य उरकावेसें आहे. लग्नास विघ्नें फार, यामुळें चिंता वाटते.' या ठिकाणीं लग्न म्हणजे मोरोबास पकडून कैद करणें. पत्र शिवाजी बाबाजीनें पुण्यांतुन मिरजेस लिहिलेलें आहे. इंग्रजांस जाचणारी मुख्य गोष्ट म्हणजे पुण्यास बसलेला फ्रेंच वकील. त्यास परत जाण्यास निरोप देण्यांत आला. मेच्या आरंभीं मोरोबानें बापूस एक चिठी लिहिलेली होती, ती नानानें मोठ्या प्रयासानें मिळविली, तींत मजकूर होता तो असा. 'नाना, पटवर्धन व सिंदे यांचें पारिपत्य जालें नाहीं तर आम्ही तुम्ही सर्वच बुडतों. सर्व दौलत नानाचे हातीं, याचा विचार केला पाहिजे. याजकरितां तिमाजीपंतास पाठवावें. त्यांशीं बोलून आपणाकडे पाठवितों. ते सविस्तर सांगतील.' ही चिठी नानानें सिंद्यास दाखविली. त्याबरोबर सिंद्याचें मनाचा निश्चय मोरोबाचे विरुद्ध पक्का झाला. जून ता. ७ रोजीं सिंद्याचा मुक्काम लोणंदवर होता. 'अजापालासह कपि नीरेवर भेटीस जाणार,' म्हणजे बापू होळकरास घेऊन नीरेवर महादजीस भेटणार होता. 'सिंदे हरदमल्याला, त्यांजवर नानांचा भरंवसा.' ( खरे २३५५ ).

इंग्रज वकील लुइ पुण्याहून लिहितो, 'मोरोबाचे हातीं कारभार आल्यावर त्यानें तुकोजीस कळविलें कीं, नर्त दसऱ्यापर्यंत दादास पुण्यास आणण्याचा आमचा विचार नाहीं. मात्र आनंदीबाई व बाजीराव यांस तुम्ही ताबडतोब पुरंदरास आणा. हे दोघे मुलगे एकत्रच जवळ असलेले चांगले. होळकर बोलला, सवाई बाजीरावास आणणें न आणणें तुमच्या मर्जीवर आहे, परंतु दादास तरी लगोलग आणलें तरच उपयोग आहे.' ( इंडिया ऑफिस पेपर्स ).

महादजी हळू हळू पुण्याकडे येत होता. आपण एकट्यानेंच पुढें जाऊन त्यास भेटावें असें बापूचें मनांत होतें. पण मोरोबानें तें कबूल केलें नाहीं. प्रसंग पडला तर बापूस कैद करावें, म्हणून मोरोबानें त्याजवर पाहरे सुद्धां ठेविले होते. पण सिंदे पुढील उपक्रमाचा थांग लागू देईना. इकडे दादा व इंग्रजही मुंबईहून येईनात; तेव्हां मोरोबानें बापूस विनंति केली, कीं तुम्ही जाऊन महादजीस भेटावें आणि माझी भेट करून द्यावी. त्याप्रमाणें बापू, मोरोबा, बजाबा वगैरे प्रमुख मंडळी फौजेसह परिंच्यास गेली. इंग्रज न येतील तर एकट्या दादास तरी घेऊन यावें म्हणून चार दिवसांपूर्वी मोरोबानें चिंतो विठ्ठलास मुंबईस पाठविलें होतें. मोरोबास चुकविण्यासाठीं सिंदे जेजुरीस न जातां परभारें

मोरगांवास गेला. तेथें हरिपंत व परशुरामभाऊ त्यास जाऊन मिळाले. नंतर बापूही तेथें येऊन १२ जून रोजीं शिंद्यास भेटला. शिंद्यानें आपली भेट घेतली नाहीं हें पाहून मोरोबाचा हिरमोड झाला. भलत्याच फंदांत सामील झाल्या-बद्दल बापूनें शिंद्याची क्षमा मागून करुणा भाकली. तेव्हां शिंद्यानें प्रसंग ओळखून बापूस गुन्हा माफ केला आणि हरिपंत व परशुरामभाऊ यांची खातर-जमा होत नव्हती ती केली. नंतर या चार प्रमुखांनीं एकत्र जमून पुढील तजवीज कशी करावयाची याचा विचार केला. मोरोबाची भेट घेण्याविषयीं बापूनें शिंद्यास सुचविलें. शिंद्याचे मनांत भेट घेण्याचें बिलकूल नव्हतें. पण बापूनें फारच आग्रह केल्यावरून दुसऱ्या दिवशीं म्हणजे जून १३ रोजीं फौजेसह नाझरे येथें महादजी बापूचे डेऱ्यास गेला, आणि तेथेंच उभ्या उभ्या मोरोबास भेटला. संभाषण मात्र कांहींच केलें नाहीं.

महादजीनें या अडचणीच्या प्रसंगीं तुकोजीचें मन वळवितांना राज्याच्या हिताचे जे उदात्त विचार प्रगट केले आहेत, ते लक्षांत घेतले म्हणजे त्याच्या सद्धेतुसंबंधानें रा. खऱ्यांनीं दर्शविलेली शंका अस्थानीं आहे असें निर्विवाद म्हणतां येतें. ' महादजी बावांनीं तुकोजीस सांगितलें जे, दौलतीमध्यें ऐवज म्हणावयास कारभाऱ्यांत दरबारी दोघे, बापू व नाना; आणि सरदारांत तुम्हीं आम्हीं. त्यास कारभाऱ्यांनीं आपले हिंमतीवर चार वर्षें निभावली. तुम्ही आम्ही देशीं आल्यानंतर सेवा काय केली तें आपण उभयतां जाणतों. हरिपंत कर्नाटकांत फसले, त्यांची कुमक करून त्यांस काढून आणावें, धनी लहान, राज्यांत बखेडा, याचा बंदोबस्त करून द्यावा, स्वस्थता करून मग हिंदुस्थानास जावें, असें असतां आम्ही करवीरचे मसलतीस गुंतलों, तुम्ही वाफगांवीं बसून राहिलां. हैदराचें पारिपत्य करून तात्यास घेऊन यावें हीं कामें तुम्हांआम्हांजोगीं, हें करणें योग्य, तें न करतां आजपावेतों उगे वाफ-गांवीं बसून राहिलां. मध्यें गायकवाडाचा व रघुपतरावाचा फंद उभा करून सरकारांत पैका यावा तो न येतां सरकारचें अनहित झालें. तुम्ही विवेक केला नाहीं. आतां मोरोबा दादा, बजाबा व तुम्हीं एक होऊन खुला मन-सबा करतां म्हणून ऐकतों, हें विहित कीं काय ? पूर्वी मल्हारबा व राणोजी दोघे एकविचारें एकनिष्ठपणें सेवा करून मातबरीस आले. समयास उपयोगी म्हणून कीर्तीस पात्र झाले. पूर्वी मल्हारबांची रीत कीं धन्यास विरुद्ध तें करूं

नये. खावंदांशीं बळ बांधल्या परिणाम कोणाचा लागला नाहीं. आतां तुम्हीं विरुद्ध मार्ग धरिला, तेव्हां द्वैत वाटलें. सिंदे–होळकर जोडफळांचा सांधा असतां एक तुम्ही बगलेस मारिले, एक आम्हीं अवलंबून विरुद्धें वाढवावीं, हा परिणाम शुद्ध नव्हे. उत्तम पक्ष मनाचा निश्चय करून आमचे पक्षास मिळावें. हें चित्तास न ये तर आम्हांस तुम्हीं आपणांत मेळवून घ्यावें. तृतीय पंथ करूं म्हटल्यास मुत्सद्दी सबळ आहेत, ते शेवट लागूं देणार नाहींत. राज्याचा नाश झाल्यावर तुमच्या आमच्या दौलता कोठें राहतील ! खुळास मिळून नामाचे निमित्तधारी होतां. धनी बाळ तो खरा, पण दैव सबळ आहे. असे तपशील एक प्रहर बोलले. शेवटीं सांगितलें, मार्गावर येऊन सुबुद्धि धरून ह्या विचारास अनुसराल तर पुढें राजकारण चालवून एकवाक्यता करूं. नये चित्तास, तर ज्यास जें बरें दिसेल तें करावें. आमच्यानें धन्याशीं अन्यथा वर्तणूक करावयाचीच नाहीं.'* अशी समजूत घातल्यावर तुकोजी पूर्णपणें महादजीचे विचारास मिळाला, इतकेंच नव्हे, तर इतउत्तर अडीअडचणींत त्यानें पुढें नानांचें साह्य चांगलें केलें. पुढें पुढें तर महादजीविरुद्ध सुद्धां नानास तुकोजी-चाच विशेष पाठिंबा होता. या पूर्वीं तुकोजीचें अंतःकरण पूर्णपणें दादाचे पक्षांत होतें असें भवानीशंकरही‡ आपल्या रोजनिशींत म्हणतो. स. १७७४ त दादा इंदुरास गेला, तेव्हां तुकोजीनें त्यास मदत केल्यामुळेंच तो बारभाईंचे हस्तगत झाला नाहीं असें दिसतें.

याचप्रमाणें इतरांशीं पृथक्पणें बोलून महादजीनें मोठ्या चतुराईनें पुढील बेत रचिला. मोरोबाचा घाट सिद्धीस जाता, तर इंग्रजांचें ठाणें पुण्यास कायमचें बसून शिवाय रक्तपात व नुकसानी झाली असती. तंट्याचें मुख्य बीज म्हणजे बापूनानांचा बेबनाव व एकमेकांविशीं बेसुमार संशय. ही गोष्ट महादजीनें ताडली; आणि प्रथम त्या दोघांशीं स्पष्टपणें बोलून त्यानें त्यांची समजूत पाडिली. नंतर त्यांजमध्यें एक करारपत्र करवून त्यावर श्रीसांबाच्या शपथ-

* वि. ज्ञा. वि. मे १९०७ पृ. १५६. मजकुराच्या संदर्भावरून हें पत्र जून १७७८ चें आहे.

‡ भवानीशंकर हा यशवंतराव होळकराजवळ होता. त्यानें लिहिलेली रोजनिशी नुकतीच इंदुरास छापली आहे. (स. १९२७).

पूर्वक त्यांच्या सह्या घेतल्या; आणि करार पाळण्याबद्दल दोघांकडून बेलभंडार घेवविला. करारांत कलमें एकोणीस आहेत. त्यांत गुप्त किंवा महत्त्वाचें असें कांहीं नाहीं. एकंदर दौलतीचा कारभार बापू व नाना यांनीं एकविचारें सरळ, निष्कृत्रिमपणें, एकमेकांस साह्य करण्याच्या बुद्धीनें, करावा असें ठरलें. हा करार तिस्सां सबैनचा म्हणजे ५ जून १७७८ नंतर लवकरच झालेला आहे. मोरोबा व बजाबा यांसीं बरें वाईट बोलणें व करणें तें उभयतांनीं एकविचारें करावें असें कलम करारांत आहे. ता. ११ जुलई रोजीं मोरोबा कैद होऊन नगरचे किल्ल्यावर अटकेंत गेला, त्या पूर्वीवें वरील कलम असलें पाहिजे. या धोरणानें करारार्चा मिति १२-१३ जून अशी निश्चित होते. करार सर्व कागदावर राहिला हें सांगणें नकोच. ( ऐ. टि. १. २९ ).

या करारावरून कारभाऱ्यांमधील तेढ स्पष्ट होते. आपल्या पश्चात् मुलास कारभार मिळावा अशी बापूची धडपड होती. नानानें आपल्या मुलास हुषार करावें आणि कारभारांत घ्यावें अशी बापूची मागणी आहे. वास्तविक त्याचा एकुलता एक होतकरू मुलगा आकोपंत पूर्वीच वारला होता. म्हणून मुलासाठीं पुनः त्यानें लग्न केलें होतें. न झाला तर दत्तक घेण्याचा विचार होता. मिळून बापूसारखे शहाणे व्यवहारज्ञ लोक सुद्धां लायकी दिसण्यापूर्वी आपल्या मुलांची अव्यवहार्य तरतूद करण्यांत दंग असलेले पाहून मराठी राज्यचालकांची कींव करावी कीं तारीफ करावी तें समजत नाहीं. हेंच राज्यनाशाचें कारण नव्हे काय ? नानाचाही प्रकार असाच आहे.

नानाबापूंमध्यें चुरस वाढण्याचें आणखी एक कारण होतें. सरकारांतून कोणत्याहि खर्चाची मंजुरी घेण्यासाठीं देणेयादी तयार होई, तिजवर कारभाऱ्यानें ' देववावें ' असा अभिप्राय लिहावयाचा, आणि मालकानें ' द्यावें ' असें लिहावयाचें, असा प्रघात त्या वेळीं होता. असे दोन शेरे झाल्याशिवाय रक्कम आदा होत नसे. बारभाईंच्या वेळेस मालक लहान असल्यामुळें बापूनें ' द्यावें ' असा शेरा लिहिला कीं रक्कम आदा होई. अर्थात् नानाचें प्रयोजन उरलें नाहीं. पुढें बापू व नाना यांच्यांत तेढ उत्पन्न होऊन बापूनें 'द्यावें' लिहिल्याशिवाय नानास पैसा मिळण्याची अडचण पडूं लागली, तेव्हां नानानें ' देववावें ' करण्याचा प्रघात घातला; आणि तशाच जरूरीच्या रकमा बापूचें ' द्यावें ' झाल्याशिवाय खर्च पडूं लागल्या. ही गोष्ट बापूस अपमानकारक वाटली.

परभारें पैसे आदा होऊं लागले, तेव्हां बापूच्या दरम्यानगिरीची जरूर राहिली नाहीं. याच मुद्यावर प्रथम मोरोबा व बापू यांचें एकचित्त होऊन उभयतांनीं नानास कारभारांतून काढण्याचें कारस्थान आरंभिलें. खरें पाहतां, मोरोबा नानास मुळीं नको होता; पण नानाशिवाय कारभार चांगला चालावयाचा नाहीं, म्हणून नाना असावा, पण मालकीची व वडीलकीची सत्ता आपली कायम असावी, एवढाच बापूचा आशय होता. या कारस्थानास शेवटीं यश आलें नाहीं, याचें कारण हेंच कीं तें करणाऱ्यांत प्रत्येकाचा हेतु वेगळा होता. ( खरे २३६५, पृ. ३२३० ).

नानाबापूंच्या शपथा शिंद्यांच्या विद्यमानें झाल्या, तशाच त्या बापू आणि फडके, पटवर्धन यांच्यांतही परस्परांशीं इमानानें वागण्याबद्दल झाल्या. अशा प्रकारें कारभारी मंडळाचा पाया घट्ट बसवून मग सिंद्यानें पुढील काम अंगावर घेतलें. हा सर्व प्रकार इतका गुप्त झाला कीं, मोरोबास त्याची मुळींच वार्ता नव्हती. नाना प्रत्यक्ष महादजीस अजून भेटलाच नव्हता. यासंबंधानें इंग्रजांच्या लेखांत खालील मजकूर आहे. 'मोरोबास अधिकार प्राप्त झाल्यावर कांहीं दिवसपर्यंत नानानें कारभारांतून निवृत्त झाल्याचें असें बेमालूम सोंग घेतलें कीं मोरोबा किंवा दुसरे कोणास त्याच्या मनांत कांहीं निराळेच बेत घोळत होते अशी शंका सुद्धां आली नाहीं. आपणांस आतां येथें कशाचीही इच्छा नाहीं, आपण काशीस जाऊन तेथेंच कायमचा वास करणार, असा पुकारा करून निवृत्तीची सर्व सिद्धता केली. पण अंतस्थ रीतीनें त्यानें महादजीशीं गुप्त बेत केले ते बाहेर कोणास सुद्धां कळले नाहींत. अनेकांचा संबंध येणाऱ्या एवढ्या प्रचंड राजकारणांत नानानें जी धूर्तता दाखविली ती केवळ अनुपमेय होय. मोरोबास केव्हां, कोठें, कोणी, कसें पकडावयाचें, तें सर्व तपशीलवार नानानें आगाऊ ठरविलें होतें.' ( Select Committee's Report,–Indore Copies).

अद्यापि मोरोबा व होळकर बाह्यत: एकत्रच होते. जून ता.१३ रोजीं नाझऱ्यास सर्व वाटाघाट झाल्यावर पुन: ता. १४ रोजीं मालोजी घोरपडे सुद्धां सर्वांची सिंद्यांचे डेऱ्यास येऊन बोलणीं तीन प्रहर रात्रपर्यंत झालीं. 'जलदी करून जाऊन मोरोबाशीं व होळकरांशीं झुंजावें तर पळून दादाकडे जातील, आणखी खूळ माजवतील, जड पडेल, खर्चाखालीं यावें लागेल. म्हणून जलदी करूं नये. पुरंदराजवळ जाऊं, नानाची भेट घेऊं. मग काय तो विचार ठरवूं,

असें सिंदे बोलला. ता. १५ जून रोजीं पुरंदराखालीं येऊन सर्वांनीं श्रीमंतांच्या भेटी घेतल्या. प्रथम नाना व सिंदे यांचें आणि मागाहून नाना, बापू व सिंदे यांचें, अशीं बोलणीं झालीं. सिंद्या सुद्धां इकडील चाळीस हजार फौज, तिकडील होळकर सुद्धां गोळा हजारांचा अंदाज. परंतु कांहीं मार्ग दिसत नाहीं. अंत मनस्वी राजकारणें. कोणाचाहि विश्वास येत नाहीं. अणाशपर्थेत बिलकूल ताल राहिला नाहीं. चिंतो विठ्ठल दादांकडे गेले आहेत. मोरोबा आणखी फौज ठेवितात. बापू व नाना लष्करांत येऊन राहिले आहेत. चिवडाचिवड फार. सिंद्यांचे मतें मोरोबा ठीक नाहीं. बापू व नानांनीं कारभार करावा व होळकराची समजूत करावी. नारो गणेशास त्याजपासून काढावा. सर्वांचे मतें मोरोबाचें पारिपत्य करावें. पुढें दोन चार दिवस पुनः सिंदे होळकरांचें बोलणें झालें. होळकर म्हणाला, 'बापूनें आम्हांस फसविलें, अबरूस खता आली. तुम्ही आम्ही भाऊ. तुम्ही कराल तें मान्य. मोरोबास सांभाळावें. अथवा काशीस पोंचवावे. सिंदेहोळकर ता. २२ रोजीं नानाच्या डेऱ्यास आले. बोलणीं झालीं. श्रीमंताचे चरणाशीं महादजीची निष्ठा फार. नानांचे लक्षांत वागतात. नानांचा भार सर्व पाटीलबाबांवर. इंग्रजांचे मनांत वांकडें येऊं लागलें. म्हणून फ्रेंच वकिलास लगोलग निरोप दिला. मोरोबांनीं पुण्यास जाऊन सुखरूप राहवें असें ठरलें, एकदम त्यास भडकूं दिलें नाहीं.' ( खरे २३६८–७५–८३ ).

मोरोबानें पूर्वी मानाजी फाकड्यास पत्र पाठविलें होतें कीं, तुम्ही पत्र पावतांच निघून यावें, तुम्हांस महादजीची दौलत देतों. तें पत्र हैदरास सांपडलें, त्यावरून हैदरानेंच मानाजीस कैद केलें. मोरोबावर महादजीचा मोठा राग यामुळेंच. इकडे नारो गणेशानें तुकोजी होळकरास वरील आड मार्गांत जाण्यास भर दिली, सबब त्यास आमचे ताब्यांत द्या असें महादजीनें होळकरास कळविलें. बऱ्या बोलानें देइनात तेव्हां परशुराम भाऊ फौज घेऊन चालून गेले. प्रकरण विकोपास जातेंसें पाहून महादजीनें मध्यस्थी केली. तेव्हां तुकोजीनें नारो गणेश, गोपाळ नाईक तांबवेकर वगैरे आठ असामी हवाली केले. मोरोबा बहुल येथें गेला, पण तेथेंही स्वस्थ बसेना. तेव्हां फौज पाठवून त्यास नानानें ११ जुलई रोजीं पकडून आणिलें. बजाबास कैद केलें, विसाजीपंत बिनीवाले व नरसिंगराव घायगुडे यांस कैद करून जहागिरी जप्त केल्या; दादाजी गंगाधर चंद्रचूड यास होळकराची दिवाण-

गिरी दिली. सदाशिव रामचंद्रास कैदेंत घातलें. बजाबास चंदन किल्ल्यावर, गोपाळ नाइकास रायरीवर, मोरोबास नगरचे किल्ल्यावर, याप्रमाणें बंदोबस्तानें ठेवण्यांत आले. 'हिरण्यश्राद्ध' म्हणजे दंडाची शिक्षा तर पांच लाख, दहा लाख अशी प्रत्येकास बसली. सर्वांची मालमत्ता सरकारांत जमा केली. वरील सर्वांस जन्मभर कैदेंत कुचंबावें लागलें. बजाबा पुरंदरे वगैरे कित्येकांचा बचाव करावा असें सखाराम बापूच्या मनांत होतें, पण नाना-महादजींच्या जोरापुढें बापूचें कांहीं चाललें नाहीं. पांडुरंगराव बारामतीकर दादांचा जांवई, वय लहान, गुन्हा थोडा, शिवाय त्याबद्दल परशुरामभाऊची रदबदली, या गोष्टी ध्यानांत घेऊन नानानें त्याचा गुन्हा माफ केला. पांडुरंगरावाच्या धाकट्या भावास परशुरामभाऊची मुलगी बयाबाई दिलेली असून तो स. १७६८ त लग्नानंतर पंधरावेच दिवशीं वारला. हाच त्या घराण्याशीं परशुरामभाऊंचा आप्तपणा होय. ||

मोरोबास कसा पकडला तें समजून घेण्यासारखें आहे. सिंदे इतका सावध-गिरीनें वागला त्याचें कारण मोरोबा होय. तुकोजी होळकरास मोरोबापासून अलग केल्याशिवाय, मोरोबाचे वाटेस जाणें शक्य नव्हतें. होळकराची फौज व सरदार सिंद्याप्रमाणेंच एकजुटीचे होते. त्यांशीं लढण्याचा प्रसंग येता तर मोठाच रक्तपात होऊन त्याचा परिणाम कोणास कसा घातक झाला असता हें सांगतां आलें नसतें. महादजीनें त्यास असें समजावलें, कीं आपण बरोबरीचे सरदार, हे कारभारी आपसांत वाटेल तसे भांडोत, त्यांत पडल्यानें आपणास फायदा काय? अशा गोड गोड गोष्टी सांगून महादजीनें तुकोजीस आपल्याच जवळ ठेवून घेतलें. हा प्रकार मोरोबाचे दृष्टीस पडला तेव्हां तो घाबरला, आणि नानाबापूंची पायधरणी करूं लागला. सिंद्याची सुद्धां त्यानें पुष्कळ विनवणी केली, पण दादा व इंग्रज यांस आणण्याच्या त्याच्या उपक्रमामुळें त्याचें बोलणें कोणीच मनावर घेईना. बापूनानांनीं सांगितलें कीं, हा आम्हांत नको. तेव्हां सिंदे होळकरांमार्फत त्यानें तिसरें बोलणें लाविलें कीं जरीपटका, शिक्केकटार व शिवनेरी किल्ला एवढें मजकडे आहे तें तरी तसेंच ठेवा, मी

|| खरे २४०५, खंड १०-१९४. ह्या बाईचा पुनर्विवाह झाल्याची वार्ता खोटी आहे. ही स. १८०१ पावेतों जिवंत असल्याचा उल्लेख सांपडतो. खरे ले. ५९३५ पहा.

शिवनेरीस जाऊन स्वस्थ बसतों. परंतु कारभाऱ्यांनीं सांगितलें, आतां तुमच्याकडे सरकारी सरंजाम कांहीं एक राहणार नाहीं. तुम्हीं दोनशें लोकांसह भीमातीरीं बहुल येथें राहवें. असा निरोप त्यास नानाचा गेल्याबरोबर त्यानें वीरश्रीचा मोठाच आव आणिला. त्यानें निरोप पाठविला कीं, मी मरून जाईन परंतु शिक्केकट्यार व जरीपटका देणार नाहीं. बजाबा पुरंदरे व पांडुरंगराव यांनींही त्यास भर दिली. ते म्हणाले, आम्ही मरून जाऊं, पण दीनवाणी होऊन नानापुढें करुणा भाकणार नाहीं. पुढें आपल्या मरणाचे सोबती कोण हें ठरविण्याकरितां मोरोबानें आपल्या फौजेंतील लोकांस जेवण घातलें. 'हजार बाराशें पात्र झालें, मग किती मरतात पाहवें,' असें परशुरामभाऊ लिहितो. पुढें मुंबईस अगर हैदराकडे पळून जाण्याचे मोरोबाचे बेत चालले. नानास सर्व बातमी होतीच. जून ता. २२ रोजीं हरिपंत व परशुरामभाऊ मोरोबाचे गोटावर चालून गेले. त्याबरोबर मोरोबा गर्भगळित होऊन सिंदेहोळकरांच्या विनवण्या करूं लागला कीं, 'कसेंही करून माझे प्राण वांचवा. मी दुसरें कांहीं मागत नाहीं. नाना सांगतील तेथें राहण्यास मी कबूल आहें.' त्याप्रमाणें सरदारांनीं एक दिवसाचा वायदा केला आणि मोरोबाचे गोटाभोंवतीं चौक्या बसविल्या. दोन तीन दिवस वाटाघाट होऊन ता. २७ जून रोजीं शिक्केकट्यार व जरीपटका नानाजवळ आला, आणि मोरोबा जाऊन बहुलास राहिला. परंतु तेथेंही त्यानें नवीन खेळ चालविले. तेव्हां त्याजवर फौज पाठवून ११जुलईस त्यास धरून पुण्यास आणिलें. त्याच दिवशीं नारो गणेश व बजाबा यांसही पकडिलें. ता. २८ जुलई रोजीं मोरोबाची रवानगी नगरचे किल्ल्यावर झाली. या एकंदर प्रकरणाचा गोषवारा थोडक्यांत एका पत्रांत आहे तो असा. 'फाल्गुनमासीं मोरोबा फडणीस वाफगावांस जाऊन तेथून होळकर फौज मुद्धां, व स्वतःची फौज पांच हजार पावेतों व बजाबा पुरंदरे, चिंतो विठ्ठल ऐसे पुण्यास येऊन तेथील शिक्काकट्यार व निशाण घेऊन पुढें सासवडावर मुक्काम केला. मध्यस्त सखारामबापू, कृष्णराव बल्लाळ व माधवराव जाधवराय ऐसे येऊन, नानाफडणीस व ह्यांनीं एकविचारें कारभार करावा ऐसें ठरविलें. त्याप्रमाणें कांहीं चाललें नाहीं. चैत्र व वैशाख दोन महिने तसेच रोखानें गेले. पुढें हरिपंत फौज सुद्धां कर्नाटकांतून व सिंदे कोल्हापुराहून आले. तेव्हां मसलत ठरून यांचा त्यांचा बिघाड पडोन, मोरोबास

नगरचे किल्ल्यांत ठेविलें. इंग्रजांचें पारिपत्य उभयतां सरदारांनीं करावें, आणि बापू व नाना यांनीं फौजेसुद्धां कर्नाटकांत जावें. असा मजकूर ठरला. दसरा आल्यावर डेरेदाखल होणार. '*

परंतु नगर येथेंही मोरोबानें फितूर केला. तेथील किल्लेदार माधवराव नगरकर यांनीं चारदोघांचीं डोचकीं मारून लगोलग बंदोबस्त केला. मोरोबाचा आचारी येसोबा म्हणून कऱ्हाडा ब्राह्मण शिवनेरीवर होता. त्यानें शिवनेरी किल्ला हवालीं केला नाहीं. उलट सेप्टेंबरांत त्यानें आजूबाजूच्या कोळ्यांस उठवून धूम मांडिली. चिंतो विठ्ठलाचीं मुलेंमाणसें पुण्यांत होतीं तीं नोव्हेंबरांत पळून गेलीं. नरसो गोविंद बोंधले करकंबचा ठाणेदार कैदेंत होता. त्यास मोरोबानें सोडलें होतें. त्यानें पुनरपि बंडाळी चालविली. तेव्हां पुनः पकडून कैदेंत टाकलें. मोरोबाचाही पक्का बंदोबस्त नगर येथें करण्यांत आला. 'मोरोबा आमदानगरहून निघोन गेले म्हणोन बाजारू वर्तमान उठलें आहे. परंतु अशा गोष्टी कशा घडतील ! बंदोबस्त चांगला आहे.' असें ता.२५-३-१७८० चें पत्र असून त्याच वेळचें दुसरें पत्र असें आहे कीं, सखारामपंत व मोरोबा यांजकडील सांसर्गिक लोक, त्यांजवर तसदी न करितां कृपा केली होती. त्यांनीं वाड्यांत थोडासा फितर केला. तो समजतांच विष्णु नरहर वगैरे चार लुच्चे होते त्यांस धरून बंदोबस्त केला.

सेवकरामाचा मुलगा गुलाबराय मोरोबाचे बंडाळ्यांत सामील होता, सबब त्यास कैद केलें होतें. त्याबद्दल सेवकरामानें रदबदल केली आणि त्याची रवानगी कलकत्त्यास सरकारी कामावर केली, तेव्हां गुलाबराय यास अटकेंतून सोडण्यांत आलें. (ता. २६-४-१७७८, स. मा. रो. ४७७, खंड १९-८५-८९, खरे २४२५,-३२ ).

**५. मोरोबाच्या प्रकरणाचें ऐतिहासिक व राजकीय महत्त्व.**— पुण्यांत मोरोबा दादाचें नांव निदान त्याच्या वाड्यावरून मशहूर आहे. नगरच्या किल्ल्यावर त्याचीं बावीस वर्षें कैदेंत गेलीं. त्याच्याबद्दल हळहळणारे पुष्कळ लोक होते. त्यास सोडवून कामांत घ्यावा असे विचार अनेकांच्या मनांत येत. पण नानानें तें कधीं मानलें नाहीं. मात्र त्याचे हालही

* खरे २३८०-९८; स. मा. रो. ९८१, खंड १०-१९४.

कधीं होऊं दिले नाहींत. त्याच्या मुलामाणसांचा परामर्ष नाना जातीनें घेत असे. ता. २५-११-१७७९ च्या एका कागदांत खालील उल्लेख आहे. 'नाना ग्रहणासाठीं भीमेस गेले. मोरोबाच्या पुत्राच्या पोटांत कावीळ झाली सबब नानांनीं जाऊन तुळा केली.' ता. १३-३-१८०० रोजीं नाना फडणीस मरण पावला, त्यास मुलगा नसल्यामुळें त्याचें उत्तरकार्य मोरोबाचे मुलानें पुण्यास केलें. मृत्युपूर्वी म्हणजे स. १७९८ च्या पावसाळ्यांत नाना फडणिसानें मोरोबास नगरहून काढून त्रिंबकास ठेविलें व तेथून मोकळें करून जुन्नरास ठेविलें. नानाच्या मृत्यूनंतर ता. २३-६-१८०० रोजीं बाजीरावानें मोरोबास आपल्याजवळ हत्तीवर बसवून पुण्यांत समारंभानें आणून दसऱ्यापासून तेरीख घालावयास सांगितलें. पण त्याजवर बाजीरावाचा विश्वास नव्हताच. एक दोन वर्षे उगाच नादीं लागल्यावर, बाजीरावास पेशवाईवरून काढण्यांत मोरोबाचें अंग असल्याचें उघडकीस आलें, तेव्हां स. १८०२ सालीं त्यास बाजीरावानें पुनः घनगडचा कैद दाखविली. पुढें यशवंतराव होळकरानें पुणें ताब्यांत घेतल्यावर मोरोबास घनगडाहून आणून कारभार सांगितला. ता.२८-८-१८०३ रोजीं मोरोबा पुण्यास मृत्यु पावला, तेव्हांच तो इहलोकच्या अपेष्टांतून सुटला.†

भानूंच्या घराण्यांत नाना व मोरोबा हे उत्तर पेशवाईतले दोन प्रसिद्ध पुरुष. अनिश्चित स्वभावामुळें मोरोबास यश आलें नाहीं. सखाराम हरीवरसुद्धां कारभाऱ्यांची एवढी इतराजी होण्यास कारण मोरोबा. पुरंदरचे तहावर सखाराम हरीची सही होती असें फॉरेस्ट व किंकेड सांगतात. स. १७७८ त मोरोबाच्या हातीं कारभार येतांच त्यानें सखाराम हरीस कैदेंतून सोडलें असें दिसतें. पुढें मोरोबास शिक्षा झाल्याबरोबर सखाराम हरीसही घनगडावर सक्त कैद होऊन तेथेंच त्याचा हृदयद्रावक अंत झाला. कर्तबगार पुरुष कायद्याचे सपाट्यांत सांपडून फुकट गेल्याचीं उदाहरणें त्या वेळींसुद्धां पुष्कळ होतीं.

मोरोबाच्या कारस्थानास एवढें प्रचंड राष्ट्रीय महत्त्व येण्याचे अंतस्थ कारण सहसा कोणाचे लक्षात येत नाहीं. हा केवळ दोघां भावांत अधिकारासंबंधीं तंटा होता, अशी सामान्य समजूत आहे. पण खरा प्रकार असा नाहीं.

† ग्वा. ४-९३, पे. अ. पृ. ४९-५०-५६-९७-१०५-१०८-११८; ख. २५१४.

मोरोबा सर्वस्वी मॉस्टिनचे मुठींत होता. मॉस्टिन त्याला थापा देऊन आपल्या राष्ट्राचा कसा फायदा करीत होता हें मोरोबास उमगलें नाहीं. 'फ्रेंच वकिलास आणून तुम्ही आपलें निष्कारण नुकसान करितां. आम्ही इंग्रज तुमचें हित पाहणारे आहों. आमचीं वचनें वज्रप्राय अटळ आहेत. दादास पेशवाई पदावर बसविण्यापलीकडे आमचा कांहीं एक हेतु नाहीं.' अशी मॉस्टिननें मोरोबाची समजूत केली. पण याचे मागें युरोपीय राजकारण होतें. फ्रेंच मध्यें घुसले तर आपणास हिंदुस्थानची सार्वभौम सत्ता मिळणार नाहीं, कदाचित् नाना, महादजी, हैदर हे सर्व एक झाले तर फ्रेंचांची मदत घेऊन ते आपणास येथून साफ उडवून देतील, अशी इंग्रजांस मोठी भीति होती. मोरोबा काय किंवा दादा काय, ते केवळ इंग्रजांच्या हातांत सर्वथा बाहुल्यासारखे वागतात. हा राष्ट्रीय डाव महादजीनें ओळखून नानाचीच सत्ता कायम केली. या कारस्थानांत महादजीनें नानास मदत केली नसती तर दादास पेशवाईवर आणून इंग्रजांनीं सर्व मराठे सरदारांशीं पृथक् पृथक् तह करून आपली सार्वभौम सत्ता याच वेळीं प्रस्थापित केली असती. मोरोबास जन्मभर कारागृहवास नानानें दाखविला त्याचें प्रयोजन एवढेंच, कीं पुनः कोणी राष्ट्रद्रोह करून आपली सत्ता परकीयांस विकूं नये. फ्रेंच वकिलांचें बुजगावणें आणून नानानें इंग्रजांचा डाव उलटविला. ही त्याची करामत अत्यंत प्रशंसनीय आहे. महादजीचा स्वभाव तडजोडीचा असल्यामुळें त्यानें तूर्त फ्रेंच वकिलास काढून दिलें; परंतु फ्रेंचांची युद्धपद्धति हस्तगत करण्याचा हेतु त्यानें मनांत सदैव कायम ठेविला. या दृष्टीनें या मोरोबाच्या प्रकरणाचा विचार व्हावयास पाहिजे.

मोरोबाचा कारभार २६ मार्च पासून ११ जुलईपर्यंत बरोबर साडेतीन महिने चालला; आणि त्याचें एकंदर कारस्थान त्यापूर्वी चार दोन महिने तरी धाटत होतें. तात्पुरता जरी या कारस्थानाचा निरास होऊन नाना फडणिसाचें आसन दृढ झालें, तरी त्यांत जी मराठी राज्याची घसरट सुरू झाली, ती कधींच थांबली नाहीं. या लहानशा प्रकरणांत मराठ्यांचा अंगस्वभाव, त्यांच्या कारभाराचें अस्थैर्य, व प्रत्येक व्यक्तीची स्वार्थमूलक रसीखेंच हे प्रकार उत्कटत्वानें निदर्शनास आले. महादजीनें नानाला पूर्ण पाठिंबा दिला, म्हणूनच या प्रसंगांतून नाना निभावला. परंतु असे हे फितूर पदोपदीं कां

उपस्थित होतात, आपल्या योजनेला प्रमुख मुत्सद्दी व सरदार नाखूष कां, याची मीमांसा नानानें केली नाहीं किंवा केली असली तरी तिचा योग्य बोध त्यानें पुढील कारभारांत घेतला नाहीं. शिंदे, होळकर, भोसले, मोरोबा वगैरे प्रमुख मंडळी कोणी राजी नाहींत, असें एक वाक्य दादाचे पत्रांत आहे. त्याची जाणीव नानास होती. प्रत्यक्ष सखाराम बापूशीं सुद्धां त्याचें पटलें नाहीं. नानाचा सर्वांत मोठा व्याप म्हणजे फितुराच्या बातम्या काढणें. एकदां अविश्वासाच्या जाळ्यांत गुरफटून कोणताही राज्यकर्ता हेरांनीं आणिलेल्या बातम्यांवरच आपला कारभार चालवूं लागला, म्हणजे त्यास सर्व जग विकृत दिसूं लागतें. नारायणरावाचे वधानंतरच हा प्रकार मुख्यतः सुरू झाला. त्यापूर्वी कोणत्याही पेशव्यास किंवा छत्रपतीस कोठेंही निर्भयपणें संचार करण्यास भय वाटत नसे. नानाला मात्र हें भय पदोपदीं दिसत होतें; आणि त्याच धोरणानें त्यानें आपल्या बचावाची सिद्धता ठेविली होती. आरबांचा व गार्द्यांचा पहारा तो नेहमीं जवळ बाळगी; म्हणजे स्वजातीय मराठे लोकांवर त्याचा विश्वास नसे. म्हणूनच नारायणरावाचा वध हे भाडोत्री गार्दी करूं शकले. स्वतःच्या बचावासाठीं परकीयांवर अवलंबून राहण्याची राज्यकर्त्यांस अवश्यकता वाटूं लागते, तेव्हां विनाशकाळ जवळ येऊन ठेपला असेंच इतिहास सांगतो. रघुनाथराव राज्यास नालायक म्हणून त्यास काढण्यासाठीं बारभाईचें मंडळ अविच्छिन्न चालविणें नानाचें पहिलें कर्तव्य असून, त्यांतच राज्याचें कल्याण होतें. मोरोबास किंवा सखाराम बापूस या मंडळांतून काढल्यावर त्यांचे जागीं दुसरे गृहस्थ दाखल केले पाहिजे होते. महादजीला कारभारांत प्रमुखपणा पाहिजे होता, आणि तशी त्याची अष्टपैलू योग्यता होती ही गोष्ट नाना जाणून होता. असें असतां त्यानें सर्व कारभार केवळ आपल्या एकतंत्री मुठींत आणिला, हें पुढील विनाशाचें बीज होय. मोरोबाचा फितूर हें रोगाचें केवळ एक लक्षण होतें, प्रत्यक्ष रोग कांहीं तो नव्हता. रोगनिवारणाचा उपाय नानानें केला नाहीं. प्रत्येक व्यक्तीच्या अंगांत कांहीं ना कांहीं गुण व पराक्रम होता. त्या प्रत्येकाच्या गुणाचा राष्ट्रकार्यांत उपयोग होईल अशी योजना निर्माण करण्याऐवजीं, नानानें असंख्य लोकांस तुरुंगवासांत डांबून ठेविलें. वास्तविक राज्यकारभाराचें चातुर्य किंवा शहाणपण याचा अर्थच उत्तर मराठशाहींत विकृत झाला होता.

दुसऱ्यांचीं छिद्रें बाहेर काढणें, आणि वाममार्गानें विरोधकांचा पाडाव करणें, या गोष्टीस मोठी किंमत हळू हळू येत गेली. मोठमोठ्या सरदारांचा कारभार पाताळयंत्री कारभाऱ्यांच्या हातांत असे. भोसल्यांचा दिवाकर पुरुषोत्तम व होळकरांचा नारो गणेश, या दिवाणजींशिवाय धन्यांनें क्षणभर चालत नसे. सखाराम बापू त्याच कोटींतला. प्रत्येकाची हाव हीच, कीं आपल्या धन्यास व बाहेरच्या दरबारांस वाटेल तसें नाचविण्यास मिळावें. आपल्या एकट्याच्या मर्जीनुरूप सर्व जग चालावें. अशी प्रत्येकाची महत्त्वाकांक्षा. कारभाऱ्यांचे हातांत नाचला नाहीं एक महादजी. बाळाराव गोविंद, राणेखान वगैरे त्याचे अनेक सल्लागार उच्च कोटींतले, राज्याचें हिताहित पाहणारे होते, केवळ इतरांसारखे आपमतलबी नव्हते. ही गोष्ट ग्वाल्हेरच्या पत्रव्यवहारांत स्पष्ट होते. जगांत माणसें चांगलीं व वाईट चहूंकडे नेहमींच असतात. उपयोग करून घेणारा असेल त्याप्रमाणें त्यांची कामगिरी वटते. असो. मोरोबाच्या कारस्थानांत मॉस्टनचा डाव साधला नाहीं, तेव्हां त्यानें पुढें मुंबईकरांस भर देऊन खुद्द पुण्यावर चाल करविली तो भाग आतां सांगावयाचा आहे.

---

प्रकरण पांचवें

# इंग्रजांची पाचर तळेगांवावर निसटली

## जानेवारी १७७९



१. गॉडर्डनें केलेलीं हिंदुस्थानचीं दोन उभीं छकलें, ( जून-डिसें. १७७८ ).
२. बारभाई व हेस्टिंग्स यांचे दरम्यान नागपुरकर भोसल्यांची त्रेधा.
३. इंग्रजांचा मारा म्हणजे अस्वलाच्या गुदगुल्या.
४. इंग्रजांची पुण्यावर चढाई.
५. तळेगांवावर इंग्रजांचा कोंडमारा.

* * * *

**१. गॉडर्डनें केलेलीं हिंदुस्थानचीं दोन उभीं छकलें,— ( जून-डिसेंबर १७७८ ).**—सन १७७७ च्या उन्हाळ्यांत नानानें पुण्यांत

आणलेला सेंटल्यूबिन हा खरोखरचा फ्रेंच सरकारचा वकील नसून भोंदू होता, ही गोष्ट येथील इंग्रजांस माहीत असून, 'चौल बंदर व फ्रेंचांचा धाक ही केवळ मुद्दाम हूल उठविलेली होती,' असें खुद्द बर्कनें आपल्या भाषणांत पुढें सांगितलेलें आहे.* फ्रेंचांचा प्रतिकार करण्यासाठीं मुंबईकरांचे मदतीस कलकत्त्याची फौज पाठविण्याचा प्रश्न कौन्सिलांत आला, त्यास हें कृत्य पुरंदरतहाचे विरुद्ध आहे असें सांगून फ्रॅन्सिस व व्हेलर यांनीं हरकत घेतली, तेव्हां त्यांस हेस्टिंग्सनें ता. २३-२-१७७८ रोजीं जबाब दिला तो असा:—'माझें कायम मत मी या कागदांत अनेकवार नमूद केलें आहे, कीं हिंदुस्थानांत पुनरपि आपलें बस्तान बसविण्याचा प्रयत्न फ्रेंच लोक करतील तर तो आरमाराच्या जोरावर आमच्याशीं लढून सफळ होणार नाहीं. मात्र एखाद्या हिंदी सत्ताधीशाच्या मार्फत आपलें एखादें ठाणें किनाऱ्यावर मजबूद स्थापून तेथून ते आपलें वर्चस्व वाढवितील. असे हिंदी सत्ताधीश त्यांच्या उपयोगी पडणारे दोनच, एक हैदर किंवा दुसरे मराठे. फ्रेंचांशीं सख्य करून हैदर आपला फायदा करील, पण त्यांच्या कह्यांत तो जाणार नाहीं. परंतु मराठ्यांचा सध्यांचा पेंच निराळा आहे. त्यासाठीं ते फ्रेंचांशीं गोडी करण्यास हयगय करणार नाहींत. त्या कामीं वाटेल तें नुकसान सोसण्यास ते तयार होतील. माझी अशी खात्री आहे कीं, एक हजार लढाऊ युरोपियन व दारूगोळा घेऊन फ्रेंच लोक इकडे आले आणि त्यांस पश्चिम किनाऱ्यावर एखादी जागा मिळाली तर ते ताबडतोब हिंदी फौजा तयार करून त्यांच्या साह्यानें येथील सर्व सत्ताधीशांस आपल्या कबजांत आणूं शकतील. तेणेंकरून बंगाल्यांत सुद्धां आपला निभाव लागणार नाहीं. अशी जागा त्यांस हल्लीं चौल येथें मिळाली आहे, म्हणूनच हें संकट निवारण्यासाठीं येथून मुंबईकडे फौजा पाठविण्याचा मी एवढा अट्टाहास करीत आहें. मुंबईकरांस आम्ही इकडून भरपूर मदत केली तर फ्रेंचांचें तिकडे कांहीं चालणार नाहीं. तिकडच्या या मोहिमेची तपशीलवार व्यवस्था आजच येथून ठरवून देणें शक्य नाहीं. बऱ्याच गोष्टी मराठ्यांच्या हालहालींवर अवलंबून राहतील. म्हणून आपण येथून नुसती फौज पाठवावी आणि पुढील मोहीम मुंबईकरांवर सोंपवावी. पण आमची मदतच न गेली, तर

* Burke's works vol 5, P. 5; Forrest's Imperial Series, vol 2 p. 593.

मुंबईवाले तरी काय करतील ! सबब माझी अशी शिफारस आहे कीं आमची या बाजूची सर्व फौज काल्पीवर जमवून तेथून बऱ्हाणपुरास रवाना करावी. बऱ्हाणपुरपावेतों या फौजेस मध्यें कोणी विरोध करण्याचा फारसा संभव नाहीं. पुढें ही फौज पुणें, मुंबई, सुरत, भडोच वगैरे जरुरीप्रमाणें पाहिजे तिकडे जाईल. तें पुढील काम मुंबईवाले ठरवितील.'

यावरून पुरंदरच्या तहाविरुद्ध हेस्टिंग्जनें ही फौज पाठविली आणि पुनः मराठ्यांशीं युद्ध सुरू केलें हें उघड होतें. तसेंच युरोपीय फौज आणून फ्रेंच लोक आपली सत्ता येथें स्थापतील, हा जो हेस्टिंग्जचा अंदाज तो महादजीनें ओळखून पुढें डी बॉयनला नोकरींत घेऊन स्वतःच्या फौजा निर्माण केल्या, हेंही ओघानेंच लक्षांत येतें.

मुंबईकरांचे मदतीस कलकत्त्याची फौज पाठविण्यास आणखी एक कारण असें झालें, कीं स. १७७४ पासून अमेरिकेंतील वसाहतींशीं इंग्रजांचें युद्ध चालू असून, त्यांत थोडथोडी इंग्लंडासच हार खावी लागत होती. साराटोगा येथें उभयतांची एक निकराची लढाई होऊन तींत ता. १८-१०-१७७७ रोजीं इंग्रज सेनापति बर्गायन यास अमेरिकन सेनापति गेट यानें सर्व फौजेसह पकडून घेतलें. याच प्रसंगानें त्या युद्धाचा अखेर निकाल लागला. या अपयशाची बातमी इंग्लंडांत पोंचून ती १५-१२-७७ च्या लंडन गॅझेट पत्रांत प्रसिद्ध झाली. ती पुढील उन्हाळ्यांत मुंबईस येऊन ता. ११-६-१७७८ रोजीं कलकत्त्याचे कौन्सिलास मिळाली. त्यापूर्वीच ता. २०-३-१७७८ रोजीं युरोपांत इंग्लंड व फ्रान्स यांचें युद्ध सुरू झालें, त्याची बातमी सुद्धां लवकरच म्हणजे ता. ७-७-१७७८ रोजीं कलकत्त्यास येऊन पोंचली. तेव्हां या विषयासंबंधानें कौन्सिलांत चार दोन महिने अत्यंत निकराचे वाद झाले. हेस्टिंग्स व बार्वेल यांचें म्हणणें असें पडलें, कीं 'इंग्लंडास जें नुकसान निरनिराळ्या ठिकाणीं पोंचत आहे, तें आपण हिंदुस्थानांत हरतऱ्हेनें भरून काढण्याचा जोरानें प्रयत्न करावा. ह्या कामीं कितीही अडचणी आल्या किंवा पैसा लागला, तरी आपण येथें इंग्लंडची बाजू राखावी.' याचे उलट व्हेलर व फ्रॅन्सिस यांचें म्हणणें असें पडलें, कीं 'हिंदुस्थानांत निष्कारण युद्धप्रसंग अंगावर घेऊन इंग्रजांच्या अडचणी वाढवूं नयेत. एकदम पुष्कळ शत्रूंशीं सर्व देशाच्या दूरदूरच्या भागांत युद्ध चालविण्याचें सामर्थ्य आपणास नाहीं. उगाच पैशाचें मातेरें होऊन त्यांत सर्वत्र फजिती

झाल्याशिवाय राहणार नाहीं.' हेस्टिंग्स यास जादा मत देण्याचा अधिकार असल्यामुळें त्यानें आपला हेका सिद्धीस नेला. 'संकटसमय म्हणजेच खऱ्या शौर्याची परीक्षा,' हें तत्त्व त्यानें प्रतिपादिलें, आणि त्याचाच अंगीकार करून मराठ्यांशीं निकराचा सामना केला. मात्र त्याचा अंतीं कांहीं एक उपयोग न होतां, इंग्रजांसच हार खावी लागली.

युरोपांत इंग्रज-फ्रेंचांचें उघड युद्ध सुरू झालें तें हेस्टिंग्सच्या चांगलेंच पथ्यावर पडलें. त्यानें लगोलग फ्रेंचांच्या चंद्रनगरवर चढाई करून ता. १०-७-७८ रोजीं तें ठिकाण हस्तगत केलें; आणि दक्षिणेंत मद्रासकरांनीं १६-१०-७८ रोजीं पॉंदिचरी जिंकून घेतली. पश्चिम किनाऱ्यावर माहे म्हणून एक मजबूद ठिकाण फ्रेंचांचें होतें तें वेढा घालून इंग्रजांनीं ता. १०-५-१७७९ रोजीं घेतलें, त्यामुळें हैदरास फ्रेंचांकडून शस्त्रास्त्रें व दारूगोळा मिळत होता तो बंद पडला, आणि त्यामुळें त्यानें इंग्रजांवर उघड शस्त्र धरिलें.

पुरंदरच्या तहास दीड दोन वर्षें होऊन गेलीं तरी उभय पक्षांतील तेढ कमी होईना. राघोबास मुंबईकर हवालीं करीनात व पुण्यास फ्रेंच वकील येऊन बसला, येणेंकरून दोनही पक्ष उत्तरोत्तर वर्दळीस येऊं लागले. या धरसोडीचा निकाल लावण्याच्या बुद्धीनें हेस्टिंग्सनें मुंबईकरांच्या मदतीस बंगालची फौज पाठविण्याचा निश्चय केला. ता. २६-२-१७७८ च्या पत्रांत त्यानें मुंबईस कळविलें कीं, "आम्ही काल्पीजवळ यमुनेच्या कांठीं मोठी फौज कर्नल लेस्लीच्या हाताखालीं तयार केली आहे. काल्पीवरून या फौजेनें सोयीचा मार्ग काढून मुंबईकडे जावें आणि पुढें तुमच्या हुकमतींत वागावें. मराठ्यांचे दरबारीं फ्रेंचांचें वजन वाढूं दिलें तर त्यापासून कंपनीचे हितास मोठाच धोका पोंचणार आहे. चौल बंदरावर एकदम हल्ला करण्याची तुमची सूचना, हल्लींच्या आपल्या कठीण स्थितींत आम्हांस मंजूर करतां येत नाहीं. मात्र पुणें दरबारांतून आणखी एखादा नवीन उपक्रम आपल्या विरुद्ध होईल तर त्याचे प्रतीकारास्तव तुम्हीं राघोबाशीं पाहिजे तसा नवीन ठराव करण्यास आमची परवानगी आहे." यावरून उघड होतें कीं मोरोबाचें कारस्थान हें मुंबई-करांनीं बारभाईविरुद्ध नवीन शस्त्र उगारलेलें होतें. म्हणून पुरंदरच्या तहानें बंद पडलेला वैरभाव स. १७७८ च्या मार्चांतच पुनः सुरू झाला असें म्हणण्यास हरकत नाहीं. काल्पीवरून मराठी हद्दींतून इंग्रज फौज दक्षिणेकडे चालूं लागली

तेव्हांच इंग्रजांनीं तह मोडिला. मुंबईकरांचा व वरील फौजेच्या अधिकाऱ्यांचा पत्रव्यवहार चालू झाला. बंगालच्या फौजेस मार्ग देण्याचीं दस्तकें सुद्धां मॉस्टिननें पुण्यास मागितलीं. कर्नल लेस्लीनें प्रथम सुरतेस यावें अशी मुंबई-करांनीं सूचना पाठविली. 'उत्तर हिंदुस्थानांतील जमीनदार वगैरे लोक मराठी अंमलास अतिशय कंटाळले असून, बहुधा इंग्रज फौजेस वाट मिळण्यास अडचण पडणार नाहीं,' अशीच हेस्टिंग्सची अटकळ होती.

पुढें मोरोबाचे हातीं कारभार आल्यावर मुंबईचे कौन्सिलनें २१-७-१७७८ रोजीं राघोबास पुण्यास घेऊन जाण्याचा ठराव केला. मात्र पर्जन्य कमी होतांच स्वारी निघावयाची होती. मध्यंतरीं मोरोबाचा पाडाव करून नानानें इंग्रजांवर डाव उलटविला. तेव्हां कळलाव्या मॉस्टिन पुढील विचाराकरितां पुनः ऑगस्टांत मुंबईस गेला. ता.१२-१०-१७७८ रोजीं मुंबई कौन्सिलनें मॉस्टिनशीं समक्ष वाटाघाट करून ठरविलें कीं, राघोबास पुण्यास घेऊन जाण्याचा पूर्वीं ठरविलेला बेत एकदम अंमलांत आणावा.

माळव्यांतून दक्षिणेंत जाणाऱ्या फौजेस हेस्टिंग्सनें मराठ्यांचे परवाने मागितले, तेव्हां ही फौज आम्ही फ्रेंचांचे प्रतीकारास्तव पाठवीत आहों, असा त्यानें बहाणा केला. परंतु नाना फडणिसास हा सर्व व्यूह बरोबर ठाऊक होता. त्यानें उलट विचारिलें, 'आजपावेतों इंग्रज फौजा जलमार्गानें दक्षिणेंत येत असतां आतांच खुष्कीनें ती पाठविण्याची गरज काय?' इंग्रज फौज पुढें येऊं लागली, ही नानानें भावी धोक्याची सूचना मानिली. याच वेळीं दक्षिणेंतही हैदरानें मराठ्यांविरुद्ध प्रलय मांडिला. तुंगभद्रेच्या दक्षिणेकडील सर्व प्रदेश घेऊन, पुढें येऊन त्यानें धारवाड सुद्धां हस्तगत केलें. नानानें त्याजवर चालून जाण्याची सिंदे होळकरांस सूचना केली, ती त्यांनीं मानिली नाहीं. दोघेही रुष्ट होते. कामगिरीवर जाईनात व फौजेस रजा देईनात. त्यामुळें हरिपंत व परशुरामभाऊ यांनाही पुण्यास फौजा घेऊन राहणें भाग पडलें. नाना व बापू यांचा समेट झाला, तरी त्यांचीं मनें परस्परांविषयीं शुद्ध नव्हतीं. स. १७७८ च्या पावसाळ्यांत मराठी लष्करानें पुण्यासभोंवारचा मुलूख खाऊन फस्त केला. पावसाळा कमी होतांच हरिपंत व परशुरामभाऊ कर्नाटकांत निघणार, तोंच मुंबईकर इंग्रज पुण्यावर चालून येणार अशी गडबड ऐकूं आली. या सालीं गणेश चतुर्थीचा उत्सव शनिवारवाड्यांत विशेष थाटानें करण्यांत आला.

पूर्वी चार वर्षे तो बेताचाच झाला होता. 'उत्तरेकडून इंग्रज येतात, मनसबे घाटतात, ताल तर्तूद दिसत नाहीं. वृद्धाची बुद्धि स्थिर नाहीं. नाना सिंद्यांच्या साधनांत आहेत.' असें एका पत्रांत आहे.

इंग्रज फौज येण्यासंबंधानें आनंदीबाई मंडलेश्वराहून ता. २-९-१७७८ च्या पत्रांत सखारामबापूस लिहिते, 'बुंदेलखंडांत इंग्रजांचे दोन कंपू आले आहेत. हुजूरचीं (म्ह० दादांचीं) पत्रें जाऊन हे इंग्रज आले. जबरदस्त आहेत. त्यांचें यांस बोलणें कीं आपणांस दौलतीवर बसविणें, आम्हांस राहण्यास जवळ जागा द्या; व दहा हजारपर्यंत आमची फौज ठेवा. ही गोष्ट हुजूरांस कठिण वाटली. परंतु रानोमाळ हिंडावें, त्यापेक्षां त्यांहीं श्रमेंकरून कबूल केलें. असे इंग्रज घरांत येऊं पाहतात. तमाम अंमल आपले बसवितात. आम्ही निमित्तमात्र, पण तेच दौलतेस गिन्हाईक होतात. लखनौचे शुजाउद्दौले व अर्काटचे महंमदअली यांच्या घरांत प्रथम हे इंग्रज नम्रतेनें पायरव करून आतां उभयतांस पोटापुरतें देऊन आपण धनी झाले, तसेंच आमच्या घरांत होईल. सर्व गोष्टी तुम्हांस ठाऊक असोन हल्लीं या तऱ्हा दिसतात. हुजूरची मर्जी कोण्या तऱ्हेनें समजाविल्यानें नीट राहते, कोण्या तऱ्हेनें बिघडते, यास तुम्ही माहीत आहां. काळच विपरीत आले. परंतु आम्हांस हाच भरंवसा आहे कीं, तुम्ही कालचक्रासही फिरवाल. म्हणून तुम्हांस पत्र लिहिलें आहे. तरी ब्राह्मणी दौलत नीट राहून, हुजूरचाही संतोष राहून बऱ्या होतील त्या गोष्टी कराव्या. नाहीं तर जन्मभर चांगलें केलें आणि म्हातारपणीं इंग्रजांच्या घरांत ब्राह्मणी दौलत घातली, हें अपेश येई तो अर्थ न करावा. हुजूर ऐकत नाहींत असें म्हणाल, तर त्यांचे तुम्ही प्राण घेतां किंवा पेंचांत आणतां, त्या पक्षीं काय होईल तें हो, तुमचे हातीं नच लागावें हा निश्चय आहे. कोणासही पेंच सोसत नाहीं. विशेष लिहावें तरी तुमचे दशांशही आम्हांस समजत नाहीं. यशापयशाचे धनी तुम्ही. आम्ही लिहून विशेष तों नाहीं. तुम्ही मोजीतही नाहीं. परंतु अंदाज दिसत चालला यास्तव सूचना लिहिली आहे. पूर्वी तुम्हांस दोन पत्रें पाठविलीं त्यांचें उत्तर आलें नाहीं. पत्रें पोंचलीं कीं नाहीं नकळे. नवी भावजय लाडकी केली तिचें नांव काय ठेविलें व दुसरी कधीं करायची हा मजकूर त्यांत विशेष होता. तर उत्तर पाठविणें.' (ऐ. टि. १-१९; खरे २४१७-२४२१).

या पत्रावरून आनंदीबाईची धूर्तता विशेष दिसून येते. तिचा बापूशीं पत्रव्यवहार असून, अशामुळेंच नानास क्षणोक्षणीं बापूचा संशय येई. याच मितीचें बाईचें पत्र नानासही अशाच मतलबाचें आहे. ‘तुम्ही तीन पिढ्यांचे दौलतेंतील फडणीस असोन, हल्लीं फितुरांनीं ब्राह्मणी दौलत यवनाक्रांत होऊं पाहते. तुमच्या चित्तांतील उगीच आटी जात नाहीं. याचा बारीक मोठा विचार तुम्हींच करणें. आम्ही तेथें तुमच्या स्वाधीन. पावणेदोन वर्षें जालीं. तुमची कार्यसिद्धि कांहींच न जाली. तुमची फौज गुंतून, आमचा धन्याचे पायाशीं वियोग, हें उभय पक्षीं नुकसान. आम्हास मुंबईस पोंचविणें.’ पत्रें खुद्द आनंदीबाईच्या हातचीं आहेत, त्यावरून विचार व भाषा दोनही तिचेच असावे. पत्रांवरून तिची योग्यता आजमावतां येते. तिच्या आक्षेपकांनीं या पत्रांचें मनन करावें.

मराठे व शुजाउद्दौला यांच्या प्रदेशांची हद्द यमुना नदी असून तिच्या दक्षिण कांठीं काल्पी हें मराठ्यांचें तटबंदीचें ठाणें सागरकर खेरांच्या ताब्यांत होतें. इंग्रज फौज यमुना ओलांडून काल्पीवरून बुंदेलखंडांतून व पुढें वऱ्हाड, खानदेशांतून मुंबईकडे यावयाची म्हणजे मुख्यतः सिंदे होळकर व भोसले यांच्या हद्दींतून तिला जावें लागे. म्हणून या ठिकाणच्या सत्ताधीशांस हेस्टिंग्सनें फौजेस वाट देण्याबद्दल आदरयुक्त पत्रें लिहिलीं. शिवाय या सर्वांचा मुख्य पेशवा त्याचीही यास परवानगी पाहिजे होती. हेस्टिंग्सनें अगोदरपासूनच भोसल्यांस व सिंदे होळकरांस गोडगोड पत्रें लिहून फौजेस वाट देण्याविषयीं त्यांचे परवाने मिळविले. पेशव्यांचे परवाने मोरोबा कारभारावर असल्यामुळें सहज मिळूं शकले. परंतु नानानें बाळाजी गोविंद खेरास निक्षून लिहिलें, कीं इंग्रजांच्या फौजेस आपल्या हद्दींतून वाट देऊं नये. दांडगाईनें जाऊं लागल्यास त्यांच्याशीं सामना करावा. इकडे हेस्टिंग्स यास नाना व बापू यांनीं लिहून कळविलें, कीं इंग्रजांच्या फौजा बंगालकडून दक्षिणेंत यावयाच्या म्हणजे समुद्रमार्गानेंच याव्या. जमिनीवरून येण्याचा शिरस्ता नाहीं, आणि परवानगी मिळणार नाहीं. स. १७७८ च्या मे महिन्यांत लेस्ली काल्पीवर यमुना उतरूं लागला, तेव्हां बाळाजी गोविंद व गंगाधर गोविंद या उभयतां बंधूंनीं जागोजाग नाकेबंदी करून त्याची त्रेधा उडवून दिली. तेव्हां लेस्लीनें काल्पीवरच निकराचा हल्ला केला आणि कैक दिवस लढून त्यानें काल्पीचा किल्ला हस्तगत केला. इतकें

झालें तरी मराठ्यांनीं इंग्रज सैन्यास पुढें जाऊं दिलें नाहीं. लेस्ली यास चार महिने काल्पीसच मुक्काम करून बसावें लागलें. तेथें बारा लक्ष रुपयांचा चुराडा मात्र उडाला. या संबंधानें कलकत्त्यास कौन्सिलमध्यें पुष्कळच चर्चा झाली आणि लेस्ली यास कमी करून त्याचे जागीं कर्नल गॉडर्डची नेमणूक झाली. परंतु बदलीचा हुकूम पोंचण्यापूर्वीच लेस्ली तापानें आजारी होऊन ता. ३-१०-१७७८ रोजीं मृत्यु पावला. तेव्हां ३ पलटणें घेऊन क. गॉडर्ड काल्पी अलीकडे जलालपुरास आला. बाळाजी गोविंद जवळपास आहे असें जाणोन गॉडर्ड रात्रीस निघाला, तों जासुदांनीं मार्ग भुलविला. अरण्यांत पाणी नाहीं तेथें पडले. कूल लोक तृषेनें व्याकुळ होऊन रानोरान झाले. आठ कोस रस्ता काढण्यास ११ तास लागले. रस्ता चुकल्यामुळें ३० मैल भटकावें लागलें. कॅप्टिन क्रॉफर्ड पाणी पाणी करून मेला. तसेंच कर्नल पार्कर, मेजर फुलर्टन, कॅ० ऍश, कॅ० मॉवर्स वगैरे ५० गोरे व ३०० गाडदी असे सर्व तडफडून मेले, (ता. ४-६-१७७८). पुढें कूच करून मुक्काम वेत्रवतीवर केला. पुढें न यावें तरी, शह खाऊन माघारे हालले असें होईल, याकरितां छत्रपुरास छावणी केली. इंग्रज निवळ दादासाहेबाकरितां येतात असें नाहीं. आणखी कांहीं घाट त्यांचे आहेत. गॉडर्डनें बुंदेले संस्थानिक वश करून हरप्रयत्नानें भेलसा भोपाळवरून हुशंगाबाद येथें नर्मदा गांठली. मागें बाळाजी गोविंदानें काल्पीसुद्धां आपला सर्व प्रदेश परत हस्तगत केला. गॉडर्ड ता. २-१२ रोजीं नर्मदा ओलांडून तो तेथेंच मुधोजी भोसल्याशीं बोलणें करीत दोन महिनेपर्यंत उगाच स्वस्थ बसला. नंतर मुंबईकरांचें त्यास निकडीचें बोलावणें पोंचल्यावरून तो २६ जानेवारीस नर्मदेवरून पुढें निघाला, तो ३० तारखेस बऱ्हाणपुरास पोंचला. तेथेंच त्यास तळेगांवावर इंग्रज फौजेची गाळण उडाली ती बातमी पोंचली. एक आठवडा विश्रांति घेऊन ता. ६ फेब्रुवारीस गॉडर्ड बऱ्हाणपुराहून निघाला तो वीस दिवसांत ३०० मैल चालून सुरतेस पोंचला. तोफखान्यासह केलेला हा तीनशें मैलांचा प्रवास त्या वेळच्या लष्करी इतिहासांत अत्यंत वाखाणला जातो. तसेंच या इंग्रज फौजेनें काल्पीपासून बऱ्हाणपुरपावेतों जी ही तीक्ष्ण पाचर मारली, तिच्या योगानें एकंदर देशाचीं दोन उभीं छकलें इंग्रज पाहिजे तेव्हां कशीं करूं शकतील, हेंही मर्मज्ञांच्या लक्षांत आल्याशिवाय राहिलें नाहीं. (खंड १०–१९१,१९४).

**२. बारभाई व हेस्टिंग्स यांचे दरम्यान नागपुरकर भोसल्यांची त्रेधा** ( १७७७–७८ ).—सेनाधुरंधर मुधोजीस तीन मुलगे, त्यांपैकीं रघूजी बापूसाहेब, त्यास जानोजीची बायको दयाबाई इचे मांडीवर दत्तक देऊन बारभाईंनीं सेनासाहेब सुभापद व नागपुरचें संस्थान दिलें. त्याचा जन्म सुमारें सन १७५७ चा $ असून वयांत येईपर्यंत त्याचा कारभार मुधोजी पाहत असे. दुसरा मुलगा खंडूजी चिमणाबापू दाजीसाहेब हा बरेच दिवस कटक प्रांताचे कारभारावर होता. याचा जन्म सुमारें १७६३ चा. धाकटा व्यंकोजी मन्याबापू नानासाहेब, हा मुधोजीचे पश्चात् सेनाधुरंधर झाला. खंडूजी हा अत्यंत धिप्पाड व बलाढ्य म्हणून नांवाजलेला शूर व धाडसी पुरुष होता. रघूजी हुशार व सर्वांवर हुकमत चालवून आपली छाप बसविणारा असून खंडूजी द्वाड, दांडगट, व वडील भावाची पर्वा न ठेवणारा असा धटिंगण होता. रघूजी सर्वज्ञ; सारा बंदोबस्त, मुत्सद्दी व सरदार लोक वडिलांचे हातचे, त्यांचा मनोदय राखून कारभार करी. अर्थात् रघूजी व खंडूजी यांचे कधींच पटलें नाहीं. हेस्टिंग्सनें या बंधूंचे स्वभाव ओळखून, खंडूजीस वश करून घेतलें. रघूजी व खंडूजी यांचा विरोध वाढत चाललेला पाहून मुधोजीस धास्ती पडली; आणि या कलहानें दौलतीचें नुकसान होऊं नये या उद्देशानें त्यानें या दोघां मुलांकडून शपथक्रियेचीं करारपत्रें ता. २९-१०-१७७९ रोजीं लिहून घेतलीं, तीं पाहण्यालायक असून त्यांवरून कौटुंबिक कलहांचे योगानें भोसल्यांची कशी दुर्दशा होत होती याचा अंदाज होतो. या बंधूंचा हा तंटा पेशवे दरबारापर्यंत गेल्याचें आढळून येतें. पेशवे व भोसले यांजमधील सवाल जबाबांचा एक कागद छापलेला आहे त्यांतील शेवटच्या कलमांत रघूजी कळवितो कीं, 'चिरंजीव खंडोजी भोसले जवांमर्द बेहोष आहेत. फौजबंदीची व सरदारीची उमेद हमेष राखितात. त्यास आळा होय आणि सरकारच्या व आमच्या उपयोगी पडत असा कांहीं बंदोबस्त परभारां करून द्यावा.' त्यावरून 'खंडोजी जवांमर्द सरकार उपयोगी हें जाणून मंडल्याचे सरंजामाचा अलाहिदा करार करून दिला आहे.' याप्रमाणें पेशव्यांनीं स. १७७९ त खंडो-

$ स. १७७७ च्या जानेवारींत वॉरन हेस्टिंग्स रघूजीचें वय १९ देतो म्हणजे त्याचा जन्म स. १७५७ च्या सुमारास असावा. ना. भो. ब. व का. ११, २०, २२, २९, ५७, ६०.

जीच्या खाजगी सरंजामासाठीं गढा मंडळ्याचे सात चांगले महाल व सेनाबहादरपद त्याजला दिलें. परंतु ही व्यवस्था यशस्वी झाल्याचें दिसत नाहीं. उभय बंधूंतील वितुष्ट वाढतच गेलें.

मुधोजीचा वकील वेणीराम पंडित ता. २३-११-१७७५ रोजीं हेस्टिंग्स यास लिहितो, 'मुधोजींचा कारभार दिवाकर पंडित पाहतात. त्यांच्यावर निजामाचा व पेशव्यांचा मोठा इतबार आहे. त्यांना मीं आपले सर्व थोर गुण वर्णन करून सांगितले, तेव्हां त्यांस मोठा आनंद झाला. मुधोजी महाराजांचे दोन गुन्हेगार राजाराम व श्यामराव धन्याशीं फितुरी करून लखनौस वजिराचे फौजेंत जाऊन राहिले आहेत, त्यांस आपण वजिराचे मार्फत परत मागवून महाराजांचे हवालीं कराल तर मोठे उपकार होतील.' यावरून दिसतें कीं वेणीराम हा मुधोजीजवळ हेस्टिंग्सचें संधान राखीत असे. (प. कॅ.४-२०६०.)

स. १७७७ च्या उन्हाळ्यापासून हेस्टिंग्सनें मुधोजी भोसल्यास अत्यंत गोड पत्रें लिहून, मराठमंडळांतून फोडण्याची अतोनात खटपट चालविली. 'तुमची तारीफ आम्हीं इंग्लंडचे राजाकडे केली आहे, त्यांच्याशीं एवढें सख्य ठेवण्याची तुम्ही इच्छा ठेवितां, याबद्दल आम्हांस मोठा संतोष होतो. तिकडून जबाब आल्यावर तुम्हांस कळवूं.' अशीं पत्रें मुधोजीस व दिवाकरपंतास हेस्टिंग्सनें वारंवार लिहिलेलीं आहेत. जयपुर वगैरे ठिकाणच्या रजपूत राजांना सुद्धां हेस्टिंग्सनें अशीं गोड गोड पण बिन जबाबदारीचीं पत्रें लिहून त्यांना इंग्रजांचे कच्छपीं लावून घेण्याचा प्रयत्न केलेला आढळतो. पेशवाई मिळाल्यावर बाजीराव जसा नर्मदेवर ठाणें देऊन पलीकडील औत्तरीय सत्ताधीशांस आमिष टाकूं लागला, तशाच प्रकारचा हेस्टिंग्सचा हा उपक्रम होता. बाजीरावाचें आद्यस्थान जसें पुणें, तसें हेस्टिंग्सचें कलकत्ता, आणि नर्मदाकांठ जसा बाजीरावाचें आघाडीचें कार्यस्थान, तसें इंग्रजांचें मर्यादास्थान प्रयाग-संगम अलाहाबाद. स्वतः हेस्टिंग्स बनारस लखनौपावेतों वारंवार खेपा घालून बादशाहासकट सर्व सत्ताधीशांस आपल्या जाळ्यांत ओढीत होता. हा त्याचा डाव ओळखूनच पुढें सालबाईच्या तहानंतर महादजीनें स्वतःचें धोरण कसें आंखिलें हें उत्तरोत्तर व्यक्त होईल.

स. १७७७ त 'हेस्टिंग्सनें दादांस कळविलें कीं, तुम्हांस गंगाथडीस जहागीर देतात ती घेऊन स्नानसंध्या करावी. श्रीमंत म्हणतात, 'आम्हांस एकंदर

यांचे अंमलांत राहणें नाहीं. श्रीकाशीस घेऊन जाणें. तेथें स्नानसंध्या करीत राहूं. त्यांस जर जलमार्गे आणावें तर ब्राह्मणत्व धर्म राहणार नाहीं. खुष्कीचे मार्गें एक दोन पलटणें सांगातें देऊन आणावें तर मार्गांत मराठे वगैरे सरदार आहेत त्यांनीं कुरापत केल्यास इंग्रजांचा जिमा पुरा पडणार नाहीं. दहा वीस पलटणें सांगातें देऊन आणावें, तर सहजच कज्जा उभा राहिला. सबब पुणेकरांनीं लिहून द्यावें कीं दादांस काशीस आणतांना आम्हांकडील सरदारांचा रतिमात्र उपसर्ग झाल्यास त्याची जबाबदारी आपल्यावर.' हें कबूल असल्यास इंग्रज दादास गुजराथ-उज्जन वाटेनें काशीस आणणार होते. त्यावर पुणेकरांनीं उत्तर दिलें, कीं 'दादांस काशीस आणावें असा करारच मुळीं तहनाम्यांत नाहीं. आम्ही कराराप्रमाणें वर्तणूक करूं.' असे किती तरी वाद दादाच्या संबंधानें झाले. एकूण दादा म्हणजे एक कोडेंच सर्वांस पडलें होतें. त्यास उघड हवालीं केल्यानें आपली इज्जत जाते असें इंग्रजांस वाटे; न हवालीं करावें तर युद्ध संपत नाहीं. तेव्हां सोक्षमोक्ष करण्यासाठीं युद्धाशिवाय त्यांस अन्य उपाय राहिला नाहीं. परंतु युद्धांत मराठे इंग्रजांस पुरे पडले.

पुरंदरच्या तहास अनुसरून युद्ध थांबविण्याची हेस्टिंग्सनें प्रथम बरीच उत्सुकता दाखविली, पण मुंबईकरांची भीड त्यास तोडवेना. दोन वर्षेपर्यंत त्यानें कसेंबसें युद्ध थांबविलें, परंतु मुंबई-पुणेकरांमधील चुरस कमी न होतां उलट वाढतच गेली. पुणेकरांनीं लेखी तक्रारी वाटेल तितक्या केल्या. त्यांचे लेख अत्यंत आवेशाचे व निर्धाराचे भासतात. इंग्लंडच्या बादशहासही त्यांनीं तेथील अधिकाऱ्यांच्या कागाळ्या खरमरित भाषेंत कळविल्या. असें पत्र परभारें बादशहाकडे न पाठवितां आपल्या मार्फत पाठवावें असें हेस्टिंग्सनें कळविल्यावरून त्यांनीं तें कलकत्त्यास पाठविलें. तें त्यानें ५-११-१७७७ रोजीं इंग्लंडास रवाना केल्याचा जबाब पुण्यास पाठविला. अशाच प्रकारचें दुसरें एक पत्र सवाईमाधवरावाच्या नांवानें स. १७८० त बादशहास लिहिलेलें उपलब्ध आहे. हीं दोन पत्रें खरे ले. २५७५ व ऐ. टि. १-३९ येथें असून, त्यांत इंग्रजांच्या आगळिकींचें मुद्देसूद व भरपूर वर्णन आहे. हेस्टिंग्सनें तर वरील दोन वर्षांत बाहेर बोलायचें एक व मनांतला डाव वेगळाच असा प्रकार चालविला; आणि एक वर्ष अनिश्चित स्थितींत काढून कौन्सिलांतील दोन प्रतिपक्षी मेल्यानें त्यास जोर येऊन हळूहळू त्यानें लढण्याची तयारी केली; आणि निजाम, हैदर,

भोसले, सिंदे, होळकर वगैरे सर्वांकडे पत्रें पाठवून भेदनीति चालविली. इंग्रजांच्या या वागणुकीमुळें मराठे सरदारांचें मात्र बरेंचसें ऐक्य झालें. मुधोजी भोसले यास पुण्याहून बाबूराव वैद्यानें लिहिलें कीं, 'सिंदे होळकरांचें ऐक्य चांगलें होऊन ते वाजद बरसाद हैदरावर जाण्यासाठीं पुण्यास येणार.' यावर मुधोजीनें ता. ९-८-१७७७ रोजीं परत लिहिलें, 'बाळाजीपंत नानांचें पत्र म्वदस्तुरचें विस्तारयुक्त आलें, तें अवलोकनीं घेऊन सर्व इच्छित अर्थ घडले हें समजोन संतोष जाहला. सांप्रत कोणताही गुंता राहिला नाहीं. मुख्य पंत प्रधान दैवशाली आणि नाना यांची एकनिष्ठता, त्यांचींच फळें श्रीनें दिल्हीं. यावर सर्व बंदोबस्त यथास्थित होऊन येतील.' ( खं. १०. १७८ ).

स. १७७७ त मुधोजी, दिवाकरपंत व ओरिसाचा कारभारी राजाराम मुकुंद पंडित यांच्याशीं हेस्टिंग्सनें पत्रव्यवहार सुरू केला, आणि भोसल्याचें मन वळविण्याकरितां आपले तीन वजनदार वकील एल्यट, जेम्स् ॲंडरसन व कॅ. कॅंपबेल असे ओढयाचे मार्गानें नागपुरास पाठविले. सातारचा रामराजा या वेळीं फार आजारी असून, त्याचे पश्चात् छत्रपतिपद मुधोजीस देऊन बारभाईंचे हातांतला डाव आपणच साफ उचलावा अशी हेस्टिंग्सनें खटपट केली. शांततेनें व्यापार करणाऱ्या कंपनीच्या या सूत्रचालकाचा हा सर्वथा भलताच उपद्व्याप ध्यानांत ठेवण्याजोगा आहे. ता. १३-८-१७७८ रोजीं कटकचा सुभा राजाराम पंडित यास खालील पत्र त्यानें लिहिलें. 'आमच्या तिघां वकिलांचा जो तुम्हीं आदर केला, त्याबद्दल तुमचे आभार मानावे तितके थोडेच होतील. तुम्ही आमच्याशीं स्नेहभाव ठेवितां हें तुमच्या धन्याचे इच्छेस अनुरूपच आहे.' ता. २९-१०-७८ रोजीं वेणीराम पंडितास हेस्टिंग्सचें पत्र गेलें त्यांतील मतलब. 'कॅ. लेस्लीच्या जागीं क. गॉडर्डची नेमणूक झाली असून त्यांना तुमच्या पत्रांतील सर्व आशय पूर्णपणें कळविला आहे. क. गॉडर्ड हे उदार व गोड स्वभावाचे असून, त्यांचा हा स्वभाव तुम्ही मुद्दाम मुधोजींच्या नजरेस आणा. तसेंच आमच्याशीं स्नेह ठेवून मुधोजी आमची सल्ला ऐकतील तर त्यांत त्यांचें किती कल्याण आहे हेंही तुम्हीं त्यांस नीट समजून द्यावें. ही फौज तिकडे पाठविण्याचे जे हेतु आहेत ते भोसल्या-कडून सिद्धीस नेण्यास तुम्ही मनापासून झटावें. तुम्ही आमचे अत्यंत अगत्य-वादी आहां हें मी पूर्णपणें जाणतों.'

वरील तीन वकिलांपैकी एल्यट हा फार हुशार होता, पण नेमल्या ठिकाणीं पोंचण्यापूर्वी वाटेतच ता. १२-९-१७७८ रोजीं तो मरण पावला. त्यामुळें त्याच्या हातून जें कारस्थान हेस्टिंग्स यास घडवून आणण्याचें होतें तें लांबणीवर पडलें. महादजी शिंद्यास खुलवून हेस्टिंग्सनें पत्र पाठविलें तेव्हां सिंद्याच्या मुनशीनें ता. १५-६-१७७८ रोजीं हेस्टिंग्स यास पत्र लिहिलें तें असें. 'आपलें पत्र वाचून त्यांतील सूचनांचा विचार महादजीबावांशीं केला. इंग्रजांशीं स्नेह जोडण्याचा विचार त्यांस अत्यंत पसंत आहे. आपलेकडून कोणी एखादा इभ्रतदार गृहस्थ येईल तर आपल्या प्रयत्नांस यश आल्याशिवाय राहणार नाहीं. ते इंग्रजांचा स्नेह पेशवे, होळकर वगैरे सर्वांशीं जुळवून देतील. मात्र येथें सरदारांत एकवाक्यता बिलकूल नाहीं. तथापि आम्ही प्रयत्न करीत आहों.'

आगाऊ परवानगी घेतल्यावांचून इंग्रज फौजा येऊन आपल्या मुलखांत शिरल्या आणि त्यांनीं काल्पीचें ठाणें हस्तगत केलें, याबद्दल ता. ७-९-१७७७ च्या पत्रानें पुणें येथील कारभाऱ्यांनीं तर त्यांचा तीव्र निषेध केलाच, पण महादजीनें सुद्धां आक्टोबर ता. २० स. १७७८ रोजीं हेस्टिंग्स यास पत्र लिहून कळविलें, कीं 'तुमच्या फौजा दक्षिणेंत येत आहेत त्या परत बोलवा, म्हणजेच तुमचा पुणें दरबाराशीं स्नेहभाव जुळेल. नाहीं तर स्नेह टिकणार नाहीं. एकवार ठरलेला तह उभयपक्षांनीं बिनतक्रार पाळावा यांतच शहाणपण आहे.' यावर ता. ९-२-१७७९ चा हेस्टिंग्सचा जबाब आला, कीं 'पुणें दरबारानें फ्रेंचांशीं सख्य केलें, म्हणूनच तिकडे फौजा पाठवून आमच्या मुलखाचें संरक्षण करणें आम्हांस भाग पडलें.' हीं पत्रें प. कं. भाग ५ मध्यें प्रसिद्ध व्हावयाचीं आहेत.

प्रथम लेस्लीच्या हाताखालीं इंग्रज फौज दक्षिणेकडे निघाली, तेव्हां निरनिराळ्या रजवाड्यांच्या वाटाघाटी कैक दिवस चालल्या. या फौजेला पेशवे, सिंदे, होळकर व भोसले या चौघांच्या हद्दींतून जावें लागणार होतें. त्या सर्वांचे परवाने हेस्टिंग्सनें मागविले. सिंद्यानें तर इंग्रजांस हवे होते ते परवाने पाठवून दिले. इंग्रजांशीं मुद्दाम कळ काढण्याची त्या वेळीं महादजीस सोय नव्हती. भोसल्यांनीं सुद्धां इंग्रजांचे सरबराईस नर्मदेवर आपले कारभारी पाठवून त्यांची सर्व तजवीज यथास्थित लावून दिली. या संबंधानें ता. २५-५-१७७८ चें दिवाकर पंडिताला हेस्टिंग्सचें पत्र आलें तें असें.—'तुम्ही

आमचे पत्राचा जबाब पाठवून आमची विनंति मान्य केली, याबद्दल फार संतोष वाटतो. नर्मदेवर आमची फौज येईल तेव्हां त्यांची सर्व व्यवस्था करून त्यांस नदीपार पोंचविण्यासाठीं आपण आपले कारभारी वेणीराम पंडित वगैरे यांस तेथें ठेवून दिलें याबद्दल आम्ही आपले फार फार आभारी आहों.' परंतु बुंदेलखंडांत चार महिने फुकट गेल्यामुळें इंग्रज फौजेस नर्मदेवर येण्यास पुष्कळ वेळ लागला. दरम्यान मुधोजी व त्याचे कारभारी त्या फौजेची चातका-सारखी वाट पाहत बसले होते. पुढें ता. २९-१०-१७७७ चें हेस्टिंग्सचें पत्र वेणीरामास गेलें तें असें. 'लेस्लीच्या जागीं आम्ही क० गॉडर्डची नेमणूक केली आहे. त्यांजवर आमचा पूर्ण विश्वास असून मुधोजींच्या विश्वासासही ते पात्र होतील अशी आमची खात्री आहे. तुम्ही आपलें वजन धन्याशीं खर्च करून त्यांची आमची कायमची दोस्ती घडवून आणावी, अशी आपणास विनंति आहे. अशी दोस्ती उभयतांस कशी फायदेशीर आहे हें तुम्ही चांगलें जाणतांच.' सारांश अशा रीतीनें हेस्टिंग्सनें भोसल्यांस सर्वस्वी वश करून घेतलें होतें. ना० ब० कार म्हणतो, 'दादासाहेबांच्या मदतीस कलकत्त्याहून पलटण येत होती ती हुशंगाबादेवर दाखल झाली. समागमें गॉडर्ड व विश्वंभर-पंताचे पुतणे हरिभद्र होते. नागपुराहून मुधोजींनीं साहेब बहादुराची खात्री करावयास व मेजवानी करावयास कारभारी पाठविले. मनांत विचार कीं इंग्रजांची दोस्ती अंतरंगीं ठेविली पाहिजे. दिवाकरपंताचे सल्ल्यानें प्रेम राखून पलटण सुद्धां गॉडर्ड यास निरोप दिला. हा प्रकार वकील बाबूराव वैद्य यांनीं नानाफडणिसांस कळविला. त्यावरून दिवाकरपंताविषयीं नानाचे मनांत वैषम्य आलें. त्यावरून नानांनीं बाबूरावांस लिहून दिवाकरपंताचा निषेध करून भोसल्यांचे घरांत शकटभेदाची युक्ति चालविली.'

मराठी मुलुखांतून फौजा जाणार त्यासाठीं ता. १९-७-१७७८ रोजीं दस्त-काची मागणी पुण्याचे इंग्रज वकिलानें पेशव्याकडे केली ती अशी.—कलकत्त्या-हून कंपनीची फौज येत आहे. रहदारीस दस्तक द्यावयाविशीं ग. ज. यांनीं लिहिलें आहे. त्यास मेहेरबानी करून सरकारच्या जागजागींचें दस्तक द्यावें म्हणजे फौजेच्या रहदारींत हरकत येणार नाहीं. या संबंधानें भोसल्यांचा पुण्याचा वकील नागपुरास लिहितो, 'तुमच्या लिहिल्या अन्वयें श्रीमंतांस विनंति केली. आज्ञा जाली, कीं कोणता गोष्ट करणें ती विचार करून

करावी. आज इंग्रजांस कांहीं एक निश्चित सांगणें ठीक नाहीं. घोडे स्वाधीन नसल्यास बसणारा काय करील ! भोसल्यांचें व इंग्रजांचें सूत्र आहे म्हणून येथं वर्तमान दाट आहे. बुंदेले यांचेही लिहिण्यांत आलें आहे. पलटणें आलीं. समागमें वेणीरामपंत आहेत, असें असोन तुम्हां कसें कांहींच लिहिलें नाहीं. दिवस बहुत नाजूक आहेत. मध्यें मोरोबाची घालमेल झाली, त्या दिवसांत डोळे ठिकाणीं नव्हते, ' ( १०-१८९, १९० ).

ता. २०-१०-१७७८ रोजीं हेस्टिंग्स यास दिवाकर पंडितानें कळविलें कीं, " तुमचे वकील एल्यट वगैरे स्नेहाचें बोलणें करण्यास येत आहेत हे ऐकून आम्हांस फार आनंद होतो. ते आल्यावर बोलणें करून ठरवूं. " सन १७७८ च्या पावसाळ्यांतलें नागपुराहून दिवाकरपंताचें पुण्यास पत्र आलें, त्यांत खालील मजकूर आहे. ' आंग्रेजांचीं पत्रें दाट आलीं कीं, आम्ही दर-मजल तुमचे प्रांतांतून मुंबईस जातों. त्यांस येथून उत्तरें गेलीं कीं, पुण्याचे कारभाऱ्यांनीं फ्रेंच वकिलास रजा दिली, त्यांचा इंग्रजांचा स्नेह आहे तो कायमच आहे. इंग्रज फौजेस पुढें जाण्याचा मार्ग विषम आहे, पर्वतांतून मार्गानें पाणीही हरवख्त मिळणार नाहीं. जास्त कठोर ल्याहावें तरी कट व प्रांतांत अपाय करतील. परंतु त्यांचीं उत्तरें हींच येत गेलीं कीं, आम्ही दर-मजल याच मार्गें जातों. इकडून वेणीराम शिवभद्र वकील त्यांजवळ आहे तो आपणांस ठाऊकच आहे. '

इंग्रजांच्या या फौजा पुण्याकडे कां येतात याची पुष्कळ दिवस कोणास फारशी कल्पना नव्हती. पुढें दादास घेऊन मुंबईकर इंग्रज पुण्यावर येण्यास निघाले, तेव्हां २४-११-७८ रोजीं नानाफडणिस नागपुरचे वकिलास लिहितो, ' इंग्रज घांटावर येऊं लागले, त्यांचें पारिपत्य ईश्वरेच्छेनें सत्वरच होईल. पण इंग्रजांचा बिघाड जाला ही गोष्ट खुली. हिंदुस्थानांत पलटणें आलीं तरी पडदा होता. ते म्हणत होते कीं, आम्हांस मुंबईस जाणें, पुणें-करांसी बिघाड नाहीं. कलकत्याहूनही अशींच पत्रें येत गेलीं. ऐसें पडद्यानें होतें. आतां चालून आले, तेव्हां तंबी देणें प्राप्त. इंग्रज प्रामाणिक म्हटले जात होते. ते लोभामुळें सर्व सोडून बदनजर धरिली. हे गोष्ट नबाब, प्रधान, भोसले, हैदरखान सर्वांसच वाईट. चक्राची गत आणि इंग्रजांची चाल एक, ज्या राज्यांत टोपीकरांची पैरव जाली, तेथील गति काय हें कांहीं लोपलें नाहीं.

याचा विचार दिवाकरपंत दादांनीं काय केला! त्यांनीं सलाह कशी योजिली तें सत्वर लिहावें. ते, तुम्ही व सेनाधुरंधर एकत्र बसोन दूरदृष्टीनें पोक्त मनसबा करून सल्लाह लिहावी.' याउपर नानाचा वकील बाबूराव वैद्य नागपुराहून २८-१-१७७९ रोजीं लिहितो. 'निजाम श्रीमंतांकडे अनुकूल, फौजांची तयारी करितात, पण संदेहात आहेत. इंग्रजांशीं बिघाड श्रीमंतांचा आहे, आपण निराळे आहों, असें भोसले बोलतात. उघड श्रीमंतांचा पक्ष सांगतात, पण अंतस्त दोनही सूत्रें ठीक. आम्ही त्यांस उत्तर केलें कीं निजामाची गोष्ट कशास! तो परकी. हिंदुमुसलमान हे दोन पक्ष. भगवंत निर्मित त्यांचा वैरभाव. मग तुम्हीं केल्याचें आश्चर्य काय! नागपुरची दौलत व पुण्याची दौलत दोन नाहींत. त्यांनीं करावें तेंच आम्हीं करावेंसें आहे.' (खं. १०–१९७,१९९).

पर्शियन कॅलेंडर्समधील कागदांवरून दिसतें कीं वॉरन हेस्टिंग्सनें नागपूरकर भोसल्याप्रमाणेंच महादर्जीलाहीं पत्रें लिहून मराठ्यांच्या कारभारांतून फोडण्याचे प्रयत्न कांहीं थोडे केले नाहींत. महादजीनें सुद्धां तशाच प्रकारच्या गोड गोड भाषणांनीं वेळ मारून नेली. निजामाकडेही हेस्टिंग्सचे प्रयत्न चाललेच होते. ता. २३-७-१७७८ रोजीं खालील पत्र निजामानें हेस्टिंग्स यास लिहिलें. 'पुरंदराहून परत जातांना कर्नल अप्टन आम्हांस भेटून गेले. आम्ही त्यांस सांगितलें कीं, रघुनाथराव मुळींच विश्वास ठेवण्यालायक नाहीं. आपल्या दुष्कृत्यांनीं त्यानें सर्व राष्ट्रांत आपली अत्यंत बदनामी करून घेतली आहे; आणि अशा स्थितींत तुम्हीं कारभाऱ्यांस भेटून पुरंदर येथें तह केला ही चांगली गोष्ट केली. पण आतां तुम्ही राघोबास आश्रय देऊन आपल्याजवळ ठेवून घेतां हें चांगलें नाहीं. अप्टननें सांगितलें, आतां हा सर्व अधिकार कळकत्त्याचे कौन्सिलचा आहे.'

पुरंदरचे तहानंतर कारभाऱ्यांनीं सरदारांस व मुत्सद्यांस एक वर्षाचा ऐवज सरकारांत घेण्याकरतां व त्यांची एकवाक्यता करण्याकरतां पुण्यास एकत्र जमविलें. त्यांत सिंदे, होळकर व विशेषतः नागपुरकर भोसले प्रमुख होते. पहिल्या दोघांच्या समजुतीचा प्रकार पूर्वी वर्णिलाच आहे. रघूजी नुकताच वयांत आलेला असून मुधोजीचा ओढा मूळचा दादाकडचा म्हणजे त्या अनुषंगानें इंग्रजांचे बाजूचा होता. पुरंदरचे तहानंतर दादांचा निकाल लागला, तेव्हां समस्त भोसल्यांनीं पुणें दरबारास अनुकूल राहवें, अन्य लफडीं उप-

स्थित करूं नयेत, म्हणून नानानें रघूजी व त्याचा कारभारी दिवाकर पुरुषोत्तम यांस मार्च महिन्यांत पुण्यास आणून त्यांची समजूत काढिली आणि त्यांस ता. ५-५-१७७७ रोजीं पुरंदरावर अत्यंत गौरवपूर्वक बाल पेशव्याकडून निरोप दिला. फाल्गुनी पौर्णिमेपासून चैत्री आमावास्येपर्यंत रघूजीचा मुक्काम पुण्यास होता. दरम्यान पेशव्यानें व सखाराम बापूनें त्यास मेजवान्या केल्या, (ता. ७-४-१७७७.) पुढच्या वर्षी १७७८ च्या उन्हाळ्यांत गॉडर्डची फौज दक्षिणेंत येऊं लागली, तेव्हां नर्मदेवर फौजेस वाट देऊन सामान वगैरे पुरवून पुढें रवाना करण्याबद्दल हेस्टिंग्सनें मुधोजीस विनवून लिहिलें, तदनुसार ३।४ महिने भोसल्यांचे कामदार या कामगिरीवर होते. त्यांनीं इंग्रजांची चांगली सरबराई केली. इंग्रज पेशव्यावर पुण्यास चालून येणार, त्यांस अडविण्याचे ऐवजीं भोसले उलट मदत करतात हें त्यांचें वर्तन राजद्रोहात्मक होतें. यापूर्वी थोडे दिवस रामराजा आजारी झाला तेव्हां मुधोजीस दत्तक घेऊन त्यास छत्रपतिपद द्यावें असा हेस्टिंग्सनें घाट रचून त्या बाबतींत मुधोजीस चढविलें. ह्या बातम्या बाहेर आल्या, तेव्हां कारभाऱ्यांनीं घाईनें रामराजास दुसरा दत्तक देऊन तें प्रकरणच मिटविलें. तरी हेस्टिंग्सनें मुधोजीचा नाद सोडला नाहीं. मुधोजी थोरल्या शाहूमहाराजांचे मेहुणीचा मुलगा असून ते त्यास स. १७४८त दत्तक घेणार होते. तो योग या वेळीं सिद्धीस नेण्याची हेस्टिंग्सनें मुधोजीस भर दिली. मुधोजीचें वय ह्लीं पन्नाशीच्या वर असून कर्तबगारीही संपत आली होती. मुधोजीचें हें दुटप्पी वर्तन पाहून कारभाऱ्यांस सहजच वैषम्य वाटलें. त्या संबंधानें नानानें दिवाकरपंतास १३-९-१७७८ रोजीं पत्र लिहिलें तें अनेक दृष्टींनीं महत्त्वाचें आहे. त्यांतील तात्पर्यार्थ असाः—'आपण दोन तीन पत्रें पाठविलीं तीं पावून संतोष झाला. होळकर मोरोबाचे बखेड्यांत. आमचेकडून खबर नाहीं, वगैरे विस्तारें ममतायुक्त लिहिलें, त्यास आपण [ गेल्या सालीं ] पुरंदरास आले तेव्हांच खातरजमा पक्की जाली. येऊन शरीरें मात्र भिन्न इतकें करून गेलेत. पुढें आपणास व आम्हांस पेंच न पडो या गोष्टीचा संतोष आपणांस पूर्वीपासून. पूर्वीच फितुरीयांचा बंदोबस्त करावा हें आपलें सांगणें वारंवार होतें. परंतु एकसमयावच्छेदें इतक्यांचे अंगीं मुद्दे कसे लागते ! त्यांचा बंदोबस्त करणें, तरी लौकिकांत होतें कीं नाहक पारिपत्य केलें. हा आरोप रक्षणें ईश्वराचें मनांत, या-

करितां त्यांस बुद्धि होऊन पुरंदरावर चालून आले, हें पृथ्वीस जाहीर जालें. येणेंकरून निर्दोषता जाली. आपण श्रीहरिभजन भावें करून करितात, त्यांत आमचें कल्याण असावें असें स्मरण होतच असेल, त्याचेंच फल श्रीहरीनें करून दाखविलें. अशी परस्परें अंतःकरणाची ममता व स्वच्छता व प्रेम असतां, अलीकडे वर्तमान उगाच ऐकण्यांत आलें कीं आपणाकडील संदेह आमचे चित्तांत आला असें आपले मनांत आलें. याचें कारण एकत्वभाव या कालीं कोणासही सोसत नाहीं. याची परीक्षा हेच कीं अंतःकरणांत श्रीहरिच आपले प्रेरक होऊन खातरजमा होईल, हा माझा निश्चय आहे. रा. बाबूरावांची रवानगी लौकरच आपणांकडे करतों. पुढें कित्येक मातबर मनसुबे व कामें करणें तीं आपणांसच मन घालून करावीं लागतील. या समयीं सिंदे श्रीमंतांचे पायांशीं एकनिष्ठ आणि आमचे मनसुब्यास अनुकूल होऊन पुढाकारी जाले, याचा संतोष आपणास विशेषात्कारें असेलच, असावा उचित आहे. श्रीमंत लहान आहेत तों जेथें उणें पडेल तेथें सांभाळणें, हा हक्क भोसल्यांचे घरापासून आपण घडवितील यांत संदेह नाहीं.'

या पत्राप्रमाणेंच दिवाकरपंतानें शिकस्त करून भोसल्यांस शक्य तितकें बारभाईकडे वळविलें; इंग्रजांकडे ते सर्वस्वीं जाऊन मिळण्याची वेळ आली असतां, मराठशाहीची जूट थोडीबहुत कायम राखिल्याचें श्रेय या दिवाकरपंतास आहे. भोसल्यांचे घरांतही नाना पक्ष व अनेक इसम बुद्धिभेद करणारे होते. प्रत्यक्ष रघूजी आतां आपला कारभार आपण पाहूं लागल्यामुळें मुधोजीशीं त्याचें सौरस्य राहिलें नाहीं. अशा स्थितींत दिवाकरपंतानें रघूजीस उघडपणें इंग्रजांस मिळूं दिलें नाहीं, एवढेंच तो करूं शकला.

मुधोजीस साताराचें छत्रपतिपद देण्याचें आमिष दाखवून त्यास पुणे दरबारांतून साफ अलग करण्याच्या उद्देशानें हेस्टिंग्सनें आपला वकील अलेक्झांडर एल्यट यास सेप्टेंबर १७७८ त नागपुरास पाठविलें, हें मागें सांगितलेंच आहे. हा नसता उपद्व्याप हेस्टिंग्सनें अंगावर घेतल्याबद्दल डफनें त्यास चांगलाच दोष दिला आहे. पुढें एल्यट वाटेंतच मरण पावला, तेव्हा तें सर्व प्रकरण हेस्टिंग्सनें गॉडर्ड बुंदेलखंडांतून येत होता त्याजवर सोंपविलें, आणि त्यासच भोसल्यांशीं कायम दोस्तीचा तह ठरविण्याची कामगिरी सांगितली. मेजर कामॅक नांवाच्या दुसऱ्या एका सेनापतीच्या हाताखालीं

आणखी दोन एतद्देशीयांचीं पलटणें' हेस्टिंग्सनें बंगालच्या पश्चिम भागीं तयार करून त्यांनीं गॉडर्डच्या मदतीस नर्मदेकडे जावें असा हुकूम केला. या वेळीं मुधोजी हेस्टिंग्सच्या म्हणण्यास अनुकूल झाला असता, पण दादास पुण्यास आणण्याचा मोरोबाचा घाट फसल्यानें मुधोजीस इंग्रजांचा मोठासा भरंवसा उरला नाहीं, आणि कारभारी दिवाकरपंत तर पुणें दरबारच्याच पक्षांत होता. तथापि गॉडर्डनें नर्मदेवरून ले० वॉटर्स्टन यास मुधोजीकडे नागपुरास पाठविलें. त्याशीं मुधोजीनें मिठीं भाषणें केलीं, पण निश्चित जबाब कांहीं सांगितला नाहीं. साताऱ्यास छत्रपतिपद स्वीकारण्याचें तर त्यानें साफ नाकारिलें. तो म्हणाला, शिवाजी महाराजांच्याच वंशाकडे गादी चालणें योग्य आहे. ही हकीकत डिसेंबर १७७८ त वॉटर्स्टननें परत येऊन नर्मदेवर गॉडर्ड यास कळविली. इतक्यांत त्यास मुंबईहून निकडीची बोलावणीं आलीं, कीं आम्ही दादास घेऊन पुण्यावर चाललों, तुम्ही शक्य ती त्वरा करून आमचे मदतीस यावें. मुंबईकरांचा हा हुकूम पाळण्याची गॉडर्डास गरज नव्हती, तरी राष्ट्रकार्यावर नजर देऊन त्यानें ताबडतोब पुढें जाण्याचा निश्चय केला. (डफ).

वेणीराम शिवभद्र पंडित व त्याचा भाऊ विश्वंभर पंडित हे दोन इसम नागपुरातर्फे कलकत्त्यास इंग्रजांकडे वकील असून त्यांस हेस्टिंग्सनें सर्वथा आपणांस वश करून घेतलें. त्यांनीं भोसल्यांचीं मनें इंग्रजांकडे वळविण्याची मोठी खटपट केली. चेतसिंगाचे प्रकरणांत वेणीरामानेंच हेस्टिंग्स यास गुप्तपणें काशींतून बाहेर पोंचवून त्याचा जीव वांचविला. हेस्टिंग्सच्या धूर्त कारवाईचा प्रचंड पत्रव्यवहार पर्शियन कॅलेंडर्स भाग ४।५ व फॉरेस्टकृत कलकत्ता रेकॉर्डस मधील निवडक भाग १-२-३ यांतच पूर्णपणें वाचला पाहिजे.

**३. इंग्रजांचा मारा म्हणजे अस्वलाच्या गुदगुल्या.**— इंग्रज मराठ्यांचें हें युद्ध म्हणजे इंग्रजांस सार्वभौम सत्तेबद्दल सुटलेल्या हावेचा परिणाम होय. विशेष कांहीं कारण नसतां नारायणरावाच्या वधानें मराठशाही संकटांत आलेली पाहून इंग्रजांनीं कांहीं तरी निमित्त काढून हें युद्ध सुरू केलें. असें असतां आजपावेतों यच्चयावत् पाश्चात्य लेखकांनीं युद्धाचा दोष मराठ्यांचे माथींच लादला आहे. पण या संबंधांत प्रत्यक्ष हेस्टिंग्सचे त्या वेळचे लेख हाच उत्कृष्ट पुरावा होय. मराठ्यांनीं पानिपतचे अरिष्टास न जुमानतां दिल्लीच्या बादश-

ह्याची व्यवस्था लावून सार्वभौम सत्ता आपल्या हातांत घेतली. ती स्थायिक होण्यापूर्वीच त्यांस उखडणें जास्त सुलभ असें इंग्रजांनीं ठरविलें. थोरला माधवराव आणखी दहा पांच वर्षें जगता तर मराठ्यांचें राज्ययंत्र सुव्यवस्थित व दृढ झालें असतें; निदान नारायणरावाचा वध झाला नसता तरी बाहेरच्यांस कारभारांत हात घालण्यास सवड मिळाली नसती. इंग्रजांचा हा डाव या वेळीं कां व कसा फसला हें वर ठिकठिकाणीं सांगितलेंच आहे. परंतु हेस्टिंग्सच्या कारभारांत हें धोरण त्याच्या दृष्टीपुढें सदैव ठळकपणें होतें हें त्याच्या पुढील पत्रांवरून सिद्ध आहे. ज्याप्रमाणें अयोध्या व कर्नाटक येथील नबाब आपण आपले कबजांत आणिले, त्याचप्रमाणें भोसले, गायकवाड, सिंदे व प्रत्यक्ष पेशवा रघुनाथराव यांस आपल्या सार्वभौम कक्षेंत आणण्याचा त्यानें कसून प्रयत्न केला. तो प्रयत्न केवळ नानाच्या व महादजीच्या कर्तबगारीमुळें फसला. बिचारा वजीर कसा अन्नान्न करूं लागला, त्याचें वर्णन हेस्टिंग्सनेंच केलें आहे. क्लाइव्हनें हिंदुस्थानची सार्वभौम सत्ता इंग्रज बादशहाचे हातीं आणण्याचा प्रयत्न केला, तो मुख्य प्रधान पिट्टनें मंजूर केला नाहीं. तोच प्रयत्न फिरून हेस्टिंग्सनें केला. इंग्लंडचे अधिकारी त्यास अनुकूल होईनात याबद्दल त्यास मोठें दुःख वाटलें. हेस्टिंग्सचें हें कारस्थान अगदीं गुप्त होतें. फक्त मॅक्फिन व एल्यट या त्याच्या दोघां दोस्तांपलीकडे दुसऱ्या कोणास त्याचा पत्ता नव्हता, हें हेस्टिंग्सच्या पत्रांत नमूद असून, देशांत शांतता ठेवणें, पैसा शोषून घेणें आणि हिंदी राष्ट्रास निःसत्त्व बनविणें, असा त्याच्या लेखाचा तात्पर्यार्थ निघतो. हेस्टिंग्स एकाच वेळीं निरनिराळ्या पक्षांशीं कसें भिन्न आचरण ठेवितो, तें पाहून चमत्कार वाटतो. उदाहरणार्थ, कलकत्याहून हेस्टिंग्स इंग्लंडास काय लिहितो, मुंबईस हार्नबीकडे काय लिहितो, मुंबईतच राहत असलेल्या रघुनाथरावास काय लिहितो, पुण्यास असलेल्या अप्टनास काय लिहितो, किंवा सखारामबापू आणि नाना फडणीस यांस काय लिहितो, हें पाहिलें म्हणजे इंग्रजांच्या वागणुकीची हद्द वाटल्याशिवाय राहत नाहीं. हें ध्यानांत येण्यासाठीं हेस्टिंग्सनें इंग्लंडांत आपला एक स्नेही अलेक्झांडर एल्यट यास ता. १२-१-१७७७ व १०-२-१७७७ रोजीं लिहिलेलीं दोन पत्रें पुढें देतों. त्यांवरून मराठ्यांचें राजकारण इंग्रज कोणत्या दृष्टीनें पाहत होते तें स्पष्ट कळून येईल. बारभाईंनीं सन १७७६ च्या नोव्हेंबरांत सदाशिवराव भाऊच्या तोतयास पकडून डिसें-

बरांत त्याचा वध केला, त्यास अनुलक्षून हीं पत्रें हेस्टिंग्सनें लगेच पुढील जानेवारी–फेब्रुवारींत लिहिलेलीं आहेत.

ता. १२ जानेवारी १७७७.

" माझे प्रिय एल्यट यांस. या पत्रांत मी एक विषय कळवीत आहें, पण त्याची संगति ध्यानांत येण्यासाठीं मला जरा मागें गेलें पाहिजे.

" पानिपतच्या समरभूमीवर मराठ्यांचा पराभव झाल्यावर, त्यांचा दुय्यम सेनापति सदोबा, रघुनाथराव ऊर्फ राघोबा याचा चुलतबंधु, अदृश्य झाला; तो मारला गेला अशीच समजूत होती. पुढें तीन वर्षे होऊन गेल्यावर एक गृहस्थ अंगावर जखमा लागलेला सदोबा या नांवानें प्रगट झाला आणि फौज जमवून बंडाळी करूं लागला. तेव्हां थोरल्या माधवराव पेशव्यानें त्याचा पाडाव करून त्यास पकडिलें आणि हा भोंदू आहे अशी लोकांची खात्री करून त्यास बंदींत ठेविलें. पुढें तो एके दिवशीं तसाच कैदेंत असतां, गेल्या एप्रिल महिन्यांत बाहेर निसटला आणि बरीच फौज जमवून त्यानें कोंकण प्रांत हस्तगत केला. त्याजवर पुणेंसरकाराची फौज चालून गेली. तेव्हां ता. २७ आक्टोबर रोजीं लढाई होऊन त्याची सर्वत्र दाणादाण उडाली, आणि तो एका जहाजांत बसून पळून मुंबईचे बेटांत इंग्रजांचे आश्रयास आला. तेथेंही त्याचें दुर्दैव त्यास आडवें आलें. तो मुंबईस आला त्या वेळीं ग. हॉर्नबी व त्याचा दुय्यम दोघेही बाहेर ठाण्यास गेले होते; आणि एक डॉ. ड्रेपर तेवढा जागेवर होता. त्यानें सदोबास घेण्यासाठीं दोन हलके इसम पाठविले. आपण एवढ्या भक्तीनें इंग्रजांच्या आश्रयास आलों असतां, ते आपला योग्य सत्कार करीत नाहींत, याबद्दल वैषम्य वाटून, काळ वेळ न पाहतां, आपल्याच तोंऱ्यांत तो तत्काळ परत जाऊन रघूजी आंगऱ्यास भेटला. रघूजीनें त्यास लगोलग पुणें सरकाराच्या हवालीं केलें. त्याच सुमारास रघुनाथरावही पुणेकरांच्या हातीं न पडावें म्हणून तारापुराहून पळून मुंबईस आला; तेव्हां सदोबापेक्षां त्याचें दैव जास्त अनुकूल असल्यानें त्यास मुंबईच्या अधिकाऱ्यांनीं सत्कारपूर्वक आपल्याजवळ ठेवून घेतलें आणि बहुधा आजही तो मुंबईसच असावा. असें कळतें, कीं सदोबास पकडल्याची बातमी हॉर्नबीस कळतांच त्यानें लगोलग रघूजी आंगऱ्याकडे माणसें पाठवून त्यास आपल्याकडे मागितलें; आणि न दिल्यास आपण एकदम तुमच्याशीं लढाई करूं अशी धमकी दिली. निदान पुणेंसरकाराकडून तरी

आमच्याकडे तशी तक्रार आली आहे. मुंबईकरांनीं राघोबास आश्रय दिला, आणि सदोबाची मागणी केली, या दोनही बाबती पुरंदरचे तहाविरुद्ध असून पुणेंसरकाराशीं युद्धभाव दर्शवितात, असें तेथील कारभाऱ्यांनीं आम्हांस कळविलें असून, आम्हींही त्या गोष्टी येथून तशाच मान्य करून, 'रघुनाथरावास मुंबईतून एकदम काढून द्या,' असा सक्त हुकूम मुंबईस पाठविला आहे. मध्यंतरीं आमचा वकील कर्नल अप्टन तह ठरविण्यास (सन १७७५चे अखेरीस) पुण्यास गेला तो अद्यापि तेथेंच आहे. आम्हीं त्यास वारंवार परत बोलाविलें असतां, तह पुरा अमलांत आणून दिल्याशिवाय पुणेकर त्यास सोडीत नाहींत. बहुधा तो पुण्यास जबरदस्तीनेंच राहत असावा असें दिसतें. कारण पुण्याहून अप्टनचीं व कारभाऱ्यांचीं जीं आम्हांस पत्रें येतात, त्यांतील झोंकावरून अप्टनला तेथें राहण्याची जबरदस्तीच होत असावी, असा आमचा तर्क होतो. त्यास आणखी एक प्रत्यंतर असें आहे कीं, पुरंदरच्या तहाच्या अगोदरपासून अगदीं आतांपर्यंत पुण्याहून जीं आम्हांस येथें कारभाऱ्यांचीं पत्रें येतात, त्यांत मुंबईकरांच्या भरमसाट आगळिकीशिवाय दुसरा कांहींच मजकूर नसतो. इतकें सुद्धां त्या पत्रांवरून दिसून येतें कीं, पुरंदरचा तह फार तर त्यावर सह्या करणाऱ्या दोघांस बंधनकारक होईल, इतरांस तो बांधूं शकत नाहीं. सदोबाचा पाडाव होतांच कारभाऱ्यांचीं जीं पत्रें हल्लीं आमच्याकडे आलीं आहेत, त्यांत तंजावरच्या राजाचा नवीनच एक प्रश्न पुणेंकरांनीं उपस्थित केला आहे. आम्हीं तंजावरचे राजास पदच्युत करून, त्याचा प्रदेश नबाब महंमदअलीस दिला, तो तेथील राजास पुनरपि परत द्यावा, अशी मागणी पुणेंसरकार हल्लीं आमच्याकडे करितात. कर्नल अप्टनशीं इतके दिवस वाटाघाट चालली त्यांत या मागणीचा बिलकूल उल्लेख नव्हता. इतकेंही झालें तरी पुरंदरचा तह मोडून हल्लीं पुणेकरांशीं आमचें युद्धच सुरू झालें, असें मानण्याचें कारण नाहीं. मात्र हा तह बिलकूल मान्य करावयाचा नाहीं असा जो मुंबईकरांचा आरंभापासून हट्ट चालू आहे, त्यामुळें काय प्रकार घडेल सांगवेना. तह अमलांत येईल अशीं चिन्हें तर दिसत नाहींत.

"सदोबाचा निकाल लागल्यानें, पुणेकरांच्या इतके दिवस चाललेल्या विवंचना बहुतेक दूर झाल्या असून, दूर दूरच्या प्रदेशांत आपले पूर्वींचे व्यवसाय पुनरपि चालू करण्याची त्यांस आतां संधि प्राप्त झाली आहे. आपण

हैदरअलीवर मोहीम करीत आहों असें त्यांनींच वरच्या पत्रांत आम्हांस कळविलें असून, दुसरीकडूनही आम्हांस कळतें कीं, निजामअलीखान व वऱ्हाडचे राजे मुधोजी भोसले यांनीही हैदरावरील या स्वारींत पुणेकरांस सामील होण्याचें कबूल केलें आहे.

" पेशव्यांच्या घरांत इतके दिवस चाललेलें भांडाभांडीचें युद्ध समाप्त होऊन मराठ्यांच्या बादशाही सत्तेची एवढी मोठी एकी एकाएकीं झाली आणि त्याचा मारा आतां लगोलग बाहेरच्यांवर होणार, यावरून त्यांच्या राज्यकारभाराचा जो जोर दिसून येतो तो पुढें तसाच टिकेल, तर त्या योगानें ईस्ट इंडिया कंपनीच्या हितचिंतकांस मोठी धास्ती उत्पन्न होत आहे, असें वाटल्याशिवाय राहत नाहीं. आम्हीं धास्ती बाळगण्याइतका मराठ्यांचा प्रभाव वाढणार नाहीं, असाच माझा अद्यापि समज आहे; आणि पूर्वीच्याहून हल्लींचा प्रसंग म्हणजे कंपनीचे मनोरथ यशस्वी होण्यासंबंधानें विशेष बाधक आहे असेंही मला बिलकूल वाटत नाहीं. मात्र सुरत येथें मुंबईकरांनीं राघोबाशीं जो अनिष्ट तह केला, त्याचे परिणाम आपणांस किती भोगावे लागतील ते लागोत. त्याशिवाय दुसरें कोणतेंही प्रकरण कंपनीचे हितास बाधक नाहीं. उलट कंपनीचें वजन व स्नेहसंबंध वाढावे अशीच संधि अजून सुद्धां आहे. कां तें तुम्हांस सांगतों.

" प्रथम एक गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे कीं, पेशवे, निजाम व नागपुरकर भोसले या त्रिकूटाचा मिलाफ फार दिवस एकत्र टिकणें शक्यच नाहीं. निजामानें पेशव्याचा पुष्कळसा मुलूख दाबलेला असून भोसले पेशव्यांचा अंकित असला, तरी तो अगदीं नांवाचा आहे. तिघांचे मतलब एकमेकांच्या विरुद्ध आहेत. दुसरी गोष्ट अशी कीं, पुण्याचें कारभारीमंडळ अगदींच दुर्बल आहे. जे गृहस्थ कारभार चालवितात, त्यांस राज्य चालविण्याचा कायदेशीर हक्क कांहींच नसून, शिवाय त्यांची आपसांत गोडी नाहीं. त्यांच्यांत वरिष्ठ सखारामबापू. तो आतां वयोवृद्ध व दुखणेकरी आहे. त्याचा दुसरा साथीदार नाना फडणीस. या दोघांनींच पुणें सरकाराच्या वतीनें पुरंदरचे तहावर सह्या करून दिल्या. ते कारभारास कंटाळले असून दोघांनींही सरकारांतून रजा मागून कायमची काशीयात्रेस निघून जाण्याची परवानगी मिळविली आहे. $

$ काशीयात्रेस जाण्याची ही हूल मुद्दाम मुत्सद्यांनीं उठविलेली होती.

काशीवास पत्करण्याचा हा त्यांचा निश्चय, तोतयास वरचेवर जय मिळून त्याच्या धास्तीनें त्यांच्या मनांत प्रथम उत्पन्न झाला असला, तरी त्यामुळें आतां लोकांचा पेशवेसरकारावरील विश्वास बहुतेक नाहींसा झाला असून, त्या सरकाराची इभ्रत फारशी उरलेली नाहीं. राज्य खंबीरपणें चालण्यास मुख्यतः असा विश्वास व इभ्रत लोकांत कायम असणें अत्यंत जरूर आहे. तिसरी गोष्ट, भोसल्यांचे घरांत भाऊबंदकीचा प्रकार जारीनें सुरू आहे; योग्य संधीचीच काय ती वाण, कीं ही भाऊबंदकी तेव्हांच विकोपास जाईल. भोसल्यांचें हें प्रकरण आरंभापासून जरा जास्त विस्तारानें येथें स्पष्ट करून सांगणें जरूर आहे. त्याशिवाय तुम्हांस उमज चांगली पडणार नाहीं.

" वऱ्हाडचा राजा रघूजी भोसले यानें नबाब अलिवर्दीखान कारभारावर असतां बंगाल प्रांतावर स्वाऱ्या करून दरसाल चौथाई घेण्याचा करार करून घेतला. पुढें रघूजी मरण पावल्यावर त्यास चार मुलगे होते; जानोजी, साबाजी, मुधोजी व बिंबाजी. पैकीं जानोजी गादीवर बसला. पुढें जानोजी मरण पावल्यावर मुधोजीचा अल्पवयी मुलगा रघूजी यास दत्तक घेऊन साबाजी कारभार करूं लागला. त्या वेळीं साबाजी व मुधोजी यांजमध्यें झगडा सुरू झाला. मुधोजी म्हणे, आपल्या मुलाच्या तर्फेनें आपणच कारभार पाहणार. याच वेळीं पुण्याचें कारभारीमंडळ व रघुनाथराव यांजमध्यें कलह चालू होता, त्यांत मुधोजीनें रघुनाथरावाचा पक्ष घेऊन साबाजीनें कारभाऱ्यांचा घेतला. अशा स्थितींत साबाजी व मुधोजी लढाईस प्रवृत्त होऊन ( ६-१-१७७५ रोजीं ) नागपुरच्या दक्षिणेस १० मैल पांचगांव येथें साबाजी मारला गेला आणि मुधोजीस नागपुरचा कारभार मिळाला.

" यापूर्वीच त्यांचा आमचा संबंध कसा आला हें सांगण्याची जरूर आहे. साबाजी जिवंत असतां त्यानें आपला वकील वेणीराम पंडित यास आमच्याकडे कलकत्त्यास पाठवून अशी इच्छा प्रदर्शित केली कीं, तुमचा आमचा कायमचा स्नेहसंबंध असावा. मलाही भोसल्यांशीं असा स्नेह जोडणें फायद्याचेंच वाटलें आणि साबाजीच्या इच्छेस दुजोरा येईल अशा रीतीनें त्यांस जबाब पाठविला. मात्र त्याविषयीं उगाच फाजील आतुरता मीं दर्शविली नाहीं. वेणीराम पंडितास भेटून, भोसल्यांच्या व इंग्रजांच्या दोस्तीपासून उभयतांचे फायदे कसे व काय आहेत हें त्यास मीं चांगलें समजावून दिलें आणि सांगितलें कीं,

पहा, अयोध्येच्या वजीरानें बनारस येथें आमच्याशीं तह करून कसा आपला फायदा करून घेतला तो. त्यांत वजिराचे इभ्रतीस कोणतेंही वैगुण्य न येतां कंपनीचाही फायदा झाला आहे. तसाच फायदा नागपुरकर भोसल्यांचाही होईल.

"हा सर्व प्रकार बोलून व आमचेकडील जबाब घेऊन वेणीराम पंडित परत जातो तों साबाजी मारला जाऊन मुधोजी कारभारावर आला होता. वेणीराम हा बोलून चालून साबाजीचे पक्षांतला असल्यामुळें तो परत गेल्यावर कांहीं दिवस मुधोजीस भेटला नाहीं. पुढें स्थिरस्थावर झाल्यावर मुधोजीनें त्यास भेटीस बोलाविलें आणि त्याजवळचीं माझीं पत्रें सर्व वाचलीं. लगोलग त्या पत्रांचे जबाबही मुधोजीनें आम्हांस पाठविले आणि पुनः वेणीराम पंडितास आमच्याशीं तह कायम करण्याकरितां कलकत्त्यास पाठविलें. तेव्हांपासून मुधोजीचा व माझा गुप्त पत्रव्यवहार चालू असून, त्याचा आमचा स्नेहभाव वाढत आहे. वेणीराम पंडिताच्या सांगण्यांत असें आलें कीं, पूर्वी जसा साबाजीशीं मुधोजीचा बेबनाव झाला, तसाच आतां मुधोजीचा रघूजीशीं चालू झाला आहे. रघूजी जरी त्याचा प्रत्यक्ष मुलगा असला तरी तो आतां १९ वर्षांचा–वयांत आलेला असून, बापानेंच सर्व कारभार पाहवा हें त्यास बिलकूल खपत नाहीं. दिवाकर पंडित म्हणून या भोसल्यांचा तीन पिढ्यांचा एक कारभारी आहे. त्याचें मुधोजीजवळ फारसें माहात्म्य नसल्यामुळें, रघूजीस हाताशीं धरून तो आपलें वजन कायम राखण्याच्या प्रयत्नांत आहे; आणि म्हणूनच तो रघूजीस मुधोजीविरुद्ध चढवीत आहे. दिवाकर पंडितानें निजामास भर देऊन त्याजकडून मुधोजीकडे असें कळविलें कीं, 'आपण उभयतांनीं संगनमत करून उभयतांच्या फायद्यांचे इलाज घ्यावे.' त्यासाठीं निजामानें मुधोजीस लिहिलें कीं, 'या संबंधांत बोलणें करण्यासाठीं दिवाकर पंडितांस आमच्याकडे पाठवा; अगर तुम्हीच स्वतः भेटीस या.' तदनुसार मुधोजीनें दिवाकरास निजामाकडे पाठविलें. जातांना तो रघूजीस बरोबर घेऊन गेला असें कळतें. दिवाकरपंताचा डाव असा दिसतो कीं, निजामाच्या साह्यानें रघूजीस पुढें आणून मुधोजीचें वजन नाहींसें करावें. याचा पुढें परिणाम काय होतो इकडे आमचें लक्ष आहे; आणि त्याचा कांहीं जरी परिणाम झाला, तरी मला इंग्लंडांतून कंपनीचा पाठिंबा असेल तर, या कारस्थानाचा उपयोग मला कंपनीच्या फायद्यासाठीं पुष्कळसा करीतां येईल; आणि असें करण्यांत

कंपनीची इभ्रत अगर तिचें हित यांस बिलकूल व्यत्यय येण्याचा संभव नाहीं. वऱ्हाडच्या सरहद्दीवर आमच्या फौजेची एक तुकडी अगोदरच आहे; आणखी एक तेवढीच तुकडी पहिलीच्या मदतीस तयार केली तर, तेवढ्यानें पुढें कसाही प्रसंग उद्भवला तरी आम्हांस तो निभावून नेतां येईल. कोणच्या पक्षाच्या तर्फेनें किंवा कशा परिस्थितींत आम्हांस आपला बोज कायम राखून या भानगडींत भाग घ्यावा लागेल, त्याचा नक्की अंदाज आतांच बांधणें शक्य नाहीं. अशी ही परिस्थिति या घटकेस आहे.

"अशा प्रसंगीं आम्ही आपलें धोरण कशा प्रकारचें ठेवावें, किंवा काय व्यवस्था घडवून आणावी, या संबंधानें मीं आपले विचार तुम्हास पूर्वी कळविलेच आहेत. तशी व्यवस्था करण्यास मला इंग्लंडांतून अधिकार मात्र मिळाला पाहिजे. माझी इच्छा अशी आहे, कीं हिंदुस्थानच्या प्रत्येक भागांत इंग्रज सत्तेचें वजन बेलाशक स्थापन करावें; मात्र हल्लीच्या आमच्या कायम पायापासून अतिशय लांबचा पल्ला एकदम गांठूं नये किंवा आम्हीं बचाव करावयाचा प्रदेश आटोक्याबाहेर असूं नये. उगाच मुद्दाम संकटें ओढून आणावीं, अथवा संशयित व्यवहार अंगावर घ्यावे, असें माझें म्हणणें नाहीं. परंतु इंग्लंडच्या राजाची मदत घेण्यास किंवा त्याच्याशीं स्नेहसंबंध जोडण्यास जे कोणी इकडचे सत्ताधीश खुषी असतील, त्यांस त्यांच्या इच्छेप्रमाणें पाठिंबा देण्यास आपण हयगय करूं नये. दोन वर्षांखालीं दिवंगत झालेला अयोध्येचा वजीर शुजाउद्दौला बेअकली किंवा निरभिमानी होता असें कोणी म्हणणार नाहीं. पण त्यास सुद्धां इंग्लंडचे राजाची वजिरी मिळविण्याची हाव सुटली होती. तो म्हणे 'इंग्लंडचे राजाची ताबेदारी स्वीकारण्यास मला मोठा अभिमान वाटेल. त्या राजाचे नांवाचा शिक्का सुद्धां मी आपल्या राज्यांतील कागदांवर पाडण्यास तयार आहें.' या कांहीं त्याच्या नुसत्या थापा नव्हत्या. ज्या इंग्रज राजाची सत्ता हिंदुस्थानांत आज इतके दिवस ऐश्वर्यानें नांदत आहे, तिच्या कृपाछत्राचा अभिलाष कोणास उत्पन्न होणार नाहीं! वास्तविक इंग्लंडचे राजावर त्याची एवढी भक्ति बसण्याचें कारण निराळेंच आहे. त्या राजाचे जे कारभारी म्हणून इकडे नेमून येतात, मग ते कोणत्याही हुद्द्याचे किंवा कोणत्याही लायकीचे असोत, त्यांच्या वारंवार बदल्या होत असल्याकारणानें, कारभारांत एकवाक्यता किंवा सातत्य राहत नाहीं; अथवा एकानें दिलेलीं वचनें किंवा जोडलेले स्नेह

मागून येणारा इसम पाळीलच, अशी येथील सत्ताधीशांची खात्री नसते. जो तो आपापल्या लहरीप्रमाणें वाटेल तें करण्यास मुखत्यार असतो. याचा परिणाम या वजिराइतका दुसऱ्या कोणास भोगावा लागला नाहीं. शुजा-उद्दौल्यावर निष्कांचन सेवाधर्माचीं दुःखें सहन करण्याची पाळी आमच्या या धरसोडीनें उत्पन्न झाली. थोडासा दूर विचार त्यास असता तर त्यानें आमच्याशीं स्नेहसंबंध जोडलाच नसता, किंवा तो जोडल्याबद्दल सारखा पश्चात्ताप भोगण्याशिवाय त्यास गत्यंतर नव्हतें. बरें, त्याची अशी स्थिति होऊन, त्यांत कंपनीचा तरी कांहीं फायदा झाला म्हणावा, तर तेंही नाहीं. तरी बरें, शुजाचा मुलगा असोफउद्दौला, इतकासा तरतरीत बुद्धीचा नाहीं. नाहीं तर झालेल्या अपायाबद्दल आमच्या सूडाचाच विचार त्याच्या डोक्यांत आला असता. अयोध्येच्या राज्यांत जेव्हां एखादा लायक पुरुष अधिकारावर येईल, तेव्हां या सर्व नुकसानींची भरपाई त्यास आपण करून दिली पाहिजे. वेळ येईल तेव्हां त्या वजिराची अव्याहत सत्ता योग्य मालकाच्या हवालीं आपण केली पाहिजे. वास्तविक हें थोडेंसें विषयांतरच झालें. सांगण्याचा मुद्दा इतकाच कीं, येथें घडणारे राजकीय व्यवहार जर सर्वस्वीं प्रत्यक्ष इंग्लंडचे राजाचे नांवानेंच एकदम केले, तर त्यापासून आमचे सरकाराचा व आमच्याशीं दोस्ती करूं इच्छिणाऱ्या सत्ताधीशांचा, असा दोघांचा फायदा आहे. कारण त्या-योगानें एकवार ठरलेली व्यवस्था इकडच्या कोणाही इंग्रज अधिकाऱ्यास केवळ लहरीखातर मोडतां येणार नाहीं; आणि त्या व्यवस्थेचे मूळ उद्देश भंग पाव-णार नाहींत. ते कायमपणें सिद्धीस जातील.

"अशा योजनेनें अयोध्येचा सुभा पूर्व स्थितीवर आणावा अशी माझी इच्छा आहे. याच योजनेनुसार नागपुरकर भोसल्यांशींही मी नवीन स्नेहसंबंध जोडूं पाहतों. अयोध्या व नागपुर हे दोनही प्रांत आम्हास लागून असल्यामुळें, त्यांचें महत्त्व आपणांस विशेष आहे; आणि म्हणूनच दुसऱ्या सत्ताधीशांपेक्षां या दोघांचीं प्रकरणें आपण प्रथम उरकावीं असें मला वाटतें. मग पुढें हळू-हळू तीच पद्धत इतरांसही लागू करण्यास हरकत नाहीं. मुख्य पाहिजे तें हें कीं, आमच्या वर्तनांत एकसूत्रीपणा असावा. धरसोड नसावी. केलेले करार बिनतकार पाळण्याची व्यवस्था झाली पाहिजे.

"या विषयासंबंधाचे माझे विचार तुम्हांस मी पूर्वीपासून वारंवार कळवीत

आलों आहें, म्हणून माझ्या या सूचनेचे फायदे काय आहेत, तें आणखी विस्तारानें तुम्हांस तरी सांगण्याची जरूर मला वाटत नाहीं. खरें म्हटलें तर हे माझे विचार कर्नल मॅक्लिन व तुम्ही, या दोघांशिवाय दुसऱ्या कोणासही मीं कळविलेले नाहींत. फक्त एकदां मुख्य प्रधान लॉर्ड नॉर्थ यांस लिहितांना, मीं पूर्वी नुसतें ओझरतें दिग्दर्शन त्या संबंधीं केलें आहे. म्हणूनच हे विषय मी पुनः पुनः तुम्हांसच लिहून कळवितों. हे माझे विचार अमलांत आणावयाचे झाले तर हल्लींच्या माझ्या प्रखर अडचणींचें निरसन झालें पाहिजे. स्वतःची अक्कल वापरण्याची मला पूर्ण मुभा पाहिजे; आणि कोणाच्या मार्फत मीं आपले विचार इंग्लंडच्या अधिकाऱ्यांपुढें मांडावे, तें मला ठरवून मिळालें पाहिजे.

" आतां या संबंधानें आज मी जास्त लिहीत नाहीं. वर जें लिहिलें आहे त्याचा उपयोग तुम्हांस योग्य दिसेल तसा करावा. पाहिजे तर त्याची पुढील व्यवस्था मर्जीमाफक करा, किंवा सर्वच सोडून द्या. माझ्या या लिहिण्यानें तेथें एखादे वेळीं कसा स्फोट होईल याची जाणीव मला आहे. कंपनीची मंडळी मला पाण्यांत पाहतात. त्यांची दृष्टि एकच, कंपनीची सनद कशी वाढेल ! कोणतेंही लष्करी प्रकरण आम्ही इकडे अंगावर घेऊं लागलों, कीं खर्चाच्या सबबीवर तें फेटाळून लावणें हा त्यांचा ठरलेला कोटिक्रम. शेजाऱ्यांच्या व्यवहारांत हात घालून त्यांच्या शांततेचा भंग करूं नका, हें त्यांचें नेहमींचें पालुपद. माझ्या वरील सूचनांचा असाच कयास ते करणार. त्यांचे हे वरच्या सारखे अनेक कोटिक्रम मीं खोडून काढण्याचें मनांत आणल्यास, त्यास पुष्कळ काळ व पुष्कळ पत्रें लागतील. या विषयाची चर्चा तेथें सार्वजनिक रीतीनें व्हावयाची असती तर इतकेही श्रम मीं केले असते; पण तसा हा विषय नाहीं. ज्यांस ही व्यवस्था ठरविण्याचा अधिकार आहे त्यांस हें पत्र दाखविण्यास हरकत नाहीं. कारण विशेष स्पष्टता केल्यावांचूनही त्यांस हा विषय समजेल. म्हणून तुमच्याकडेच हें पत्र मी गुप्त म्हणून पाठवीत आहें. तुम्हीं इतकीच सावधगिरी ठेविली पाहिजे कीं, इकडच्या गैरमाहीत सत्ताधीशांचे मनांत इंग्रज राष्ट्राची इभ्रत किंवा इंग्रज राज्याचा अधिकार वृद्धिंगत व्हावा म्हणून जो मीं हा प्रयत्न चालविला आहे, त्यामुळे निदान नुकसान भोगण्याची पाळी तरी मजवर येऊं नये. माझ्या समजुती-

प्रमाणें माझे हे उद्देश फार स्तुत्य आहेत, ते तडीस नेण्यास लागणारीं साधनें तेथें अपुरीं वाटत असतील तर वाटोत, अथवा दुसऱ्या कांहीं सबबींवर या माझ्या सूचना अप्रयोजक वाटतील, तर त्यासही माझा इलाज नाहीं. न्याय व नीति यांच्या खंबीर पायावर माझ्या सूचनांची उभारणी आहे, याविषयीं मला तिलप्राय संशय नाहीं. कळावें."

ता. १७ फेब्रुवारी सन १७७७.

" माझे प्रिय एल्यट यांस. वरील पत्र मागच्याच महिन्यांत जाण्यासाठीं लिहिलें होतें. पण तें जाऊं शकलें नाहीं, म्हणून तें यासोबतच पाठवीत आहें. जी व्यवस्था ठरवावी म्हणून मी म्हणतों व जी तुम्हांस पूर्वींच माहीत आहे, तिची स्पष्टता त्या पत्रांत आहे. ती कितीही जरूर आहे असें मला वाटत असलें, तरी मीच येथें ती प्रत्यक्ष अमलांत आणण्यास मला मोकळीक नाहीं, आणि माझ्या डोक्यावर सासूबाईच्या अधिकाराचा दांडा लटकत असल्या-मुळें, दुसऱ्या कोणाची शिफारसही मला या बाबतींत घेण्याची सोय नाहीं.

"याशिवाय दुसऱ्याही आणखी अडचणी आहेत. सरकारी रीतीनें हा विषय मला वरिष्ठांपुढें मांडतां येत नाहीं. एक तर हा विषय गुप्त स्वरूपाचा अस-ल्यामुळें, तो गुप्त समितीपुढें ठेवणें इष्ट नाहीं. कारण ज्या समितींत अनेक गृहस्थ असणार, तेथें गुप्तपणा तो काय राहणार ! ते सर्वच कांहीं निष्कृत्रिम भावनेनें या गोष्टीचा विचार करणारे नसणार! कितीही अल्पसंख्य असली, तरी समिति ती समिति. तिच्यापुढें येणारे कामाचा जिम्मा कोणा एका ठरीव व्यक्तीवर कधींच नसतो. समितीच्या अध्यक्षास हा विषय लिहून कळविणें शक्य नाहीं. कारण एक तर तो अध्यक्ष हल्लीं कोण आहे हें मला माहीत नाहीं; आणि दुसरें असें कीं, डायरेक्टर मंडळींत जे हल्लीं मुख्य मुख्य जागांवर आहेत, ते बोलूनचालून माझे शत्रुच असल्यामुळें, ते माझ्या सूचनांचा योग्य विचार न करितां, उलट भलताच विपर्यास करून अनर्थ मात्र उडवितील. बरें, एकदम मुख्य प्रधानांसच हे सर्व भाग लिहून कळवावे, तर प्रथम त्यांस फुरसत किती आहे, इकडील व्यवहारां संबंधानें त्यांचे विचार कसे आहेत आणि त्यांची एकंदर आवरशक्ति कशा प्रकारची आहे, याचा आरंभीं थोडा ठाव लावल्याशिवाय, एकदम मुख्य प्रधानांस हा विषय

कळविणें मला इष्ट वाटत नाहीं. त्यासाठीं प्रथम त्यांची समजूत कोणी तरी परभारें पाडणें अवश्य आहे.

" हें पत्र तुम्हांस पोंचेल तेव्हां इंग्लंडांतील एकंदर हालहवाल कशी असेल याची मला येथें कांहीं एक कल्पना करतां येत नाहीं. गेल्या वर्ष दोन वर्षांत हिंदी राजकारणासंबंधानें कोर्ट ऑफ डायरेक्टरांकडून आमच्याकडे अनेक भिन्न हुकूम लिहून आलेले असून, त्यांचा ठाम निष्कर्ष काय ठरवावयाचा, याचीच आम्हांस पंचाइत पडली आहे. कोणत्याही सबबीवर आम्हीं येथें युद्धप्रसंग करूं नये, कितीही फायदा कंपनीचा होत असला तरी आम्हांस युद्धें नकोत, असें एका बाजूनें ते सांगतात, तर त्याबरोबरच, राघोबानें सुरतेच्या तहानें जो प्रदेश मुंबईकरांस दिला तो आपल्या ताब्यांतून परत जाऊं देऊं नये, त्यासाठीं आम्हीं कलकत्त्याहून मुंबईकरांचें शक्य तितकें साहाय्य करावें, असेंही ते लिहून पाठवितात. हिंदी राजकारणांत बिलकूल पडूं नये, असें एका तोंडानें म्हणणें, तर लगेच हिंदुस्थानांतील अत्यंत प्रबल सत्तेशीं टक्कर देण्यास दुसऱ्या तोंडानें सांगणें, या दोन विरुद्ध गोष्टींचा मेळ कसा बसवायचा !

" यामुळें कोर्ट ऑफ डयरेक्टरांचा खरा उद्देश काय, याचीच निश्चिति जर आम्हांस येथें बिलकूल करतां येत नाहीं, तर मग प्रत्यक्ष राजाचे मनोदय तेथें काय आहेत याचा थांग तरी मला कसा लागणार ! अशा अडचणींमुळें मी हा विषय तुम्हांवरच सोंपवितों. तुम्हीच तेथील काल देश वर्तमान पाहून योग्य दिसेल तें करा. मीं सुचविलेली योजना ग्राह्य होण्याचें चिन्ह तुम्हांस तेथें दिसत असलें, तर तिचा पुरस्कार करण्यास ज्या गोष्टी तुम्हांस अवश्य वाटतील, त्या तुम्ही करा; उलट पक्षीं आम्ही आपल्या राष्ट्राचें वजन इकडे वाढविण्यासंबंधानें लोकमताची तेथें अनुकूलता नसेल तर हा विषय साफ सोडून द्या, त्याचा कोठें उल्लेख सुद्धां करूं नका. कारण उगाच वाच्यता झाल्यानें फलप्राप्ति कांहीं न होतां उलट अपायच व्हावयाचा.

" हीं पत्रें मी कॅप्टिन टून यांजबरोबर पाठवीत आहें. त्यांची लायकी तुम्हांस माहीतच आहे. माझा त्यांजवर मोठा लोभ आहे. प्रकृति बरी झाल्यास त्यांनीं पुनः हिंदुस्थानास परत यावें, असा माझा त्यांस आग्रह आहे. तुम्ही त्यास योग्य ती मदत करावी.

" ताजा कलम—पहिल्या पत्रांत मी सदोबाचा उल्लेख केला आहे, त्याचा लोकांनीं बडवून* वध करण्यांत आला, असें वर्तमान कळतें. अब्बी हानीफाचे मताप्रमाणें असा वध म्हणजे खून होत नाहीं. ब्राह्मणाचें पवित्र रक्त भूमीवर सांडूं नये, अशी हिंदूंची कल्पना दिसते. यावरून हा तोतया नसून खराच सदाशिवराव होय, असा समज व्यक्त होतो.

" वरच्या पत्रांत मी आपली हिंदी राजकारणाची योजना, फुरसत मिळाली तेवढ्यांत, शक्य तितकी स्पष्ट केली आहे. तिचा उपयोग तुम्हांस योग्य दिसेल तशा रीतीनें करालच. अर्थात् ती अपूर्ण आहे. मला जें साध्य होईल अशी खात्री वाटते, तें सर्व स्पष्टपणें मला आतांच कागदावर नमूद करतां येत नाहीं. एकदां आमचें वजन बसून, एक एक प्रकरणें उलगडत चाललीं, म्हणजे आणखी किती तरी नवीन महत्त्वाचे व्यवहार उपस्थित होतील, त्यांची आतांच कल्पना बांधणें इष्ट नाहीं, आणि त्या संबंधानें माझे अंदाज मी कागदावर नमूद करूं लागलों तर शेख महंमदाप्रमाणें लोक मला वेड्यांत सुद्धां काढण्यास कमी करणार नाहींत. यावरून मी बांधीत असलेले भावी तर्क खोटे ठरतील अशी मात्र मला बिलकूल भीति वाटत नाहीं. मला तर खात्री आहे कीं, मी म्हणतों याहूनही जास्त यश आपणांस मिळण्याचा चांगलासा संभव आहे. परंतु निंदकांच्या हातांत हा विषय गेला तर ते माझा सूड घेण्यास चुकणार नाहींत, एवढीच मला भीति वाटते. प्रस्तुत येथील इंग्रजी राज्यकारभारांत दोन मोठीं व्यंगें आहेत. एक अधिकाऱ्यांच्या अंगीं अनिवार खावूपणा आहे, आणि दुसरें, हातांत सत्ता आली म्हणजे ज्याला त्याला वाटतें, पूर्वीच्यास नालायक ठरवून आपण नवीन दिग्विजय संपादन करावा ! याचें उत्कृष्ट उदाहरण, अयोध्येच्या वजिराबरोबर जडलेला आमचा स्नेहसंबंध पहा. त्यामुळें निष्कारण खर्चाचा बोजा आपल्यावर पडला, असें आरंभीं कंपनीला वाटलें. नंतर कांहीं दिवस उभयतांचा फायदा व्हावा अशी योजना ठरविण्यांत आली, आणि हल्लीं मात्र त्यामुळें अयोध्येच्या राज्यावर खर्चाचें दुःसह संकट ओढवलें आहे. याचा अर्थ असा कीं, पर्यायानें हें नुकसान शेवटीं कंपनीलाच भोगावें लागणार.

* कुंभारवेसीचे वाटेवर चुन्याचे चाकाजवळ 'डोक्यांत मेखसूं ठोकून मारलें.' असें मराठी कागदांत आहे.

माजी वजीर शुजाउद्दौला तैनाती फौजेबद्दल दरसाल पंचवीस लाख खंडणी आनंदानें कंपनीला देत असे. फौज पाहिजे तर खर्च द्यावा, खर्च नको, तर फौज सोडावी, अशी ही व्यवस्था त्याच्या मर्जीवर होती. हल्लींचा वजीर असोफउद्दौला यानें तेवीस लाख उत्पन्नाचा बनारस प्रांत आम्हांला दिला; शिवाय खंडणीबद्दल तो ३१ लाख आम्हांस सालाचे देतो, निदान त्यानें तसे दिले पाहिजेत. याशिवाय त्याजवर आम्हीं आपली फौज लादून तिच्या खर्चाबद्दल सुमारें चाळीस लाखांचा आणखी बोजा जाणूनबुजून टाकिला. मिळून वजिराच्या खजिन्यांतील एक कोट रुपये खर्च करण्याचें तेवढें काम आम्हीं पत्करिलें; मग तो खजिना साफ रिकामा झाला तर नवल काय! बरें, जी फौज त्याचे उपयोगासाठीं म्हणून आम्हीं दिली, तिचा त्याला उपयोग घडेल तर शपथ. उलट तिला पगार पोंचत नसल्यामुळें, ही एक नसती उपाधि मात्र त्याचे मागें लागली, इतकाच अर्थ निष्पन्न झाला. आज अयोध्येच्या राज्यास ही फौज दूर करण्याचीहि सोय राहिलेली नाहीं. कारण फौज दूर झाली, कीं वाटेल त्या चोरानें येऊन तें राज्य बळकवावें, अशी तेथील स्थिति आहे. असो.

"माझ्या सूचनेंतील अनेक विधानांची स्पष्टता करणें जरूर आहे हें मी जाणतों; परंतु मला तसा वेळ नाहीं व पत्रही फार लांबलें. तेव्हां तुम्हांस सुचेल तशी त्याची स्पष्टता तुम्ही तेथें करीत जा. बादशहाजवळ मीर्झा नजफखान कारभारी आहे, तो आमचाच मनुष्य आहे. तो जिवंत आहे तोंपर्यंत दिल्लीच्या राजकारणासंबंधानें आम्हांस मराठ्यांची भीति बाळगण्याचें मुळींच कारण नाहीं. येऊन जाऊन आम्हांस भीति काय ती एकट्या मराठ्यांची. नजफखानाजवळ पैसा नाहीं, म्हणून बादशहाकडून खंडणी मिळण्याची आपण अपेक्षा ठेवूं नये. परंतु तो जिवंत आहे तोंपर्यंत मराठ्यांची धास्ती आम्हांस नाहीं. तो नाहींसा होईल, तेव्हांच दुसरी कांहीं तरी आमच्या व आमच्या दोस्ताच्या ( वजिराच्या ) बचावाची तरतूद आम्हांस करावी लागेल. कारण मराठे आपणांस चैन पडूं देणारे नव्हत.‡

"शांतता कायम राखणें एवढाच जर आमचा हेतु असेल, तर तो साध-

‡ मीर्झा नजफखान ता. ६-४-१७८२ रोजीं मरण पावला आणि त्यानंतरच महादजी सिंद्यानें दिल्लीचें कारस्थान हातीं घेतलें.

ण्याचें उत्कृष्ट साधन म्हणजे युद्धाची तयारी जय्यत ठेवणें हेंच होय. यावांचून दुसरा उपाय नाहीं; आणि माझी सूचना तिकडे पसंत पडून मी येथें असें-पर्यंत ती अमलांत आली तर, मी तरी या योजनेचा उपयोग शांतता राखण्या-साठींच करणार. मात्र मी आतां इकडे फार दिवस राहीन असा योग दिसत नाहीं. हातीं सत्ता नाहीं व वरिष्ठांचा पाठिंबा नाहीं, अशा स्थितींत येथें केवळ पार्लमेंटानें दिलेली मुदत संपेपर्यंत वाट पाहत राहणें मला पसंत नाहीं. त्या-पेक्षां ते मला एकदम परत बोलावून घेतील तर त्यांत मला आनंद होईल. अशा पराधीन स्थितींत मला कोणी राज्य दिलें तरी नको. जनरल क्लॅव्हरिंगला माझा चार्ज मिळाला तर ठीकच; परंतु कर्नल मॉन्सनच्या जागीं दुसरा कोणी नेमून येईल तर तो माझा दुष्मनच येणार. माझ्या तर्फेचा कोणी येईल अशी मला आशा नाहीं; आणि माझा विरोधक कोणी आला म्हणजे पुनरपि पूर्वीचेच अत्याचार चालू होतील. खरें म्हटलें, तर एका सत्तेचा पुरस्कार कौन्सिलच्या पांच असामींनीं करणें हें मुळीं अस्वाभाविक आहे; कारण पांचांमध्यें कोणत्याही कामांत मतभेद झाला, कीं एकाच्याच मतावर अखेर निर्णय अवलंबून राह-णार हें उघड आहे. कळावें. "

मराठ्यांच्या तत्कालीन राजकारणासंबंधानें वरील पत्रें फार मननीय आहेत. शांतता राखण्याचें उत्तम साधन म्हणजे युद्धाची सिद्धता ठेवणें, हा युक्तिवाद महायुद्धापूर्वी फारच बोकाळला होता; त्याचाच पुरस्कार वरील हेस्टिंग्सच्या पत्रांत दिसतो. तसेंच एकतंत्री सत्ता आपल्या हातांत असावी म्हणून हेस्टिंग्स कसा धडपडत होता, हेंही या पत्रांत दिसतें. वरून कोणतेंही बंधन नसून, मन मानेल तसें वागून आपल्या राष्ट्राची सत्ता वाढविण्याची त्याची तळमळ सारखी चालू होती. परंतु इंग्लंडच्या नियंत्रित राज्यघटनेपुढें त्याचा इलाज चालला नाहीं.

इंग्रजांच्या आक्रमणशक्तीची मार्मिक व्याख्या अहल्याबाईनें केली आहे. ती म्हणते, 'इंग्रजांची प्रबळता हिंदुस्थानांत फार जाली. इंग्रज सर होणें दुरापास्त आहे. त्यांस सर करण्यास सहाय एक श्रीमंत रावसाहेबांचा पुण्यप्रताप. ते केवळ अवतारी पुरुष. त्यांच्या कृपावीक्षणें मात्र मसलत सिद्धीस पावेल. वर-कड व्याघ्रादिक श्वापदें बळ व युक्तिप्रयुक्तीनें मारतील; परंतु आस्वलाचें मारणें फार कठिण आहे. सुरत धरून मारलें तरच मरेल. नाहीं तर आस्वला-

ने चपेटींत कोणी सांपडला तर गुदगुल्या करूनच आस्वल त्यास मारील. तद्वत् ही इंग्रजांची लढाई आहे. पाहतां यांचें मारणें कठिण.' (म. द. बा. १.५). म्हणजे मराठ्यांची सार्वभौम सत्ता हिसकून घेण्याचा हेस्टिंग्सचा हा प्रयत्न असून, त्यांत त्यास यश आलें नाहीं. ही सत्ता वेलिंग्टननें आसईच्या लढाईंत संपादिली असें फॉरेस्ट लिहितो. डाड्वेल म्हणतो कीं स. १७५७ पासून जरी हिंदुस्थानांत इंग्रजी राज्य हळूहळू वाढत गेलें, तरी बराच काळ पावेतों हा एक प्रकारचा चोरटा कारभार होता. त्यास युरोपियन राष्ट्रांनीं मान्यता दिलेली नव्हती. अशी मान्यता नेपोलियनच्या पाडावानंतर स. १८१४ त इंग्रजांनीं युरोपियन राष्ट्रांपासून मिळविली.

**४. इंग्रजांची पुण्यावर चढाई** ( २४ नोव्हें०–९ जाने० १७७९ ).—मोरोबाच्या प्रकरणानें राज्यावर कठीण प्रसंग आला होता, तो नाना महादजींच्या उद्योगानें टळला; तरी लग्नासाठीं तयार झालेलें साहित्य लग्न झालें नाहीं तरी जसें वायां जात नाहीं तद्वत् या कामीं झालेल्या खटपटीनें प्रत्येकास आपल्या स्थितीची व सामर्थ्याची चांगली उमज पडली, हा तरी त्या प्रकरणाचा आनुषंगिक फायदा पदरांत पडला. महादजीची धूर्तता व सामर्थ्य नानाचे प्रत्ययास पूर्णपणें आलें, आणि मराठ्यांच्या राज्यशकटाचीं हीं दोन मुख्य चाकें होत, अशी सर्वांची खात्री झाली. 'काल्पीचें ठाणें घेऊन इंग्रजांनींच बिघाड सुरू केला. भारी सरंजमानिशीं पुण्यावर येण्याचा मॉस्टिन व मुंबईकर यांचा बेत आहे; उभयतां सरदार प्रस्तुत वर्ततात तसेच राहिले तर कोणतीही गोष्ट अगाध नाहीं; नाना प्रकारचे मनसबे घाटत आहेत, कांहीं ताल नाहीं. नित्य नवीन ठरतें. कांहीं हिसके आंतून बापूचे व कांहीं पाटील-बावांचे, असें आहे. हिंदुस्थानांतून इंग्रज येतात, मुंबईहून श्रीमंत निघणार, उभयतां सरदारांचें लक्ष त्यांचे ठायीं आहे. वृद्धही त्यांत आहेत असें बोल-तात. नाना सिंद्यांचे साधनांतच आहेत. चिंतो विठ्ठलाचीं मुलें माणसें पुण्यांत होतीं, तीं परवां ( २-११-१७७८ ) पळून गेलीं. गडबडीचा प्रकार दिसतो. दादांनीं पांच सात हजार माणूस जमा केलें आहे. आणखी दोन तीन हजार जमवून बाहेर निघणार.' अशा प्रकारची गडबड पुण्यांत होती. (खरे, ले. २३९२, २३९४, २४२१-२२, २४२५, २४३२, २४३४ ).

पुरंदरचा तह मोडून दादास नेऊन पेशवाईवर स्थापावें असा मुंबईकरांनीं

ठराव करून तो मंजुरीकरितां कलकत्त्यास पाठविला. तेथें त्यावर अत्यंत तीव्र वादविवाद होऊन ता. २ फेब्रुवारी १७७८ रोजीं हेस्टिंग्सच्या जादा मतानें तो मंजूर झाला. हेस्टिंग्स व बार्वेल एका बाजूस, आणि फ्रॅन्सिस व व्हेलर विरुद्ध. त्याच वेळीं कर्नल लेस्लीच्या हाताखालीं मुंबईकरांचे मदतीस कलकत्त्याची फौज पाठविण्याची तजवीज झाली. ता. २४-११-१७७८ रोजीं दादाशीं मुंबईकरांनीं नवीन तह केला. त्याचीं कलमें बहुतेक स. १७७५ तील सुरतच्या तहासारखींच होतीं. मात्र आतां पेशवाईचा मालक सवाई माधवराव ठरल्यामुळें दादानें फक्त त्याच्या अज्ञानस्थितींत कारभारी म्हणून राहवें. 'आम्ही नवीन कांहीं करीत नाहीं. कारभारी लबाड आहेत, त्यांस दूर करून दादासच हक्कदार या नात्यानें कारभार देऊं,' असा इंग्रजांचा पुकारा होता. बालपेशव्याच्या संरक्षणास इंग्रज पहारेकरी सदैव राहवे, अशी आणखी अट होती. म्हणजे आमच्या संरक्षणाशिवाय तुमचें चालत नाहीं एवढेंच इंग्रजांस पदरांत पाडून घ्यावयाचें होतें. मोरोबा, बजाबा व तुकोजी होळकर यांस पूर्वीप्रमाणें कामावर घ्यावें, इंग्रजांचे शत्रूंस राज्यांत थारा देऊं नये आणि त्यांच्या दोस्तांस उपद्रव देऊं नये, वगैरे नेहमींचीं मामुली कलमें या तहांत होतीं. तह झाल्यावर दुसरेच दिवशीं इंग्रजी फौज दादा व अमृतराव यांस घेऊन मुंबईची खाडी उतरून समोर पनवेलीस उतरली. त्यांत ५०० इंग्रज व सुमारें दोन हजार एतद्देशीय शिपाई होते. मुख्य सेनापतीचें काम कर्नल इगर्टन याजकडे असून तो, कार्नक व मॉस्टिन या तिघांच्या समितीकडे इतर सर्व कारभार सोंपवलेला होता. या द्विमुखी व्यवस्थेमुळें नाना प्रकारचे घोटाळे झाले; आणि शुष्क वाटाघाटींत मूल्यवान वेळ फुकट गेला. स्वारी खंडाळ्यास पोंचण्यास महिना लागला. ता. २५ डिसेंबरचा मुक्काम खंडाळ्यास झाला. इतक्यांत इगर्टनची प्रकृति बिघडली, तेव्हां मुंबईस परत जाण्याची त्यानें परवानगी घेतली, परंतु परत जाण्याची वाट मराठ्यांनीं अडवून धरल्यामुळें तो फिरून कामावर रुजू झाला. इतक्या अवधींत या इंग्रजांच्या डोळ्यांतच चक्क उजेड पडला कीं पुणें काबीज करण्याचें काम आपल्या शक्तिबाहेरचें आहे. खंडाळ्यावरून इंग्रज पुढें येऊं लागले तसे मराठे सर्व प्रदेश जाळून गवताची काडी सुद्धां शिल्लक न ठेवतां मागें हटूं लागले. ता. ९ जानेवारीस इंग्रज तळेगांवास पोंचले, तेव्हां त्या गांवाची राखरांगोळी केलेली त्यांस दिसून आली.

घांटापर्यंत येतांना सुद्धां अनेक भानगडी झाल्या. पुण्याची कांहीं फौज दिवा घांटानें खालीं उतरून तळें घोसाळ्यावरून इंग्रजांच्या मागें आली. रघुनाथराव मागें मागें असे. त्यास पकडून घेऊन जावें, म्हणजे सर्व खेळ संपला अशी मराठ्यांनीं तयारी ठेविली. मागच्या मागें दादास पकडून आणण्याची ही कामगिरी रघूजी आंगऱ्यास सांगितलेली होती. प्रत्यक्ष दादाजवळ वावरणाऱ्या मंडळींत नानाचे हेर असून त्यांजकडून सर्व कच्ची बातमी रोजच्या रोज नानास कळत होती. कांहीं ना कांहीं अडचणींमुळें दादा मागेंच राहूं लागला. तेव्हां मागें न राहतां फौजेंत बरोबर चालण्याविषयीं इंग्रजांनीं त्यास निकड केली. इकडे पुण्यास सुद्धां इंग्रजांचे हेर नानाचे सभोंवार वावरत होते. दादाजी उद्धवजी हा इंग्रजांस पुण्याची बातमी पाठवी. टॉमस बार्नस् नांवाचा एक गृहस्थ दुभाष्या म्हणून नानाचे नोकरींत होता, त्याजकडून दादाजी उद्धवजी बातमी काढी. याच संधीस म्हणजे ता. ११-१२-१७७८ रोजीं कारभाऱ्यांनीं साताऱ्यास माणसें पाठवून शाहूस राज्याभिषेक करविला, आणि त्याजकडून माधवराव नारायणाचे नांवचीं पेशवाईचीं वस्त्रें आणविलीं. नाहीं तर त्या संबंधानें पुढें कांहीं तरी भानगड दादानें उपस्थित केली असती. मुंबईकरांचे मदतीस मे महिन्यांत निघालेली बंगालची फौज प्रथम काल्पीवर व पुढें आणखी अडथळा होऊन अडकली गेली, नाहीं तर ती वेळेवर येऊन डिसेंबरांत आपणांस सामील व्हावी असाच मुंबईकरांचा अंदाज होता. वास्तविक मोरोबा दादास कारभार मिळाला, तेव्हांच इंग्रज दादास घेऊन पुण्यास येणार होते, पण एक तर पावसाळा नजीक येऊन त्यामुळें घांटांतून तोफा जाणें अशक्य असून बंगालची फौज येण्यास अवधि होता. यास्तव ही मोहीम इंग्रजांनीं डिसेंबरचे आरंभीं सुरू केली. गॉडर्ड १२ नोव्हेंबरास सिरोंजेस व २६ नोव्हेंबरास भोपाळला आणि तेथून बरोबर एक महिन्यानें हुशंगाबादेवर नर्मदाकांठीं आला. या हालचालींचा संदर्भ येथें ध्यानांत ठेविला पाहिजे. या वेळीं लुई नांवाचा एक इंग्रज मॉस्टिनचा मदतनीस पुण्यास होता, तो दादाजी उद्धवजीकडून बातमी मिळवून इंग्रजी फौजेस पाठवी. फौजेबरोबर पुण्यावर येत असतां रस्त्यांत मॉस्टिन आजारी झाला, आणि मुंबईस परत जाऊन ता. १-१-१७७९ रोजीं मरण पावला; त्या वेळीं त्याचें वय ४८ होतें. ता. ३०-१२-७८ बुधवार रोजीं खंडाळ्याहून फौज पुढें निघाली. ता. ४-१-७९

मु० कार्ला येथें कॅ. स्टुअर्ट मारला गेला. कर्नल के जखमी होऊन परत गेला. ता. ६-१-७९ कर्नल ईगर्टन आजारी होऊन परत गेला, त्याचे जागीं कॉक्-बर्नची नेमणूक झाली. इंग्रजांच्या तोंडावर खंडाळ्यास भीवराव पानशे याची रवानगी झाली होती. तळेगांवास इंग्रज येई पावेतोंचें लढणें बहुतेक पानशांशींच झालें. सिंदे होळकर वगैरे प्रमुख सरदार आपणास लगोलग येऊन मिळतील असें दादानें पक्कें आश्वासन इंग्रजांस दिलें होतें. पण त्याप्रमाणें कोणीच आले नाहींत, तेव्हां दादास विचारतां, तो म्हणाला, आम्हांस या लोकांनीं फस-विलें. यानंतर फौजेचे मुक्काम झाले ते असे. ता. ७-१-७९ खडकाळें; ता. ८-१ वडगांव, शनिवार ता. ९-१ तळेगांव. तळेगांवांत कांहीं एक उरलें नव्हतें. या ठिकाणीं इंग्रज येतांच होळकर सुद्धां सिंद्याचे बरोबरीनें दादाचे उलट लढतांना इंग्रजांनीं पाहिला. मॉस्टिन व दादा यांनीं वाटेल तशा थापा मारून मुंबई कौन्सिलला फसविलें, असें आतां तळेगांवावर इंग्रज कमिटीस दिसून आलें. अशाच प्रकारें चिंचवड व पुणें सुद्धां जाळण्याची कारभाऱ्यांनीं सिद्धता केली आहे, असा प्रकार उघड दिसूं लागला. पुढें निभावणी होणें कठिण तेव्हां सिंदे, होळकर व सखाराम बापू यांच्याशीं तडजोड करून पुढील व्यवस्था ठरविण्याचा इंग्रज कमिटीनें निश्चय केला. यासंबंधानें दादाचें व त्यांचें सारखें बोलणें चालू होतें. रविवार १० व सोमवार ११ या दोन दिवशीं इंग्रजांकडे पुष्कळ वाटाघाट होऊन फौजा परत जाव्या असें ठरलें. सिंदे होळकरांशीं दादाची कांहीं अंतस्थ वाटाघाट चालू होती. विल्यम कॉकबर्न हा या वेळीं सेनापति होता. ता. १२-१३ जानेवारी, मंगळवार बुधवार या दिवशीं वडगां-वास इंग्रजी फौज मुक्कामास राहिली.

**५. तळेगांवावर इंग्रजांचा कोंडमारा** ( १७-१-१७७९ ).—मुसा नारज म्हणजे मस्यू नोरोन्हा नांवाचा एक फिरंगी गोलंदाज पानशांचे हाता-खालीं पेशव्यांचे फौजेंत होता. या गोलंदाजीसाठीं मराठी फौजांत अशीं पाश्चात्य माणसें मुद्दाम ठेवण्यांत येत. हा गृहस्थ नाना फडणिसाचे भरंवशाचा, दहावीस वर्षें मराठ्यांच्या युद्धांत सुप्रसिद्ध होता. न व ज या मोडी अक्षरांच्या साम्या-मुळें त्याचें नांव मुसा नारज, जारज, असें तत्कालीन लेखांत आढळतें, पण त्याचें खरें नांव Noronha ( नोरोन्हा नारन ) असें फॉरेस्टनें ( पृ. ४२२ वर ) दिलें आहे. तळेगांवावर इंग्रजांस त्राहि त्राहि करून सोडणारा हाच गृहस्थ होय.

कॅप्टिन बॉन्व्हो नामक एक इंग्रज गृहस्थ पुण्यास पेशव्यांचे कैदेंत होता. तेथील ता. २५-२-१७८१ च्या पत्रांत त्यानें मुसा नारनची फारच वाखाणणी केली आहे. हा बान्व्हो युरोपांतून इंग्रजांची जरुरीची डांक घेऊन येत असतां त्यास पश्चिम किनाऱ्यावर धुळपानें पकडून विजयदुर्गास नेलें आणि पुण्याहून हुकूम आणून रसाळगडच्या किल्ल्यांत अडकवून ठेविलें. तेथें तो आजारी पडला, तेव्हां त्यास पुण्यास नेलें. तेथें मुसा नारननें त्याची उत्कृष्ट शुश्रूषा करून त्यास बरा केलें. हा मुसा नोरोन पुढें खर्ड्याच्या लढाईंत व बाजीरावाचे अव्वलीस कामावर होता.* ता. ७-१-१७७९च्या पत्रांत तो लिहितो, 'भीवरावांचे बरोबर पुढें गेलों होतों. अगोदर इंग्रजांनींच दोन चार गोळे टाकले. तेव्हां पानशांनीं आम्हांस गोळे टाकण्यास सांगितलें. त्यावरून सरकारची तोफ मचसीमन आहे, तिचे वीस गोळे टाकविले. त्यांचे गोटांत जाऊन पडले. त्यांजकडील दोन असामी एक मुसलमान व एक धनगर आमचे पेंढाऱ्यांनीं धरून आणिले. त्यांनीं सांगितलें कीं इंग्रजांचीं चार पलटणें व १५ तोफा आहेत.$ परवां इष्टुर फांकडा पडला. ते आज कूच करून लढाईस गेले. मागें लष्करांत हुल्लड पडून कूच होऊन तळेगांवीं मुक्काम केला. घोडेस्वार कोणी पुढें होत नाहींत. तोफांचे बार मात्र करितात. त्यांस आपणांस सहा कोसांचें अंतर आज आहे.' रामचंद्र गणेश व बाजीपंत अण्णा हे पानशांच्या मागोमाग तळेगांवास होते, नंतर उभयतां कारभारी व सिंदे होळकर वानवडीवरून कूच करून गेले. एकंदर मराठी फौज अंदाजी ४५ हजार होती. 'लष्करांत महादजी सुद्धां सर्व एकदील आहेत. होळकराचा मात्र भरंवसा नाहीं. या वेळीं खर्चासाठीं सर्व सरंजाम्यांपासून निम्मे ऐवज सरकारांत घेतला. सिंदेहोळकर वगैरे सर्वांनीं ऐवज दिला. मुधोजी भोसले यांस वारंवार पत्रें गेलीं ते फौज इकडे पाठविणार आहेत. निजामाची फौज दहा हजार कुमकेस पैठणाजवळ जमा होणार.' या वेळीं करवीरकर छत्रपति व हैदर फारच त्रास देत होते. त्यांचे तोंडावर परशुरामभाऊ मात्र सुरापुराकडे होता. 'शुक्रवार ता. ८ रोजीं इंग्रज दादासुद्धां तळेगांवावर आले. सोमवारीं रात्रीस तळेगांवावरून पलटणें सुद्धां निघोन

---

* बा. रो. पृ. ६१; डफ.

$ ऐ. टि. १. ५१; खरे २४५७–६१; व फॉरेस्ट.

माघारे गेले. ही चाहूल समजतांच मराठी फौजा धावून गेल्या. वडगांवास दोन तीन पलटणांची दिवस उगवतां गांठ पडली. सरकारच्या तोफांनीं इंग्रज तोफा बंद केल्या. पांच तोफा पाडाव आणिल्या. इंग्रजांचा मोड जाहला. चार पांचशें माणूस मारिलें. शिवाय दोन हजार बंदुका वगैरे लूट सांपडली. वडगांवास इंग्रज कोंडले आहेत.' कोंकणांत बाळाजीपंत फाटक चार हजार फौज घेऊन कल्याण प्रांतांत गेले. खोपवलीस फौज बसली आहे. तमाम मुलूख जाळिला. इंग्रजांची रसद बंद केली. तळेगांवाहून पुण्यास पत्रें कारभाऱ्यांचीं आलीं, कीं शहरास अग्न लावणें. यावरून तमाम लोक पळून गेले. कोणी माणूस शहरांत राहिलें नाहीं. नानाचे मतें पुणें जाळावें. होळकर सिंद्यांचे मतें न जाळावें. इंग्रज माघारा गेला म्हणून अग्न लावायचें राहिलें. तरी गडबड भारी जाली. शहर झाडून ओस झालें.

वडगांवास मराठी फौजांनीं इंग्रजांस घेरून परत जाण्याची बंदी केली. या कोंडमाऱ्यामुळें इंग्रजांची पांचावर धारण बसली, तरी जमल्यास सखाराम-बापूस खासगी रीतीनें सामील करून सिंदे होळकरांसही लालूच दाखवून अनुकूल करावें असा प्रयत्न थोडा वेळ दादा व इंग्रज यांनीं केला. परंतु मोरोबाचे प्रकरणापासून बापूचें वजन कांहींच राहिलें नव्हतें. सर्व सूत्रें एकटा नाना हालवीत असून तो सर्वथैव महादजीचे तंत्रानें वागत होता. इंग्रजांस कोंडून मारावें, असा त्यांनीं बेत केला. अशा स्थितींत कार्नेकनें होळकरास चिठी लिहिली, पण तिचा कांहीं एक उपयोग झाला नाहीं. ता. १० जानेवारीस दादानें होळकरास पत्र लिहिलें, कीं 'पुण्यांतील कारभारी बंड करून राज्याचा नाश करीत आहेत, त्यांना तुम्ही बुद्रूक सरदारांनीं मदत करणें योग्य नाहीं. यासाठीं तुम्हां उभयतांशीं स्नेह करावा, अशी माझी इच्छा आहे.' यावरून महादजीनें दोन माणसें गुप्त वेषानें दादाकडे पाठविलीं. त्यांजबरोबर दादानें निरोप पाठविला, कीं आपण सिंद्याचे स्वाधीन होण्यास कबूल आहोंत. दादास आतां कळून चुकलें होतें, कीं महादजीच सर्व सूत्रचालक आहे, त्याच्याच आश्रयानें आपला बचाव लागेल. अशा स्थितींत दादास हवालीं करून घेऊन आपणांस सुरक्षित परत जाऊं द्यावें, असें ठरविण्यासाठीं इंग्रजांनीं आपला फार्मर नांवाचा एक इसम स्नेहाचें बोलणें करण्यास मराठ्यांच्या छावणींत पाठविला. या दोन तीन दिवसांत मराठ्यांनीं इंग्रजांस अगदीं जेरीस आणून

त्यांचे शेंकडों लोक ठार मारिले. ता. १४ रोजीं फार्मरची भेट सिंदे, नाना व हरिपंत यांनीं दरबारांत घेतली.

इंग्रजांशीं स्नेह केल्यानें मराठ्यांस कसे फायदे आहेत याची खूब बतावणी फार्मरनें आपल्या बाजूनें शक्य तितकी केली. परंतु त्यांचा दम मराठ्यांस चांगलाच कळून चुकला होता. 'प्रथम रघुनाथरावास स्वाधीन करा आणि मग काय तें बोला,' असें त्यास सगळयांनीं स्पष्ट सांगतांच, फार्मरनें जाऊन दादालाही तोच उपदेश त्याचे हिताचा म्हणून सांगितला. त्यावरून दादास हवालीं करण्याचें ठरलें. ती गोष्ट फार्मरनें महादजीस कळविली, तेव्हां महादजीनें स्पष्ट सांगितलें, कीं 'आम्हांस लढाईचा बाऊ दाखवूं नका, त्याची आम्हांला मुळींच परवा नाहीं. परंतु तुम्हीं मुद्दाम पुरंदरचा तह मोडून आमचे मुलखावर स्वारी करून लाखों रुपयांचें नुकसान केलें आहे, तर याच ठिकाणीं नवीन तह केल्याखेरीज आम्ही तुम्हांस परत जाऊं देणार नाहीं.' तेव्हां फार्मर बोलला, 'आम्हांस तह करण्याचा अधिकारच नाहीं. त्यावर महादजीनें विचारिलें, 'मग पुरंदरचा तह मोडण्यास मात्र तुम्हांस अधिकार आहे, हें कसें!' त्यावरून नवीन तह केल्याखेरीज आपणांस हे जाऊं देत नाहींत अशी खात्री होऊन, इंग्रजांनीं महादजीचे मार्फत पेशव्यांशीं नवीन तह केला. त्यांत असें ठरलें, कीं 'दादास स्वाधीन करावें, साष्टी, ठाणें, उरण व गुजरातचे महाल घेतले आहेत ते इंग्रजांनीं परत करावे; आणि नानासाहेबाच्या वेळेच्या तहाप्रमाणें पुढें चालावें. साष्टीस ठाणें सरकारचें बसेपर्यंत दोन इंग्रज इसम मराठ्यांचे स्वाधीन करावे; दादापासून घेतलेले सर्व दस्तैवज माघारे द्यावे; आणि कलकत्याहून येणारे कंपू परत पाठवावे.' या शिवाय महादजीशीं एक वेगळा करारनामा इंग्रजांनीं केला कीं 'भडोच परगणा व एकेचाळीस हजार रुपये नजराणा महादजीस द्यावा.' येणेंप्रमाणें ठरून दादा आणि फार्मर व स्टुअर्ट हे दोन इंग्रज वकील महादजीचे छावणींत माघ शु॥ १ ता. १८ जानेवारी रोजीं दाखल झाले, तेव्हां कोंडलेल्या इंग्रजांस परत जाण्याची मोकळीक झाली. नारो गणेश, विसाजी कृष्ण, भालेराव गोविंद आणि राणेखान या चार सरदारांनीं इंग्रज फौजेस परत पोचविलें. या संबधानें खालील मनोरंजक संवाद इंग्रजी कागदांत आढळतो. 'वडगांव येथें मराठयांनीं इंग्रज फौजेस चहूंकडून वेढून घेतलं. बाहेर कोणासही जातां येईना. १४ व्या तारखेस सकाळीं

त्यांजवर मराठयांनीं तोफांचा मारा चालविला, त्याबरोबर ५० इंग्रज व ४०० एतद्देशीय ठार पडले. आपल्या तोफा लागू पडत नाहींत असें पाहून इंग्रजांनीं त्या बंदच केल्या. तेव्हां पुढें इलाज नाहीं असें पाहून इंग्रजांनीं दादाचे मार्फत सिंदे होळकरांशीं तडजोड सुरू केली. त्यांत इंग्रज वकील फार्मरचें मराठ्यांचे छावणींत संभाषण झालें त्याचा सारांशः—

फार्मर—आम्ही केवळ व्यापारी. रघुनाथरावाचा व तुमचा तंटा पडून ते आमच्याकडे आश्रयार्थ आले. आम्हांस वाटलें, त्यांचा राज्यावर हक्क आहे, म्हणून आम्हीं त्यांस मदत केली. त्यांच्या नशिबीं यश म्हणून नाहीं, त्यामुळेंच आमची सुद्धां अशी दशा झाली. आतां तुम्ही त्यांचे धनी आहां. आम्हांस हा अपराध माफ करा आणि सोडा. आम्ही इतःपर पूर्वींच्या तहाप्रमाणें वागूं.

कारभारी—रघुनाथरावाचें आमचें भांडण आम्ही पाहून घेतलें असतें. त्यांत तुम्हांस पडण्याची गरज काय? आतां तुम्ही साष्टी व वसई वगैरे प्रांत सोडून द्या, आणि पूर्वींच्या तहाप्रमाणें वागा म्हणजे आमचें कांहीं एक म्हणणें नाहीं.

हें बोलणें चालू असतांच १५ हजार मराठे इंग्रजांच्या छबिन्यावर चालून गेले; आणि तावडींत सांपडले त्या सर्वांस त्यांनीं ठार मारिलें. चौल बंदरांत इंग्रजांनीं बंदस्ती पहारा ठेवला होता, तोही मराठयांनीं सर्व कापून काढिला.

ता. १६ रोजीं फार्मर पुनः सिंद्याकडे जाऊन बोलला, मी सही शिक्के केलेला कोरा कागद आणिला आहे, त्यांत तुम्ही वाटेल तीं कलमें लिहून घ्या. यावर महादजीनें कारभाऱ्यांस सांगितलें कीं आतां जरी ते आमच्या तावडींत पूर्ण सांपडले असले, तरी भलतशा अटी लिहून घेण्यानें उगाच उभयतांचा द्वेष वाढेल तो कामाचा नाहीं. म्हणून आपण या प्रसंगीं रीतीचें असेल तेवढेंच मागावें. रघुनाथरावास आमचे हवालीं करा म्हणजे सगळें भागलें. काबीज केलेलीं स्थळें व परगणे सोडावे. बंगालची फौज येत आहे ती परत पाठवावी, आणि नाना साहेबांच्या वेळच्या ठरावाप्रमाणें उभयतांनीं चालावें. रघुनाथरावानें इंग्रजांपाशीं जवाहीर गहाण टाकलें आहे तें कांहीं मोबदला न घेतां परत द्यावें. हा तह कंपनीच्या ग० ज० कडून कौन्सिलच्या संमतीनें

मंजूर होऊन येईपर्यंत इन्टुर फांकड्याचा पुतण्या स्टुअर्ट व फार्मर ह्या दोघांस ओलीस म्हणून आमचे जवळ ठेवावें. फौजेंतले कांहीं इंग्रज पळून गेले ते आज तीन दिवस उपासानें मरणोन्मुख झाले आहेत. सर्व फौजेनें आपलीं हत्यारें तर दूर केलींच आहेत, असें कारभाऱ्यांस कळविण्यांत आलें. या प्रमाणें ठरलेल्या तहाचीं कलमें फारशी, मराठी, व इंग्रजी अशा तीन भाषांत लिहून त्यांजवर कंपनीचें सील आणि दुसरे अधिकारी यांच्या सह्या झाल्या. नंतर ता. १७ रोजीं ते तह महादजीचे हवालीं करण्यांत आले. तेव्हांच सर्व फौजेस अन्नपाणी मिळूं लागलें. इंग्रज लोकांस वीस हजार मराठ्यांचा जाबता देऊन परत जाण्याची परवानगी मिळाली. इतकें लिहून इंग्रज रिपोर्टर खालील मजकूर टीका म्हणून सांगतो. करार पुरा होऊन मराठ्यांच्या अंगचें औदार्य व नेमस्तपणा यांचा नमुना लगोलग इंग्रजांस पाहण्यास मिळाला. जिंकलेल्या शत्रूंना इतक्या सवलतीनें वागविल्याचीं उदाहरणें क्वचितच सांपडतील. पूर्वी चालत आलें आहे तसें चालावें, अशा मतलबाच्या अटी दोनही पक्षांस कबूल झाल्याबरोबर इंग्रजांचा कोठीकामगार होम्स यास लगेच पाहिजे तें खाण्यापिण्याचें सामान भरपूर मिळालें. नंतर मराठ्यांची फौज इंग्रजांस पोंचविण्यास बरोबर गेली; आणि पनवेलीस सर्वांस जहाजांत बसवून व मुंबईस पोंचतें करून परत आली. ( इंडिया ऑफिस कागद ).

वडगांवच्या करारांस इंग्रज अधिकारी तह मानीत नाहींत. कन्व्हेन्शन म्हणजे गुदरलेला प्रसंग अशी त्याची विल्हेवाट करितात. या करारांत, 'इंग्रजांनीं असें लिहून दिलें, कीं पूर्वीचा अप्टनचा तह रद्द करून कै० माधवराव पंडितांचे कारकीर्दीपर्यंत चालल्याप्रमाणें पुढें चालावें. आम्ही रघुनाथरावाचा पक्ष सोडिला. त्यास आश्रय देणार नाहीं. महाल व जागा घेतलेल्या आम्हीं सोडून देतों. याप्रमाणें आम्ही अकृत्रिमपणें वर्तूं. परत जातांना आमची फौज मार्गानें कोणास उपद्रव करणार नाहीं. इंग्रज फौज नर्मदेवर आली आहे, ती परत कलकत्त्यास पाठवूं. ता. १६-१-१७७९.' ( ऐ. टि. १, ५९; नातूकृत महादजी चरित्र पृ. २८२. ).

महादजी सिंद्याचा मिजास थंडा होता. नानाप्रमाणें तो जहाल नसून शक्य तितकी सर्वांची गोडी संपादण्याकडे त्याचा कल असे. तो इंग्रज किंवा दादा यांच्याशीं, किंवा ज्यांच्याशीं तो लढला त्या कोल्हापुरकरांशीं सुद्धां

त्यानें नरमाईच ठेविली, या त्याच्या धूर्ततेचा इंग्रजांनीं उपयोग करून घेतला. त्यांनीं महादजीला एक स्वतंत्र करार लिहून दिला त्यांत मजकूर, कीं " वड-गांवावर आम्ही अडचणींत असतां आपण मध्यस्थी करून लढाई थांबविली, आणि आमच्या फौजेस उपद्रव न देतां सुरक्षित जाऊं दिलें, याबद्दल आम्हीं तुमचे फार आभारी आहों. आपण पेशवे सरकाराचे मोठे हितचिंतक व अधिकारी जाणून आम्ही आपला स्नेह संपादूं इच्छितों; आणि त्यासाठीं आमच्या ताब्यांतील भडोचचें ठाणें त्याखालील मुलखासह आम्ही कृतज्ञतापूर्वक संतोषानें कंपनीच्या सहीशिक्क्यानिशीं तुम्हांस इनाम दिलें आहे. पुनः आम्हीं तंटा करणार नाहीं." या स्वतंत्र करारावरून पुढें नानामहादजींत वैषम्य उत्पन्न झालें. परंतु युद्धमान राष्ट्रांमध्यें तह ठरविणाऱ्या पुढाऱ्यांनीं शत्रुपक्षाकडून अशीं बक्षिसें घेतल्याचीं उदाहरणें पेशवाईंत शेंकडों असून, प्रत्यक्ष नाना फडणिसाचाही त्यास अपवाद नाहीं.

तळेगांवावर इंग्रजांची फजिती उडाली त्या संबंधानें फार्मर लिहितो, ' रघुनाथरावाच्या बढाईखोर शब्दांवर विसंबून मुंबईकरांनीं पुण्यावरची मोहीम स्वीकारली, हीच त्यांची मोठी चूक. निदान गॉडर्ड फौज घेऊन येत होता याची त्यांस माहिती असल्यानें तो दाखल होण्यापूर्वीं तरी त्यांनीं निघावयाचें नव्हतें. बिचाऱ्या मॉस्टिननें त्यांस भुरळ घातली आणि रघुनाथरावाच्या हक्काचें भांडण उगाच आपल्या अंगावर ओढून घेतलें. त्यावरून बाहेर इंग्रजांच्या नांवाचा असा बोभाटा झाला, कीं दुसऱ्याच्या घरांतल्या भांडणांत पडण्याचें यांस प्रयोजन काय? या भलत्याच उपक्रमानें सर्व मराठा मंडळ इंग्रजांचे विरुद्ध एक झाले; आणि ज्या सत्ताधीशांना इंग्रजांचें वैषम्य वाटत होतें ते सर्व त्यांस सामील झाले. पण मुंबईकरांस पुणें जिंकल्याचें सर्व श्रेय एकट्यांस पाहिजे होतें. त्यांत गॉडर्ड भागीदार झालेला त्यांस खपत नव्हता. मुंबईकरांच्या या उद्योगांत हेस्टिंग्सचें अंग नव्हतें. उलट त्याचें मत रघुनाथरावास पाठिंबा बिलकूल देऊं नये असेंच होतें. पण मुंबईकरांच्या कृत्यानें इंग्रजांचें नांव बद्दू झालें आणि सगळें हिंदुस्थान त्यांजविरुद्ध चाललेल्या कटांत सामील झालें. या संकटांत मराठे व हैदर हे दोन आपले मुख्य शत्रू. त्यांपैकीं पश्चिम किनाऱ्यावरील आपले सर्व फायदे सोडून देऊन मराठ्यांशीं मिटवून घ्यावें आणि हैदरावर चढाई करावी, दोघांशीं एकदम सामना करणें

आपणास झेंपणार नाहीं. मॉस्टिनचें माझें कधीं सूत नव्हतें, आणि त्याच्या-वरच सर्व भिस्त हॉर्नबीनें ठेवल्यामुळें हें अरिष्ट कोसळलें.' ( डॉड्वेल पृ. १७६).

तळेगांवचा हा लांछनकारक प्रकार इंग्रज राष्ट्रास फारच झोंबला. वर्ष सहा महिने त्याचा एकंदर तपास करण्यांत आला. सर्वांचे जावजबाब घेऊन कर्त-व्यांत चुकल्याबद्दल अनेकांस शिक्षा करण्यांत आल्या. कार्नक, ईगर्टन व कॉकबर्न यांस नोकरींतून दूर करण्यांत आलें. राष्ट्राच्या इभ्रतीचा असा प्रसंग उद्भवल्यास, प्रत्येक इंग्रज, हा आपलाच अपमान समजून संतापानें कसा जागृत होतो, याचें हा प्रसंग उत्कृष्ट उदाहरण आहे.

तळेगांवावर इंग्रज कैचींत सांपडले असतां त्यांस कायम अद्दल घडविण्या-ऐवजीं महादजीनें फाजील नरमाईनें वागविलें, याबद्दल त्या वेळीं सुद्धां कित्येकांनीं त्यास दोष दिला आहे. या संबंधानें खुद्द त्याचें समर्थन असें दिसतें कीं, इंग्रजांसारख्या बलाढ्य शत्रूशीं आपलें द्वैत माजविण्यांत फायद्या-ऐवजीं नुकसानच होईल. उत्तर हिंदुस्थानांत इंग्रज पुढें पाऊल टाकते तर तिकडे मराठ्यांस मारच खावा लागता. त्यांच्या व्यवस्थित कवाइती फौजा घाबरत नाहींत, वरिष्ठांचे हुकमाशिवाय पाऊलही हालवीत नाहींत, सर्व फौज एक विचारानें हालते, भिंतीसारखी छातीठोक उभी राहते; जो पडला, त्याची जागा लगोलग पाठीमागचा भरून काढतो. पळतांना सुद्धां घबराट न दाखवितां सर्व व्यवस्थेनें परत जातात. मराठ्यांप्रमाणें सैरावैरा उधळत नाहींत. तसेंच तोफखान्याच्या बळावर असंख्य शत्रूंच्या ते हां हां म्हणतां फन्ना उडवितात. हें पाश्चात्य युद्धकलेचें बीज तळेगांवावर व तत्पूर्वीच्या प्रसंगांत महादजीच्या मनावर इतकें जबरदस्त बिंबून गेलें, कीं तोंडास तोंड देण्याची तयारी होई-पर्यंत इंग्रजांशीं निकरावर यावयाचें नाहीं, ही खूणगांठ महादजीनें मनाशीं बांधून ठेविली. कारभारी वाटेल ती मुत्सद्दीपणाची सल्ला देवोत, त्याचा शेवटीं निकाल लष्करी बळावर होतो, हें तत्त्व उराशीं बाळगून इतउत्तर महादजी वागला, ही गोष्ट लक्षांत ठेवणें जरूर आहे.

या प्रसंगीं इंग्रजांशीं स्वतंत्र करार करून महादजीनें आपलें स्वातंत्र्य स्थापन केलें आणि हळू हळू आपल्या विचाराशिवाय कारभार चालूं नये अशी परिस्थिति उत्पन्न केली. तरी अखेरपर्यंत पेशव्यांचा नोकर म्हणवून घेण्यांत त्यास भूषण वाटे, आणि पेशव्यांच्या विरुद्ध त्यानें कधीं खटपट

केली नाहीं. या गोष्टी नाना महादजींची योग्यता ठरविण्यास उपयोगी पडतात. इंग्रजांकडून तह अमलांत आणविण्याची हमी तळेगांवावर महादजीनें पत्करली, आणि रघुनाथरावाचा बंदोबस्त आपल्या हातीं घेतला. नानाच्या हातांत लष्करी जोर नसल्यामुळें महादजीच्या म्हणण्याला रुकार देणें त्यास भाग पडलें.

---

प्रकरण सहावें

# बारभाईचें रूपांतर एकभाईंत

## स. १७७९.

१ दादाची सोडचिठ्ठी व झांशीस रवानगी ( मार्च १७७९ ).
२ सखारामबापूची इतिश्री ( २७-२-१७७९ ).
३ सखारामबापूची योग्यता व कौटुंबिक.
४ नाना महादजींची बंधुभावाची शपथक्रिया ( १५ मार्च ).
५ दादाचें पुनरपि सुरतेस गॉडर्डाकडे पलायन.

* * * *

**१. दादाची सोडचिठ्ठी व झांशीस रवानगी** ( मार्च १७७९ ).— माघ शु० १ च्या मुहूर्तानें दादांची स्वारी महादजीचे गोटांत दाखल झाली. नानाबापूंनीं त्याची भेट सुद्धां घेतली नाहीं. इतकें त्याचें मुखावलोकनही पुणेकरांस दुःसह झालें होतें. 'बालपेशव्याचें पुण्य विचित्र कीं इंग्रजांचें पारिपत्य होऊन आंतबाहेरचे फितूर तुटले. श्रीमंतांचें पुण्य समर्थ. ज्या मॉस्टिननें मसलत केली, तो घांटावर येतांच समाधान नाहीं म्हणोन मुंबईस जाऊन मृत्यु पावला. इष्टुर फांकडा व कर्नेल की ठार झाले. कोणीही मराठे सरदार इंग्रजांस मिळाले नाहींत. पन्नास हजार जमून इंग्रजांची छावणी तडकली, तेव्हां माघारें कूच केलें. सर्व सलाबत

चांगलीच बसली. इंग्रजांस ऐशी शिकस्ती कोणी दिली नव्हती. आपला तोरा राहिला हें केवढें झालें! त्यास जोडा नाहीं. श्री. रावसाहेबांचे प्रतापास उपमाच नाहीं. गर्भापासून कृष्णचरित्रासारखेंच झालें. धर्म रक्षावयास ईश्वर साह्य खरा, हें आतां पटलें. इंग्रज लयास पावतात.' शिंद्यांनीं एकनिष्ठेनें बाजू संभाळिली याबद्दल तत्कालीन कागदांत सर्व पक्षांचे धन्यवाद ऐकूं येतात. त्याच्या शांत दूरदृष्टीची सुद्धां सर्वांनीं तारीफ केली आहे. 'दादांबरोबर तीनशें राऊत, तेरा तोफा, बारा तेराशें गाडदी व दोनशें शागीर्द पेशा आहे. कोठें राहवें, काय करावें, खर्चाची बेजमी कशी, इत्यादि ठराव होणें आहे.' हे प्रश्न व भानगडी निकालास लागेपर्यंत सरदार व कारभारी यांचा मुक्काम तळेगांवावरच झाला. मार्चचे आरंभीं पुरंदरास आले. (खरे २४६४; खंड १०. २००).

तळेगांवावर उगाच घाबरून इंग्रज अधिकाऱ्यांनीं राष्ट्रास लांछन आणणाऱ्या अटी कबूल केल्या, यापेक्षां लढून पराभव झाला असता तरी वाईट नव्हतें, अशी मुंबईच्या कौन्सिलची समजूत होऊन त्यांनीं गुन्हेगार इसमांचे जाबजबाब घेऊन शिक्षा केल्या. विशेषतः ओलीस देऊन आपली सुटका करून घेण्याचा प्रसंग इंग्रजांवर आल्याचें दुसरें उदाहरण नाहीं. दादांची व्यवस्था लावण्यापूर्वीं त्याचा करारजाबता लिहून घेण्यांत आला, तो वाचण्यालायक आहे. 'करार शपथपूर्वक दादासाहेब यांचा. राजश्री माधवराव नारायण पंतप्रधान यांसी, विद्यमान तुकोजी होळकर व महादजी शिंदे. तुम्हाआम्हांशीं नानाप्रकारें विग्रह राज्यलोभास्तव वाढोन आम्हीं दौलत साधावी यास्तव बहुत प्रयत्न केला. इंग्रजांकडे जाऊन त्यांस आमचे साह्यास बरोबर घेऊन तळेगांवापर्यंत आलों. सरदारांनीं खर्चाची बेगमी करून देतों, आणि स्नानसंध्या करून स्वस्थ राहवें असें सांगितलें. त्याप्रमाणें मान्य करून खर्चाची नेमणूक बारा लक्षांची जागा लावून दिली. ती आपण घेऊन स्नानसंध्या करून झांसीस राहूं. राज्यलोभानें दौलतीचा वारसा करणार नाहीं. नेमणूक करून दिली त्यांत सत्कालक्षेप करून स्वस्थ राहूं. तुम्ही पंत प्रधान राज्याचे धणी, व चि. बाजीराव तुमचे कारभारी करून घ्यावे, असें उभयतां सरदारांचे व आमचे विचारें ठरून, आम्ही मान्य झालों. तुम्ही व चिरंजीव बाजीराव यांनीं पूर्वी नानासाहेब व भाऊसाहेब धणी व कारभारी याअन्वयें वर्तत होते, त्या-

प्रमाणें प्रबुद्धपण आलियावर परस्परें वर्तावें. स्वामिसेवक धर्म उभयतांनीं अन्योन्य निष्कपटपणें चालवावा. तुम्हां उभयतांची धनीपणाची व कारभाराची पुस्तपुन्हां उभयतां सरदार करतील. आम्ही कारभाराच्या प्रकरणांत बिलकूल मन घालणार नाहीं. कलमबंदीची याद लिहून दिली आहे, त्याप्रमाणें तुम्हां-कडून अंमलांत यावें, आम्हांकडूनही येईल. यास अंतर करूं तर श्रीसांबाची व गंगाभागीरथीची शपथ असे.' ता.३-२-१७७९. (ऐ. टि. १-७: खं.१९-२०१.)

तह व करारमदार या पुस्तकांत पृ. १३०-१३४ वर वरील तारखेचे दादांचे तीन करार दिलेले आहेत त्यांचा मतलब असा, कीं 'बारा लक्ष खर्चास घेऊन झांशीस स्नानसंध्या करून राहूं. बाहेर कोणाशीं कागदपत्र लिहून संबंध राखणार नाहीं. बाहेरचा कागद आल्यास सरदारां-कडील कारकुनांच्या हवालीं करूं. संशयित लोकांस जवळ बाळगणार नाहीं. तीर्थास वगैरे बाहेर जाणें झाल्यास सरदारांचे विचारें ठरलें तर जाऊं. स्वतःच्या पागेचीं घोडीं शंभर पावेतों ठेवूं. दोनशें स्वार सरदार ठेवतील. जाजतीचें प्रयोजन नाहीं. झांशीस गडबड झाल्यास सरदार सांगतील तेथें राहूं. दौलतेस विरुद्ध असें राजकारण, निरोप, कागदपत्र करणार नाहीं. जो कोणी अन्यायी ठरेल त्यास कोणी जवळ ठेवणार नाहीं. एकूण कलमें बारा यांची निभावणी केली जाईल. मु० तळेगांव.' दुसरा करार घेणें देणें व पैशाचा व्यवहार या संबंधीं आहे. अडीच लाख सुमार कर्ज आहे तें वारण्याचें कारभाऱ्यांनीं कबूल केलें. मोरोबा फडणीस, बजाबा पुरंदरे, रघुपतराव नारायण, बाबूराव व सखाराम हरि यांशिवाय बाकीचे अटकेंत असलेले लोक सोडून देण्याचेंही कारभाऱ्यांनीं कबूल केलें. आपल्या लोकांस अटकाव किंवा उपद्रव होऊं नये ही दादाची मागणी होती तीही मान्य करण्यांत आली.

चिंतो विठ्ठल, सदाशिव रामचंद्र, व खरगसिंग हे तिघे दादाबरोबरच सिंद्याचे हवालीं झाले. पैकीं पहिल्या दोघांना, बहुधा दादाचे आग्रहावरून महादजीनें आपल्याजवळ जाबत्यांत ठेविलें. खरगसिंग नारायणरावाचे खुनांत सामील, त्यास देहान्त शिक्षा झाली. पहिल्या दोघांस महादजीनें कारभाऱ्यांचे हवालीं केलें नाहीं, म्हणून बऱ्हाणपुर व अशीरगड हीं ठाणीं महादजीस देण्याचें ठरलें होतें, तों त्यास, ते पुढें दोन वर्षांनीं हातीं येईपर्यंत कारभाऱ्यांनीं

सोडून दिलीं नाहींत. दादाप्रमाणेंच चिंतो विठ्ठल व सदाशिव रामचंद्र यांनीं महादजीचे कैदेंतून पलायन केलें.

सिंदे होळकरांमुळें या कठिण प्रसंगीं दादाची व्यवस्था चांगली लागली. केवळ नानाच्याच मर्जीची गोष्ट असती तर एखाद्या अडचणीच्या किल्ल्यावरच त्याची बोळवण झाली असती; आणि पांच लाखांहून यत्किंचित् जास्त त्यास कांहीं मिळालें नसतें. दोन महिने या वाटाघाटींत गेले. सवाई माधवरावाची मालकी दादानें कबूल केली. अर्थात् तो नारायणरावाचा खरा पुत्र नव्हे वगैरे बाष्कळ प्रवाद सर्व राजरोस खोटे ठरले. मात्र माधवरावाचे कारभाऱ्याची जागा बाजीरावास देण्याची कबुलात झाल्यामुळें, हे दोघे एकामागून एक असे पेशवाईचे हक्कदार मान्य झाले. म्हणजे दादानें स्वतःचा हक्क सोडून त्या ठिकाणीं आपल्या मुलाचा कायम करून घेतला, हें ध्यानांत ठेविलें पाहिजे. म्हणजे प्रमुख सरदारांची मनोभावना अशी, कीं नानानें आपणास सर्वथैव दडपून टाकूं नये. पेशवाईचें राज्य कमावण्यास आपण दोघे सिंदे होळकर मुख्यतः कारण झालों, तर त्याची व्यवस्था पुढें आपल्याच तंत्रांत चालली पाहिजे. ही त्या सरदारांची मनःस्थिति विशेषतः महादजीचा आशय या व्यवहारांत व्यक्त होतो. शिवाय तसाच प्रसंग आल्यास कारभाऱ्यांचे विरुद्ध आपल्या हातांत कांहीं तरी शस्त्र कायमचें असावें, अशा बुद्धीनेंही महादजीनें दादास झांशीस ठेवण्याचें ठरवून त्याजकडून लिहून घेतलेले करार शक्य तितके आपल्या सोयीचे केले, हेंही त्या करारांवरून उघड होतें. म्हणजे दादाच्या व्यवहारांत नानास दरम्यानगिरी करण्याचें प्रयोजनच ठेवण्यांत आलें नाहीं. बाकी स्वतः दादाचा विचार तर अगदींच भिन्न होता. तूर्तचा प्रसंग कसा तरी निभवावा, पुढचा भाग पुढें, असें समजून बिचाऱ्या आद्यदैवत शंकराच्या नांवाची शपथ घालून करार पुरा केला, पण चार महिन्यांच्या आंतच तो पुनरपि मोडून दादा निसटून इंग्रजांकडे सुरतेस गेला हें पुढें दिसून येईलच. शंकरानें तरी खोट्या भक्ताचें ब्रीद कां राखावें !

'फेब्रुवारी महिन्यांत दादांनीं झांशीस राहवयाचा निश्चय झाला. तेथें बंदोबस्त उभयतां कारभारी याचा असावा असें ठरलें. दोन चार दिवशीं रवानगी होणार.' ( १७-२-७९ ). यानंतर लागेच सिंदे होळकरांस निरोप

जाला. अमृतरावाची बायको गेल्या जुलईत निवर्तली, तेव्हां तळेगांवावर त्याचें फिरून लग्न जालें. या प्रसंगीं दादा आपलेंही आणखी लग्न करणार होता. याप्रमाणें व्यवस्था होऊन फाल्गुनचे आरंभीं ता. २४ फेब्रुवारीचे सुमारें दादा पुण्यास न जातां परभारें उत्तरेंत रवाना झाला. ११ मार्च रोजीं मुक्काम पारनेरास होता. बरोबर उभय सरदारांची फौज चार हजार व सिंद्याचा सरदार हरि बाबाजी केतकर हा मुख्य होता. हा गृहस्थ शूर व महादजीच्या भरंवशाचा होता. मात्र त्यास दादाच्या स्वभावाची वाकबगारी विशेषशी नसावी; म्हणूनच पुढील भानगडी झाल्या. (खरे २४८१, ८५, ८७, ८९ व २३९९.)

याच सुमारास म्हणजे ता. ८ मार्च १७७९ रोजीं इष्टुर फांकड्यास मारून तळेगांवावर इंग्रजांस जेर करणारा शूर पुरुष भिवराव पानसे तोफखान्याचा कामदार थोडा ताप येऊन एकाएकीं मरण पावला. 'भीवराव कर्ता माणूस. इंग्रजांचे लढाईंत यंदा फारच मेहेनत केली. तसा मनुष्य होणें दुस्तर. भीवराव बहुत थोर, शहाणे, कर्ते, एकनिष्ठ, सालमजकूर व तोतयाचे मसलतींत बहुत मेहनत करून नानाचे उपयोगीं पडले. आयुष्यमर्यादा सरली त्यास इलाज नाहीं. मोठी धुराच या काळांत गेली. तोफखान्याचा बंदोबस्त चांगला राखीत होते. पुत्र राजाबाचें सांत्वन केलें. स्त्रीनें सहगमन केलें.'

**२. सखारामबापूची इतिश्री** (२७-२-१७७९–२-८-१७८१).—उत्तर पेशवाईंतील प्रमुख मुत्सद्यांत सखाराम बापूची गणना आहे. त्यानें पुढाकार घेतल्यामुळेंच बारभाईंचें कारस्थान उभें राहून यशस्वी झालें. पण मूळपासून रघुनाथरावाची सेवा केल्यावर शेवटीं त्याजविरुद्ध शस्त्र धरून बापूस जो कारभार करावा लागला, त्यात कैकवेळां इकडे आड, तिकडे विहीर अशी त्याच्या मनाची त्रेधा होऊन, नानाफडणिसाशीं त्याचा जम कधींच बसला नाहीं. तोच उभयतांचा कारभार एकमुखी चालता तर मराठ्यांचें राज्य इतक्या लवकर लयास गेलें नसतें असें वाटतें. अंतःकरणाचा ओढा मूळचा दादाकडे, पुष्कळसे आप्त व बरोबरचे पुरुष दादाचे पक्षांत, त्यांस संभाळून घेण्याविषयीं दादा, आनंदीबाई इत्यादिकांचा आग्रह, वगैरे कारणांनीं त्याचा कैकवेळां नानाशीं उघड बेबनाव होई. शिवाय नाना अत्यंत करारी

दादाचे कुटुंबास व त्यांचे साहाय्यकांस हाणून पाडण्याचा त्याचा पण; हा पण सिद्धीस नेण्यासाठीं पटवर्धन, फडके वगैरे स्वपक्षीय मंडळींचा पुरस्कार व विरुद्ध पक्षीयांचा द्वेष, अशा गोष्टी करितांना, सरंजाम जप्त करणें, शिक्षा करणें, लोकांकडून कर व पट्टया वसूल करणें व सरदारांच्या नेमणुका ठरविणें, वगैरे बाबतींत या उभय कारभाऱ्यांत तीव्र मतभेद उत्पन्न होऊन पुढें पुढें त्यांचें जवळजवळ हाडवैरच जुंपलें. त्यांतून बापूचा स्वभाव नानासारखा करडा नसून नरम होता. थोडेंसें नमतें घेऊन प्रकरण निभावण्याकडे त्याची नजर असे. यामुळें नारायणरावाच्या वधापासून पांच सहा वर्षे कारभार कसाबसा चालला. पेशव्यांचे घरांतच दोन पक्ष झाल्यामुळें राजद्रोह कशास म्हणावें, याचा थांग व पत्ता नव्हता. महाराष्ट्रांतील प्रत्येक कुटुंब या दुहींत विभागलें गेलें होतें. तोतयाचे वेळेस प्रत्यक्ष पटवर्धन व इचलकरंजीकर त्यांस मिळाले, तर दादांच्या वेळीं इतरांची कथा काय? दादांचीं पत्रें आलीं तर त्यांस कांहीं तरी जबाब देणें किंवा मुरवतीखातर थोडेंबहुत साह्य करणें म्हणजे नानाच्या दृष्टीनें तो मोठा गुन्हा मानला जाई. त्यांतून सखारामबापूचा स्वभावही मूळचा कांहींसा दुटप्पी, म्हणून नानाचा व त्याचा सारखा कलह चाले. ता. १८-२-१७७७ ची एक करारयाद इ. सं. पे. द. पृ. १६९ वर छापली आहे तिजवरून पाहतां, 'आतां म्हातारपणचे खेळ पुरे झाले, स्नानसंध्या करीत स्वस्थ बसा,' असेंच त्यास नानानें सांगितल्याचें दिसतें. तोतयाचा पाडाव झाल्यानंतर व इंग्रजांचें कारस्थान रंगण्यापूर्वीचा हा करार आहे. 'आपला सरंजाम, किल्ले, शेतें, व्यवस्था वगैरे आहे तशी चालवावी, घरीं रिकामें निरोप घेऊन बसलों तरी घालमेल करूं नये, स्वरूप राखावें,' असें बापूनें मागून घेतलें; आणि तें नानानें बाळ-पेशव्याचे तर्फेनें कबूल केलें. 'दौलतीचें व आमचें लक्ष धरून चालावें, आमचे बऱ्यांत आपलें बरें, आमच्या वाइटांत आपलें वाईट, याप्रमाणें चाल-ल्यास अंतर होणार नाहीं. शपथपूर्वक यावत् शक्ति आमचें बरें तेंच करावें.' अशा प्रकारें शपथपूर्वक हा करार झाला. म्हणजे या वेळीं बापूचे अंगीं गुन्हा लावून त्याची जिंदगी वगैरे जप्त करण्याचा नानाचा विचार चालू होता असें दिसतें. पुढें इंग्रजांचें कारस्थान रंगून मोरोबा दादाचा फितूर झाला, त्यांत बापूचे पुष्कळ अनिष्ट प्रकार उघडकीस आले, परंतु मोठीं प्रकरणें निभावत तोंपर्यंत बापूच्या वाटेस जाणें नानास शक्य नव्हतें. तरी अधून मधून धुसपूस

कांहीं बंद पडली नाहीं. नानाचा पाहरा त्याजवर सारखा वर्षसहा महिने होता. मोरोबाचें कारस्थान निभावण्यासाठीं नानानें महादजीस सर्वस्वीं वश करून घेतलें, आणि त्याच्या लष्करी जोरावर एक एक प्रकरण तो धडाक्यानें उलगडूं लागला, असें पाहून बापूचें धाबें दणाणलें असावें. वास्तविक त्यानें या वेळीं आपण होऊनच कारभार सोडून घरीं बसलें पाहिजे होतें. अशा स्वार्थत्यागानें आपला बोज राखून एखाद्या महत्त्वाच्या कामांत निर्भीड सल्ला सांगण्याचाही अधिकार येतो. पण तशी वासना आपल्या प्राच्य मुत्सद्यांत बहुधा दिसून येत नाहीं. हातांतील अधिकार सोडणें त्यांच्या जिवावर येतें. वास्तविक बापूचें वय या वेळीं सुमारें ६५ असावें. आपण होऊन तो घरीं बसता तर नानानेंही त्यास अंतर दिलें नसतें. उलट कठिण प्रसंगीं त्याची सल्ला नानानें मुद्दाम ऐकिली असती. परंतु ही गोष्ट बापूनें केली नाहीं, याबद्दल त्यास वृद्धापकाळीं भयंभर शिक्षा भोगावी लागली.

स. १७७८ च्या जून महिन्यांत नाना बापूंच्या दरम्यान झालेल्या कराराची याद्दी पूर्वीं दिली आहे, त्यावरून त्या वेळच्या कारभारांतील मतभेद केवळ व्यक्तीच्या स्वार्थाचा असून तत्त्वाचा बिलकूल नव्हता असें दिसतें. बापूस मोठी पंचाईत, कीं आपल्या पश्चात् आपल्या मुलासही आपलीच योग्यता व किफायत कशी मिळेल? कराराचे वेळीं मुलाचें अस्तित्वच नव्हतें, मग लायकीची गोष्टच बोलावयास नको. आपणास पुढें मुलगा होईल तो किंवा दत्तक घेऊं तो कारभारांत आपल्या जागेवर नानानें स्थापावा, ही बापूची मागणी एकंदर राष्ट्राच्या मनोवृत्तीची द्योतक आहे.

तळेगांवावर दादा स्वाधीन झाला, तेव्हां या पापी मनुष्याचें दर्शन सुद्धां नको असें समजून नानाबापूंनीं त्याची भेट घेतली नाहीं. मात्र चिंतो विठ्ठल, सदाशिव रामचंद्र व खरगसिंग यांस आमचे स्वाधीन करा, त्यांस आम्ही शिक्षा करणार असें बोलणें त्यांनीं सिंद्याकडे केलें. या सर्व गोष्टी दादा व चिंतो विठ्ठल यांचे मनास फारच झोंबल्या. त्यांतून नानाबद्दल तर त्यांस कांहींच म्हणतां येण्याजोगें नव्हतें. पण सखाराम बापूस ते थोडाबहुत आपला समजत. त्याच्याशीं त्यांचा पत्रव्यवहार असे. आठ पंधरा दिवस दादाच्या व्यवस्थेची वाटाघाट झाल्यावर बापू मुलीच्या लग्नासाठीं थोडे दिवस वाईस गेला, मुलगी सचिवास दिली. बापू आपणाला भेटला सुद्धां नाहीं

हा अपमान दादास सहन झाला नाहीं. चिंतो विठ्ठल सिंद्यांस म्हणाला, 'मला जर तुम्ही फितुरीबद्दल शिक्षा करणार, तर तीच शिक्षा बापूस कां करूं नये? बापूचीही फितुरी मी तुम्हांस दाखवून देतों. सिंद्यानें तें दादास विचारलें. दादानें ती गोष्ट खरी आहे, असें सांगितलें. सिंदे मोठा पाताळयंत्री, पोटांत शिरून दुसऱ्याचें इंगित काढून घेण्यांत सदा कुशल. शिवाय दादा त्या वेळीं तळेगांवावर अत्यंत गरजू, केवळ शिंद्याची मर्जी संभाळून होता. सखारामबापूवर त्याचा दंश अतिशय. अशा स्थितींत बापूच्या हातच्या दोन चिठ्या, एक दादास व एक चिंतो विठ्ठलास गेलेल्या, महादजीनें दादाजवळून युक्तीनें काढून घेतल्या. त्या इंग्रज घाट चढून आले त्या वेळीं लिहिलेल्या होत्या. त्यांत मजकूर असा, 'विनंती उपरी. दक्षिणेकडे (म्ह. हैदराकडे) सूचना केली आहे. आम्ही पाय पसरून बसलों आहों. अशांत जलदी कराल तितकी उपयोगी आहे.' चिठीवर तारीख नांव गांव वगैरे कांहीं नाहीं. असेच बापूच्या फितुराचे आणखी कांहीं कागद धोंडभट कटके व जोतिपंत हे मृदंगांत घालून मुंबईस नेत होते ते नानानें पकडले होते. सिंद्यानें हे कागद तसेच स्वत:जवळ गुप्त ठेवून दिले. मुलीचें लग्न करून बापू तळेगांवास परत आला व दादाची रवानगी झांशीस होतांच कारभारी व सरदार पुरंदरास आले. नंतर एकंदर फंदफितूर मोडून व्यवस्था करण्याचें काम नाना व महादजी यांनीं अंगावर घेतलें. त्या दोघांचा या वेळीं अगदीं एक विचार होता. चिंतो विठ्ठलावरून प्रथमच बापूच्या फितुरी चिठ्यांचें प्रकरण निघून त्या चिठया महादजीनें नानास दाखविल्या, आणि बापूस कैद करण्याचें उभयतांनीं ठरविलें. महादजीला कारभाऱ्यांचा निरोप घेऊन जांबगांवीं जावयाचें, म्हणून त्यानें नानाबापूंस आपल्याकडे मेजवानीस बोलाविलें. भोजनोत्तर निराळें बोलण्यासाठीं म्हणून तिघे बाजूस गेले. तेथें महादजीनें त्या चिठया व मोरोबा दादाचे फितुरांतल्या दुसऱ्या नानानें बापूस दाखविल्या आणि पदरीं अपराध घालून लगोलग कैद करून सिंहगडास पाठविलें. त्याबद्दल परशुरामभाऊ लिहितो, 'वाईट गोष्ट जाली. चांगला कर्ता पुरुष होता. परंतु खेळ न जात, याजमुळें हें प्राप्त जालें. होणार सुटत नाहीं.' हा प्रकार फाल्गुन शु. १२ ता. २७-२-१७७९ रोजीं घडला. 'बापूचे फौजेचा व जातीचा सर्व सरंजाम घर, पागा, कोठी, दाणा वगैरे सर्वांची मोजदाद करून तेरा उंट भरून

कापड, नक्त, कांहीं मोहोरा सर्व सरकारी जामदारखान्यांत नेलें. त्याच वेळीं चिंतो विठ्ठल, बाबूराव व सखाराम हरि गुप्ते, मोरोबा दादा वगैरेंच्या घरांच्याही जप्त्या केल्या. बापूचा संगमावरील बाग सरकारांत घेतला. दररोज भोजनास उत्तम शिधा, दोन नोकर, नित्यदान, श्राद्ध, शाकभाजी, विड्याचीं पानें वगैरेंची सामान्य तर्तूद सिंहगडावर नेमून दिलेली होती.' परंतु दोन महिन्यांनींच मेच्या आरंभीं त्यास प्रतापगडावर पाठविण्यांत आलें. तेथील घरास भिंती उंच व मजबूद नाहींत अशी तक्रार किल्लेदाराची आल्यावरून १-९-१७७९ रोजीं पांचशें रु. पावेतों खर्च करून भिंती घालण्याचा हुकूम झाला. प्रतापगडावर बापूचे दोन पावसाळे स. १७७९ व ८० चे गेले. त्यानंतर 'प्रतापगडची हवा चांगली नाहीं म्हणून गुदस्तां माघमासीं (फेब्रुवारी स. १७८१) किल्ले रायगडावर नेऊन ठेविलें. तेथें त्यांचे शरीरीं अतिसाराचा उपद्रव जाला, त्यास औषधोपाय केले, त्यानें अतिसार बंद जाला, परंतु क्षीणता आली. यामुळें वायूचा उपद्रव होऊन श्रावण शु. १३ स देवाज्ञा जाली. हें वर्तमान श्री. पाटीलबावांस सांगितलें.' मृत्यु ता. २ ऑगस्ट स. १७८१ रोजीं जाला. कैदेंतील त्याच्या जिंदगीची यादी, छापलेली पाहण्यालायक आहे. वृद्धापकाळीं नानानें या पुरुषाचा व्यर्थ असा सूड घ्यावयाचा नव्हता, अशीच त्या वेळीं लोकांची भावना झाली. 'बापू मोरोबा यांजकडील जवाहीर आदीकरून हातीं लागलें. आतां जागोजागीं ठेवी आहेत त्यांची चौकशी होत आहे.'

कैदेंत असतां फितुरासंबंधीं बापूच्या तोंडून काय उद्गार निघतात ते काढण्याचा नानानें पुष्कळ प्रयत्न केला. बातमीदार नानास लिहितो, "वृद्ध चिठ्यांच्या वगैरे गोष्टी बोलतात, त्यांत हे विना अपराधी ऐसें दर्शवितात. बोलतां बोलतां मी एके दिवशीं अज्ञानपणें मागील पुसों लागलों. 'बारभाईचें कारस्थान ठरतांना तुम्ही नाना, हरिपंत, परशुरामभाऊ, त्रिंबकराव मामा, वगैरे एकत्र होऊन तुमच्या नानांच्या शपथा जाहल्या कीं नाहींत?' तेव्हां उत्तर केलें, 'जाहल्या होत्या.' तर मग मोरोबाच्या मसलतींत बापूचें अंग आहे असें लोक तुम्हांस कां म्हणतात!' त्याचें उत्तर केलें, 'गोपाळ नाईक, चिंत्या वगैरेंनीं माझा पुकारा केला.' मी म्हटलें, 'उगाच पुकारा होत नाहीं, त्यांत कांही तरी असेल.' तेव्हां बोलले, 'मी नानाचें मोरोबाचें

ठीक करून देणार होतों.' तेव्हां मीं उत्तर केलें, 'पूर्वी मोरोबाच्या तुमच्या शपथा झाल्या नव्हत्या. गंगाबाईस घेऊन यावयाचे सोबती दोघे तिघे, तेवढ्यांचीच आपली शपथ. मग त्यांस अंतर देऊन, मागतीं बदल खाऊन भलतीकडेच जावें हें ठीक केलें नाहीं.' त्यावर म्हणों लागले, 'शपथ पूर्वी जाली खरी, परंतु मध्यें दोन तीन गलबला जहाल्या त्यांमध्यें ती शपथ गेली. शब्दांपलीकडे कांहीं मिळालें नाहीं.' त्यावर मी म्हटलें, 'गंगाबाईस आणण्याचे सोबती नाना व आपण. ऐसें असतां शपथ गलबलेंत गेली हें कसें बोलतां!' त्यावरून उगाच राहिले. बहुत मोह घालून बोलतात." या हकीकतीवरून कित्येक गोष्टी ठरतात. प्रथम नारायणरावाचे मृत्यूनंतर गंगाबाईस काढून नेतांना बापू नानांची शपथक्रिया झाली होती आणि त्यांत फडके, पेठे, पटवर्धन साक्षीस होते. म्हणजे मूळ बारभाईच्या कारस्थानांत हे पांच इसम सामील. मोरोबा त्यांत नव्हता. पुढें पहिली शपथ मोडून सवाई माधवरावाचे विरुद्ध बापू मोरोबास सामील झाला, आणि मोरोबा कैद झाल्यावर तळेगांवावर बापूनें दादाशीं संधान केलें, त्याबद्दल त्यास कैद भोगणें प्राप्त झालें. (ख. ले. २३४३, २४८६–८८; २५१४; रुमाल २ पृ.११०; भा. व. श; स. मा. रो. २९१, २९३–९८; ऐ. टि.५-१३, ६-३६.)

सखारामबापूच्या या प्रकरणासंबंधानें महादजीचा कारभारी बाळाजी जनार्दन यानें ता. ७-४-१७७९ रोजीं खालील हकीकत कोटेकर लालाजी बल्लाळास पुण्यांतून लिहून कळविली. 'वृद्ध अमात्य इकडील अधिकारी. मुळापासून कुचाळे करावे ही चालच. त्याचीं दोन तीन वर्षें श्रीमंत यजमानसाहेबांची स्वारी या प्रांतीं येऊन जाहलीं. बखेडे उभे राहत गेले. त्यांचें पारपत्य बरे रवेसीनें केलेंच. परंतु मागती वरचेवर खूळ उभें राहतें, याचें कारण व कर्तृत्व समजलेंही होतें; परंतु कोणी गोष्ट दागदूम पत्ते दरदस्तऐवजीं सांपडल्याविना काय करावें, या अर्थी क्षमा करीत गेले. ज्येष्ठ (दादा) हस्तगत झाल्यावर, त्यांनीं इत्थंभूत जीं जीं सूत्रें होतीं ते सांगितलीं. वृद्धाचे दस्तऐवजही होते ते काढून दिल्हे, तेव्हां पक्का मुद्दा सांपडला. मग त्यांचे अंगीं लावून त्यांस कायल केलें. उभयेतां राज्यास आमलपणावह होते. श्रीमंत यजमानांनीं निर्वेध करून दिल्हें. याउपर राज्यभार चालवणें, संरक्षण करणें अधिकारी यांजकडे आहे.'

फितुरीबद्दल बापूस शिक्षा करण्याचा विचार चालला, तेव्हां 'असले फितूर माझ्या खिशांत कैक आहेत,' असें वाक्य बापूनें म्हटलेलें प्रचलित आहे. त्याचा भाव असा, कीं अशा कृत्यांस फितूर किंवा राजद्रोह म्हणूं लागलें तर त्यांतून कोणताही राजकारणी पुरुष सुटणार नाहीं. कामें उरकतांना अशा संशयास्पद गोष्टी अनेक कराव्या लागतात, असा त्याचा भाव आहे. पुण्यास असले फितूर त्या वेळीं हरहंमेश चालू होते. ता. २१-३-१७८० चा खालील उल्लेख पहा. 'सखारामपंत मोरोबा यांजकडील सांसर्गिक लोक यांजला तस्दी न करितां कृपा केली होती. त्यांनीं वाड्यांत थोडासा फितूर केला, तो समजतांच विष्णु नरहर वगैरे चार लुच्चे होते, त्यांस धरून पारिपत्यें केलीं.' (खंड १९-८५).

**३. सखारामबापू बोकील, योग्यता व कौटुंबिक.**— बोकीलांची हकीकत व वंशावळ म. वि. ४ पृ. २८८ वर दिली आहे, त्यांत खालील भर पाहिजे. हे हिवरे गांवचे वतनदार जोशी व कुलकर्णी, गोत्र जामदग्नि, सासवड ठाण्याचे सबनीस व चिटणीस. यांचा पूर्वज पंताजी गोपीनाथ शिरवळास न्याहारखानातर्फे हुद्देदार होता. शहाजीचा व त्याचा स्नेह, याजमुळें पुरंदर किल्ला हस्तगत करण्याचे वेळीं मुसलमानांकडून फुटून शिवाजीकडे आला. स. १६५५ चे पूर्वीं व नंतर कांहीं काळ तो शिवाजीचा चिटणीस होता. अफझलखानाच्या वधानंतर त्यास वाकेनिशी मिळाली, ती राज्याभिषेकप्रसंगीं कायम होती. त्याचा पुतण्या महादाजीपंत यास संभाजीजवळ वाकनिसाचा मुतालिक म्हणून शिवाजीनें नेमिलें होतें. (खं. ८-२५). महादाजी व त्याचा पुतण्या भगवंत गंगाधर, संभाजी बरोबर पकडले जाऊन मोगलांच्या कैदेत पडले. त्यांचा परामर्ष शाहूनें घेतला. शाहूचे आधीं त्यांची कैदेंतून सुटका होऊन, ताराबाईनें त्यांस हिवरे गाव व सासवड येथें वाडा बांधण्यास जागा दिली. पुढें शाहूनें त्या घराण्यास उदयास आणिलें. अव्वलपासून अखेरपर्यंत मराठी राज्याकरितां कष्ट केलेल्या घराण्यांत या बोकीलांची गणना आहे. 'सासवडकर पंचायतनाची' त्या बाजूस अद्यापि ख्याति आहे, त्यांत हे बोकील, पुरंदरे, पानशे, विठ्ठल शिवदेव व नारो शंकर हे पांच मुख्य असून त्या सर्व घराण्यांत अनेक ऐतिहासिक पुरुष उदयास आले.

सखाराम भगवंत हा तिघां बंधूंतला सर्वांत लहान. हे बंधू स. १७६३ पर्यंत एकत्र होते, नंतर विभक्त झाले. वडील भाऊ विभक्त होण्यापूर्वीच वारला.

सखारामबापूचें स्वतःचें पथक असून त्यास सरंजाम लावून दिलेला होता. त्यांचा मूळ वतनी गांव हिवरे. येथें त्यांचे वंशज अद्यापि नांदत आहेत. सखारामबापू कैद झाला, तेव्हां घरांत कोणीच मोठा पुरुष नव्हता. मरणसमयीं बापूच्या दोन बायका काशीबाई व जिऊबाई व विधवा सून आकोपंताची बायको गोदूबाई हयात होत्या, पैकीं काशीबाई लवकरच वारली. धाकटी बायको जिऊबाई व सून पुढें पुष्कळ वर्षें हयात होत्या. त्यांचें पटेना तेव्हां सून सासवडास व बायको हिवरे येथें राहूं लागली. गोदूबाई ही रघुनाथ चिमणाजी सचिवाची मुलगी. त्याचा मुलगा शंकरराव यास बापूची मुलगी दिलेली होती. गोदूबाईनें पेशवाई बुडाल्यावर यशवंतराव नांवाचा एक गोत्रज मुलगा दत्तक घेतला. त्याचा वंश हल्लीं आहे. (कै. या. पृ. १६६ ).

बापू अगदीं निरक्षर असून केवळ तोंड पाटिलकीनें कामें करी, असा मुंबईकर इंग्रज टेलरनें जो खोटा मजकूर त्या वेळीं आपल्या खलित्यांत कलिकत्तेकरांकडे लिहून पाठविला, तोच अद्यापपर्यंत प्रचलित आहे. पण अलीकडे बापूच्या हातचे शेंकडों कागद उपलब्ध झाले असून तो लिहिण्याच्या कामांत इतरांच्या मानानें मुळींच कमी नव्हता, त्याचें हस्ताक्षर चांगल्यापैकीं होतें, आणि त्याच्या हातचे हिशेब व इतर राजकारणी लेख हल्लीं पुष्कळ उपलब्ध आहेत. बापूचे पुष्कळसे कागद तो कैद झाल्यावर सरकारांत गेले, आणि कांहीं राहिले ते त्याच्या नोकरांनीं शिक्षेच्या भीतीस्तव विहिरींत टाकून ती बुजवून टाकिली. परंतु बरेचसे कागद हल्लीं त्याच्या वंशजांकडे व त्याचे व्याही अंताजी माणकेश्वर यांचे घरांत सांपडतात. पुरंदरे यांजकडे बापू शागिर्द होता असे जे प्रवाद आहेत ते खरे दिसत नाहींत. माधवराव पेशव्यानें बापूची योग्यता ओळखूनच मरणसमयीं पुढील सर्व राज्याची व्यवस्था त्यास सांगितली. लहानपणापासून अनेक लढायांत तो प्रत्यक्ष हजर होता व अनेक राजकारणें त्यानें उलगडलीं, यावरून लढाईचे पांचपेंच सुद्धां तो चांगले जाणत असे. नाना फडणिसास युद्धकलेचें ज्ञान बिलकूल नव्हतें, तसें बापूचें नव्हतें. तो तलवार व लेखणी दोनही चालविण्यांत कुशल होता. याच कारणास्तव नानास अर्धा व बापूस दीड शहाणा म्हणतात.

हिवरे येथें चरणावती नदीच्या कांठीं त्र्यंबकेश्वर नांवाचें एक सुंदर मंदिर बापूनें पुष्कळ खर्च करून बांधलेलें आहे. मोगलांच्या स्वारींत हिवरे व पुरंदर

येथें बापूचे मोठे वाडे होते, पैकीं सासवडचा वाडा अद्यापि शाबूत आहे. सासवडास गोदूबाईनें बांधलेलें मुरलीधराचें सुंदर देवालय असून तेथेंच कऱ्हा नदीस बापूनें बांधलेला घाटही आहे.

सखारामबापूच्या योग्यतेसंबंधानें वेळोवेळीं भरपूर विवेचन करण्यांत आलें आहे. समग्र पेशवाई पाहिलेल्या अशा नामांकित राष्ट्रसेवी पुरुषाचा अंत कैदखान्यांत व्हावा ही अत्यंत खेदाची गोष्ट होय. त्याच्या वयाकडे पाहून तरी त्यास एकांतांतील डोंगरी किल्ल्यांची हवा नानानें दाखवावयास नको होती. त्याच्याच राहत्या घरांत पक्का बंदोबस्त करणें अशक्य नव्हतें. ‘आमचा जसा शेवट सिंद्याच्या हस्तें तुम्हीं करविलात, तसाच तुमचाही शेवट सिंदेच करतील,’ हा बापूचा नानास गेलेला निरोप किंवा शाप तात्पर्यानें तरी पुढें खरा झाला.† बरोबरीच्या किंवा श्रेयान कारभाऱ्यास अशी शिक्षा देणें अत्यंत अनुचित होय. बापूच्या कुटुंबाचा बंदोबस्त पुढें बाजीरावानें करून दिला. मोरोबाच्या कुटुंबाची जशी व्यवस्था नानानें केली, तशी बापूच्या मंडळीची त्यानें केलेली दिसत नाहीं. राजकीय कैद्यांस इतर दृष्टीनें उपसर्ग न देणें सर्व राष्ट्रांत मान्य आहे. सखाराम बापूचा गुन्हा सुद्धां एखाद दुसऱ्या अपूर्ण चिठ्ठीवर शाबिद धरण्यांत आला. बापूस निजामाकडून मदारुलमहाम असा किताब होता. त्याचा राहता वाडा पुण्यांत त्या वेळीं अत्यंत उत्कृष्ट म्हणून नांवाजलेला होता. स. १७८६ त इंग्रज वकील मॅलेट पुण्यास राहण्यास आला, त्यास गायकवाडांचा वाडा दिला असतां, तो नापसंत करून मॅलेटनें सखाराम बापूचा किंवा सदाशिव रामचंद्राचा वाडा आपणांस राहण्यास द्या, अशी मागणी केली. पण ती नानास पसंत पडली नाहीं. हरिवंशाचे बखरींत बापूच्या पुष्कळ आख्यायिका आहेत, त्यावरून राजकारणाच्या अनेक बाबतींत तो नानाहून वरचढ होता यांत संशय नाहीं. विशेषतः निरनिराळ्या प्रकृतीच्या लोकांकडून तडजोडीच्या बुद्धीनें कामें घेण्याची हातोटी बापूस होती, ती नानाचे ठिकाणीं नव्हती. अधिकाराची हाव तर त्या काळीं सार्वत्रिकच होती.

सन १७७५ सालीं बापूचा एकुलता एक मुलगा आकोपंत वारला तेव्हां बापू पुरंदरावर पेशव्याजवळ असून मोठ्या मसलतींत गुंतला होता. मुलाच्या

† भा. व. २ जु. ऐ. गो. ३७.

मृत्यूमुळें त्या वेळीं त्याची कोण त्रेधा उडाली, वगैरे हकीकत पुढील पत्रांत नमूद आहे. हें पत्र आजवर कोठेंही प्रसिद्ध झालें नसल्यानें येथें तें समग्र दिलें आहे. ' पु॥ राजश्री आबा स्वामीस विनंती. उपरी श्रीमंत राजश्री सखारामबापूचा पुत्र आकोपंतबाबा याचा येकायेकीं काल जाला तो मजकूर पेसजी लिहिला त्याजवरून कलले असेल. मोठा घात जाला. ईश्वरी क्षोभ उपाये नाहीं. याजमुळे सौ॥ मातुश्री ताईस दुख जालें तें त्याहा-वयासी हात न चाले. याजकरितां वेदमूर्ती राजश्री विठल भट अन्या सासवडी त्याजवल गुतोन नेहमी राहिले. श्रीमंत किल्यास. यासमीप आम्ही होतो तैसे राहाणे प्राप्त. यासमई घरास जावे यैसे चितास न होये. यामुले नेहमी गुतोन राहिलों. श्रीमंतास श्रम जाले तो प्रकार ल्याहावा काये ! तथापि भारी मसलत पडली यामुले उपाये नाही. मसलतीमुले जे घडणें ते घडू. यैसे प्राप्त. नाही तरी येखादे तीर्थी जाऊन बसते. कोण्हाचे हाती न लागते. त्या ही उपरी त्यासारिखा ज्ञानी विवेकी कोण्ही नाही. त्याचे तेच एक. येसा पुरूष पुढे होणे कठीण. कारण आम्हा सर्वत्राची अवसाने झाडून गेलीं. तथाप त्यानी अवमान धरून मसलत जैसी आरंभली तैसी सिधीस न्यावी यैसा निश्चये. पुढें पुत्र व्हावा यैसा योग आहे. ईश्वरी सता प्रमाण. तुमचे घरची खुशाल आहेत व पत्रेही तुमची आहेत त्याजवरून केलेल. राजश्री हरिपंत तात्याकडील वर्तमान तुम्हास कलत असल, तेथे लिहिणे काय ! येदा फौजेची छावणी सुरते नजीक होईल यैसे आहे. मसलतीस प्रथम दिवस. याउपरी इग्रेज दमला यैसे आहे. काये घडल ते पाहावे. नबाब निजाम आलीखान छावणीस शहरास आले. मुधोजी भोसले यासी साहेबसुभ्याची वस्त्रे होऊन नागपुरास गेले. रुखनत दौला व इस्मालखान पठाण अलजपूरकर याचे वर्तमान कलले असेल हे विनंति '. $

मुलगा नसल्यामुळें वृद्धपणीं बापूस अत्यंत दुःख झालें. स. १७७८ च्या मे महिन्यांत त्यानें मुलगा व्हावा म्हणून फिरून लग्न केलें, त्यास अनु-लक्षून आनंदीबाईनें आपल्या एका पत्रांत त्यास नाजूक चिमटा घेतला आहे.

---

$ हें पत्र शिरवळकर देशपांडे यांचे दप्तरांतलें रा. कृ. वा. पुरंदरे यांजकडून मिळालें. हें सासवडाहून शिरवळास आबा देशपांडे यास लिहिलेलें दिसतें. हरिपंताची छावणी सुरतेनजीक होण्याचा समय म्हणजे स. १७७५

**४. नाना महादजींची बंधुभावाची शपथक्रिया** (१५-३-१७७९).— बापूस कैदेंत घातल्यावर नानानें हरिपंतास कारभारांत आपल्या मदतीस घेतलें. दुसरा कृष्णराव काळे याचाही अनेक भानगडी मिटविण्यास नानास मोठा उपयोग होत असे. या वेळेपासून बारभाईचें मंडळ साफ मोडलें आणि नानाचा अधिकार अनियंत्रित झाला. यासच खऱ्यांनीं अधिकारयोग असें नांव देऊन तत्संबंधीं स्वतंत्र पुस्तक लिहिलें आहे. नानास प्रतिस्पर्धी मोरोबा व बापू हे दोनच होते. दोघांचीही कैदखान्यांत रवानगी करून नानानें सर्व अधिकार स्वतः एकट्याचे हातीं घेतला. राज्याच्या दृष्टीनें ही गोष्ट अत्यंत गैर झाली. नानाचा अनियंत्रित कारभार पुढें सुरू झाला, त्यास इंग्रजींत 'डिक्टेटर-शिप' म्हणतां येईल. महादजी वगैरेंशीं नानाची चुरस पडत गेली, त्याचें बीज यांत आहे. अशी चुरस वाढल्यानें राज्याचें नुकसान होईल ही जाणीव मात्र दोघांसही होती, आणि त्याचा सुलभ उपाय तो त्यांनीं केला.

उभयतांमध्यें सदैव सौरस्य राहवें आणि उभयतांनीं निष्कृत्रिमपणें एकमेकांचें साह्य करून बंधुभावानें वागावें अशी त्यांनीं शपथक्रिया केली. या क्रिया-पत्राची तारीख १५ मार्च आहे, म्हणजे ही आणभाक बापूस कैद केल्याबरोबर स. १७७९ त झाली असें दिसतें. तें पत्र येणेंप्रमाणेः— 'रा. बाळाजीपंत नाना गोसावी. से. महादजी शिंदे दंडवत. आम्हांकडील अर्थ रा. रामचंद्र शिवदेव यांणीं आपणांस सांगितल्यावर आपण शपथपूर्वक खातरजमा करून श्रीवरील तुळसी देतों असें निश्चयपूर्वक बोललां; आणि सरदारी माझी व फडनिशी त्यांची, बंधुत्वाप्रमाणें वर्तन करूं, ज्यांत सरदारीचें कल्याण तें संधान चालवूं, जो अनिष्ट चिंतील त्याचें पारिपत्य करूं, म्हणून बोललां, तो मजकूर म॥ निल्हेर्नी लिहिला, तो सर्व समजोन चित्तास

---

चा जून, त्या सुमारचें हें पत्र आहे. त्या वेळीं सखारामबापूस सासवड सोडून जाणें शक्य नव्हतें. मातुश्री ताई ही बापूची बायको,—बहुधा देशपांड्यांकडची असावी. खरे ले. १४७० त भोसऱ्यांस वस्त्रें दिल्याचा उल्लेख १० जून १६७५ चा आहे, त्यावरून या सालच्या मे महिन्यांत बापूचा मुलगा वारला असें निष्पन्न होतें. सखारामबापूसंबंधानें पुष्कळ कागद व माहिती रा. पुरंदरे यांजकडून आस्थापूर्वक मिळाली.

परमसंतोष जाला. आम्हीं श्रीवरील बेलभंडार पाठविला आहे, व हें पत्र शपथपूर्वक लिहिलें आहे. आपण बंधुत्वाविशीं संशय न मानावा. मशारनिल्हे बोलतील तें आमचें बोलणें जाणावें. ही सरदारी आपली व फडनिशी आमची असा निश्चय झाला. जेथें आपण आहां तेथें मी आहें. हें शपथपूर्वक जाणावें. रवाना छ १५ सफर. बहुत काय लिहिणें लोभ कीजे हे विनंति.' (खरे. ना. च. पृ. ५७).

नाना महादजींनीं ही शपथक्रिया शक्य तितकी पाळिली हें त्यांस भूषणावह आहे. नाहीं तर दादा किंवा इतर अनेकांच्या मराठशाहींतील आणा शपथांची रेलचेल पाहून अत्यंत किळस येतो व उद्वेग वाटतो. बिचाऱ्या देवतांस, गंगादि तीर्थांस, मातापितरांस आपल्या करारांत गोवून त्यांच्या नांवास मात्र लांछन आणावें, हें तर विशेषच खेदकारक होय. कारण असे शपथपुरःसर केलेले लेख बहुधा त्यांची शाई वाळण्यापूर्वींच मोडले गेले असें दिसून येतें. राजापासून खालचे सर्व प्रमुख सरदार, मुत्सद्दी व इतर जन त्या काळीं करार करण्यांत, शपथा घेण्यांत व त्या लगोलग मोडण्यांत इतके प्रवीण दिसतात कीं, जो कोणी वचन मोडणार नाहीं तोच मूर्ख म्हटला पाहिजे. हेंच अवनतीचें चिन्ह नव्हे काय? अशा शपथांचा उपयोग शिवकालीन कागदांत फारच क्वचित् आढळतो. जसजशी राज्यास उतरती कळा लागली तसतसा शपथांचा सुकाळ झाला; आणि बाजीरावानें तर त्यांची परमावधि केली. मात्र करार मोडल्याबद्दल इहलोकींही दंड भोगावा लागतो, ही गोष्ट वसईच्या तहांतील अटी न पाळल्याबद्दल खुद्द इंग्रजांनींच बाजीरावाच्या प्रत्ययास तावडतोब आणून दिली. त्यांतल्या त्यांत नाना फडणिसानें शपथा घेऊन त्या मोडल्याचें उदाहरण बहुधा मिळणार नाहीं, निदान बचावाची पळवाट त्याचे लेखांत अवश्य दिसेल. दादानें मात्र या बाबतींत आपली कीर्ति अजरामर करून ठेविली आहे. 'आणा शपथांत कांहीं ताल राहिला नाहीं' असे त्या वेळच्या कागदांतले शेकडों उद्गार आहेत. (खरे २३६२).

वरील क्रिया-पत्राचा उल्लेख नानानें ता. १-१२-१७९४ रोजीं दौलतरावास पत्र लिहिलें त्यांतही केला आहे. 'कै. महादजींशीं सरदारी माझी व फडणिसी आपली, बंधुत्वाप्रमाणें परस्परें चालावें,' हाच करार नानानें दौलतरावासही लिहून दिला. म्हणजे अनेक भानगडी उपस्थित झाल्या असतांही नाना

महादजी हें बंधुत्वाचें नातें कधींही विसरले नाहींत, हें ध्यानांत ठेवण्याजोगें आहे. महादजीहून नाना पंधरा वर्षांनीं लहान, आणि त्याचे पश्चात् सहा वर्षें जगला. इतउत्तर अनेक पत्रांत ह्या बंधुत्वाचा उल्लेख उभयतांनीं केलेला वाचकांस आढळेल. 'संकटसमयीं मला कोणी कामास आले नाहीं, एक नानाचा भाऊपणा कामास आला, उदंड झाले तरी थोर ते थोरच,' असे स. १७८८ चे महादजीचे शब्द आहेत. (ग्वा. ५-१५४.)

याप्रमाणें महादजीशीं आपला संबंध दृढ केल्यावर नानानें कडक उपायांनीं विरोधकांचा नायनाट केला. जो कोणी नानास विरोध करील तो फितुरी, राजनिष्ठेचा नुसता अभाव म्हणजे शत्रुत्व असा भाव प्रगट झाला. (नातू-पृ.३००).

तळेगांवावर मिळालेल्या विजयाचा आनंदोत्सव म्हणून नानानें बाल पेशव्यास पुण्यास समारंभानें आणून वैशाख शु० ५ ता. २१ एप्रिल रोजीं पर्वतीवर त्याची मुंज मोठ्या समारंभानें करून सुमुहूर्तें शनिवारवाड्यांत गृह-प्रवेश करविला. एवंच गर्भांत असल्या वेळेपासून मोठ्या दक्षतेनें रक्षिलेल्या पेशव्यास नानानें त्याचे घरीं आणून पोंचविलें. नुकतींच त्याच्या वयाचीं पांच वर्षें पुरीं झालीं. धामधुमीमुळें हा समारंभ पुण्यास न करतां पुरंदरासच उरकून घ्यावा असें परशुरामभाऊ वगैरे कित्येकांचें मत होतें. परंतु नानानें तें मानलें नाहीं. चैत्र अखेर स्वारी पुरंदराहून निघून जेजुरी, मोरेश्वर थेऊर येथें देवदर्शन करून पर्वतीवर आली. तेथें मुंजीस सिंदे होळकर वगैरे सरदार हजर होते. त्यानंतर सहावे दिवशीं वैशाख शु० ११ स श्रीमंतांची स्वारी पर्वतीहून निघून शहरांतून मोठ्या थाटानें मिरवत मध्यरात्रीं सुमुहूर्तानें शनिवारवाड्यांत येऊन राहिली. त्यावर पुढें स. १७८१ च्या फेब्रुवारींत इंग्रज पुण्यावर चाल करून येणार अशी बातमी येऊन पळापळ झाली, त्या वेळीं थोडे दिवस पेशव्यास पुनः पुरंदरावर नेलें होतें. एकंदरींत प्रथमायुष्यांत या बाल पेशव्यावर महाराष्ट्राची भक्ति परिपूर्ण होती. या समारंभास सखारामबापू हजर राहण्याऐवजीं सिंहगडावर अटकेंत असलेला पाहून पुष्कळांस हळहळ वाटली असेल. (खरे. २४९८).

मुंजीच्या मुहूर्ताची वाटाघाट रामशास्त्री याचे पत्रांत दिसते ती पाहिली म्हणजे या पेशव्याच्या प्रत्येक कामाबद्दल नाना किती दक्षता ठेवीत होता, तें दिसून येतें. 'मंत्र्युत्तम रा० नाना यांसी प्रति रामशास्त्री कृतानेक आशीर्वाद.

चैत्र व॥ ११ पर्यंत यथास्थित असे. विशेष. वे. मू. बाळंभट थत्ते आपणांकडून आले, त्यांनीं सांगितलें कीं श्रीमंताचे व्रतबंधनाचा मुहूर्त वैशाख शु॥ ५ चा नेमिला आहे, त्यास चंद्रानुकूल्य नाहीं. तेपेक्षां एकादशीचा मुहूर्त प्रशस्त आहे कोणी कोणी म्हणतात, याचा विचार करून लिहून पाठवावें, म्हणून त्यावरून वे. सं. पाठकजी गोपीनाथ दीक्षित प्रभृति शिष्ट व ज्योतिषी बोलावून सभा करून विचार करितां या संवत्सरीं प्रशस्त मुहूर्त नाहीं. तथापि अवश्यक कर्तव्य तरी एकादशीपेक्षां पंचमीचा मुहूर्त उत्तम. पर्वतीचे घरांत प्रवेश करावयाचा मुहूर्त चैत्र व॥ ११ सतरा घटका रात्रींनंतर देवदर्शन करून अठरावे घटकेंत घरांत प्रवेश करावा. अस्तमान पावेतों हडपसरापावेतों यावें. तेथून वानवडीस येऊन मुहूर्ताचा अवकाश पाहून यावें. बहुत काय लिहावें. आशीर्वाद.' (ऐ. टि. ६-३९) अशा समारंभांनीं नानानें नाना प्रकारच्या खस्ता खाऊन सवाई माधवरावाची प्राणप्रतिष्ठा पुण्यास केली; आणि सर्व भानगडी संपल्यावर सिंदे जांबगांवास, व होळकर वाफगांवास‡ जाऊन राहिले. क्षणभर सर्वत्र शांतता होते, तोंच जूनचे आरंभीं दादानें पुनः इंग्रजांकडे पलायन केल्याची बातमी येऊन कारस्थानाचा पहिला दिवस उभा राहिला आणि सर्व मराठमंडळ हादरून गेलें.

**५. दादाचें सुरतेस गॉडर्डकडे पलायन** ( मे १७७९ ).—तळेगांवावरील बनावाची बातमी गॉडर्ड यास बऱ्हाणपुरावर कळली, तेव्हां तो ताबडतोब पुढें निघून फेब्रुवारी अखेर सुरतेस पोंचला. 'इंग्रजांनीं लबाडी मांडिली आहे. सरकारच्या महालांस उपद्रव करितात, लढाऊ सामान तयार करीत आहेत. श्रीमंत दादासाहेब बऱ्हाणपुरापावेतों गेले. दरमजल पुढें जातात. त्यांचे शरीरीं समाधान नाहीं, ज्वर येत असतो.' बहुधा यावरून गॉडर्डचें व दादाचें थोडेंबहुत सूत असावें. वडगांवचा तह अधिकार नसतां केला, तो आपणांस मान्य नाहीं, असें इंग्रजांनीं पुण्यास कळविलें, आणि त्यांत झालेली मानखंडना चहूंकडून भरून काढण्याचाच त्यांनीं उद्योग चालविला. दादाचें सर्व कुटुंब झांशीस एकत्र राहण्याचें ठरल्यावरून आनंदीबाईस आणून नवऱ्याचे स्वाधीन

‡ वाफगांव पुण्याचे उत्तरेस खेडजवळ, तेथून पुर्वेस घोडनदीच्या पलीकडे जांबगांव, हल्लीं तालुका पारनेर, जि. नगर.

करावयाचें होतें. ती मंडलेश्वर येथें राहत होती, जवळूनच इंग्रजी पलटणें सुरते-कडे जात होतीं, त्यांच्याशीं कदाचित् ती अनुसंधान चालवील म्हणून तें बंद करण्याकरितां खालील पत्रें पाठविण्यांत आलीं होतीं. ( खरे २४९१–२८ ).

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री शिवराव महादेव स्वामी गोसावी यांसी. पे॥ माधवराव नारायण प्रधान नमस्कार, विनंति उपरि. येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहित जाणें. विशेष. इंग्रजांचीं पलटणें तिकडून येतात याजकरितां तीर्थस्वरूप सौ० मातुश्री आनंदीबाईस घेऊन येणें म्हणोन तुम्हांस वारंवार पत्रें सादर होत गेलीं असतां तपशील लाऊन तुम्ही उत्तरें लिहित गेलां. सांप्रत इंग्रजांचीं पलटणें बऱ्हाणपुरचे सुमारें येणार असें वर्तमान आहे; याजकरितां तुम्ही समजावोन सांगोन इंग्रजांचे येण्याचा शह चुकाऊन घेऊन येणें. कदाचित् येणें नच होय, त्यापक्षीं तुम्हीं सारे मिळोन तेथील बंदोबस्त उत्तम प्रकारें मजबुतीनें राखणें; हेंहि तुम्हांस न जालियास ठीक नाहीं. जाणिजे छ १७ मोहरम सु॥ तिसा सबैन मया व अलफ. बहुत काय लिहिणें हे विनंति—पो. छ १२ सफर, ( ५-२-१७७९ ).

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री शिवराव महादेव स्वामी गोसावी, पे॥ माधवराव नारायण प्रधान नमस्कार, विनंति उपरि येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहीत जाणें. विशेष. तीर्थस्वरूप राघजी दादासाहेब तिकडे जातात, बराबर रा॥ हरि बाबाजी दि॥ महादजी सिंदे यांस दिल्हे आहेत, त्यास तुम्ही हरि बाबाजीस लिहिणें. म॥ निले तुम्हांस लिहितील त्या सुमारें तीर्थस्वरूप सौ मातुश्री आनंदीबाई यांस घेऊन येऊन तेथें पोहोंचाऊन देऊन तुम्ही व राजश्री खंडेराव त्रिंबक व कृष्णाजी व सदाशिव पवार व सर-कारचे कारकून राजश्री सदाशिव त्रिंबक व आनंदराव गंगाधर याप्रमाणें फौज सुद्धां निघोन हुजूर येणें. जाणिजे, छ ४ रा॥ वल सु॥ तिसा सबैन मया व अलफ. बहुत काय लिहिणें हे विनंति, पो॥ छ ६ रा॥ खर उ॥ वैशाख मास सु॥ सबैन. $ ( २३ मार्च १७७९. )

दादाचे बंदोबस्तास हरिबाबाजी केतकर होता त्यास या परिस्थितीची माहिती

---

$ पत्रें धार दप्तरपैकीं अप्रकाशित. शिवराव ओढेकर धारचा दिवाण.

नव्हती. इंग्रजांचा धूर्त सेनापति गॉडर्ड फेब्रुवारी अखेर सुरतेस पोंचून तळेगांवची फजिती भरून काढण्याच्या तयारींत होता. आपण त्याजकडे गेल्यास आपली सोय मनासारखी लागल्याशिवाय राहणार नाहीं असें दादानें ताडलें. मानाजी फाकडे, बाजीराव बर्वे, सटवोजी भोसले, पांढरे, जाधव वगैरे दादाचे पाठीराखे हळूहळू खानदेशांत जमा होत होते, पण याची वार्ता बाहेर कोणास नव्हती. हरि बाबाजीबरोबर विठ्ठल शामराज नानाचा वकील अहल्याबाईकडे जात होता, तो ता. ९-४-१७७९ रोजीं लिहितो. 'सांप्रत हरि बाबाजीची सावधता फार आहे. कारकून रात्रंदिवस श्रीमंतांचे डेऱ्यांत यांनीं बसविला आहे. कोण येतो जातो याची पैरवी ठेवतात. श्रीमंतांची मर्जी रक्षून त्यांचे खर्चोवेंचाची सरबराई करून अंतर्गत चौकशी फार बारकाइनें यथास्थित करितात. श्रीमंतांस आज चार दिवस चैन नाहींत. पडसें, ज्वर आला आहे. चार दिवस स्नान करीत नाहींत. यास्तव तीन मुक्काम नातेगांवावर आंबराईत झाले, तेथें पाण्याचा तोटा फारच जाला. पाण्याकरितांच काल कासारबारीचा घांट उतरून येथें आलों. येथें झाडें सावलीस नाहींत, पण ओढा वाहत आहे, सबब येथेंच कांहीं मुक्काम होतील. आराम झाला पाहिजे, व दादांचा खजीना पैठणीहून येणार, त्याचीही मार्गप्रतीक्षा आहे. वाटेनें कमाविसदार सरंजाम आणून पोंचवितात व रखवाली करितात. श्रीमंतांस पदार्थ लागेल तो हरिबाबाजींस सांगून पाठवावा, त्यांनीं मर्जीप्रमाणें द्यावा ' असें आहे. ( म. द. बा. प्रस्तावना ).

दादा अंतस्थ रीतीनें आपली जमवाजमव करीत होताच. प्रस्तुत प्रसंगांतून कसें निसटावें याजबद्दल त्याचे विचार अहर्निश चालले होते. बऱ्हाणपुरचे मुक्कामीं आनंदीबाई बाजीराव सुद्धां मंडलेश्वराहून येऊन दादास मिळाली. दादाचा सरंजाम पंधराशें गारदी, पंधरा तोफा, व पांचशें स्वार इतका असून हरिबाबाजीजवळ पांच हजार फौज सिंदे होळकरांची मिळून होती. होळकराचे लोकांवर हरिबाबाजीची हुकमत बेताचीच असे. रस्त्यांत दादा व हरिबाबाजी यांचे खटके वारंवार उडत. हा मुद्दाम आपला अपमान करितो, असें दादास वाटे. दादाची कपटबुद्धि किती खोल आहे हें हरिबाबाजी ओळखीत नव्हता. सातपुड्यांतील भिल्लांशीं कैक दिवस दादाचें अनुसंधान होतें. रनाळ्याचा गुलजारखान कैक दिवस दादाचे तर्फेनें दंगल माजवून राहिला होता. नारोशंकराचा मुलगा रघुपतराव नारायण दादाचे बाजूचा असून,

जंबूसरचा मामलेदार केसो कृष्ण दातार दादासाठीं त्या बाजूस जिवापाड खटपट करीत होता. हरिबाबाजीस दादावर कोणत्याही प्रकारें सक्ति करतां येत नव्हती. त्याच्याच कलानें सर्व घ्यावें लागत होतें. मे महिन्यांत मुक्काम महेश्वरसमोर नर्मदेवर झाला. त्याच वेळीं हरिबाबाजी एकाएकीं तापानें आजारी पडला. नदी तीरावर दादाचा व हरिबाबाजीचा असे दोन गोट एकमेकांलगत उतरले होते. आपलें पायदळ व तोफा नदीच्या उतारावर आगाऊ रवाना करतों, ते लोक नदीपार गेल्यावर मागाहून बाकीच्या लष्करानें नदी उतरून जाणें सोयीचें होईल, असें मिष करून दादानें आपल्या तोफा व पायदळ पुढें रवाना केलें. तें हरिबाबाजीच्या गोटावरून जात असतां दादाच्या गोलंदाजांनीं तोफांचा व पायदळानें बंदुकांचा भडिमार हरिबाबाजीचे गोटावर केला. त्याचे लोक सावध नव्हते. त्या दंगलींत शेंकडों मेले व हरिबाबाजीची फौज उधळून गेली. स्वतः हरिबाबाजी दहा जखमा लागून ठार झाला. त्याबरोबर दादा सहकुटुंब झपाट्यानें लांब मजला करीत नर्मदा दक्षिण कांठानेंच गुजराथेंत उतरून सुरतेस दाखल झाला. त्यास तेथें गॉडर्डनें आश्रय दिला, ( जून १० ). ता. ३१-५ रोजीं दादा फत्तेसिंग गायकवाडास लिहितो. 'खासा स्वारीबराबर हरिबाबाजी होते. त्यांणीं बहुत अमर्यादा केली. त्याजमुळें त्यांचें पारिपत्य करून स्वारी तिकडे येत आहे. तुम्ही शहाणे माणूस, कारस्थानी आहांत, याजकरितां तुम्हांकडे येत आहों. तरी तुमची सलाह कशी काय ती लिहून पाठविणें. इंग्रज आम्हांस सामील आहेत हें तुम्हांस ठाऊकच आहे. त्यांचीही फौज बोलाविली आहे. लवकरच येऊन पोहोंचतील.' हरिबाबाजीचें कुटुंब उज्जनीस होतें. त्याचा मुलगा गोपाळराव पुढें सिंद्यांचे फौजेंत होता. ( खंड १०. २०४ ).

हरिबाबाजीची कत्तल मेच्या आरंभींच झाली असावी. बातमी नानास पुण्यास पोंचून तेथून त्यानें ता. २० मे रोजीं शिवाजी विठ्ठल यास माळव्यांत पत्र लिहिलें आणि कळविलें, कीं 'श्रीमंत सुरतेस जातील अथवा हिंदुस्थानांत जावयाचा प्रकार करतील तर तुम्ही फौज सुद्धां पिच्छावर पोंचून हस्तगत करावे.' त्यास उत्तर शिवाजी विठ्ठलानें ६ जूनचें नानास लिहिलें तें असें.¶ 'पाटील-बावांचें

¶ ऐ. टि. ४. १०.

पत्र आलें होतें कीं तुम्हांकडील एक हजार राऊत ब्ऱ्हाणपुरच्या रोखें हरिबाबाजींचे मदतीस पाठवावे, परंतु फौज जवळ नव्हती. खंडेराव हरि खंडणी-करितां फौज घेऊन गेले होते. पत्र येतांच त्यांस परत बोलावून, आल्यानंतर हरि-बाबाजीस सामील व्हावें, इतक्यांत एक दोन रोजांत हजिरीचा गुंता उरकून खंडे-राव हरि ईंदुराच्या सुमारें गेले, तों महेश्वरीहून बातमी आली, कीं श्रीमंतांनीं हरिपंतास दगा करून नर्मदेच्या दक्षिण तीरानें सुरतेकडे चालले. बारीचे पली-कडे गेल्यावर भिल्लांनीं बारी बंद केली. नाहीं तरी गांठ पडल्यावर सरकार-सेवेंत अंतर झालें नसतें. आपण राज्यांतील खूळ मोडून चांगलाच बंदोबस्त केला. परंतु श्रीमंतांची रवानगी झाशी प्रांतीं करण्यांत दुरंदेशी ध्यानांत आणिली नाहीं. दूरदेशीं पाठवून बंदोबस्त होण्यासारखा असता तर, कै० माधव-राव साहेबांस संनिध बाळगावयाचें प्रयोजन काय होतें! तथापि रवानगी करणें तर एका जुटीची पाच सात हजार फौज समागमें द्यावी, श्रीमंतांचीं पलटणें व तोफा हुजूर ठेवाव्या तें न केलें. असो, होणार भविष्य चुकत नाहीं; आणि अजून विशेष काय व्हायचें आहे! आज चार वर्षें बाहेर गेले त्याचा शेवट काय जाला! श्रीमंत बाळ माधवराव दैववान आहेत, त्यांजपुढें दुसऱ्याचें किमपि चालणार नाहीं. इंग्रज एक वेळ फजित पावोन गेले, पुनः अंगेजणी करतीलसें दिसत नाहीं. आमचें लक्ष आपल्या शिवाय नाहीं. आज्ञेप्रमाणें वर्त-णूक करूं.' नानाकडून यासंबंधानें शिवराव महादेवास पत्र गेलें होतें तें असें:—

विशेष. राजश्री हरिबाबाजी यास तीर्थस्वरूप राजश्री दादासाहेबांनीं गलबल करून कैद केलें म्हणोन अवगत झालें. त्याजवरून हें पत्र तुम्हांस सादर केलें असे, तरी तुम्हीं फौज सुद्धां व राजश्री कृष्णाजी पवार येकत्र होऊन जथ चांगला मांडोन त्यांचें पारपत्य करोन हस्तगत करणें. या समयीं सरकार-चाकरी बजावून दाखवायचे दिवस हेच आहेत. येविसीं कृष्णाजी पवार व सदाशिव पवार यांस आलाहिदा पत्र सादर केलें आहे. येविसीं रा. बाबूराव शंकर व खंडो अनंत § यांस आज्ञा केली असे. उभयेतां माा निले तुम्हांस लिहि-तील त्याजवरून कळेल. जाणिजे छ ११ जा॥ लौवल सु॥ तिसा सबैन मया व अलफ. बहुत काय लिहिणें हे विनंति. ( २८-५-१७७९ ). $ पे॥ छ २२ जमा॥ लौवल ८ जून १७७९ मु॥ किले धार सु॥ समानीन संध्याकाळीं.

§ अंताजी माणकेश्वराचा पुत्र (?) $ ओढेकर, धारकरांचा दिवाण. पत्र धार दप्तरांतून मिळालें.

अशा रीतीनें पुनः दादानें सर्व मराठमंडळास साफ चकविलें. या कामांत तो अत्यंत निष्णात. प्रथम कपटविद्येनें नारायणरावास मारून त्यानें पेशवे पद मिळविलें. त्यानंतर त्रिंबकराव मामास मारून तो निसटला. पुढें त्याच सालीं बऱ्हाणपुरपावेतों कारभाऱ्यांचे भेटीस येऊन तेथून सर्वांस चकवून गुजराथेंत इंग्रजांकडे गेला. तेथें आनंदमोगरीच्या लढाईंत हातीं सांपडणार, इतक्यांत शिताफी करून तो समुद्रमार्गें सुरतेस गेला. त्यानंतर पुरंदरचा तह होऊन तो हस्तगत होणार तों दमण तारापुरावरून मुंबईस गेला. तेथून तळेगांवावर तो हस्तगत झाला, पण नर्मदेवरून पुनरपि निसटून सुरतेस गेला. सारांश, त्याचें सर्वच चरित्र अद्भुत पळपुटीचें आहे. मरेपर्यंत त्याजबद्दल कधीं कोणास विश्वास म्हणून आला नाहीं. राघो भरारी हें त्याचें नांव अगदीं सार्थ होतें. हेंच घरचें बाळकडूं त्याचे चिरंजिवासही मिळालें.

दादाचें प्रकरण पुनः मूळ पदावर आल्यानें सर्वांसच उद्वेग उत्पन्न झाला. महादजीनें मुद्दाम दादास पळून जाण्यास संधि दिली, असा प्रवाद उत्पन्न होऊन नाना त्याजवर रुष्ट झाला. त्यानें महादजीस निकड केली, कीं दादाचा जिमा तुमच्याकडे असल्यानें तुम्ही एकदम फौजेनिशीं त्यांचे पिच्छावर चालून जावें. परंतु पावसाळा नजीक आल्यानें महादजी गेला नाहीं. त्यामुळें संशय जास्तच वाढला.

स्वतः महादजी कांहीं थोडा खजील झाला नाहीं. 'दादास धरून आणून सरकारच्या हवालीं करावें; तुम्हींच हें लफडें आपण होऊन अंगावर घेतलें, आतां त्यासाठीं युद्धें, खर्च वगैरे करावे लागतील, त्यांचें जोखीम तुमच्यावर,' असें नानानें त्यास निक्षून कळविलें. याच वेळीं सखारामबापू गेल्यापासून महादजीनें कारभारांतही मन घालून कांहीं बाबतींत नानाचे विरुद्ध आपला हेका तडीस नेण्याचा प्रयत्न चालविला, ही गोष्ट नानास असह्य होऊं लागली. इंग्रजांनीं गुजरातेंत ठाणें देऊन दादास पुनः आपल्या आश्रयास ठेविलें, तेव्हां त्यांजवर स्वारी करण्याची सिंदे होळकरांस नानाची टोंचणी लागतांच प्रकरण चिडीवर गेलें. शिवाय बऱ्हाणपुर अशीरगड वगैरे कांहींच पदरांत पडलेलें नाहीं, फौजेचा खर्च मागण्याची अडचण, न जावें तर आपली अप्रतिष्ठा होऊन वजन राहत नाहीं, असा दुहेरी पेंच महादजीस उत्पन्न झाला.

दादा निसटून गेल्याची वर्दी मिळतांच महादजीनें खालील पत्र फत्तेसिंगास लिहिलें. 'श्रीमंत दादासाहेब यांणी हरिबाबाजीस दगा करून सुरतेचे सुमारें गेले. फिरंगियांस जाऊन मिळणार, त्यास तुम्ही आपले फौजे सुद्धां आडवे होऊन फिरंगियांस मिळों न द्यावें, गांठ घालावी, म्हणोन पेशजी तुम्हांस पत्रें पाठविलीं आहेत, तीं पावून फौज पुढें रवाना केलीच असेल. हल्लीं दादासाहेब अलीमोहनचे रानांत गेले. तेथून पुढें फिरंगियांकडे जाणार. तरी या समयीं आपण जलदी करून आडवें व्हावें; आणि दादासाहेबांस तिकडे जाऊं न देतां अडथळा करून हस्तगत करावे. हे गोष्ट जाहल्यानें फार चांगलें आहे. तरी जसें कळेल तशी जलदी करून मेहनत करावी, आणि दादासाहेबांस हस्तगत करावें. छ १९ जमा दिलावल. पे॥ ३ जमादिलाखर.' $

अशाच आशयाचीं आणखी अनेक पत्रें महादजीनें उतावळ करून लिहिलीं असलीं पाहिजेत. अर्थात् दादानें पळून जाण्यांत महादजीची फूस किंवा ढिलाई असती तर अशीं पत्रें त्यानें कां लिहिलीं असतीं? दादा पळून जाण्यांत महादजीस कांहीं तादृश फायदा नव्हता.

दादा नर्मदेवरून पळून जातांच महादजीनें काय केलें तें खालील पत्रांत व्यक्त होतें. 'दादासाहेबांचें वर्तमान आपणास कळलेंच आहे. गुजरात प्रांतीं गेले. इंग्रज पुनः त्यास घेऊन कमरबंदी करतील असें दिसत नाहीं. कदाचित् कमरबंदी त्यांनीं केली तरी मैदानची लढाई त्यांस निभवत नाहीं. श्रीमंताचें महादजीचें कूच त्या गडबडींत जाहलें. कारण दादासाहेब नर्मदातीराहून माळव्याकडे जाईल किंवा काय करील हें समजलें नव्हतें. त्यांस धैर्य कोठील! हंगामा करून दरकूच निघोन जीव वांचवावयासी गेला. त्याचे मागें जाऊन उपयोग नाहीं, या अर्थें माघारी जांबगांवास येऊन मुक्काम जाहला. सोबतीही (होळकर) स्वस्थळास गेले. जांबगांवास प्रस्तुत किल्ला बांधावयाची तजवीज चालली आहे. लगता पर्वत लहानसा आहे त्याचे पायास हवेली खासी व आसपास संपूर्ण वसती करावी, पर्वताचे तळवटीं पाणी लागलें आहे. गांवचा ओढा आहे तो आणून खंदकांत सोडून द्यावा. आंत पडकोट घालावा. असा कारखाना हवे-

$ (बडोदें दप्तरपैकीं).

लीस व विहिरीस सुरू जाहला. पांच सात लक्ष रुपयांचा खर्च आहे. चातुर्मास छावणी इकडे जाली (जून १७७९). जांबगांवच्या या वाड्याचें नांव 'माधव-विलास' व किल्ल्याचें 'साहेबगड' असें तारीख ६-८-१७८० रोजीं ठेवून वास्तु जाहली.' (कोटा दप्तर).

---

प्रकरण सातवें

# युद्धाचा तीव्र स्फोट

१. इंग्रजांविरुद्ध चौकडीची जूट (स.१७७९ दसरा).
२. मुंबई कलकत्त्याचे दरम्यान गॉडर्डाच्या वाटाघाटी (जून–डिसें १७७९).
३. महादजीचा रुसवा ( १७७९ आक्टो०–१७८० जानेवारी ).
४. नानामहादजींमधील लढ्याचे मुद्दे.
५. सातपुड्यांतील बंडावा ( ऑगस्ट १७७९—डिसें. १७८० ).

* * * *

**१. इंग्रजांविरुद्ध चौकडीची जूट,** (स. १७७९ दसरा).—स. १७७९ च्या फेब्रुवारींत सखाराम बापू जेव्हां मुलीचे लग्नासाठीं वाईस गेला, त्याच वेळीं महादजीही मुलगी बाळाबाई इच्या लग्नासाठीं बारामतीस गेला. लाडोजी राव शितोळे देशमुख यांस दिली. तेथून पुढें पुरंदरास आल्यावर सखाराम बापूचें प्रकरण व पेशव्याची मुंज उरकून महादजी जांबगांवास गेला. दक्षिणेस हैदरानें फारच धुमाकूळ चालविला होता, त्याचा बंदोबस्त करणें, आणि गुज-रातेंत इंग्रज सेनापति गॉडर्ड येऊन उतरला होता, त्यास घालवून देणें हीं दोन मुख्य कामें या वेळीं निकडीचीं होतीं. त्यांची वाटाघाट नाना व महादजी यांजमध्यें चालू असतांच दादा पळून गेल्याची बातमी आली, तेणें करून इंग्रजांशीं पुनः युद्ध सुरू होण्याचा प्रसंग आला. शिवाय कोल्हापुरकर छत्रपति दंगल करीत होते, त्यांजवर नानानें परशुरामभाऊस पाठविलें. मिळून पाव-साळा सुरू होतांच बिकट परिस्थिति उत्पन्न झाली. इंग्रज व हैदर या दोन

शत्रूशीं एकदम तोंड देण्यापेक्षां एकास आपणाकडे मिळवून दुसऱ्याचा समाचार प्रथम घ्यावा, असें नाना महादजींनीं दूरवर विचार करून योजिलें; आणि अशा रीतीनें नानानें अत्यंत गुप्तपणें चौकडीचें कारस्थान पुढील दसऱ्यास उभारिलें. हें कारस्थान उभें करण्यास काय कारणें झालीं, महादजी व इंग्रज यांचे डाव दादा पळून गेल्यापासून काय चालू झाले, त्यांच्या योगानें नाना व महादजी यांचें वितुष्ट कसें आलें, वगैरे प्रकार प्रथम समजून घेतले पाहिजेत.

इंग्रजांविरुद्ध ही मोठी जूट प्रथम निजामानें उभारली. गंटूर प्रांत घेऊन त्यास उत्तरेकडून बंगालकरांनीं व दक्षिणेकडून मद्रासकरांनीं अगदीं संपुष्टांत आणिलें. तो म्हणे, राघोबा ही व्यक्ति दुष्टपणाचा व लबाडीचा परिपूर्ण पुतळा आहे, त्याचे शब्दास बिलकूल किंमत नाहीं. अशा माणसास इंग्रजांनीं हातांशीं धरून पुण्याचे मसनदीवर आणण्याचा खटाटोप केला, हें कृत्य इतकें नीच होतें कीं परमेश्वरालाही तें न आवडून त्यानेंच त्यांचा सूड घेतला.$

वडगांवच्या करारास इंग्रजांनीं जुमानलें नाहीं. त्यांत अपमान व नुकसान असे दोन मुद्दे इंग्रजांचे अंतःकरणास झोंबले;. त्याच संधीस गॉडर्डची फौज येऊन सुरतेस पोंचल्यामुळें मुंबईकर इंग्रजांस धीर आला. गॉडर्डलाही कांहीं तरी कामगिरी हवीच होती. तेव्हां मुंबईकरांनीं वडगांवचा करार मोडून पुणें दरबाराशीं दुसरा तह अगर युद्ध करावयाचें ठरविलें आणि मार्चे महिन्यांत एकंदर प्रकरणासंबंधानें अभिप्रायाचे दोन विस्तृत खलिते लिहून कलकत्त्यास पाठविले. तेथें फ्रॅन्सिस व व्हेलर यांचा अभिप्राय मराठ्यांशीं युद्ध करूं नये असा असतां, हेस्टिंग्सनें आपलें जादा मत वापरून वडगांवचा करार आपण पाळीत नाहीं असें पुणेंदरबारास कळविलें; आणि गॉडर्ड यास नवीन तह ठरविण्याची कामगिरी सांगितली. सेनापतीला तह ठरविण्याचें काम सांगणें मुळीं विसंगत होय. तथापि दादा पुनः निसटून इंग्रजांकडे पळाला नसता तर बहुधा तह ठरलाही असता. फ्रेंचांना आश्रय देऊं नये एवढीच इंग्रजांची अट होती आणि ती पुणेकरांस मान्य होती. पण दादाच्या कृतीनें पुनः सर्व डाव उलटून पूर्वपदावर आला; आणि त्यास गॉडर्डनें आश्रय दिल्याचें पुण्यास कळतांच युद्धाची तयारी करण्याशिवाय पुणेकरांस गत्यंतर राहिलें नाहीं.

---

$ ( India Office papers ).

आणि युद्धच करावयाचें तर त्याची भिस्त कोणावर ठेवायची हा नानास प्रश्न पडला. दादास महादजीनें मुद्दाम आपल्या कबजांतून जाऊं दिला, असा सर्वत्र बोभाटा झाल्यामुळें सिंदे मनापासून इंग्रजांविरुद्ध लढेल कीं नाहीं याबद्दल नानास जबरदस्त संशय उत्पन्न झाला. बंधुत्वाच्या आणाशपथा झाल्या, जहागीर वगैरेची मागणी नानानें पुरी केली, तरी हरिपंताप्रमाणें नानाचे हुकूम बिनतक्रार उठविण्यास महादजीची तत्परता नसे. प्रथम दादास आपल्याच हातीं ठेवण्याचा त्यानें आग्रह धरला, आणि पुढें त्याचा योग्य बंदोबस्त ठेवला नाहीं, हे प्रकार नानानें गय करण्याजोगे नव्हते. 'दादास आमचे हवालीं करा म्हणजे तुम्हांस एक कोट रुपये देतों,' असें सुद्धां नानानें महादजीस सांगितल्याचा उल्लेख इंग्रजांच्या बातमींत आहे. सारांश, नानाचा एकतंत्री कारभार महादजीस मान्य नव्हता. नाना लष्करी पेशानें लंगडा आहे, आपल्याशिवाय त्याचें चालावयाचें नाहीं, हें महादजी ओळखून होता. नानाचा आधार काय तो एक हरिपंत, तो जवळ नसावा असेंही महादजीनें उघड कळविलें, तें नानानें मानिलें नाहीं; आणि महादाजीला बाजूस ठेवूनही आपण मुत्सद्देगिरीच्या बळावर इंग्रजांस शरण येण्यास भाग पाडूं, अशी योजना नानानें ठरविली. सर्व हिंदुस्थान या वेळीं इंग्रजांविरुद्ध फिरलें होतें, ही गोष्ट भर कौन्सिलांत फ्रॅन्सिसनें बोलून दाखविली ती नानासही माहीत होती. माहे बंदर हस्तगत केल्यामुळें इंग्रजांवर हैदर नाईक अत्यंत चिडला होता. निजामाचा पूर्वकिनारा व खालचा कर्नाटकचा भाग इंग्रजांनीं गिळला, म्हणून निजामही मनापासून इंग्रजांशीं एकदां सोक्षमोक्ष करून घेण्याच्या तयारींत होता. जिवाजीपंत वकिलामार्फत या सर्व गोष्टी नानास कळल्या होत्या. बंगालच्या चौथाईची रक्कम भोसल्यास देण्याचें हेस्टिंग्सनें नाकबूल केल्यामुळें, म्हणजे पर्यायानें सर्व बंगाल कायमचा हातांतून गेल्यामुळें, भोसलेही किती क्रुद्ध झाले होते ही गोष्ट दिवाकरपंतामार्फत नानास पूर्ण ठाऊक होती. उत्तरेंत अयोध्येचा वजीरही सर्वस्व गमावून इंग्रजांचा केवळ बंदा गुलाम होऊन बसला, याची जाणीव सर्व हिंदुस्थानास होती. बादशहा तर नेमणूक बंद झाल्यामुळें इंग्रजांची ही ब्याद काढून टाकण्यास अति उत्सुक झाला होता. काशीचा चेतसिंग, तंजावरचा राजा, वगैरे अनेक लहान सत्ताधीश असेच इंग्रजांविषयीं चरफडत होते. मिळून हिंदु व मुसलमान हे जे दोन मुख्य हिंदी पक्ष, ते दोनही सर्वथा इंग्रजांवर उलटले होते. अशा

स्थितींत निजामानें पुढाकार घेऊन इंग्रजांविरुद्ध सर्वांनीं एकदम उठून प्रत्येकानें आपापल्या हद्दींत त्यांचा पाडाव करावा अशी सूचना पुण्यास व अन्यत्र केली आणि तिला नानानें लगेच मूर्तस्वरूप आणिलें. निजाम व हैदर, हे दोन मुसलमान, आणि भोसले व पेशवे हे दोन हिंदु सत्ताधीश, या कारस्थानांत प्रमुख असून, त्याची रचना स. १७७९ च्या दसऱ्यास सुरू होऊन पुढील चार दोन महिन्यांत पूर्ण झाली. या कारस्थानाचे उद्देश जरी अखेरीस तंतोतंत पूर्ण झाले नाहींत, तरी इंग्रजांस सर्वत्र दहशत बसून, कसाबसा सर्वांशीं सलूख करण्याची प्रवृत्ति त्यांचे ठिकाणीं उत्पन्न झाली, याचें मुख्य कारण हें चौघांचें जंगी कारस्थान होय. नानाच्या कर्तबगारीचा तर तो कळसच समजला पाहिजे.

या जुटींत नानानें जंजिरेकर सीदीसही सामील केलें; आणि ता. १५-४-१७८० च्या करारानें आपलें पथक सीदीनें परशुरामभाऊचे तैनातींत पाठविलें. वास्तविक पथकाची किंमत विशेष नव्हती, आणि खर्चही पेशव्यांकडूनच होता. परंतु इंग्रजांचा हा नेहमींचा दोस्त नानानें आपल्या बाजूस वळविला हें विशेष आहे. (पे. द. पृ. १५९ ).

जुटीच्या चार प्रमुख सत्ताधीशांपैकीं मराठ्यांनीं व हैदरानें इंग्रजांस चांगलें नरम करून आपली कर्तबगारी प्रगट केली ती इतिहासांत प्रशंसनीय समजली जाते. परिस्थितीवरून पाहतां मराठे, इंग्रज व हैदर हे तिघे जवळ जवळ समबल असून, त्यांपैकीं कोणतेही दोन तिसऱ्यास भारी होते. यामुळें वरील चौकडीचें कारस्थान पुढें प्रगट झालें, तेव्हां इंग्रजांस फारच भय उत्पन्न झालें; आणि ते मराठ्यांशीं स्नेह जोडण्याच्या खटपटीस लागले. पुढें सुद्धां मराठ्यांशीं स्नेह करून जेव्हां त्यांनीं टिपूचा पाडाव केला, तेव्हां दोघेच प्रतिस्पर्धी उरले, म्हणून इंग्रजांस मराठ्यांवर चढाई करतां आली. या चढाओढीचें व बला-बलाचें वर्णन लायलनें आपल्या ग्रंथांत मार्मिकपणें स्पष्ट केलेलें आहे.

वारन्हेस्टिंग्सनें पुण्यास नानास व महादजीस स. १७७९ च्या एप्रिलांत कळविलें, कीं वडगांवचा करारनामा आपणास बिलकूल मान्य नाहीं; तसा करार करण्यास त्या कामगारांस अखत्यार नव्हता, आणि तो इंग्रज राष्ट्रास अत्यंत लांछनकारक असल्यामुळें आपण बिलकूल मानणार नाहीं. अशा पत्रांची झोड पुढील चार दोन महिन्यांत हेस्टिंग्सनें सर्वत्र उठविली. गॉडर्डानेंही पुणें

दरबाराशीं बोलतांना हाच प्रकार व्यक्त केला. गॉडर्डाचा हेर ठाकोरसिंग नांवाचा पुण्यास वावरत होता, त्यास घासीराम कोतवालानें पकडून जबानी लिहून घेतली, ती उपलब्ध आहे, ( ६-१०-१७७९ ). तो म्हणतो, 'आम्ही चार असामी कठोरहून † पुण्यास आलों. गांवांत बातमीचा शोध करीत असतां घाशीरामाची गांठ पडली. त्यांनीं वर्तमान पुशिलें. त्यास, दादासाहेब सुरतेस महंमदी बागांत आहेत. सिधासामान इंग्रज देतात. त्यांस हैदर नायकाकडून हुंड्या २५ लाखांच्या आल्या. एकंदर फौज २५ हजार आहे, तोफा लहान मोठ्या चारशें आहेत. आनंदीबाई फार खटपट करतात. त्यांचे कारकून इंग्रजांकडे जातात येतात. अंमदाबादेस वकील गेले आहेत. दादांनीं तीन गोळे सवालाख रुपये देऊन घेतले आहेत. ते फौजेवर सोडले असतां दिसूं नयेत. इंग्रजानें दारूची चादर एक केली आहे. ती फौजेवर सोडावी, म्हणजे दोन कोसांवरून हजार दोन हजार माणूस जायां होतें.' ( ऐ. टि. २-९, ३-८; फारसी प. ३०; ग्वा. इं. का. )

असा प्रकार झाल्यावर आतां इंग्रजांशीं युद्ध झाल्याशिवाय राहत नाहीं असें नानास कळून चुकलें, आणि सिंदे होळकरांच्या पायधरण्या करण्यांत कसा बोजवारा उडतो याचीही त्यास अटकळ असल्यामुळें, हैदराशीं मिटतें घेऊन इंग्रजांचा समाचार घ्यावा असा विचार हरिपंत महादजी वगैरेंच्या सल्ल्यानें नानानें ठरविला. दादा इंग्रजांकडे असल्यामुळें हैदरासच मिळवून घेणें शक्य व सोईचें होतें. हें कारस्थान घडवून आणण्यांत महादजीचा प्रत्यक्ष हात किती होता तें कळत नाहीं. पण करार पुरा पाडण्याबद्दल हैदरास महादजीनें स्वदस्तुरची हमी लिहून दिली, आणि पुढें वारंवार नानास लिहितांना महादजी या कारस्थानांतील मुद्यांचा उल्लेख करतो, त्यावरून महादजी व नाना दोघांनीं तें बनविलें याबद्दल संशय राहत नाहीं. हा सर्व घाट दसऱ्यास ठरून नंतर निजामाकडे व हैदराकडे वकील जाऊन बोलणें झालें, तदनुसार 'सरकार व हैदरअलीखान यांचा तहनामा २० सफरीं ( २०-२-१७८० ) विकारी संवत्सरीं, मदारुल महाम बाळाजी जनार्दन, हरि बल्लाळ, महादजीराव सिंदे, आनंदराव रास्ते व कृष्णराव बल्लाळ ( काळे ) यांचे विद्यमान शपथ बेलभंडारपूर्वक झाली,' त्याचीं कलमें हैदर नाईकास पेशव्याकडून लिहून देण्यांत आलीं तीं:—

† सुरतेजवळ तापीचे कांठीं.

१. तुंगभद्रेपलीकडील व अलीकडील जो मुलूख, कोट, किल्ले किंवा पाळेगार तुम्हीं जिंकले आहेत, ते दरोबस्त तुमचेकडे राहतील. त्यांबाहेर तुम्हीं मराठ्यांचे मुलखास उपद्रव देऊं नये.

२. तुम्हीं इंग्रजांशीं बिघाड करून चिनापट्टण, आरकाट, त्रिचनापल्ली वगैरे इंग्रजांचे तालुके मारून त्यांस जेर करावें. सरकार गुजरात प्रांतांत त्यांस जेर करतील, व निजाम अलीखान शिकाकोल राजमहेंद्रीकडे जाऊन शह देतील.

३. जरूर पडल्यास पांच हजार स्वार पेशव्यांचे मदतीस पाठवावे.

४. दादा किंवा त्यांचे आप्त व साथीदार यांस आश्रय किंवा पैका देऊं नये किंवा त्यांच्याशीं संबंध ठेवूं नये.

५. स. १७८० पावेतोंचा खंडणीचा हिशेब करून त्याची तोड पंधरा लाख केली आहे. ही रक्कम हैदरानें लगोलग पुण्यास भरणा करावी; व पुढें दरसाल खंडणी बारा लाख भरीत जावी.

६. तंजावर संस्थानास इंग्रज उपद्रव करितात, त्याचा परिहार करून तें राज्य निर्वेध करावें.

७. नवीन जिंकलेला प्रदेश हैदर व पेशवे यांनीं निम्मेनिम वांटून घ्यावा.

८. इंग्रजांशीं तह करणें झाल्यास परभारें कोणीही करूं नये. उभयतांनीं एक विचारें करावे.

९. रास्ते हजार स्वारांनिशीं हैदरखानांचे कुमकेस राहतील.

या करारास जामीन महादजी सिंदे व रास्ते असे दोघे दिलेले असून शपथपूर्वक बेलभंडार देण्यांत आला. वकील व मसुदे जाऊन येऊन अखेर ता.९-८-१७८० रोजीं तह कायम झाला. (फॉरेस्ट, सालबाई तह कलम ९ पहा. भा. व. १; प. या. ७; स. मा. रो. ३८६; खंड १०-२३५ त. क. पृ. ८५; ).

सन १७७९ च्या दसऱ्याचें म्हणजे २० आक्टोबरचें खालील पत्र या तहासंबंधानें उपलब्ध आहे. 'सरकारचा व तुमचा ( हैदराचा ) ठराव महादजी सिंदे व कृष्णराव काळे यांचे मार्फत तुमचे वकील नरसिंगराव यांशीं बोलोन जाला, त्याची याद करार करून कृष्णराव नारायण आणि सिंदे व रास्ते यांजकडील कारकुनाबरोबर पाठविली आहे. त्याप्रमाणें अमलांत यावें. सलूख जाहला. इतःपर दुसरा विचार नाहीं.' या पत्रांत उल्लेखिलेला कृष्णराव नारायण

जोशी* हा इंग्रजांचा वकील नानानें मुद्दाम हैदराकडे पाठविला. त्याचा पत्रव्यवहार खंड १९ यांत छापलेला महत्त्वाचा आहे. तसेंच कृष्णराव काळे हा मोठा कारस्थानी पुरुष हरिपंताप्रमाणेंच हरएक व्यवहारांत व विशेषतः निजामाकडे नानाचें साह्य उत्कृष्ट करीत होता हें ध्यानांत ठेविलें पाहिजे.

हैदरखानाचा तह व एकंदर चौघांचें कारस्थान महादजीच्या विद्यमानें सन १७७९ च्या पावसाळ्यांत घाटून सिद्ध झालें असें का. सं. प. या. २३० वरून ठरतें. इंग्रजांस कायमच उखडून काढण्याकरितां नानानें पुढाकार घेऊन जी ही जूट जमविली ती त्याच्या हयातींतील प्रमुख कर्तबगारी समजली पाहिजे. तदनुसार चौघांनीं चार दिशांस आपापले कार्यक्रम वांटून घेतले. हैदरानें दक्षिण, निजामानें पूर्व, भोसल्यानें पूर्वोत्तर व पेशव्यांनीं पश्चिम भाग थेट गुजरातपावेतों असे वांटून घेतले. पैकीं भोसले व निजाम यांनीं कांहींच कार्यभाग करून दाखविला नाहीं, हें पुढें निदर्शनास येईलच. या जुटींत महादजी किती कसून मेहनत करीत होता, त्या संबंधानें त्यानेंच वेळोवेळीं काढिलेले उद्गार बाणेदार आहेत. स. १७८१ त निजामाची ढिलाई पाहून त्यास महादजीनें लिहिलें, ‘शिकाकोल राजमहेंद्रीकडे इंग्रजांस ताण देऊन मुलूख हस्तगत करावा, असा समय फिरोन येणार नाहीं. इंग्रजांची जात मस्ती, वचनाचें, कौलकरारांचें प्रमाण नाहीं. एकास भुलथाप देऊन एकाची दौलत घेतात, हे त्यांचे कावे आपणांसही वाकब आहेत. श्रीमंतांचा व आपला द्विधाभाव नाहीं. एका दौलतेस पेंच पडला असतां, दुसरी दौलत राहील असें होणार नाहीं. आपले व सरकारचे करार असतील त्यांत तफावत पडली नाहीं व पडणार नाहीं. आपलें बोलणें आहे जे, श्रीमंत बारा वर्षांचे होत तों पावेतों नफानुकसान न पाहतां दौलतीस कुवत असेल तितकें साहित्य करीन.’ (ग्वा. ४-४९, ५२, ५३; २-२५१).

स. १७७९ च्या ‘श्रावणमासीं नबाबाचीं पांचसात पत्रें पुण्यास आलीं,

* या कृष्णरावाचा बाप नाना जोशी म्हणून बारभाईंचे तर्फेनें नागपुरकडे संधान ठेवण्याच्या कामगिरीवर असून बापलेकांचीं पत्रें दहाव्या खंडांत आहेत. (ले. १२२–१३० व १६५). कृष्णाजी नारायण नाना फडणिसाचे तर्फेनें अनेक कामांवर असून त्याचे पश्चात् बाजीरावानें त्यास सातारकर छत्रपतींजवळ ठेविलें होतें. (का. सं. प. या. १८६ व ४८३).

कीं इंग्रजांची जात लबाड आहे. चौघांनीं एक होऊन चहूंकडे मसलत करावी असा निश्चय ठरला, त्यावरून नानांनीं पाटिलबावांस जांबगांवाहून बोलाविलें. ते पुण्यास आल्यावर या मसलतीचा निश्चय ठरते समयीं नबाबाचीं पत्रें आलीं होतीं तीं दाखविलीं. दिवाकरपंतांसही नबाबांनीं तशींच पत्रें लिहिलीं. सारांश, इंग्रजांची मसलत नबाबांनीं आपण होऊन करविली, आणि ती त्यांनीं सिद्धीस नेली नाहीं. नानातऱ्हेचे बाहाणे काढले; आणि आम्हीही जांबगांवास असतांपासून, नबाब मसलत करणार नाहीं, असे पर्याय बोलत गेलों,' असें महादजी म्हणतो. १७७९ च्या डिसेंबरचे आरंभीं महादजी लिहितो, 'आम्ही तयारीस लागलों, कांहीं फौज रवाना जाली. बाकीची तर्तूद करितों.' पुढें स. १७८१ त महादजी हैदरास लिहितो, 'इंग्रज मकरी, माहूतलब आहेत. त्यांची चाल आपणांस वाकीफ आहेच. नागपुरचे भोसल्यास गुप्तपणें कांहीं देणेघेणेचें करून भोसल्यांचा आपला सलूख करून घेतला. इंग्रज दगाबाज आहे. त्याचें पारिपत्य करावें हाच कसा इकडील आहे. त्यांशीं सलूख करूं नये. चहूंकडून तंबीच करावी. आपण व आम्ही मसलतीविरी जाऊन लढाया केल्या, तशा भोसले नबाबाकडून घडल्या नाहींत, तरी चिंता नाहीं. आपणा दोघांकडून पारिपत्य होतच आहे.' अशा रीतीनें चौकडीचें कारस्थान सिद्ध झालें.

**२. मुंबई कलकत्त्याचे दरम्यान गॉडर्डच्या वाटाघाटी,** (जून–डिसें ७९).—ग. हॉर्नबीनें वडगांवच्या बनावानंतर मराठ्यांच्या संबंधानें एकंदर वस्तुस्थिति दाखविणारे दोन विस्तृत खलिते वरिष्ठांकडे पाठविले असें वर सांगितलें, त्यांतला एक तारीख १९ फेब्रुवारीचा व दुसरा ३० मार्चचा. त्या दोहोंत मिळून सर्व लहान मोठ्या बाबतींचा मार्मिक विचार केलेला आहे. या कागदांवरून † कित्येक प्रकार निष्पन्न होतात ते असेः—

महादजीला नाना प्रकारची लालूच दाखवून आपल्या बाजूस वळवावा आणि नानास हलका करावा, हा इंग्रजांचा प्रयत्न वडगांवचे तहापासून सारखा पांच सहा वर्षे चालला. प्रथमच महादजीस इंग्रजांनीं आपला भडोच परगणा इनाम देऊन मिंधा केलें. इंग्रजांच्या मतें नानाचें कारस्थान अद्यापि

† Parasnis' Gwalior Papers English.

फ्रेंचांकडे चाललें असून, सें० ल्यूबिननें कबूल केलेली भरपूर लष्करी मदत युरोपांतून लवकरच येईल असा भरंवसा नानास वाटत आहे. हा इंग्रजांचा समज सर्वथा चूक होता. स.१७७८च्या जून महिन्यांत ल्यूबिननें पुणें सोडल्या-ल्यापासून मराठी कागदांत फ्रेंचांचा उल्लेख यत्किंचित् कोठें आढळत नाहीं. महादजी मात्र इकडे नानावर व तिकडे इंग्रजांवर उपकार करून स्वतःचा फायदा करून घेत होता. महादजीनें आपल्याकडे संधान लावावें, अशी धड-पड इंग्रजांनीं परभारें पुष्कळ करून पाहिली, परंतु तोही त्यांस शेरास सवा-शेरच भेटला. त्यानें इंग्रजांस आपल्या मनाचा थांग यत्किंचित् लागूं दिला नाहीं; आणि इकडे नानाचें तर आपल्याशिवाय चालूंच नये अशी तजवीज ठेविली. 'शिंद्याच्या कचाट्यांतून सुटण्याची नानाची मोठी इच्छा आहे, पण त्याचा इलाज चालत नाहीं.' असें एक इंग्रज लिहितो. याला तोड म्हणून नानानें आपल्या मुत्सद्दी शहाणपणानें इंग्रजांविरुद्ध वरील कारस्थान उभें केलें आणि फ्रेंचांची युरोपीय मदत न आणतां इंग्रजांस सळो का पळो करून सोडिलें.

हेस्टिंग्सनें मात्र या वेळीं राजकारणाचा योग्य मार्ग पत्करिला नाहीं. त्याच्या कर्तबगारीचा विचार इंग्रज लेखक हल्लींच्या साम्राज्यदृष्टीनें करितात; आणि आपल्या राष्ट्राचा ज्यानें फायदा केला, त्याचे अन्याय सुद्धां त्यांस गुण असे वाटतात. याचें प्रत्यंतर फॉरेस्टनें हेस्टिंग्सचे कागद दोन लठ्ठ भागांत प्रसिद्ध केले आहेत त्यांतील प्रतिपादन वाचावें. पण सर आल्फ्रेड लायल किंवा पी. इ. रॉबर्टस् यांच्यासारख्या समतोल इतिहासज्ञांनीं हेस्टिंग्सवर अभिप्राय दिला आहे तोच आपण ग्राह्य मानला पाहिजे. पृ. १९५ वर रॉबर्टस् म्हणतो—

"या वेळीं कंपनीच्या सर्वच इलाख्यांवर अत्यंत अयोग्य माणसांची नेमणूक होती. स्थूल दृष्टीनें असें म्हणावें लागतें कीं, दक्षिण आणि मध्य हिंदुस्थानांत जितके तद्देशीय सत्ताधीश होते, त्या सर्वांशीं कुरापती काढून युद्धप्रसंग उपस्थित करण्याची जोड त्या वेळच्या गव्हर्नरांनीं संपादिली, त्याचा परिणाम असा झाला कीं स. १७८० त हिंदुस्थानांतील इंग्रजी सत्तेचा पाया सर्वथैव ढांसळला होता."

इंग्रज मराठ्यांचें हें सप्तवार्षिक युद्ध हिंदुस्थानचे इतिहासांत हिंदी राज-कारणाच्या दृष्टीनें अत्यंत महत्त्वाचें गणलें जातें. त्यांत मराठ्यांचें शौर्य व

मुत्सद्देगिरी हे दोनही गुण उत्कटत्वानें निदर्शनास आले. मराठ्यांचा पक्ष न्यायाचा, हक्काचा व नीतीचा होता. अन्याय, अनीति, स्वार्थ वगैरे अनन्वित प्रकार इंग्रजांनींच केले. ही गोष्ट माल्कम वगैरे मार्मिक लेखकांनीं पूर्णपणें मान्य केली आहे. ' कलकत्तेकर, मुंबईकर, मद्रासकर व प्रत्यक्ष इंग्लंडांतील कंपनीचे डायरेक्टर्स यांनीं अत्यंत विसंगत, घोटाळ्याचे व धरसोडीचे इतके कांहीं प्रकार केले कीं, त्यांमुळें सर्व हिंदुस्थानभर इंग्रजांची पत नाहींशी झाली. मद्रासकरांची अनीति तर इतकी कळसास पोंचली होती, कीं तेथलि वातावरणाची दुर्गंधी कैक वर्षे जाचक झाली. '

मुख्य गोष्ट इंग्रजांनीं ठरविली ती ही, कीं सर्व मराठमंडळांत महादजीइतका वजनदार दुसरा कोणी नाहीं; सबब त्यास कधीं दुखवूं नये, त्यास खूष ठेवण्यांतच आपला फायदा आहे. हेंच सूत्र वॉरन हेस्टिंग्सनें सुद्धां अखेरपर्यंत कायम ठेविलें. सालबाईच्या तहांत किंवा उत्तर हिंदुस्थानांतील पुढच्या अनेक भानगडींत महादजीस न दुखविणें हीच इंग्रजांची मुख्य पद्धत होती. अर्थात् नाना व महादजी यांच्या हयातींत इंग्रज पुनः मराठ्यांचे वाटेस गेले नाहींत; हाच या पहिल्या युद्धाचा मुख्य परिणाम होय. इंग्रजांस चांगला बोध त्यांत मिळाला. हॉर्नबी लिहितो, ' ज्याच्या स्नेहापासून आपणास पुष्कळ फायद्याची आशा ठेवतां येईल आणि ज्याच्या द्वेषामुळें आपलें अत्यंत नुकसान होण्याचा संभव आहे, अशी व्यक्ति निःसंशय महादजी सिंदेच होय.' पण गॉडर्डचें मत अगदीं याचे उलट होतें. तो लिहितो, ' महादजी फौजबंद आहे, पैसेवाला आहे, उत्कृष्ट प्रदेशाचा मालक आहे, तेव्हां त्यास फोडून त्याच्याशीं स्वतंत्र तह करण्याची आपण गोष्ट सुद्धां मनांत आणूं नये. त्यास लढूनच आपण जिंकिलें पाहिजे, आणि तह करणें असेल तर तो नानाशींच करावा. या मतास अनुसरून गॉडर्डनें महादजीशीं तहाची वाटाघाट बिलकूल न करितां, नानाशींच काय ती केली. रघुनाथरावास सुद्धां महादजीचा भरंवसा नव्हता.

ता. २८-९-१७७९ चें हेस्टिंग्सचें पत्र पुण्यास पेशव्यास आलें तें असें: ' आपलीं पत्रें पोंचलीं. आपल्याशीं कायम स्नेह जोडण्याची आमची इच्छा असून ज० गॉडर्ड यांजकडे पूर्ण अधिकार देऊन तह ठरविण्याचें काम सोंपलें

आहे. हे गृहस्थ ज्या अटी सुचवितील त्यांपासून उभयतांसही फायदाच होईल, अशी मला खात्री आहे.' (प. कॅ.)

मराठ्यांशीं नवीन तह ठरविण्याचें काम हेस्टिंग्सनें गॉडर्डकडे सोंपविलें होतें. पुरंदरचा तह कायम करून त्याशिवाय फक्त फ्रेंचांशीं मराठ्यांनीं बिलकूल संबंध ठेवूं नये, असें स्पष्ट कलम ठरवावें आणि हें नाना कबूल करील तर तह ठरवावा, अशी गॉडर्डास ताकीद होती. असा तह न जुळेल तर मग गुजरातेंत गायकवाडाशीं स्वतंत्र तह करून पुनः युद्ध चालू करावें, अशी प्रथम इंग्रजांची मसलत ठरली. जूनपासून ऑक्टोबरपर्यंत गॉडर्ड, व नाना आणि महादजी यांजमध्यें ही तहाची वाटाघाट चालली. इतक्यांत दादा पळून गेला, त्याला गॉडर्डानें आश्रय देऊन दरमहा पन्नास हजार रुपये खर्चास नेमून दिले, त्यामुळें पुनः पूर्वस्थिति उत्पन्न झाली, आणि तहाचें बोलणें मागें पडलें. दादा हातचा गेला, महादजी नेट धरीना, तेव्हांच नानास नवीन कारस्थानाचा मोठा व्यूह रचावा लागला. नानानें गॉडर्डास निक्षून कळविलें कीं 'प्रथम दादा व साष्टी आमचे हवालीं करा आणि मग तहाचें काय तें बोला.' या वेळीं लाला निहालचंद व लक्ष्मण गोविंद चिटणीस नानाकडून सुरतेस गॉडर्डशीं बोलणें करण्यास गेले होते. नानानें त्यास साफ कळविलें, कीं 'दादा आणि साष्टी हवालीं केल्याशिवाय आमच्याशीं सलूख करण्याची गोष्ट बिलकूल बोलूं नका.' गॉडर्डची सुद्धां खात्री झाली होती, कीं एकंदर मराठी राज्यांत दादास काडी-इतका मान कोणी देत नाहीं, व त्याचे हातून कांहीं सुद्धां सत्कृत्य होणें शक्य नाहीं. असल्या इसमाशीं बिलकूल संबंध ठेवूं नये अशीच गॉडर्डची इच्छा होती, पण इतक्या दिवसांचा दोस्त आश्रयास आला, त्यास काढून लावणें गॉडर्डच्या जिवावर आलें. लक्ष्मणरावाबरोबर नानानें बोलणें करावयाच्या तहाच्या अटी म्हणजे तालीमनामा लिहून पाठविला तो ऐ. टि. ६-४३ व इ. ऐ. वि. वि. खं. १ पृ. ३२९ येथें दिला आहे.

नानाच्या या अटींस पुढें काय जबाब द्यावा हें ठरविण्याकरितां गॉडर्ड सुरतेहून निघून मुंबईस ता. १-११ रोजीं पोंचला. तेथें त्यानें सर्व वाटाघाट करून युद्धाचीच तयारी केली. उत्तरेकडून त्यानें ग्वाल्हेर गोहदवर मोहीम ठरविली; मद्रासकडील आरमारी फौज माहे बंदरावर आली होती ती मुंबईस मागविली; परत सुरतेस जाऊन त्यानें नानाचे वकिलांस (डिसेंबरांत) रजा

दिली आणि नूतन वर्षारंभीं सुरतेहून मोहीम सुरू केली. सखारामबापू व मोरोबा ठिकाणीं बसल्यामुळें एकट्या नानाशींच इंग्रजांस बोलणें करावें लागलें; आणि नानाच्याच हातांत संपूर्ण सूत्रें गेलीं, याबद्दल इंग्रज चडफडूं लागले; आणि महादजीनेंही त्यांस दाद दिली नाहीं, तेव्हां नाइलाजानें त्यांस महादजींचे मुलखावरही उत्तरेंत स्वारी करावी लागली. नाना लिहितो—

'बोलणें करण्यास मातबर इसम पाठवावा म्हणून इंग्रजांनीं लिहिलें होतें, त्यावरून लक्ष्मणराव चिटणीस सुरतेस पाठविले. त्यांचें व इंग्रजांचें बोलणें चार महिने झालें. दादासाहेबांस द्यावें व साष्टी द्यावी हें त्यांच्या मनांत नाहीं. मगरूरीच्या गोष्टी. बाहेर गोड बोलावें, आंतून लढाईचें सामान करावें. तेव्हां पारिपत्य करणें जरूर. इंग्रजांनीं चहूं दिशेस आकर्षण केलें आहे. याकरितां निजामअलीनीं सिकाकोल राजबंदरीं इंग्रजांचें पारिपत्य करावें. भोसल्यांनीं भारी फौजेनें बंगाला मारावा. हैदर नाइकांनीं चेनापट्टणवर स्वारी करावी, आणि सरकारांनीं सुरतअमदाबादेकडे बंदोबस्त करावा, असा निश्चय ठरला. त्यावरून भोसले बंगाल्यांत जात आहेत. सिंदे होळकरही सुरतेकडे जात आहेत.' (ता. ४-१-१७८०, भा. व. १ प. या. ३; व भा. व. २ प. या. ५५, ६५, ६७ व १४७.)

गॉडर्डच्या हालचालीसंबंधानें मराठी कागदांत खालील उल्लेख आहेत. "दक्षिणच्या रियासतींचा एका जाला ही कैफियत गॉडर्डास सुरतेस मालूम होतांच मसलत भारी पडली. अडचण निवारण करण्यासाठीं मुंबईस आले. तेथें सर्वांचें कौन्सिल होऊन कलकत्त्यास पत्रें गेलीं. 'ठराव केला कीं, प्रथम गुजरात घेऊन मग वसई हस्तगत करावी. त्याविना पुणेकर बधणार नाहींत. फत्तेसिंगाकडे सलूखा ठेवावा. मुंबईहून चारपांच हजार सरंजाम रवाना होत आहे. बारभाईशीं सलूख करावा तर आपणांस लांछन. दोन सालें विकत खाऊन खराब झालों. शिवाय श्रीमंतांस पैका खर्चास द्यावा लागतो. तूर्त गुजरात प्रांतीं जावें, अमदाबाद जागा बसण्यास करावी, पुढें फत्तेसिंगास तंबी द्यावी; ममतेंत घेऊन पैकाही तूर्त त्यांजकडून घ्यावा.' असें ठरवून ता. २ डिसेंबर रोजीं गॉडर्ड मुंबईहून माहिमास गेला. तेथून बंदरबोटींतून वेसाव्यास जाऊन डुमस बंदरास उतरेल. मद्रासचीं पलटणें सुरतेच्या मदतीस येणार आहेत. ठिकठिकाणीं दारूखाने जमवीत आहेत. दादासाहेबांस समागमें घेत नाहींत,

अमृतरावास घेणार. भडोचेहून डभईस जाऊन तेथें जागा कायम करावी, गायकवाडास न जमे तर तेथून अमदाबादेस जावें. अद्याप मराठ्यांची फौज गुजरातेंत येत नाहीं, याबद्दल टोपीवाल्यांस आश्चर्य वाटतें. अंकलेश्वरचा मार्ग नीट करावयास लागले आहेत. परंतु इंग्रज फौज फार दिक्क आहे. या वेळीं सरकारची फौज असती तर दबाब मोठा पडता. पुण्याचे वकील लक्ष्मणराव चिटणीस यांचे हवेलीस इंग्रजांकडील चौकी बसली, कीं हे बातमी पुण्यास लिहितात. पुण्याहून कोणी गृहस्थ गुप्त सुरतेंत येऊन श्रीमंतांची भेट घेतली." गुजरातेंत सिंदे होळकर लगोलग जात आहेत असें नानानें हैदरास याच वेळीं कळविलें. गणेश विश्वनाथ बेहेरे इंग्रजांच्या पाठीवर गुजरातेंत होता, तो व अंमदाबादचीं पलटणें इंग्रजांस अडविण्याकरितां नर्मदेकडे आलीं. तों इकडून बाजीराव बर्वे, सटवोजी भोसले, गुलजारखान मिळोन सुरतेहून बडोद्यास चालले. 'त्यांची यांची गांठ अंकलेश्वरावर पडली. पण मुकाबला झाला नाहीं. दुर्गोजी भापकर पेशव्यांचे तर्फेनें उगाच उतावळी करून डोंगर किनाऱ्यानें बांसदा पावेतों गेले. इकडील पैरवीस दिरंग नसावा,' असें बेहेऱ्यानें नानास कळविलें. दादानेंही या वेळीं सुरतेहून लढाईची सिद्धता जोरानें करून, शिवाय मणियार पारशी व हणमंतराव या दोन वकिलांस इंग्लंडास पाठवून तिकडूनही लष्करी मदत खुद्द बादशाहाची मागविली. हे दोन वकील आरबस्तानांतील जिद्दा बंदरांतून पुढें जावयाचे होते. १२-२२९-२३४ हे वकील पुढें दोन वर्षांनीं हात हालवीत परत आले. एडमंड बर्कनें त्यांची बर्दास्त ठेवून, इकडून फौजेची मदत मिळणें शक्य नाहीं, अशा जबाबानिशीं त्यांस परत पाठविलें. त्यासंबंधाचें बर्कचें दादास आलेलें पत्र प्रसिद्ध आहे. (का. सं. प. या. ४६९; खंड १२-२२९-२३४.)

**३. महादजीचा रुसवा** (ऑक्टो० १७७९-जाने० १७८०).—चहूंबाजूंनीं लढाईची सिद्धता होते, तोंच नाना आणि महादजी यांजमध्यें स. १७७९ च्या दसऱ्याच्या सुमारास बेबनाव उत्पन्न झाला, तो पुढें तीन चार महिने अत्यंत विकोपास जाऊन इंग्रजांवर स्वारी करण्याचा सोन्यासारखा काळ फुकट गेला. दसऱ्यासच सरदार बाहेर पडावे अशी नानाची टोंचणी असतां जवळ जवळ माघापर्यंत त्यांचें पाऊल निघालें नाहीं. हे पांच महिने गॉडर्डास फार फायदेशीर झाले. त्यानें स्वतः मुंबईस जाऊन व कलकत्त्यास सर्व प्रकार लिहून

पुढील उद्योगाचा बेत निश्चित केला; आणि तह बनला नाहीं, तेव्हां स.१७८० च्या प्रथम दिवशीं गुजरात जिंकण्याची मोहीम त्वरेनें सुरू केली. फेब्रुवारींत सिंदे होळकर गुजरातेंत इंग्रजांवर चालून गेले, ते स्वतः रक्त राऊत घोड्यावर अशा तऱ्हेनेंच गेले. नाना महादजींच्या या रुसव्याचें कारण स. १७७९ च्या ऑगस्टांत गॉडर्ड येणेंप्रमाणें लिहितो. 'महादजी व नाना यांजमध्यें हल्लीं मोठी तेढ उत्पन्न झाली आहे, त्याचें कारण महादजीचा वकील असें सांगतो कीं, नानास दादा आपल्या स्वतःच्या कबजांत पाहिजे होता, तो महादजीनें दिला नाहीं, आणि उलट त्यास आपल्या हातांतून निसटून जाऊं दिलें. शिवाय मला हें द्या, मला तें द्या, अशा महादजीच्या मागण्या नानाच्या मागें सारख्या चालू आहेत; नानानें महादजीस कैकवार पुण्यास बोलावलें, पण तो गेला नाहीं.' दुसरें एक कारण असें दिसतें, कीं नानानें हरिपंतास जवळ केलें, त्याशिवाय नानाचें पान हालेना, ही गोष्ट महादजीस दुःसह वाटूं लागली. राज्यांत अलीकडे मोठमोठीं कामें महादजीनें लष्करी बळावर व अंगच्या इभ्रतीवर उलगडून नानाचा जम चांगला बसवून दिला. महादजीनें नानाचा पाठपुरावा केला नसता तर सवाई माधवरावाची धडगत नव्हती. महादजी स्वतः धूर्त व महत्त्वाकांक्षी होता. केवळ नानाच्या हुकमानें पाणी पिऊन राहणें त्यास खपेना. आपण पेशव्यांचे पुरातन सरदार, त्यांच्या दौलतीचे आधारस्तंभ, असें असतां, नाना फडणीस लहान मोठ्या कामांत आपणांवर हुकमत गाजविणार कोण ? आपल्या लष्करी साह्याशिवाय नानाचें क्षणभर चालणार नाहीं; मग कारभार तरी नानानें आपल्या साह्यानें कां न करावा ? उलट नानानें हरिपंत आपल्या मदतीस घेतला, याचा अर्थ असा कीं पुढें मागें जरूर पडल्यास हरिपंताच्या लष्करी बळावर आपण कारभार पाहिजे तसा निभावूं, महादजीची एवढी पर्वा ठेवण्याचें आपणास प्रयोजन नाहीं, असा नानाचा भाव उघड झाला. याचें प्रत्यंतर इतकेंच कीं हरिपंत कारभारांत नसावा, अशी उघड मागणी महादजीनें नानाकडे केली. नानानें अर्थातच ती मान्य केली नाहीं. त्यामुळें महादजी सुद्धां जांबगांव सोडून मोहीमेवर जाईना; तेणेंकरून एकंदर राज्याच्या कारभारांत चार महिने मोठा घोळ पडला. लष्करी सत्ता प्रमुख कीं दिवाणी सत्ता प्रमुख, हा जो राजकारणांतला नेहमींचा मोठा

वाद अद्यापि प्रसंगानुसार प्रत्येक देशांत रंगास चढतो, तोच वाद पर्यायानें त्या वेळीं मराठमंडळांत उपस्थित झाला. आम्ही जर राज्याची कामगिरी उठवणार, तर त्याच्या कारभारांत आपला हात पाहिजे, हें महादजीचें म्हणणें; उलट पक्षीं, नानाचें म्हणणें कीं लष्करी सरदारांनीं कारभाऱ्यांचे हुकूम बिनतक्रार उठवावे, त्यांस आपण हुकूम करूं त्याप्रमाणें लगोलग त्यांनीं मोहिमेस जावें. वास्तविक उभयतांचीं प्रत्युत्तरें काय झालीं तीं सर्व आज आपणांस उपलब्ध नाहींत. बारभाईचें मंडळ व्यवस्थित करावें, सर्वांच्या साह्यानें कारभार चालावा, एकट्या नानानें सर्व मराठशाहीवर संपूर्ण हुकमत गाजवूं नये, असा स्पष्ट आग्रह महादजीनें धरला होता कीं काय, हें समजण्यास मार्ग नाहीं. पण नानानें हा पेंच ओळखून कारभारांत महादजीस घेण्याचा उपक्रम केलेला दिसत नाहीं. शाहूच्या मृत्यूनें राजसत्ता पेशव्यांचे हातीं आली, त्यावेळीं जुने सरदार पेशव्यांची हुकमत पाळण्याची टाळाटाळ करूं लागले, त्यांतून दोन चतुर पेशव्यांच्या कर्तबगारीनें राज्याचा बचाव झाला, पण त्या वेळीं सुद्धां जानोजी भोसल्यास छत्रपति करून राज्याची हुकमत पहिल्यासारखी करण्याचा प्रयत्न झालाच. त्यानंतर रामराजाचे अंतसमयीं पुनः छत्रपतींची सत्ता प्रस्थापित करण्याचा उद्देश पुष्कळांचे मनांत होता, पण तो सिद्धीस गेला नाहीं. या गोष्टी नानाचे डोळ्यांसमोर घडत होत्या. आपण पेशव्यांची ताबेदारी वाटेल तशी करूं, ते आमचे मालक आहेत; पण नाना म्हणजे एक मुख्य कारकून, हा आपणावर हुकमत गाजवणार कोण, अशा प्रकारची सरदारांची भावना होती. तिला तोंड म्हणून नानानें या वेळीं बारभाईचेंच मंडळ भक्कम पायावर स्थापिलें पाहिजे होतें. त्यानें सिंदे होळकरांस स्पष्ट सांगितलें पाहिजे होतें कीं, तुमच्या मनांत कारभार करणें आहे तर खुशाल या आणि करा, मी बाजूस होतों, किंवा तुम्ही जी कारभारी मंडळाची रचना ठरवाल ती मी मान्य करितों. पण अशा आशयाची कोणतीच योजना नानानें पुढें आणली नाहीं, कीं या प्रश्नाचा उघड खल केला नाहीं.

महादजी जांबगांवास होता. तेथून त्यानें नानास कळविलें, 'हरिपंत तुम्हांजवळ आहेत ते नसावे, आमचें त्यांचें ठीक नाहीं. ते तुम्हांस मनस्वी शिकवितात, यास्तव त्यांनीं घरीं बसावें; तरच तुमचा आमचा स्नेह चालेल, म्हणजे मी गुजरातच्या स्वारीस आज निघून जातों. गुदस्तां झांशी प्रांतीं

भांडेर तालुका पांच लक्षांचा आम्हांस देण्याचें ठरलें होतें. दादासाहेबांचा कारभार बिघडला, त्यापक्षीं तो तालुका देत नाहीं असें नानांनीं कळविलें, त्यासाठीं रुसवा. शिंद्यांचें म्हणणें आम्ही दादांचा जिम्मा कबूल केला, फौज ठेवावी लागणार, खर्चास पाहिजे. तरी तो तालुका अवश्य द्यावा, अशीं बोलणीं होऊन तालुका देण्याचें नानानें कबूल केलें, पण त्यास अशी अट घातली, कीं चिंतो विठ्ठल व सदाशिव रामचंद्र तुम्हांजवळ आहेत, ते आमच्या हवालीं करावे, तुम्हीं निघून सुरतेच्या सुमारें जावें, तेव्हांच तालुक्याच्या सनदा पाठवून देऊं. हरिपंतास काढण्याचें तर नांव सुद्धां घेऊं नये. तें आम्ही बिलकूल मान्य करणार नाहीं.' असें नारो शिवदेव पोंक्षे याजबरोबर नानानें सांगून पाठविलें. हें प्रकरण फारच चिडीस गेलें आणि सिंद्याच्या लष्करांत आवई सुद्धां पडली कीं, पुण्याहून हरिपंत व परशुरामभाऊ फौज घेऊन सिंद्यास लुटावयास येतात. त्यावरून सिंद्यांकडे दोन प्रहरांच जीनबंदी झाली. 'नानाचे मनांत तर असा प्रकार स्वप्नींहि नाहीं. त्यांचा भार सर्व पाटीलबावांवर. अशीं दुश्चिन्हें होऊं लागलीं आहेत, तीं बरीं नाहींत. सिंद्यांचे लष्करांत आवई पडली, तेव्हां त्यांनींही पत्रें पाठवून फौजा जमा केल्या. पुण्यासही फौज चांगली जमविण्यांत आली.' एवंच प्रकरण चांगलेंच हातघाईवर येणार होतें. परंतु उभय पक्षांच्या समजुतीनें तें मिटलें. तूर्त शिंद्यानें हरिपंतास काढण्याचा हट्ट सोडावा, आणि नानानें त्यास बुंदेलखंडांत जहागीर द्यावी अशी तडजोड झाली. या संबंधाचा एकंदर पत्रव्यवहार फार मजेदार आहे, त्यावरून सरदारांचे रुसवे समजून येतात.

जांबगांवचा बातमीदार नानास ता. ३० ऑक्टोबर रोजीं लिहितो, 'आपली आज्ञा घेऊन स्वार जालों, तों आजपर्यंत जांबगांवीं वीस रोज लष्करांत होतों. महादजी व तुकोजी हे उभयतां एक विचार होऊन चिंतो विठ्ठल, सदाशिव रामचंद्र, महादेव गोगटा व नारो गोपाळ दि॥ आबाजी महादेव यांचीं खलबतें नित्य होतात. त्यांत मजकूर हाच कीं उभयतां सरदारांनीं पुण्याचे मुक्कामीं जाऊन आपल्यास व हरिपंतास दगा करावा. हा निश्चय येथें जाला आहे, त्यास हे पुण्यास आलीया आपण बहुत सावध असावें. यांचा इतबार एकरूप न करावा. खलबतास बोलावून दगा करावा हें यांचें मानस आहे. त्यास यांशीं आतां जें खलबत करणें

तें आपल्या मजबुदीनें करावें. देवाजीपंत निसबत भोसले यांचे विद्यमानें आंगरेजांचा सलूख होतो. म्हणून यांस बहुत कठिण आहे, कीं आमचे हातीं कांहीं संधान राहिलें नाहीं, नाना जैसें बोलेल तैसें करून, हे चार पांचजण सिंदे यांजपाशीं आहेत त्यांस हस्तगत करून घ्यावें, मग फितूर मोडलासा होईल. नाना, मीं गरीब, मी हें लिहूं नये. परंतु मी आपले पदरचा, मला दुसरा उपाय नाहीं. सर्व माझी लज्जा आपल्यास आहे. श्रीमंत एक होऊन मज गरीबावर आरोप न ये तें करावें.'

या बातमींत तथ्य इतकेंच दिसतें कीं, चिंतो विठ्ठल वगैरे दादाची मंडळी महादजीजवळ बसून त्याचा सारखा बुद्धिभेद करी, त्यामुळें महादजी स्वारीवर जाण्यास दिरंगाई करतो, सबब त्या लोकांस एकदम छापा घालून हस्तगत करावें, असा कदाचित् नाना व हरिपंत यांचा विचार असेल. परंतु पुरंदरावर छापा घालून नानास पकडावें, असा विचार कोणाचे मनांत आला असला तरी, महादजीचे मनांत कधींच नव्हता. महादजी फार खोल मनुष्य. अशा गोष्टी तोंडानें बोलणारा नव्हे. देवाजीपंतामार्फत इंग्रजांशींच तडजोड करण्याचा नानाचा घाट होता तो बरोबर आहे. या वेळीं नानाचा सरकारी हुजऱ्या गंगाजी आव्हाड व त्याचा भरंवशाचा वकील नारो शिवदेव हे दोघेही चांगले हुशार असून पुढील दहा पांच वर्षांत त्यांचा उल्लेख कागदोपत्रीं वारंवार येतो. 'हे राजकारणी मनुष्य सर्व कामांचा बंदोबस्त करतील,' असा त्यांजबद्दल एका लेखकाचा अभिप्राय आहे. त्यांनीं हें प्रकरण मिटविलें.$

समक्ष बोलून शंका भागविण्याऐवजीं एकमेकांच्या गुप्त बातम्या हलकट माणसांमार्फत काढण्यांत त्या वेळचे पुढारी कसे निमग्न असत, याचा मासला या वेळच्या भानगडींत पाहवयास मिळतो. नानास पकडण्याचा महादजी बेत करतो, अशी बातमी वर एका पत्रांत लिहिली, तर त्याचे उलट नानाचे वर्त्तींतून महादजीस निराळीच बातमी आली. नानाचे हुशार वकील सदाशिव दिनकर व नारो शिवदेव हे दोन गृहस्थ महादजीच्या पत्रव्यवहारांत विशेष ध्यानांत ठेविले पाहिजेत. ती बातमी अशी.

'आज दोनप्रहरीं पुण्याहून रा० बावांस पत्र आलें, त्यांत मजकूर जे, हरिपंततात्या व परशुरामभाऊ यांनीं मनसबा केला कीं शिंदे फार ओढितात,

$ भा. व. २ प. या. ४० व ग्वा. ४-९३. व खरे २५१६.

काय चिंता आहे, पाहून घेतों. असें पत्र आलें, त्यावरून बावांची मर्जी फारच विक्षेपास पावली. कल्पना चालली जे, दिवाकर पंतांसीं पूर्वी (नानांनीं) मनसबा केलाच आहे, त्या अन्वयें उंदरीवर $ भोसल्यांचे फौजेचा जथ पाडिला आहे. नबाबाची फौज दहा हजार औरंगाबादचे रखवालीचें निमित्त करून गंगथडीस येत आहे. हुजरात बारा पंधरा हजार पुण्यास जमा झाली. इतका जथ पाडिला, तेव्हां पत्राचा मजकूर खरा. हे आम्हास पाहून घेतात तर मी काय कुणबी लागलों आहे कीं काय! बरें. पाहून घेतात, चिंता नाहीं. गुजरातेंत रवानगी करण्यास फौज जमा होतच आहे, त्वरा करून आणवावी. पागा आणविल्याच. उभयतां मनसब करून आम्हांवर येतात, त्यापक्षीं आपणच पुढें व्हावें. उभयतांची गांठ वाटेस पडली, उत्तम; न पडे तर जाऊन श्रीमंतांचे पायांवर डोई ठेवून, बंधूंस रामराम करून निघोन यात्रेस जावें. याउपर यांजवळ राहणें ठीक नाहीं, असा विचार जाला. पत्र कोणाचें आलें त्याचा शोध केला, नांव घेतलें नाहीं. म्हणतात कीं चौकशी करतील तर पत्रच आहे. अंगीं लावून देतों. लिहिणारावर नाना रुष्ट होतील तर त्याचें चालवावयास मजला सामर्थ्य आहे. रुजुवात करावयास चिंता नाहीं. अशा कल्पना होऊन फौज व पागा जमा करावयाची ताकीद जाली. हें वर्तमान मीं न लिहावें, परंतु नाशास गोष्ट आली असतां कसें न लिहावें? आधीं हें वर्तमान लिहावयास परवानगीच नव्हती. मागाहून परवानगी झाली. स्वामी येणार असा बावांजवळ निश्चय झालाच होता, त्यावरून आपले येण्यापावेतों सबुरी आहे. या मागेंच संशय दूर व्हावयाचे नव्हते. गंगाजी आल्यावर संशय तुटला होता. आतां कोणाच्यानें कांहीं होत नाहीं. लाचार. श्रु० हो० हे, विज्ञापना.' नाना जांबगांवास सिंद्याचे भेटीस जाणार असा उल्लेख यांत आहे. याच तारखेचें गंगाजी आव्हाडाचें नानास पत्र. 'येथील मजकूर आज दोन प्रहरां जाला तो दाजींनीं (सदाशिव दिनकरांनीं) लिहिलाच आहे. आम्ही तेथून आल्यावर इकडील संशय कांहीं दूर केले. पुढेंही तेंच चालविणार, तों आज कोणत्या गृहस्थाचें पत्र आलें त्यांत बजिन्नस खोलून लिहिलें आहे. हे बोलतात, श्रीमंतांचे ठायीं दुसरा

---

$ वऱ्हाडांत नागपुर--खानदेश रस्त्यावर बुलढाण्याचे पूर्वेस ५० मैल.

अर्थ धरावयाचा नाहीं. आम्हीच रामराम करावयास पुण्यास जातों; पण न कळे, पुण्यास गेल्यावर श्रीमंताचे गादीस व भावास अभाव होईल. याज-करितां पुण्यास न जातां, कारभारी पुढें येणार त्यांसच सामोरा जाऊन रामराम करून देवास ( तुळजापुरास ) जावें. या अर्थें आज झाडून पागा शिलेदारांस पत्रें गेलीं. मी मोठी शिकस्त करून आपण येथें येतात तावत्काळ सबुरी करावी म्हणून विनंति केली. शेवटास गोष्ट येऊं म्हणते. विना श्रीमंत येथें आल्याखेरीज हा संशय दूर होत नाहीं. फौज तों जमा करतातच. श्रीमंतांचे येण्याविशीं इकडील कांहीं अभाव चित्तांत येईल तर त्याची खातरजमा आम्हीं पाहिजे तशी करूं. इकडून ( सिंद्यांचे मनांत ) श्रीमंतांचे ठायीं भाऊ-पणांत दुसरा अर्थ तिलतुल्य नाहीं.' म्हणजे सिंद्यांचे मनांत नानाविषयीं बिल-कूल कपट नाहीं अशी खात्री नानाचाच मनुष्य करीत आहे. ( भा. व. २ प. या. ६२; ए. स्फु. ले. ४-१४ ).

**४. नानामहादजींमधील लढ्याचे मुद्दे.**—या वेळीं नाना महादजींचे दरम्यान वादाचे विषय काय होते त्याचाही निर्देश एका लांबलचक पत्रांत आहे. जांबगांवाहून आपाजीराम दाभोळकर सिंद्याचा कारभारी डिसेंबर १७७९ त नानास लिहितो. 'आज्ञा घेऊन निघते समयीं पाटीलबावांशीं बोलावयाचीं कलमें सांगितलीं होतीं, त्यांतला मजकूर सदाशिव दिनकरांस सांगून खाशांची गांठ घेतली. संशयाचें मूळ वगैरे भाव निखालसपणें बोलावे येविशीं फार आग्रह केला. त्याजवर बोलणें झालें त्यांतील मजकूर. प्रश्न कारकुनाचा व उत्तरें महादजीचीं.

१. अलीकडे संशय पडले याचें कारण काय! उ० आम्हांकडे चाकरीचा प्रकार. फौज नेमून देतील त्याप्रमाणें चाकरी करावी. अखत्यारीमुळें फौज आधिक उणी ठेवावी, आणि पेंचांत येऊन घोर करीत बसावें तें कामाचें नाहीं. ऐसें कित्येक वांकडें बोलणें जालें. संशयाचीं कारणें पुसतां तर ऐका. तोतयाची वगैरे कामगिरी केली तरी नानाची पुरती निखालसता जाली नव्हती. इंग्रजांची लढाई होऊन बापूसंबंधीं काम जाहल्यानंतर आम्हांविशीं संशय गेला. पुनः संशयास कारण दादा निघोन गेले. त्यासंबंधानें नबाबाचीं पत्रें आलीं व लोकांचें सांगणें, असे तीन प्रकार एके जागां जाहले. त्याची छान न होतां विकल्प वाढले. इंग्रजांची

मसलत आम्हांकडे, सलूख जाहला आमच्या विद्यमानें. पहिल्यानें मुंबईस वकील गेले ते एक सरकारचा व एक आम्हांकडील असे गेले. पुढें सुरतेस ( गॉडर्डकडे ) वकील गेले. तेव्हां आमचा वकील सरकारचे वकिलाबरोबर नसावा असें जाहलें. तेव्हां संशय जाहला कीं नाहीं ! ( म्हणजे इंग्रजांशीं बोलणें करण्यांत महादजीची मध्यस्थी ठेवावयाची नाहीं असा नानाचा प्रयत्न सुरू जाहला कीं नाहीं ? )

२. मसलतीमुळें खर्च जाहला, तो सरकारांतून चालवावा म्हटलें. त्यावर सरकारांत ऐवज नाहीं असा जाबसाल जाला. तेव्हां पेचाची गोष्ट आम्हांकडे आणावी असें जाहलें कीं नाहीं ?

३. होळकरांची बातमी राखोन आम्ही खबरदारीस चुकत नाहीं, परंतु ईश्वर इच्छा प्रमाण.

४. भांडेरीच्या मामल्याविशीं बोललों. भांडेर दिल्यास झांशीचा खर्च कसा निभावेल! त्यावर उत्तर जालें जे, दादांची मसलत संपली नाहीं. इंगळे खंडेराव हरि यांजकडे फौजेचा भरणा केला आहे, त्याचे उपयोगास भांडेर पाहिजे. नानांचें मानस असेल तें खरें.

५. अशीरगड आम्हांस दिल्यास दोन तीन वर्षे जाहलीं. अद्यापि हस्तगत न होय. तेव्हां चित्तांत संशय कोणाच्या आहे ?

६. आम्ही सरकारचे कामांत पडत नाहीं. तत्राप नानांचा व आमचा भाऊपणा, यामुळें एखादा आम्हांकडे येतो. त्याजला बोलोन आकसांत धरितात. तेव्हां संशयाचें घर जाहलें कीं नाहीं ?'

७. आमचीं कामें नानांनीं स्वतः पाहवीं. ती चाल मोडून कारभाऱ्यांजवळ बोला म्हणतात. त्यामुळें तर्ककुतर्क वाढून बाजार होतो, तेव्हां संशयामुळेंच असें घडतें कीं नाहीं !

८. आम्हाकडून चाकरींत अंतराय म्हणावा तर बाजीरावांचा पुत्र दादा वचनें करून धरून आणिला, ते मसलत बिघडली. दुसरें, एखादे वेळेस रागांत अधिक उणें बोलतों. आम्ही गैर प्रकार मनांत धरलाच नव्हता. राज्याचें कल्याण व नानाचें कल्याण त्याच गोष्टी केल्या.

९. दादा सुरतेकडे गेले ही बातमी राहुरीचे$ मुक्कामीं (महादजीस) कळली. तेव्हां उरूस केला (=देवास कौल विचारला), ते समयीं दृष्टांत जाला जे, पुढें न जावें. गांठ पडायची नाहीं, देशींच राहवें. त्यावरून संशय वाढला.'¶

१०. भोसल्यांची फौज उंदेरी सुमारें चालून आली, ती आपणावर येते असा संशय महादजीस आला. तर्क वितर्क होत आहेत.

कलम ८ मधील 'बाजीरावाचा पुत्र' असें दादाचें विशेषण महादजीचे तोंडचें ध्यानांत ठेवण्याजोगें आहे. या सरदारांचा ओढा दादाकडे कां, तर ज्या बाजीरावानें आपणास उदयास आणलें त्याचा तो मुलगा. इकडे तो केवळ खुनी असें नाना समजे, परंतु सरदारांची भावना सर्वथा तशी नव्हती. या वेळीं नानानेंही पेंच जाणून निजाम, भोसले, हुजरात वगैरे फौजा जमविल्या, त्यावरून महादजीवर हल्ला करण्याची ही तयारी असा कुतर्क लोकांनीं काढिला. वास्तविक ही सर्व बातमीदारांची लावालावी होती. याशिवाय होळकर व पेशवे यांजमधील हिशेबाचीही कांहीं भानगड चालू होतीच, असें ग्वा. २,२४८ ता. ६-११-१७७९ वरून दिसतें.

वरील कुतर्कांचीं उत्तरें नानानें दिलीं तीं अशीं:—

१. दादांच्या पलायनासंबंधीं नबाबांनीं कांहीं लिहिलें नाहीं व लोकांनीं कांहीं सांगितलें नाहीं. इंग्रजांकडे वकील पाठवावयाचा मजकूर बावांस लिहिला, त्यांनीं पाठवावा म्हणोन लिहिलें, त्याजवरून रवानगी केली. पुढें सिंद्यांकडील कारकून जावा तों इंग्रजांकडील साफ जबाब आला. लक्ष्मणराव चिटणीस तेथें होते ते आणविले. साराच गुंता उरकला.

२. बोलण्यांत आलें तशी याद लिहिली. पुनः याद फिरवून पहिल्याप्रमाणें लिहून देऊं.

३. होळकरांसंबंधानें आम्ही एका गृहस्थासमागमें निरोप सांगून पाठविले, त्याचे अर्थ सांगणारानें भलतेच सांगितले. त्याची रुजुवात गंगाजीचे रुबरू केली.

४. याविशीं नारोपंताजवळ सविस्तर खुलासा झाला आहे.

---

$ नगरचे उ. ३० मैल. ¶ ग्वा. ३-३.

५. अखेरीचा मजकूर संशय यावयाजोगा खरा. परंतु शपथपूर्वक चिठी पाठविली. प्रत्ययास येईल.

६. लोकांचे सांगितल्यावर जाऊं नये. सरकार किफायतीचीं वाजवी कामें हजारों सांगोन पाठवावीं. आम्हीं तीं करावीं हीच इच्छा.

७. आम्हीं चाल मोडली नाहीं कीं नवी केली नाहीं. गैरवाजवी ज्याचें काम असतें, त्याचे मनाजोगें जालें नाहीं म्हणजे तो भलतेंच लिहितो. वरकड गुंता पडला नाहीं व पडायचा नाहीं.

८. दादा गेला ही चूक आम्ही मोजीत नाहीं. सर्व प्रकारें बंदोबस्त करून इमानावर विश्वास ठेविला. दगाबाजी केली. चिंता काय! दगा-बाजीचा मनसुबा शेवटास जात नाहीं. उद्यां धरून आणूं. मुळांतच नाहीं त्याची कल्पना मनांत कशास आणावी! लबाड सांगतात त्याजवर जाऊं नये. आम्ही जन्माचा भाऊपणा मेळविला, तेथें अशा कल्पना कशा येतील!

९. तेव्हां राहणें बरसातीकरितां ठीकच होतें, परंतु आतां गेल्याखेरीज मसलत होणार नाहीं.

१०. सिंद्यांचे चांगले लौकिकाचा मनसुबा लिहितों हा कसा ध्यानांत येत नाहीं? पाटीलबावा पुरःसर होऊन मोगल, भोसले, हैदरनाईक यांसीं बोलून मनसुब्याची अंगेजणी केली, त्याच कार्यभागापैकीं दहा हजार फौज फत्तेसिंगाकडे पाठवून इंग्रजांस ताण बसवावा. सर्वांचे डोळे पाटीलबावांकडे. ते स्वारीवर गेले म्हणजे बाकीचे सर्व कामास लागतील. याजकरितां पै दर पै लिहीत गेलों. यांत वांकडेपणाची जात कोठें राहिली!

एकूण दहा कलमें लिहिलीं आहेत. (जानेवारी १७८०, ग्वा. ३. २१).

या युद्धांत कोठेंही शत्रूस तोंड देण्याची बिकट कामगिरी आली कीं त्या वेळीं नाना महादजीस पाचारण करी, त्यामुळें लढण्याचा म्हणजे खर्चाचा व श्रमसाहसाचा मुख्य बोजा महादजीवर पडे, पण मानपानाचे प्रसंगीं मात्र सर्व सरदार व जहागीरदार मीमी म्हणून पुढें येत; अशा स्थितींत सर्वांकडून यथास्थित कामगिरी घ्यावी, एकट्यावरच सर्व भार टाकूं नये, लहान मोठे दौलतींत आहेत, त्या सर्वांनीं श्रम करावे, अशी महादजीची एक तक्रार

नेहमींच चालू होती, त्या संबंधानें नानानें केलेला खुलासा वाचण्यालायक आहे, तो असा. "श्रीमंतांचे घरांत चौघांनीं चोहोंकडे आटोपावें, असें आपलें म्हणणें, तर चौघांचे सरंजाम तरी बराबर कोठें आहेत? एक स्वतः श्रीमंत व सिंदे होळकर अशीं तीन मुख्य प्रकरणें. त्यांत श्रीमंतांचे सरकारचा प्रकार खालीं दर्शविला आहे. त्याहीपेक्षां अधिक होईल तें घडतच आहे. बाकी उभयतां सरदार दोन राहिले, त्यांजकडे राज्यरक्षणाचा भार आहे. श्रीमंतांच्या पदरच्या लहानमोठ्यांनीं श्रमसाहस अर्थें प्राणें करून करावयास कसूर केली नाहीं. स्थूलमानें करून पटवर्धन, रास्ते, शिवाजी विठ्ठल, खंडेराव त्रिंबक ओढेकर व प्रतिनिधि यांशिवाय लहानमोठे यांनीं सात वर्षें तवाईज सोसली. पांडुरंगराव जातीनिशीं पाडाव गेले. वामनराव सरकारकामावरच वारले. परशुरामभाऊंनीं अंगावर कर्जें काढून कामें केलीं तीं परस्परें ऐकलींच असतील. रास्त्यांनीं फौज सुद्धां कर्नाटकांत, गुजरातेंत लढाया मारल्या व छावण्या केल्या. त्यांपासोन सरकारांत पैसाही घेतला. शिवाजी विठ्ठल व खंडेराव त्रिंबक यांची मेहनत पाटीलबावांस माहीत आहेच. भवानरावांनीं कर्जाच्या जरबेंत असतांही चाकरीस गुंता आणिला नाहीं. यांशिवाय लहानमोठ्यांनीं वर्ष दोन वर्षें नव्हे तर सतत सहा वर्षें कुवतीपेक्षां मेहनत केली. दौलतीचे स्तंभ म्हणजे सिंदे होळकर. इमारत थकली तर स्तंभांवर उभी रहाते. पुढेंही भरंवसा यांचाच आहे. 'चौघांनीं चोहोंकडे कंबर बांधून मसलती आटोपाव्या,' याचा अर्थ, श्रीमंत, नबाब, हैदरखान व भोसले असा असेल तर त्याचा उलगडा निराळे पत्रीं केला आहे.' नानाचें हें पत्र मे १७८० त महादजीस गुजरातच्या स्वारींत गेलें. अर्थात् ब्राह्मण व मराठे सर्व सरदार मनापासून संकटसमयीं राज्यासाठीं कष्ट करीत होते, त्यांत कोणी कसूर केली नाहीं, हें नानाचें प्रतिपादन राष्ट्रास भूषणावह आहे. भोसले आपणास अलग समजत, त्यामुळें बराच राष्ट्रघात झाला. (ऐ.टि.३-५).

पण आरंभींच्या चुका सिंदे होळकरांकडेच लागू होतात. त्यांच्या हयगयीमुळें युद्ध दोन वर्षें लांबलें. प्रथम सन १७७४ त त्यांनीं दादास एकदम तंबी दिली नाहीं, म्हणून तो निसटून गुजरातेंत जाऊन पुढील डाव खेळण्यास समर्थ झाला. तसेंच तळेगांवावर तो कबजांत आलेला त्यांनीं नीट बंदोबस्तांत ठेवला नाहीं, म्हणून पुढील संकट ओढवलें. नानाशीं पुण्यांत रुसवा करून

चार महिने सिंदेहोळकर रेंगाळत राहिले, त्या संधीचा उपयोग गॉडर्डनें मात्र भरपूर केला. मुंबईस जाऊन त्यानें युद्धाची व्यवस्था ठरविली आणि फत्तेसिंगास आपल्या बाजूस वळविलें. सरदारांच्या ढिलाईमुळें नानाचे उत्कृष्ट बेत अमलांत आले नाहींत. सिंदे, होळकर व भोसले हे तीन मराठशाहीचे प्रमुख सरदार केवळ स्वार्थ दृष्टीनें आपसांत विरोध करीत, म्हणूनच मराठ्यांचें राज्य खालावलें. नाहीं तर नानानें रचलेलें चौकडीचें कारस्थान सिद्धीस जाऊन इंग्रजांचा या वेळीं पूर्ण उठावा झाला असता. बंगाल प्रांत सुद्धां भोसल्यांस देणें त्यांस भाग पडलें असतें. गॉडर्ड व हेस्टिंग्स यांच्यासारखा कसून मेहनत करणारा एकही इसम मराठ्यांकडे नव्हता. नानाचा वरचष्मा त्यांस दुःसह वाटत होता तर छत्रपतींस बाहेर आणून किंवा बारभाईचें मंडळ नवीन रचून दुसरी कोणती ती राज्योपयोगी व्यवस्था त्यांनीं स्पष्ट बोलून ठरविली पाहिजे होती. पण शाहूच्या मृत्युसमयीं अशी प्रमुख मंडळीची भावना होती, कीं नानासाहेबाशिवाय राज्याचें जोखीम अंगावर घेण्यास दुसरा कोणी समर्थ नाहीं, तशीच याही प्रसंगीं मराठ-मंडळाची पक्की भावना होती कीं नानाफडणिसाशिवाय राज्याचें गाडें चालविणारा दुसरा कोणी नाहीं; तथापि त्याचे हुकूम उठविण्यास मात्र जो तो कांकूं करी. चौकडीचें उत्कृष्ट कारस्थान फिसकटलें, त्यांतच मराठशाहीचा अंत ओढवला.

आतां पुढें मुख्य बनाव दोन. एक गायकवाडाची अव्यवस्था व दुसरी गुजरातेंतलि गॉडर्डची मोहीम. सन १७८० च्या पहिल्याच दिवशीं ही मोहीम त्यानें सुरू केली. हैदर अलीनें इंग्रजांशीं टक्कर देण्यांत काय उद्योग केला, त्याचेही पुष्कळसे कागद मराठींत आहेत, पण त्यांचा संबंध मराठ्यांच्या इतिहासापेक्षां इंग्रजांशीं विशेष येतो.

**५. सातपुड्यांतील बंडावा** ( ऑगष्ट १७७९–डिसेंबर १७८० ), **केसोकृष्ण, गुलजारखान वगैरे,**—पुण्यास इंग्रजांशीं निकरानें युद्ध चालविण्याचे बेत सुरू होते. मुंबई, मद्रास व कलकत्ता येथील समस्त इंग्रजांनीं एकमत करून सर्वत्र चढावाचें धोरण स्वीकारिलें, अशा बातम्या नानास येऊन, पुढील युद्ध निकराचें व लांब मुदतीचें होणार अशी त्यानें अटकळ केली आणि तसेच निकराचे प्रयत्न त्यानें सुरू केले. इकडे दादा व गॉडर्ड

यांनीं शक्य तितक्या तऱ्हेनें पुणेकरांच्या योजना हाणून पाडण्याचा उपक्रम आरंभिला. या संबधानें मराठी कागद इतके विपुल आहेत कीं त्यांची संगति जुळवून कालक्रमानें हकीकती बनविणें अवघड पडतें. दादा हरिबाबाजीस मारून सुरतेस गेला, तेव्हां प्रथम इंग्रजांनीं त्याचा धिक्कारच केला. 'तुम्ही बेइमान, तुमच्या वचनांत दृढता नाहीं. तुमचे नादीं लागून आम्हीं कर्जदार मात्र जाहलों. पेशजी तुम्हांस रुपया दिला, तो वसूल नाहीं. लढाईंत खराबी आमची, तुम्हांजवळ ना फौज ना खर्चास. तुमची सोबत आम्हांस नको.' नंतर मातुश्री आनंदीबाईचीं पत्रें इमान पुरस्सर अमृतरावासह गेलीं, तेव्हां पुढें इंग्रजांची चित्तशुद्धता झाली. (म. द. बा. १-१).

बारभाईंचा उच्छेद करण्याचा दादाचा उद्योग अगदीं आरंभापासूनच चालू होता. नुसते मोठमोठे सत्ताधीश पेशव्यांच्या विरुद्ध उठवूनच तो स्वस्थ बसला नाहीं, तर समस्त मुलुखांत त्यानें अनंत बाजूंनीं दंगा उसळून दिला. विशेषतः पुरंदरचा तह कायम होऊन इंग्रजांचा आधार तुटल्याबरोबर दादानें मुलखांत प्रळय सुरू केला. 'हे दिवस सुगीचे, लोकांचें बारा महिन्याचें अन्न. त्यावर हा घाला. रयतेचा इलाज नाहीं. प्रजा बुडाली. कोळ्यांनीं तर चहूंकडे दंगा केला. पुण्यापासून तीन कोसांवर कोळ्यांचे रोखे आले होते. विसाजी केशव फौज व पायदळ घेऊन व होळकराकडील नारो गणेश असे सन १७७६ च्या उन्हाळ्यांत कोळ्यांवर गेले. पांडुरंगपंत गोडबोले व बापूजीपंत गाडदी सुद्धां जाऊन चोहोंकडून येलगार करून दोनतीनशें कोळी जिवें मारले. कोळ्यांचा बंदोबस्त झाल्यासारखाच आहे.'† पण हा भ्रम होता. कोळ्यांचा दंगा सारखा तीन चार वर्षें चालू राहिला. विशेषतः दादाचा पाडाव तळेगांवावर झाल्यावर तर त्यास ऊतच आला. दादाचे साथीदार मानाजी शिंदे, बाजीराव बर्वे, सटवोजी भोसले, पांढरे व जाधव हे खानदेशच्या उत्तरभागीं येऊन त्याची साथ करूं लागले. म्हणजे झांशीस राहण्याचें ठरवल्यापासूनच दादाचा विचार पलायन करण्याचा असून, त्या धोरणानें त्यानें आपले साथीदार नर्मदेच्या बाजूस अंतस्थ सूचना देऊन जमा केले. जूनच्या सुमारास या सर्व बनावांची खबर नानास लागून त्यानें आपला सरदार दुर्गोजी भापकर यास या

† खरे १८१८.

बंडखोरांवर रवाना केलें. त्यांची लढाई ता. २९-७-१७७९ रोजीं मुल्हेरजवळ सामळें येथें झाली. 'बंडखोरांचा मोड जाला. त्यांचें निशाण घेतलें. कांहीं काबिले पाठीमागें बांधून पळूं लागले. बायका कटारा घेऊन मरावयासी सिद्ध जाल्या. ते समयीं आमचे लोक लुटीस शिरले. अब्रूवर आलीसें जाणून त्यांनीं लढाई जमविली. उपरांत संध्याकाळ होऊन पाऊस आला. थोडक्या सरंजामा-निशीं गेलों म्हणून पेंच पडला. दुसरे दिवशीं ते पहांटे कूच करून घांटाखालीं गेले. त्यांजवळ सरंजाम हजार बाराशें लोक चांगले आहेत. दादासाहेबांजवळ गुलजारखान व केसोकृष्ण दोन हजार पर्यंत जमा जाले आहेत, शिवाय मानाजी वगैरे हें खूळ गेलें तें वेगळें. यांचा बंदोबस्त लवकर जाला पाहिजे.' अशी हकीकत दुर्गोजीनें पुण्यास लिहून कळविली. या पत्रांत दहा पानें केवळ जखमांचीं वर्णनें प्रत्येक इसमाचीं लिहिलेलीं आहेत, त्यांवरून त्या वेळीं लढाईंत घडलेल्या गोष्टींचा संपूर्ण तपशील मराठे सरदारांस सरकाराकडे लिहून पाठवावा लागे, हें उघड होतें. इंग्रजांच्या लढायांचे असे तपशील फॉरेस्टमध्यें आहेत.

बंडाचें हें वर्तमान नानास कळतांच त्यानें विसाजी आप्पाजी आठवले यास तोफांसह खानदेशांत रवाना केलें. होळकराचे पाराजीपंत व भगीरथराव सिंदे, प्रतिनिधीची फौज वगैरे आले. ही सर्व फौज चोपड्याचे बाजूस जमा झाली. तों बंडखोरांचा पुढारी गुलजारखान सातपुड्याचे जंगलांत मोठ्या जमावानिशीं होता, त्यानें पाटलांजवळून खंड घेऊन गांवें लुटलीं. एकदां चोपड्याचे गढीवर गुलजारखानानें छापा घालून कांहीं माणसें मारलीं, (ता. ४-९-१७७९). केसो कृष्ण दातार नगरदेवळाच्या गढींत होता. त्याजवर विसाजीपंत व केसो भिकाजी दातार यांनीं हल्ला केला. पण त्यांत त्यांस यश आलें नाहीं, (२९-९-१७७९). 'ता. २०-८-१७७९ रोजीं गुलजारखानानें नवापुरचें ठाणें लुटून खंडणी घेतली. मागाहून अमृतराव, बाजीराव व आनंदी-बाईही येणार आहेत.' या सर्व किरकोळ बंडाळ्या दादानें मुद्दाम उठविल्या होत्या. पण दादा व गॉडर्ड एकत्र झाल्याबरोबर गुजरातेंतील पेशव्यांचे अंमल-दारांस फार दहशत पडली. अंमदाबादचा अधिकारी ता. २९-११-१७७९ रोजीं लिहितो, 'कपी (इंग्रज) सुरतेस आले. दादासाहेबही आले. त्या दिवसापासून या प्रांतास वेध लागला. बिघाड झाला तर आश्विन शुद्धांत. त्या वेळीं सरकारच्या व सिंदे होळकरांच्या फौजा त्या प्रांतीं येतील. फत्तेसिंग

गायकवाडही उपराळा करतील, म्हणोन पत्रें येत गेलीं. त्यास कार्तिक झाला. चंद्रराव पवार दादासाहेबांचा जमाव घेऊन आला, त्याची आमची लढाई २८ नोव्हेंबर रोजीं पेटलादेजवळ झाली. पवाराची बाजू शेर झाली. या संस्थानास अपाय जाल्यानें गुजरात प्रांतच गेला असें समजावें.' सिंदे होळकर गुजरातेंत वेळेवर जाऊन पोंचले नाहींत म्हणून चंद्रराव पवार बळावला. फत्तेसिंग गायकवाडानें इंग्रजांशीं स्वतंत्र तह केला. सातपुड्यांतील बंडखोरांचा पाडाव करण्यास वर्ष दीड वर्ष लागलें. चंद्रराव पवार हा उदाजी पवाराचा सर्वांत धाकटा मुलगा होय.*

'केसो कृष्ण दातार, राजेबहादरांकडील जंबूसरचा मामलेदार मर्द होता, तो दादासाहेबांकडे मिळाला, आणि खानदेशांत नंदुरबार सुलतानपुर वगैरे मुलखास उपद्रव करून ठाणीं बसवूं लागला. त्याचे बंदोबस्तास हरिपंतानें गणेशपंत बेहेरे यास फौजा, तोफा व गाडदी देऊन पाठविलें.' त्यास गुलजारखान सामील झाला. याचा बंडावा सालबाईचे तहापावेतों चालला. गुलजारखानाचा बाप मीरखान हा थोरले बाजीरावाच्या फौजेंत सरदार असून त्यास चोपडे परगण्यांत पंनास हजारांचा सरंजाम फौजेकरितां दिलेला होता. त्याचा मुलगा गुलजारखान हा दादा नर्मदेवरून स. १७७९ च्या उन्हाळ्यांत पळाला त्यास सामील झाला; तेव्हांपासून पुढें सन १७८२ त दादा ठिकाणीं बसेपर्यंत त्याची बंडाळी सारखी कमीजास्त प्रमाणांत चालू होती. गुलजारखानाचे पारिपत्याची मसलत नानानें लगोलग सुरू केली. विसाजीपंत आठवले, भगीरथराव शिंदे वगैरेंसही त्याजवर चोपड्यास जाण्याचा हुकूम होता. 'त्याजजवळ फौजेचा जमाव भारी, मातबर गांवें बळकावून लुटलीं. २७-८-१७७९ रोजीं प्रहरभर लढाई होऊन खान पळाला. विसाजीपंत बापू त्याचे पाठीवर होताच. खानानें पुष्कळ ब्राह्मणांस मारून कैद करून ठेविलें. केसो कृष्ण लासूरच्या गढींत राहिला. केसो भिकाजी हा पुढें अहिल्याबाईजवळ नानाचा विश्वासू कारकून होता. पुढें गुलजारखान, धारकर खंडेराव पवार व चंद्रराव पवार असे दादाचे साह्यास सुरतेस गेले. दादानें चंद्ररावास डभई हस्तगत करण्यास सांगितलें. पण तिकडे

*ऐ. टि. ३-१९; भा. व. २ प. या. ५४, ५६, ५८, ७०, ८२, ८३, १४७; ख. २५६१,-६९,-७४; म. द. बा. १-२-४२.

पेशव्यांच्या फौजेनें त्याचा पराभव केला, ( १०-११-१७७९ ) तरी त्याचा दंगा चालूच होता. या मंडळीस तुकोजी होळकराचा अंतस्थ पाठिंबा होता.

सन १७८० च्या सुमारास सिंदेहोळकर माळव्यांत गेल्यावर गुलजारखान बीजागडच्या डोंगरांत भिल्लांचा जमाव करून राहिला. त्यानें अहल्याबाईस पत्रें लिहिलीं, कीं 'श्रीमंतांनीं कृपा करून बापरोटी विभागून द्यावी, आणि मजला चाकरी सांगावी.' त्याप्रमाणें बाईनें पुण्यास लिहून पाठाविलें. तें जुळलें नाहीं तेव्हां अहल्याबाईनें त्याजवर फौज पाठविली. आनंदीबाईनें माळव्यांत असतां त्या बाजूच्या समस्त भिल्ल मवाली लोकांस आपलेसें करून ठेविलें होतें. त्यांचा जमाव आतां गुलजारखानाजवळ झाला. त्यास दादाकडून अभयपत्रें आलीं. पुढें त्याजवर नंदुरबारकडून गणेशपंत बेहेरे व उत्तरेकडून अहल्याबाईची फौज चालून आली. सुलतानपुरावर लढाई झाली. त्या ठाण्यास होळकरांचे मोर्चे कित्येक महिने चालले. रनाळें व नंदुरबार येथें गणेशपंतानें ताण दिला. रनाळ्यावर केसोपंताची व गणेशपंताची लढाई होऊन गणेशपंताचा पराभव झाला. त्यास केसोपंतानें रनाळ्यांतून उधळून दिलें. नंतर गणेशपंत व होळकराची फौज एकत्र झाली. शिवाय धिंगडखान म्हणून दुसरा एक सरदार गुलजारखानास मिळाला. पळणारास वाट एकच, पण पाहणारास शंभर, अशा प्रकार त्यांनीं जंगलांत आरंभिला. गुलजारखान व केसोकृष्ण वरचेवर सुरतेस जाऊन दादास भेटत. स. १७८०च्या डिसेंबरांत रनाळें येथें लढाई होऊन चंद्रराव पवार ठार झाला, आणि केसोकृष्ण सडकून मार खाऊन पळून गेला, तो पुनः बाहेर आला नाहीं. ही हकीकत खालील पत्रांत नानानें ता. २१-१-१७८१ रोजीं हैदरखानास लिहून कळविली. 'इंग्रजांकडील केसोकृष्ण दातार कांहीं तोफा व पलटणें व स्वार सुद्धां खानदेशांत हंगामा करीत होता, त्यांचे तंबीवर गणेशपंत बेहेरे फौज घेऊन होते. त्यांचे मदतीस तुकोजी होळकरही त्या जिल्ह्यांत आले. दोघांनीं मिळून रनाळ्यावर त्यांशीं लढाई चालविली. अखेरीस सरकारचे फौजांनीं चालून येऊन पलटणें गारत केलीं. बाकीचीं लुटून घेतलीं. त्यांजकडील चंद्रराव पवार ठार पडला. केसोपंत जिवानिशीं पहाडांत पळून गेला.'$

$ खरे २५५९; का. सं. प. या. ४८७; ऐ. टि. ६-६८; भा. व. २ प. या. ८३ व ३४; म. द. रु. २ पृ. १०६.

एक एक बंडखोर नाहींसे झाले तेव्हां गुलजारखान उघडा पडला, त्याबरोबर त्यानें पुणेकर कारभाऱ्यांशीं सल्ला करून आपला बचाव केला. गुलजारखान पुढें निजामशाहींत गेला, तो पुनः नोकरींत पेशव्यांकडे येण्याची खटपट स. १७८४ त करीत होता. त्या पुढें त्याचें नांव येत नाहीं.

याच वेळीं म्हणजे स. १७८० च्या डिसेंबरांत तुळया पवार नानाचे हस्तगत होऊन त्यास देहान्त शिक्षा झाली. हैदराचा व नानाचा तह होतांच हैदरानें त्यास आपल्याजवळून काढून दिलें. तेव्हां तो गोव्यास फिरंग्यांचे आश्रयास गेला. त्यांनीं स्नेह धरून सरकारांत पाठविला. मरणापूर्वीं घेतलेली तुळया पवाराची जबानी पूर्वीं देण्यांत आलीच आहे. नारायणरावास ठार मारणारे सर्व इसम भरपूर शिक्षा पावले, त्यांतला हा शेवटचा तुळया पवार होय.

---

प्रकरण आठवें

# गुजरातेंतील मोहीम

## जानेवारी–जून १७८०

१. फत्तेसिंग गायकवाडाची फूट, गॉडर्डशीं स्वतंत्र तह.
२. गॉडर्डकडे महादजीची तहाची हुलकावणी.
३. इंग्रजांशीं गुजरातेंत धांवपळीचें युद्ध.
४. गुजरात मोहिमेंतील फसगती.
५. नाना महादजींच्या उखळ–बेऱ्या.

* * * *

**१. फत्तेसिंग गायकवाडाची फूट, गॉडर्डशीं स्वतंत्र तह** (२६-१-१७८०).—इंग्रजांनीं कोणताही उद्योग हातीं घेतला कीं तो ते अत्यंत व्यवस्थितपणें पूर्ण मन लावून कसा तडीस नेतात, याचें उत्तम उदाहरण गॉडर्डचें पुढील वर्तन होय. पेशव्यांशीं तह जुळत नाहीं, असें सिद्ध होतांच

गॉडर्डनें सर्व ठिकाणीं पत्रें पाठवून लढाईची सिद्धता केली. त्यांत नाना उपायांनीं त्यानें फत्तेसिंगास वळविण्याचा प्रयत्न केला. फत्तेसिंगाचा पहिला ओढा बारभाईकडे होता. पुढें नागपुरच्या भोसल्यांप्रमाणेंच फत्तेसिंगासही मराठशाहींतून फोडण्याचे प्रयत्न सतत चालू झाले. पुरंदरच्या तहापासून गायकवाडांचे गृहकलह बिलकुल मिटले नव्हते. पेशव्यांचें देणें त्यांस पुष्कळ असून पुण्याचा सावकार बाळाजी नाईक भिडे हा पेशव्यांकडे फत्तेसिंगास जामीन राहून एकप्रकारें त्याच्या वकिलाचेंही काम तो पुण्यास करी. दहाव्या खंडांत त्याचा व फत्तेसिंगाचा पुष्कळसा पत्रव्यवहार छापलेला आहे. या वेळीं दिल्लीचा पानिपतकालीन वजीर, थोरल्या निजामुल्मुल्कचा नातू गाजीउद्दीन गुजरातेंत येऊन पेशव्यांचे मार्फतीनें स्वतःचें कांहीं संधांन जुळेल तर पाहत होता. पुण्यास, इंग्रजांकडे, गायकवाडांकडे वगैरे अनेक ठिकाणीं त्याचे उद्योग चालले होते. यास पूर्वी काल्पी प्रांतांत दोन लक्षांची जहागीर पेशव्यांनीं नेमून दिली होती, ती बाळाजी गोविंद खेर यानें जप्त केली, त्यास कारण बहुधा गाजीउद्दीननें मराठ्यांविरुद्ध कांहीं खटपट केली असावी. ती जहागीर पुनरपि त्यास चालू करण्याबद्दल नानाफडणविसानें १३-१-१७८० चा हुकूम दिला. यावरून गाजीउद्दीन पुढें उत्तर हिंदुस्थानास निघून गेला. (खंड १०-२०८, २०९; स. मा. रो. ३४६; पहा उत्तर वि. २ प्रकरण २२.)

पुरंदरचा तह झाल्यावर गुजरातेंतला बारभाईचा शह मिटला, पण फत्तेसिंगराव व गोविंदराव यांजमध्यें दादानें कलह माजवून दिला, आणि इंग्रजांनींही तें भांडण चेतावण्यास कमी केलें नाहीं. त्यांच्या चिथावणीनें फत्तेसिंगानें गोविंदरावाशीं लढाई सुरू करून बारभाईशींही विरोध आरंभिला. सन १७७७ चे आरंभीं उभय बंधूंत लढाई होऊन गोविंदरावाचा मोड झाला; आणि तो दोनशें स्वारांनिशीं पळून गेला. लढाईत खंडेराव गायकवाडाचा पुत्र पडला. मोठमोठे चांगले लोक कामास आले. फत्तेसिंगाची फौज गोविंदरावाचे पाठीस लागली. पुढें फत्तेसिंगानें अंमदाबादेस मोर्चे लावून पेशव्यांचे महालांस उपद्रव आरंभिला. गणेशपंत बेहेरे व अंताजी नागेश असे दोन पेशव्यांचे सरदार गुजरातच्या बंदोबस्तास होते ते फत्तेसिंगावर चालून गेले. ते लिहितात, 'आम्ही फौज सुद्धां बडोद्यानजीक आलों. तों फत्तेसिंगांनीं उत्तर पाठविलें, कीं मही उतरून अलीकडे आल्यास तुमची आमची कटकट होईल. त्यांनीं दोन

तीन घांटांची बंदोबस्ती केली. तथापि आज्ञेप्रमाणें जातच आहों. अंमदाबादेस गेल्यावर तेथील पेशव्यांचा सुभेदार आपाजी गणेश व आम्ही त्यांस दोन गोष्टी विचाराच्या सांगूं. परंतु त्यांची नजर अंमदाबाद घ्यावीशी आहे. फार भरीं भरले आहेत. त्याचे सुरत अठ्ठाविशीचे महाल जप्त करावे लागतील.' असें बेहऱ्यानें पुण्यास कळविल्यावर त्यास ता. २२-४-१७७७ चें नानाचें उत्तर आलें कीं 'फत्तेसिंग तुमचें न ऐकत तरी तुम्ही व आपाजी गणेश व गोविंदराव व खंडेराव गायकवाड एकत्र असतां फत्तेसिंगाचे हातून काय व्हावयाचें आहे! अंताजी नागेश येथें आले आहेत, त्यांच्याशीं जाबसालांत येईल तसें तुम्हांस लिहिलें जाईल.' यावरून गणेशपंत अहंमदाबादेस गेला. इकडून पुण्यांतूनही माणको शंकर यास फत्तेसिंगाशीं ठराव करण्याकरितां नानानें तिकडे पाठविलें, (ता. ३-९-१७७७). 'त्यांनीं जाऊन ठराव केला, कीं प्रांत गुजरात वगैरे सरंजाम व वतनें पेशजीप्रमाणें, व सेनाखासखेली गोविंदरावांकडे चालत होती तीं फत्तेसिंगास करार करून द्यावी.' त्याप्रमाणें ता. २३-१०-१७७७ रोजीं कराराची सनद पेशव्यांनीं करून दिली; आणि अंताजी नागेश यास फत्तेसिंगाचा कारभार करण्यासाठीं मुजुमदार नेमून पाठविलें. ह्या करारांत अठरा लाख रुपये फत्तेसिंगानें पेशव्यांस नजराणा द्यावयाचा ठराव होता, त्यांपैकीं पांच लाख रोख आले व बाकीची रक्कम हस्तेहप्त्यांनीं भरावयाची होती. ही पैशाची व्यवस्था सिद्धीस नेण्याचें काम अंताजी नागेशचें असून, ती अंमलांत आणतांना अर्थात् त्याचें व फत्तेसिंगाचें पटलें नाहीं. आपाजी गणेश, बेहरे व अंताजी नागेश रगडून कारभार करूं लागले, तेणें करून फत्तेसिंग केवळ नामशेष झाला. स. १७७७ च्या डिसेंबरांत आपाजी गणेशाचा मुलगा अमृतराव 'अंमदाबादेंत होता, त्यास फत्तेसिंगानें भेटीस म्हणून बोलाविलें; जात होते तों वाटेंत त्यास एका गाड्यानें जिवें मारिलें. त्यासंबंधानें फत्तेसिंगाकडून सरकारांत पत्रें आलीं जे, हे गोष्ट आपणाकडून घडली नाहीं. परंतु हा प्रकार त्याजकडूनच झाला असें लौकिकांत आहे. पुढें पारिपत्य होणें तेव्हां होईल. सध्यां ब्राह्मण जिवानिशीं गेला. अमदाबादेंत गोविंदराव गायकवाड व गणेशपंत बेहेरे असून दोघांनीं शहराचा बंदोबस्त केला आहे.' (खरे २०-६३, १८९०, २२१३; का. सं. प. या. १२६; स. मा. रो. २१४–२१७).

फत्तेसिंगाच्या आरबांनीं खून केला, तो त्यानेंच करविला असा कारभाऱ्यांनीं त्याजवर आरोप केला आणि राघो भिकाजी व बाबाजी भिकाजी यांस अहंमदाबादचा कारभार सांगितला, ( मार्च १७७८ ). परंतु गायकवाडबंधूंचा तंटा मिटला नाहीं. सन १७७८ च्या उन्हाळ्यांत मोरोबाचें कारस्थान उभारल्याचें ऐकून गोविंदरावानें पुण्यास जाऊन सेनाखासखेलीचें पद परत मिळविण्याची खटपट सुरू केली. तुकोजी होळकरानें त्याचा पुरस्कार जोरानें सुरू केला. कारभाऱ्यांनीं जबरदस्त नजराणा मागितला आणि गोविंदराव पेशव्यांशीं इमानानें वागेल अशी होळकराची खात्री मागितली. परंतु गोविंदरावाजवळ पैका नसल्यामुळें त्याचा डाव साधला नाहीं. फत्तेसिंगानेंही कबूल केलेला नजराणा भरला नाहीं. गायकवाडबंधूंची तक्रार शेवटीं मिटली नाहीं. तळेगांवची मोहीम होऊन दादा बारभाईंचे कबजांत आलेला पुन: पळून गुजरातेंत गेला. तेव्हां गॉडर्डच्या साह्यानें त्यानें गुजरात जिंकण्याचें ठरवून फत्तेसिंगास आपल्या बाजूस वळविण्याचा उद्योग अंताजी नागेश करूं लागल्यामुळें त्याचें व फत्तेसिंगाचें वांकडें आलें. या अडचणीच्या प्रसंगीं गोविंदराव कामतेकर नामक गृहस्थ फत्तेसिंगास इंग्रजांचे बाजूस आणूं लागला. त्या वेळीं फत्तेसिंगानें उघड उघड स्वार्थी डाव आरंभिला. तो असा कीं, इकडे दादा व गॉडर्ड आपल्या छातीवर बसल्यामुळें आपली परिस्थिति कठिण होत चालली आहे; आपल्या मदतीस पुण्याहून लवकर फौजा न आल्यास गुजरात हातची जाणार, असें त्यानें पुण्यास लिहून पाठविलें, आणि इकडे अंतस्थपणें गॉडर्डाशीं संधान चालू केलें. हा खेळ गोंदबा दिवाणाचे सल्ल्यानें फत्तेसिंग खेळत होता. अंताजी नागेश आपणास फार विरोध करितो असें पाहून त्यास फत्तेसिंगानें कैद केलें. त्या संबंधानें ता. १५-८-१७७९ रोजीं तो हरिपंतास लिहितो, ‘अंताजी नागेश येथें आले. त्यांजवर सर्व प्रकारें अखत्यार ठेवून आजपर्यंत चाललों. आजपावेतों दरबारचा गुंता उरकावा आणि बाळाजी नाइकाचे देण्याची तोड निघावी असा येथून पुरावा केला. अंताजीपंत गुदस्तां आले ते आम्हांस न भेटतां माघारे गेले. सोनगडानजीक दुसाण्यास $ जाऊन बसले. हे पहिल्यापासून बखेडखोर, आम्ही मसलतीवर, घरांत खुळें नानाप्रकारचीं, फौजेचा पेंच, चहूंकडून बखेडे. पुढें कोणे गोष्टीनें परिणाम नाहीं असें जाणून

$ नंदुरबारचे दक्षिणेस १५ मैल, ता० पिंपळनेर, जि० खानदेश.

त्यांचा बंदोबस्त करणें प्राप्त जालें. तात्या, आमचा तुमचा भाऊपणा, सर्व भरंवसा आपणास आहे.' फत्तेसिंगाचा कारभारी गोविंद गोपाळ याचा अनेकांच्या पत्रांत 'गोंदबा' असा उल्लेख आहे, त्यानेंही अंतोबाबद्दल वरचीच तक्रार पुण्यास भिडे यांजकडे लिहून कळविली. तिकडून हरिपंतानेंही फत्तेसिंगास पैशाबद्दल टासून लिहिलें. 'सरकारचे ऐवजाचा निकाल पडल्यास सारी प्रामाणिकता आहे. नाईक खातरजमा करितात, परंतु श्रीमंतांचे प्रत्ययास आलें पाहिजे का नको. काळजी धरून सरकारचा निकाल लवकर पडेसें करावें' (ऑगस्ट १७७९). भिडेही असेंच फत्तेसिंगास लिहितो. 'शिंदे व होळकर यांनीं वांटणीचे पेंच घातले होते ते सरकारांतून दूर करविले. त्यास सरकारचा कारभार जो केला त्या मुदतीप्रमाणें रुपये न पाठवितां बयान लावून लिहितां हें बरें कीं काय! तुमच्या लिहिल्यावरून आम्ही या कामांत पडून ठरावांत आणिलें, त्याचें फळ कीं सरकारांत बोलावून आम्हांस फजीत करतात. हर तजवीज करून सरकारचा कारभार निर्गमास आणावा हें उत्तम आहे, नाहीं तर स्थित राहणार नाहीं.' अशा रीतीनें फत्तेसिंग व नाना यांचें बिनसत चाललें. 'आमची निष्ठा श्रीमंतांसीं कोणे कालीं बदलणार नाहीं. अंताजी नागेशाचें बहुत प्रकारें मनोधारण करीत होतों, कीं तुमचा कारभार तुम्ही करून शिबंदी सरकार व सावकार यांचा फडशा करणें. तें न होय तेव्हां कैद केलें. त्यांजकडील हिशेब घेणें प्राप्त. त्यांजकडे सुरत अठ्ठाविशी महालांची मामलत; ऐवज आला किती, दिला किती, याचा झाडा समजला पाहिजे. त्यांनीं सातपुड्यांत पहाडी किल्ला घेऊन बंदोबस्त केला आहे, त्याची तजवीज सरकारांतून झाली पाहिजे. शिंदे यांजकडून बखेडा करवितील, सबब विनंति लिहिली आहे.' असें फत्तेसिंगानें नानास लिहिलें.

यानंतर इंग्रज व दादा यांची गुजरात प्रांत जिंकण्याची तयारी होऊं लागली, तेव्हां पुणें दरबार व इंग्रज यांचा सल्ला होतो कीं बिघाड होतो, याची विवंचना फत्तेसिंगास वाटूं लागली. त्याजकडे दोहोंकडील अनुसंधान चालू झालें. दादाचे हस्तक राजाराम गोविंद व चंद्रराव पवार यांनीं फत्तेसिंगाचा उच्छेद चालविला. 'यांच्याशीं आमचा नित्य संबंध जडला आहे. दोहींकडून संकट. उपाय नाहीं. ऐवजाविशीं आपण वरचेवर लिहितात, त्यास दररोज नवें खूळ उभें राहतें. कोणासच भरंवसा पटत नाहीं. गोष्ट कुपेचीं

पडली आहे. इंग्रजांची जात बेइमान. एकाशीं गोड बोलून एकास झक द्यावी, फोडाफोड करावी, हे हुन्नर टोपीकर बहुत जाणतात. तूर्त येथील प्रसंग बहुत विलक्षण, करतांही दोष, न करतांही दोष. चहूंकडून संकट. फौज घरीं बसलियामुळें सिबंदी चढली. जलचर नजीक, यांचा विश्वास नाहीं. तह बिघडल्यामुळें लोकांचे होश ठिकाणीं राहिले नाहींत. नर्मदा उत्तरतीर व दक्षिणतीर, व मही उत्तरतीर अशा तीन ठिकाणीं इंग्रजांचा शेजार, यामुळें सर्व शत्रुपण माथां आलें आहे. यास्तव कोंडाई बारीकडून सुरत प्रांतीं अति सत्वर फौजा आल्यास निभाव आहे. या गोष्टीस दिवसगत लागेल तर दोष न ठेवावा. चंद्रराव पवाराचें पारिपत्य करून सरकारचीं ठाणीं बसविलीं. अशा प्रकारें फत्तेसिंग व त्याचे कारभारी यांनीं पुण्यास भिडे, हरिपंत फडके वगैरे मंडळीस तीन महिने सारखीं पत्रें लिहिलीं तीं सर्व अस्सलच वाचण्या-लायक आहेत. पाटिलबावाकडे जांबगांवास कारकून पाठवून फत्तेसिंगानें त्याजशीं करार सुद्धां केले. सखारामबापू कैद झाल्यापासून हरिपंत फडके दुय्यम कार-भारी म्हणून पुण्यास काम करीत असून बाहेर मोहिमेवर नव्हता, हें लक्षांत ठेवलें पाहिजे. हरिपंताचे नांवचीं पत्रें बरींच आहेत. (खं. १० ले. २०८-२५१.)

कारभाऱ्यांनीं गुजरातचे स्वारीचा जिम्मा सिंदे होळकरांकडे सोंपविला, त्या वेळेस गायकवाडांची व्यवस्थाही सिंद्याकडेच देण्यांत आली. त्या संबंधानें पुढील पत्र महादजीनें फत्तेसिंगास लिहिलें. ‘विशेष. बाळकृष्ण अनंत याजला आपणांकडे पा। व दोन चार पत्रें पाठविलीं, परंतु उत्तर न आलें. दौलतीस इतकी दीर्घसूत्रता नसावी. इकडून कित्येक बारीक मोठे अर्थ आपणांस कळत जावे, त्याप्रों पैरवीं आपण करावी, यास्तव वारंवार लिहिण्यांत येतें. इंग्रजांचा स्थायीभाव काय? आजवर आप-णांकडून न जालें. करार केल्याप्रमाणें ऐवज आला नाहीं. सरकारांत वारंवार तापत्रय लिहितां हें ठीक नाहीं. सुरत अठ्ठाविशींत सरकार अंमलांत तसदी तुम्हांकडील लागती हें काय! या उपरी मनस्वीच करणें असलीयास स्पष्टार्थ ल्याहावा. सरकारांतून सुरत अंमदाबादेकडील बंदोबस्त आम्हांस सांगितला आहे. चि. भगीरथराव सिंदे व पाराशर दादाजी गोहलकर तूर्त जमावानिशीं गुलजारखानाचे पारिपत्यास क(ला?)सुराजवळ आहेत. अविलंबें तिकडील निर्गम

करून सुरत महालांत व अंमदाबादेकडे येतील. विजयादशमीनंतर आम्ही व होळकर त्या प्रांतीं येत आहों. ज्यांत सरकार काम होईल तें करावें लागेल, हें समजोन उत्तर जलदीनें पाठविणें. ता. २५ रमजान' (६-१०-१७७९, बडोदें दप्तर, भा. व. २, प. या. ३४, ५४, ७१, ७२ ).

यानंतर पुनः फत्तेसिंगाचा कल इंग्रजांकडे दिसूं लागला, तेव्हां त्यास भरंवसा यावा म्हणून सिंदे होळकरांनीं बेलभंडारासह त्यास स. १७७९ च्या अखेरीस करार लिहून दिला, कीं 'तुमची आमची निखालसता बाळाजी नाईक भिडे यांचे विद्यमानें जाली आहे. इंग्रजांचे मसलतीस आम्ही उभयतां सरदार येणार आहों. आम्हां उभयतांकडून अगर सरकारांतून तुम्हांविशींचे वांकडे प्रकार आढळल्यास आम्ही तुम्हांस सर्व प्रकारें हमी देतों. अंतर देणार नाहीं. इंग्रजांचा व तुमचा वैरभाव पडल्यास तुमचें साहित्य सर्व प्रकारें करूं.'

या वेळीं इंग्रजांनीं उत्तर कोंकणांतून गुजरातेकडे विशेष शह चालविला. ता. २-१-१७८० ची बातमी पुण्यास आली, कीं 'इंग्रजांकडील बातमी काढावया तीन रोज बातमीदार बैरागी होऊन गेले आहेत. आल्यानंतर सेवेसीं लिहून पाठवीन. अर्जुनगडावर † आपल्या फौजेचा टिकाव झाल्यास प्रयत्नांत चुकणार नाहीं. श्रीमंत दादा बडोद्यास मोहीम करणार. शहरचे सावकारांपासून पंधरा लक्ष कर्ज घेतलें. इंग्रजांचे कंपनींत पैका नाहीं. दांतीं बळ धरून व्यावृत्ति मांडिली आहे. सिद्धीस जाऊ अगर न जाऊ. सरकारच्या फौजा येत्या तर फत्तेसिंगास हिंमत येऊन इंग्रजांचे फैल कमी पडते. इंग्रज जलमार्गें चार होड्या तयार करून बलसाड, पारनेरा याजवर येणार. आजपर्यंत गायकवाडांचें लक्ष इंग्रजांकडे किमपि नाहीं. कारण चंद्रराव पवारास त्यानें छापा घालून लुटून घेतला. गायकवाडाची व इंग्रजांची लढाई भडोचेस झाली.'

सन १७८० च्या जानेवारींत शिंदे होळकरांची तयारी होऊन ते गुजरातेंत येण्यास निघाले. ता. ३०-१-१७८० रोजीं कासारबारीवरून महादजीनें पुढचें पत्र फत्तेसिंगास लिहिलें.§

'इंग्रजांनीं सुरतेहून कूच केलें. नर्मदा उतरून तुम्हांकडील तालुक्यांत जाणार म्हणोन ऐकलें, त्यावरून आम्ही मातबर फौज व तोफखाना सुद्धां कूच

---

† दंमणजवळ. § बडोदें दप्तर अप्रकाशित.

करून मजल दर मजल कासारबारीवर आज आलों. येथें मुक्काम न करितां दरकूच त्या प्रांतें येत असों. फौज व तोफखाना समागमें भारी. यास्तव पंधरा वीस दिवस गुजरात प्रांतीं येण्यास लागतील. आम्ही येऊं तोंपर्यंत तुम्हीं इंग्रजांस ठांसून राखावें. पुढें त्यांचा प्रसार होऊं न द्यावा. तुम्ही आम्ही एक जागां जालियावरी इंग्रजांचें पारपत्य होईल. चिंता नाहीं. आम्ही जलदच येतों. तोंपावेतों इंग्रजांस दबकून राखावें. बडोदें वगैरे जाग्यांचा बंदोबस्त करवून तुम्हीं फौजे सुद्धां मैदानांत आपले मजबुदीनें राहावें.'

अशाच आशयाचें यानंतरचें पत्र ता. ४-२-१७८०चें खंड १०-२५२चें असून, त्यांत खालील ज्यास्त मजकूर आहे. 'आपणाकडून नारायण गोविंद जांबगांवचे मुक्कामीं आले, त्यांनीं आपणाकडील कित्येक घरोब्याचे अर्थ सांगितले. ऐशास पूर्वीपासून आपला आमचा स्नेह चालत आहे, त्याच प्रा। पुढें चालावा हेंच आमचें मानस आहे. आजपर्यंत आपण सरकारचें लक्ष राखलें आहे. तसाच पुढें सरकार उपयोग करून दाखवावा.' परंतु वरील पत्रें पोंचण्या-पूर्वीच ता. २६-१-१७८० रोजीं फत्तेसिंग इंग्रजांशीं स्वतंत्र तह करून त्यांस सामील झाला होता, तो प्रकार असा.

सुरतेस आल्याबरोबर सन १७७९ च्या पावसाळयांत गॉडर्डनें फत्तेसिंगास हलकेच आपल्या बाजूस वळविण्याचा प्रयत्न चालविला. फत्तेसिंगास त्यानें कोणत्या ही प्रकारें दुखविलें नाहीं, किंवा त्याच्या प्रदेशास त्रास दिला नाहीं. रघुनाथरावाशींही स्वतंत्र तह वगैरे न करितां, आपणच मुख्य पक्ष म्हणून पुणें दरबाराशीं युद्ध चालवावें, अशीच मुंबईकरांची गॉडर्डास ताकीद होती. हार्ट्ले यास त्यांनीं गॉडर्डचे मदतीस गुजरातेंत पाठविलें. ता. १-१-१७८० रोजीं तापी उतरून गॉडर्ड कीम नदीवर आला. त्याचा मार्ग हल्लींच्या आग-गाडीच्या पूर्व बाजूनें जवळजवळ समांतर असा १५ मैलांवर होता. कीमच्या उत्तरेस जाऊन त्यानें बाबा पीरावर नर्मदा ओलांडिली, आणि तिच्या उत्तर तीरावर शुक्लतीर्थ येथें थोडे दिवस मुक्काम केला. येथून ता. १६ जानेवारीस मुंबईस कळविलें, कीं आमच्या सुदैवानें नाना व महादजी यांजमध्यें भानगडी उपस्थित होऊन, त्यांचें इकडे येणें लांबणीवर पडलें, त्या योगानें फत्तेसिंग आम्हांस येऊन मिळण्याच्या अगदीं बेतांत आहे. करार ठरला म्हणजे तुम्हांस कळवितों. आपण जें प्रचंड युद्ध हातीं घेत आहों, त्यांत फत्तेसिंग

आमच्या बाजूस आल्यानें मराठ्यांची बाजू हलकी होऊन गुजरात हस्तगत करण्यास विलंब लागणार नाहीं.' ता. १९ रोजीं गॉडर्ड डभईवर आला आणि लगेच तें ठाणें पेशव्याचे अधिकाऱ्यानें त्याचे हवालीं केलें. डभई गेल्याबरोबर फत्तेसिंगाचा धीर सुटला, आणि लगेच तो गॉडर्डास भेटण्यास आला. डभईचे पश्चिमेस ३ मैलांवर कुंदेला गांवीं दोघांची भेट होऊन खालील तह ता.२६-१-१७८०रोजीं उभयतांच्या सह्यांनिशीं पुरा झाला. (फॉरेस्ट पृ. ३९४.)

१. पुणें दरबारानें तह मोडून इंग्रजांचें वैर संपादिलें आणि उगाच फत्ते-सिंगाची छळणूक चालविली, म्हणून गुजरात प्रांतांतील पेशव्यांचा अंमल साफ काढून टाकण्यासाठीं हा बचावाचा व चढावाचा तह इंग्रज व फत्तेसिंग गाय-कवाड यांजमध्यें कायम करण्यांत येत आहे. एकमेकांनीं एकमेकांचें सदैव साह्य करावें.

१. हल्लीं गुजरातेंत पेशव्यांचा जो भाग आहे तो इंग्रजांनीं घ्यावा आणि फत्तेसिंगाचा प्रदेश त्याजकडे राहण्यास इंग्रजांनीं त्यास मदत करावी.

१. फत्तेसिंगानें तीन हजार स्वारांनिशीं इंग्रजांस चालू युद्धांत सामील व्हावें.

१. हल्लीं गुजरात प्रांताची पेशवे गायकवाडांची वांटणी उभयतांस गैर-सोयीची आहे. सबब महीच्या उत्तरेस हल्लीं जो प्रदेश पेशव्यांकडे आहे, तो फत्तेसिंगास द्यावा, आणि तापीच्या दक्षिणेकडील सुरत अठ्ठाविशीचे महाल इंग्रजांनीं ठेवावे. महीच्या उत्तरेकडील प्रदेश जिंकून फत्तेसिंगास देण्यास इंग्रजांनीं मदत करावी. ही विभागणी उभय पक्षीं कायम समजावी.

१. पुणें दरबाराचा व इंग्रजांचा तह होईल तेव्हां इंग्रजांनीं फत्तेसिंगाचे हितास जपावें. या सर्व उपकारांबद्दल भडोच जवळचे गांव व सिनोर परगणा फत्तेसिंगानें कायमचे इंग्रजांस द्यावे. अहंमदाबाद जिंकून फत्तेसिंगाचे ताब्यांत येतांच वरील विभागणीचा अंमल व्हावा.

याप्रमाणें फत्तेसिंगास अडचणींत गांठून त्याजकडून वरील तह इंग्रजांनीं कबूल करून घेतला, इतकेंच नाहीं, तर वर दक्षिणा म्हणून सिनोर व भडो-चचे गांव फुकटांत मिळविले. मागें पुढें अडचण आल्यास अहंमदाबादेकडे फत्तेसिंगानें आपलें पाहून घ्यावें; सुरतेजवळ सलंग प्रदेशांत इंग्रजांचा पाया कायम करावा, ही गॉडर्डची योजना होती. गॉडर्ड म्हणतो, 'विश्वासघात करून

कपटविद्या लढविण्यांत फत्तेसिंगाची ख्याति इकडे इतकी पसरलेली आहे कीं तो उद्यां काय करील याचा नेम नाहीं.'

तह कायम झाल्याबरोबर गॉडर्ड ताबडतोब डभईहून निघून ता. १० फेब्रुवारीस अहंमदाबादेपुढें आला आणि तोफांच्या माऱ्यानें तीन दिवसांत तें शहर त्यानें हस्तगत केलें. लढण्याची मुख्य कामगिरी हार्टलेनें केली. पेशव्यांचे अधिकारी निकरानें लढले. लढाईत इंग्रजांचे १०० व मराठ्यांचे ३०० लोक पडले. गॉडर्ड अहंमदाबादेस असतां सिंदे होळकर त्वरेनें आपल्यावर चालून येतात असें कळतांच त्यानें तोफा व जड सामान खंबायतेस पाठविलें आणि फत्तेसिंगासह ७ मार्च रोजीं परत महीच्या अलीकडे फाजलपुरास येऊन तळ दिला. तों दक्षिणेस आठ मैलांवर भगीरथ सिंद्याची फौज छाणी येथें येऊन पोंचली; तसेंच महादजी व तुकोजी डभईजवळ येऊन पावागड पाठीशीं घालून उतरले. ता. ८ रोजीं गॉडर्ड बडोद्यास विश्वामित्रीवर दाखल झाला. तळेगांवावर ओलीस दिलेले दोन इंग्रज गृहस्थ फार्मर व स्टुअर्ट महादजीजवळ होते, ते त्यानें मोकळे करून गॉडर्डकडे पाठविले, ते बडोद्याजवळ त्यास भेटले, त्याजबरोबर महादजीचा वकील आपाजी साबाजी होता. त्यांनीं गॉडर्डास कळविलें, कीं महादजीची इच्छा इंग्रजांशीं कलह करण्याची नाहीं. वकील सोडले याबद्दल नानानें महादजीस ठपका दिला, तेव्हां त्यानें कळविलें (ग्वा. ४-१९), 'ओलीस इंग्रज बावांनीं सोडावयाचे नव्हते, त्यास त्यांनीं उत्तर दिलें जे, एवढ्यानेंच अर्थ सरतो असें नाहीं. त्यांचे हातें संदर्भ लावावा, राजकारण करावें. पुण्यांत भास विपरीत जाला असेल तर इंग्रजांनीं इमान ठेवलें नाहीं. तळेगांवीं तहनामा देऊन बदलले. झुंजावयाची हिंमत धरून चाललों आहों, मग पाठीमागें कां पाहवें. ओलीस परत पाठविले तेव्हां आपाजी साबाजी पाठवून त्यांची बातमी व हिंमत व फत्तेसिंगाचा खुलासा घ्यावा इतकाच अर्थ होता.' यांत महादजीचा मुख्य कावा होता तो पुढें दिसून येईल.

**२. गॉडर्डकडे महादजीची तहाची हुलकावणी** (मार्च १७८०).—गुजरातेंत इंग्रज मराठ्यांच्या फौजा समोरासमोर आल्या तेव्हांची हकीकत गॉडर्ड लिहितो:—'अद्याप सिंद्याकडून आमच्या फौजेस कोणताही उपसर्ग नाहीं; आमच्याशीं शत्रुत्व त्यानें दाखविलेलें नाहीं, उलट आम्ही न विचारतां आपण होऊन त्यानें आमचे दोघे गृहस्थ फार्मर व स्टुअर्ट सोडून आम-

त्याकडे पाठवून दिले, यावरून इंग्रजांशीं त्याचा स्नेहभावच दिसतो. हे दोघे काल आमच्या छावणींत येऊन दाखल झाले. त्यांला घेऊन महादजीचा वकील आपाजी साबाजी मजकडे आला. बरोबर महादजी तुकोजींचीं पत्रें मला होतीं, कीं 'वडगांवावर आम्ही तुमच्याशीं स्नेहभावच दाखविला असून, अद्यापि आमचे मनांत तो कायम आहे.' फार्मर व स्टुअर्ट यांस त्यानें फारच आदरानें वागविलें, त्यांस मोकळें करून आमच्याकडे पाठवून दिलें. आणि आतां सिंदे मला विचारतात कीं, आपल्याशीं व पेशव्याशीं आम्ही इंग्रज पुढें स्नेह राखणार कीं वैरभावच चालविणार? मी आपाजी साबाजीस इतकाच जबाब दिला, कीं पेशवे सरकाराशीं आम्हांस वैरभाव चालविण्याची बिलकूल इच्छा नाहीं हें सिंद्यास कोठें ठाऊक नाहीं! त्याच उद्देशानें मी उभयतांस पसंत पडाव्या अशा तहाच्या अटी पुण्यास नानाकडे पाठविल्या, त्या त्यांनीं नापसंत केल्यामुळें आम्हांस नाइलाजानें शस्त्र उचलणें भाग पडलें. आतां या युद्धापासून मराठी राज्याचें नुकसान होईल तर त्यास सर्वथैव नानाच जबाबदार होत. प्रत्यक्ष सिंद्याशीं तर आमचें मुळींच वांकडें नाहीं. आमच्या संबंधानें ते किती कळकळ बाळगितात ती मला ठाऊक आहे; आणि उभयतांच्या फायद्याची अशी जर कांहीं व्यवस्था ते सुचवितील तर त्यांत आम्ही मोठ्या संतोषानें सामील होऊं. (Forrest & Gwalior Vol. English).

त्यावर वकील बोलला, तुमच्याप्रमाणेंच महादजीचेंही नानांशीं वांकडेंच आहे. मोरोबा व बापू यांच्या कामांत सिंद्यांनीं नानास केवढें साह्य केलें तें सगळे लोक जाणतात. हे उपकार बाजूस ठेवून, नानानें आतां यांजविरुद्ध भोसले निजामाशीं गट्टी केली आहे. यावरून सिंद्यांचें औदार्य व नानाचा स्वार्थ सहज उघड होतात. खरें पाहतां इंग्रज व सिंदे यांचें अर्थाअर्थी कांहींच वैर नाहीं. दोघांचेंही वांकडें फक्त नानाशीं; अशा स्थितींत तुम्ही इंग्रजांच्या तर्फेनें कांहीं व्यवस्था सुचवाल, तर सिंदेही त्याचा विचार योग्य तोच करतील.

यावरून गॉडर्ड म्हणतो, त्या वकिलाचा मुख्य हेतु मला इतकाच कळला, कीं कोणत्या तरी निमित्तानें माझे पोटांत काय आहे तें प्रथम काढून घ्यावें, आणि तदनुसार पुढें आपली व्यवस्था ठरवावी. तेव्हां मी त्यास इतकेंच कळविलें, कीं आमच्याशीं संगनमत करून नानाचा पाडाव करण्याची जर

सिंद्यांची खरोखरच इच्छा असेल, तर ती गोष्ट कशी सिद्धीस न्यावयाची तें प्रथम सिंद्यांनींच सुचवावें, म्हणजे मग त्यासंबंधानें पुढें विचार करण्यास मला ठीक पडेल. मिळून आमच्याशीं दोस्ती ठेवल्यानें सिंद्यांचे कसकसे फायदे आहेत, ते स्पष्ट सांगून, स्वतःचा अंत लागूं न देतां, 'तुमच्याकडूनच काय तें बोलणें येऊं द्या,' असें सांगून मीं त्या वकिलास रजा दिली.

'नंतर पुनः आपाजी साबाजी महादजींचीं पत्रें घेऊन मला येऊन भेटला, पण त्या पत्रांत विशिष्ट सूचना कांहीं नसून पहिल्यासारखेच मोघम स्नेहभाव दर्शविणारे शब्द होते. बोलणें सुरू झाल्यावर वकील मला म्हणाला, 'नानाला कारभारांतून काढण्याची तुमच्याइतकीच आमच्या यजमानांचीही उत्सुकता आहे; आणि तसा उद्योग हातीं घ्यावयाचा तर प्रथम राघोबानें सिंद्यास जो करार तळेगांवावर लिहून दिला आहे, तो तुम्ही त्याजकडून अमलांत आणून द्या. त्या करारांत राघोबानें आपला राज्यावरील बेदावा लिहून दिला असून, बारा लाख रुपये नेमणूक घेऊन झांशीस राहण्याची कबुलात आहे. पेशवाई माधवराव नारायणाचे नांवें चालावी, बाजीरावास त्याचा कारभारी नेमावें; परंतु बाजीराव लहान असल्यामुळें कारभार सर्व सिंदे पाहतील. या करारानुसार प्रथम तुम्ही राघोबास झांशीस पाठवा, आणि बाजीरावास सिंद्यांचे ताब्यांत देऊन पुण्यास पाठवा, म्हणजे पुढील सर्व भाग उभयतांच्या मनाजोगते जुळवितां येतील.' यावरून सिंद्याचा उद्देश मला इतकाच दिसला, कीं कोणीकडून दादा व त्याचा मुलगा यांस माझेकडून आपले ताब्यांत घ्यावें, आणि नंतर पुण्यास जाऊन नानावर आपला वर्चष्मा वाटेल तसा बसवावा, मग इंग्रजांचें त्यांत काय वाटेल तें होवो. हा वकिलाचा झोंक पाहून मीं त्यास स्पष्टच असें कळविलें कीं, 'राघोबा आमच्या आश्रयास आलेला पाहुणा आहे, त्याजला त्याचे इच्छेविरुद्ध कैद्यादाखल तुमचे हवालीं करणें हें आमचे इभ्रतीस गैर. सबब आम्हांस तसें बिलकूल करतां येणार नाहीं. त्याचा तुमचा करार काय झाला तो आम्हांस ठाऊक नाहीं, व त्याच्याशीं आमचा संबंध नाहीं. बाल बाजीरावास तुमचे हवालीं करण्यापूर्वी त्याच्या जिवास अपाय होणार नाहीं, याची कांहीं तरी हमी पाहिजे; आणि या गोष्टी प्रथम पुण्यासच नीट ठरल्या पाहिजेत. बरें, इतकें करून सिंद्याचे हातीं सर्व सूत्रें जमवून देण्याचे कामीं जर आमचें साह्य तुम्हांस पाहिजे, तर त्याबद्दल

आम्हांस तुम्ही काय देणार तें अगोदर ठरवा. कारण आजपावेतों तुमच्या या भानगडींत पडून आम्ही उगाच भयंकर खर्चाखालीं मात्र आलों. तो खर्च भरून येण्याची तजवीज झाली पाहिजे.' असें सांगून मी आपाजी साबाजीस आजच परत पाठविलें. आमच्याशीं दोस्ती करण्याची सिंद्यांची इच्छा असेल तर ती आतां लगोलग दिसून येईल. परंतु मला त्याबद्दल मोठा संशय येतो. या केवळ कालहरणाच्या पोकळ बाता दिसतात. एकच गोष्ट आज कळली ती सांगतों. फत्तेसिंगाचा भाऊ गोविंदराव सावंतवाडीस $ राहत होता, त्यास महादजीनें पत्र लिहून आपणाजवळ बोलाविलें आणि तो आजच येऊन त्याजकडे दाखल झाला.' फत्तेसिंग इंग्रजांस मिळाला, म्हणून त्यांस शह देण्याकरितां महादजीनें गोविंदरावास आपल्याजवळ आणिलें, आणि बडोदें हस्तगत करण्याची युक्ति चालविली.

पुढें चार दोन दिवसांतच गॉडर्ड महादजींचा सामना बडोद्याजवळ सुरू झाला. गॉडर्ड लिहितो, 'महादजीच्या हालचाली इतक्या सावधगिरीच्या आहेत कीं तो सामना करण्यासाठीं स्वतः पुढें येत नाहीं, किंवा मला जवळ भिडण्याची संधि येऊं देत नाहीं. मी अंगावर आलों कीं तो मागें सरतो; त्याचे पाठीस लागावें, तर त्यांत माझेंच नुकसान होणार. फत्तेसिंगाचा मुलूख सर्व त्याचे तावडींत आहे. त्याचा वकील येथून परत गेला, तो पुनः मजकडे आला नाहीं, किंवा त्या संबंधानें कोणतेंही बोलणें आतां चालू नाहीं. नानाचें व त्याचें अत्यंत वांकडें आलेलें आहे असें सर्व लोक बोलतात, पण तो केवळ देखावाच होय अशी माझी खात्री आहे. नानाचे वकील सिंद्याचे लष्करांत असून, उभयतांचीं दररोज पत्रें जात येत आहेत. सिंद्यानें मजकडे वकील पाठवून गोडीचें बोलणें सुरू केलें, तेव्हांच प्रथम मला त्याचा वहीम आला, कीं ही सर्व बाहेरची हुलकावणी असावी. इंग्रजांना फसवून गोत्यांत आणावें एवढ्याच पुरता नानाशीं आपलें वांकडें असल्याचा देखावा सिंद्यानें केला आहे, अशी आतां माझी खात्री झाली. कोणीकडून तरी राघोबा व बाजीराव यांस हस्तगत करावें असा सिंद्याचा डाव दिसतो. ते हस्तगत झाले म्हणजे पुनः त्याला नानावर आपला शह बसवितां येईल. सारांश,

$ हा राजपिंपळयास होता; सावंतवाडीस कशास गेला ?

नानाचें आपलें वांकडें आहे हा केवळ मुद्दाम पुकारा केलेला आहे. मनांतून दोघे एकच आहेत.' ( ता. २४-३-१७८०, बडोद्यानजीक छावणी ).

यासंबंधानें मराठींतही पुष्कळसा पत्रव्यवहार नाना महादजींचा आहे; त्यांत महादजी गॉडर्डला मिळाला, दोघे मिळून नानाला कारभारांतून काढणार, अशी बातमी गुजरातेंतून नानाच्या हस्तकांकडून त्यास पुण्यास गेली, परंतु ती खरी कीं खोटी याची स्पष्टता मुद्दामच कांहीं दिवस नानानें केली नाहीं. महादजी अत्यंत खोल गांठीचा मनुष्य. त्याला कोणीकडून दादा आपले कबजांत आणावयाचा होता. लढाई करून गॉडर्डचा पाडाव केल्याशिवाय दादा आपल्या हातीं येणें शक्य नाहीं अशी महादजीची खात्री झाली. अशा प्रकारचा पराभव आपल्या हातून गॉडर्डचा होईल ही गोष्ट महादजीला अगदीं अशक्य वाटली. कारण इंग्रजांच्या तोफांपुढें महादजीचा कांहीं इलाज चालला नसता. धांवपळीच्या लढाईंत, किंवा मुत्सद्दीगिरीच्या काव्यांत मराठे इंग्रजांना भारी होते, पण त्यांच्या तोफांपुढें मराठ्यांस एकदांही कधीं जय मिळाला नाहीं. तेव्हां नुसतें लढून स्वतःचीच खराबी करून घेण्यांत हांशील काय! त्यापेक्षां केवळ मुत्सद्देगिरीनेंच काय साधेल तें साधावें असा महादजीचा डाव होता; म्हणूनच इंग्रजांचे संशय परभारें दूर करण्याच्या उद्देशानें त्यानें ओलीस असलेले इंग्रज मुद्दाम सोडून गॉडर्डकडे परत पाठविले; नानाचें आपलें वांकडें आहे, असा वकिलामार्फत देखावा केला; आणि अंगावर बाजू न घेतां पर्जन्या-पूर्वीचे दोन तीन महिने निभावून नेले. एकदां पाऊस पडला म्हणजे गुज-रातच्या चिखलांत इंग्रजांच्या तोफा निरुपयोगी होणार हें जाणून तो शक्य तितका आपला कावा साधीत होता. कोणत्याही रीतीनें दादास हस्तगत करावें ही त्याची इच्छा; पण हें त्याचें वर्तन पुण्यास सुद्धां सर्वांस विपरीत वाटलें. नानाला खरेंच वाटलें कीं महादजी इंग्रजांकडे फितूर झाला. महादजी मात्र मनाचे मनांत हंसत असेल. 'नाना, हें राजकारण आहे, असेही बनावट पुकारे मुद्दाम करावे लागतात. त्यांमुळें तुम्ही आपल्या अंतःकरणाची चलबिचल कां करितां! तुम्ही आम्ही शपथेनें भाऊ झालों आहों, त्यास बाध नाहीं.' असेंच महादजीनें पुढें योग्य वेळीं नानास सांगितलें. यावरून महादजीचा खोल व हिकमती स्वभाव व्यक्त होतो. नाना एकवचनी होता. तसा महादजी नव्हता. हा स्वभावभेद दृष्टीपुढें पाहिजे. इंग्रजांचे वकील जवळ ठेवून पोसण्याचा

खर्च करण्यांत कांहीं हांशील नव्हतें. ओलीस आलेले इसम मारून टाकण्याची ताकद असेल तर त्यांचा उपयोग. तशी ताकद मराठ्यांची नव्हती, म्हणून ते सोडले, हा महादजीचा शहाणपणाच म्हटला पाहिजे.

ता. ९-३-१७८० चें सिंद्याकडील वर्तमान. 'इंग्रज मही उतरून अलीकडे आले. त्यांची आमची तफावत आठ दहा कोसांची आहे. दोन चार दिवसांत गांठ पडेल. फत्तेसिंग अंमदाबादेस मार्गे राहिले आहेत. इंग्रजांसमागमें त्यांनीं गोंदवा दिवाण फौज सुद्धां दिला आहे. अमृतरावही इंग्रजांबरोबर आहेत. हा कालपर्यंत गायकवाडाकडील जाबसाल किंवा अनुसंधान किमपि नाहीं. फत्तेसिंगानीं इंग्रजांस पगडीबद्दल भाईचारा केला.' इतकें कृत्य व्हावयास कारण गोंदबा. त्यानें फत्तेसिंगाचे बुद्धीस भ्रंश करून समजाविलें कीं सिंदे होळकर जागिरी किल्ले घेतात, आणि आम्हांपाशीं कारभारी रुपये मागतात. तेव्हां आपण इंग्रजांस मिळावें, म्हणजे पुण्याचे कारभारी पैका मागतील तो द्यावयास नलगे.

**३. इंग्रजांशीं धावपळीचें युद्ध** (एप्रिल मे १७८०).—ता. २६ मार्चची हकीकत. 'इंग्रज दहा अकरा दिवस बडोद्यास होते. फत्तेसिंग फौज सुद्धां तिहीं कोसांवर येऊन राहिले. इंग्रजांचे व आमचे लोकांची दोन तीन दिवस गोळागोळी होते. साल मजकुरीं गुजरात प्रांतीं पर्जन्य पडला नाहीं त्यामुळें फौजेस पेंच फार आहे. पाटिलबावांनीं गायकवाडाकडे अनुसंधान करून पाहिलें. त्यांचा निश्चय एकच कीं टोपीकरांचा स्नेह केला, त्या पक्षीं श्रीमंतांच्या इष्टत्वाची इच्छा नाहीं. परभारें त्यांजकडे पुण्याहून सरकारचे कारकून येऊन बोलाचाली होते, यास्तव पाटीलबावा बहुत खट्टे आहेत. आम्ही बडोद्याचे रोखें येणार तों त्यांनीं अगोदरच बडोदें जवळ केलें. उपरांत इंग्रज नदीचे पाण्यानें सुमारें पांच कोस पुढें आले. फाल्गुन शु० १४ स (१९ मार्च) रविवारीं सडे होऊन पुढें आले.'

'इंग्रजांचा मुकाबला होऊन एकमास होत आला. रोज गोळागोळी व कांहींशी लढाई होतच आहे. ता. ३ एप्रिल रोजीं पहांटेस सडे फौजेवर इंग्रजांचा छापा आला. अगोदर बातमी आल्यानें सावध होऊन उभे राहिले. दोन तीन घटका तोफांचा मार होऊन उपरांत हत्यार लागलें. आपल्याकडील दहापांच भले माणूस ठार व ४० । ५० जखमी जाले.

त्यांजकडील दोनचार मातबर सरदार व टोपीवाले स्वार तीस पसतीसपर्यंत ठार झाले, व शें सवाशे जखमी जाले. दोन घटका लढाई चांगली झाली. फत्तेसिंगाच्या माहितगारीमुळें इंग्रजांकडे रसद व कुमक येते. (ग्वा.३-७-१०).

'सरदार पावागडाजवळ इंग्रजांपासून चार पांच कोसांच्या अंतरानें आहेत. विसाजीपंत, पाराजीपंत व भगीरथराव इंग्रजांभोंवताले फिरतात. नित्य गोळागोळी होतच आहे. ते गोल फोडून यांजवर येत नाहींत, हे त्यांजवर तुटून पडत नाहींत. उज्जनीहून पाटिलबावांस रसद चांगली मिळते. इंग्रजांस महर्गता आहे. त्यांचे पिच्छास आपली फौज आहे. साधल्यास लुटून घेऊं. सौ. आनंदीबाईनीं दादासाहेबाशीं भाषण केलें जे, इंग्रजांचा खर्च वाढतो, हें कार्याचें नाहीं. गुजरात प्रांत उजाड करावा आणि पोख्त सरंजामानिशीं पुण्यावर चाल करावी. तेथें आपणास भय काय? दोघे सरदार ते इकडे गुंतले आहेत. दुसरे तिकडे कर्ते पुरुष बळ बांधून उभे राहणारे कोणी नाहींत. येथें सुरतेंत बसून उगेच दिवस गमावूं नयेत. बोरघांटांत पलटणें पाठवून घांट बंद करावा. तिकडून मानाजी सिंदे व येसाजी सिंदे येतील व दाटी करतील. ही मसलत सुरत-वाले इंग्रजांस सांगितली. त्यांनीं मान्य करून कल्याणकडे मोहीम चालविली.

'चैत्र व॥ १४ स ( ३-५-१७८० ) इंग्रजांची गांठ होळकराचे फौजेशीं पडली. स्वतः तुकोजी हजर होते. लढाई चांगली झाली. कांहीं लोक पडले. सहा घटकांना पाटीलबावांकडील तोफा व सरंजाम आला. एक लढाई उत्तम प्रकारें इंग्रजांशीं करावी, मग छावणीस फिरावें असें सरदारांचें मानस आहे.' वरील लढाईसंबंधीं अहल्याबाई म्हणाली, 'आम्हांकडील लोकांचीं कामें चांगलीं होतात, परंतु उजेडांत आणणार कोणी नाहीं. न होत्याचें उजेडास येतें. दिवसच असे आहेत.' उत्तरेकडून नानास आलेल्या निरनिराळ्या इसमांच्या बातमीपत्रांतील हे सर्व उतारे आहेत. ( म. द. बा. १-७.)

ता. ८ मार्च रोजीं इंग्रज गृहस्थ ओलीस असलेले बडोद्याजवळ गॉडर्डच्या छावणींत आले. दहा दिवस तेथेंच बोलाचाली झाली. सिंद्याच्या वकिलास रजा दिल्यावर गॉडर्ड ईशान्येस आठ मैलांवरील पिलोल गांवीं ता. २ ते ४ मार्चपर्यंत राहिला. तेथें पाण्याची टंचाई झाल्यामुळें तेथून ईशान्येस चार मैलांवर कुनवाड येथें तो गेला. तेथून पूर्वेस सुमारें दहा मैलांवर महादजी व तुकोजी यांचा मुक्काम कामरोळ येथें असल्याची बातमी गॉडर्डास लागली.

तेव्हां तो ता. ३-४-१७८० रोजीं त्यांच्यावर चालून गेला. इंग्रजी सैन्याच्या तोफांच्या मारानें मराठी फौजा मागें हटून विरळ झाल्या. गॉडर्डनें कामरोळासच मुक्काम ठेविला. मराठे पूर्वेस पावागडच्या बाजूस सरकले. समोरासमोर लढण्याचें शक्य तितकें टाळून इंग्रजांस आपल्या अंगावर ओढून घ्यावयाचें आणि ते बरेच पुढें आले म्हणजे एकदम उलटून त्यांस नरम करावयाचें, असा महादजी तुकोजींचा कावा होता. पाठलाग करीत इंग्रजी फौज माळव्याकडे वळली तर त्यांस पाहिजेच होतें. परंतु दोन्ही सैन्यें केवळ बचावाच्या हालचाली करीत होतीं. सभोंवारचा सर्व प्रदेश उध्वस्त झाला होता. कामरोळाहून थोडें पुढें सरकून ता.२४ एप्रिल रोजीं गॉडर्डनें मराठ्यांवर हल्ला केला. थोडीशी चकमक उडाल्यावर मराठे परत गेले. यानंतर प्रत्यक्ष लढाई झालीच नाहीं. दोन महिने सामना होऊनही उभयतांत एकही लढाई झाली नाहीं. मुलूख बेचिराख झाल्यानें व पावसाळाही डोक्यावर आल्यानें गॉडर्डला छावणीकरितां सुरतेस परत जाणें भाग पडलें. ता. ८ मे रोजीं हार्टले वरिष्ठांच्या हुकमानें आपल्या तुकडीसह कल्याणच्या बाजूस परत गेला. गुजरातची मोहीम पुणें दरबारास प्रत्यक्ष कांहीं हानिकारक नव्हतीच, तेव्हां अन्य दिशेनें पुणेंकरास थोडा तरी शह बसावा म्हणून कल्याण प्रांतांत मुंबईकर इंग्रजांनीं उचल केली. ठाण्यास इंग्रजांची जी फौज होती तिनें एकाएकीं कल्याणवर हल्ला करून तें ठिकाण हस्तगत केलें, ( ११-५-१७८० ).

या युद्धांत इंग्रज हैराण झाल्याची हकीकत खालीलप्रमाणें मिळतेः— ‘ इंग्रज पोख्त सरंजामानिशीं चालून आले. राव सिंदे यांस आगाऊ बातमी होतीच. ते तयार होऊन मोकाबल्यास उभे राहिले. तोफांची मारगिरी तारफेची जाली. शेवटीं इकडील लोक आंत घुसले, हत्यार चाललें. शें दीडशें लोक जखमी व ठार जाले. तीन इंग्रज सरदार ठार झाले. इंग्रज सांभाळोन आपले गोटांत गेले. पाठीवर फौजा होत्याच. त्यानंतर दुसरे दिवशीं बारा पंधरा हजार पेंढारी उज्जनीहून येऊन दाखल जाले, त्यांस इंग्रजांभोंवतीं घेराघेरी करण्याचें बावांनीं काम सांगितलें. त्याप्रमाणें नित्य तलावा करून बैल, उंटें, घोडीं, दोन चार वेळ वळून आणिलीं. बडोद्याहून रसद येत होती ती दरोबस्त लुटली. माणूस जाऊं येऊं न पावे. तेणेंकरून इंग्रज तंग जाले. पलटणाच्या बंदोबस्तानें त्यांची कही येत असतां त्यांजवर पाटिलबावांनीं धारराव सिंदे

पाठविले. त्यांनीं पलटणाशीं गांठ घातली; इकडे पेंढाऱ्यांनीं कही लुटली. लढाई मातबर जाली. धाररावांचा बसता घोडा पडला. इंग्रज लोकही फार मारले गेले. इंग्रज खटे होऊन कही गमावून माघारे गेले. सरदारांनीं त्यांस अंगावर घेतलें. निभाव होईना तें जाणून बडोद्याचे आसऱ्यास गेले. त्यांस फौजांनीं घेरिलें. कही बाहेर निघों देत नाहींत. बंदी केली आहे. थोडेच दिवसांत आयास येतील. तळेगांवचीच गत होण्याची संधि होती. या फौजां-पुढें आपला तग निघत नाहीं ऐसें पुरतें समजोन गॉडर्डनीं मागें सुरतेस कूच केलें. पाठीवर सरकारच्या फौजा आहेतच.' मे ता. २६ पावेतों नर्मदेवर इंग्रजांचा मुक्काम होता.

या युद्धांतील अनेक अंगांच्या अशा प्रकारच्या किती तरी हकीकती आहेत. इंग्रजी कागदांत मराठ्यांची बाजू स्पष्ट कळतच नाहीं. सिंदे होळकरांचें गॉडर्ड-पुढें कांहीं चाललें नाहीं, असेंच इंग्रजी मत त्यांत दिसतें. त्याच्या मुकाबल्यास त्या वेळच्या मराठी कागदांतील हकीकती अवश्य ध्यानांत घेतल्या पाहिजेत, म्हणजे वरील युद्धांत गॉडर्डनें योजलेला प्रचंड डाव गुजरातेंत सपशेल फसला अशीच खात्री होईल.

ता. ३-६-१७८० चें वर्तमान. ' पाटीलबावा छावणीस जाण्याकरितां माघारे फिरोन पायागड जवळ हालोल येथें मुक्काम केला. मजल दर मजल उज्जनीस जावें हा विचार आहे. पहिल्यानें बऱ्हाणपुरास जाण्याचा निश्चय होता. परंतु त्यामार्गें फौजेस पाणी नाहीं. दाहोदची वारी पार जाऊन महेश्वरावरून बाग-पुरीस जावें हाही मार्ग आहे. येथील विचार कारस्थानीचे फार आहेत. काम होईपावेतों लवणभंजन यथास्थित होतें. मग त्या गांवचें स्मरण नाहीं.'†

उत्तरेंत गॉडर्डशीं सिंदे होळकर लढत असतां दक्षिणेकडून गणेशपंत बेहे-ऱ्यानेंही इंग्रजांस दाबण्याची कामगिरी चांगली केली. त्यानें सुरत अठ्ठाविशीचे महाल लुटून प्रत्यक्ष सुरतेसच शह दिला. तेव्हां त्याचे बंदोबस्तास गॉडर्डनें ले० वेल्श यास पाठविलें. त्यानें २३ एप्रिल रोजीं गणेशपंतावर रात्रीचा छापा घालून, त्याचे १०० लोक कापून काढिले आणि लगोलग दक्षिणेकडे येऊन दंमणजवळचे पार्नेरा, बुगवडा व इंद्रगड हे तीन किल्ले हस्तगत केले. ही

† ग्वा. ३-१२; खंड १९ ले. ११९ व १३६.

मोहीम पुढें पावसांतही चालली. 'गणेशपंतावर इंग्रजांनीं छापा घातला, ते समयीं लढाई झाली. पंतास दोन तीन जखमा झाल्या. सांभाळून निघोन मुल्हेरजवळ हातगडाकडे आले. त्याबरोबर इंग्रजांनीं पार्नेरावर मारगिरी केली व किल्ला घेतला,' ( ता. २६-८-१७८० ). या वेळीं मराठ्यांचें आरमारही जोरानें कामागिरी करीत होतें. 'सर्वोत्तम शंकर फडके यास चार इंग्रज सांपडले आहेत ते पक्क्या बंदोबस्तानें अटकेंत ठेवून पोटाची बेगमी करणें. चौकी पहारा चांगला असावा. बोभाटा येऊं नये.' असा हुकूम सुवर्णदुर्गचे अधिकाऱ्यास गेला होता, त्याप्रमाणें चार निरनिराळ्या किल्ल्यांवर त्यांची रवानगी झाली. ' बरोबर माणसें, कारकून व डोल्या देऊन, पुण्यास जाणें असें बाह्यतः समजावून कोणास न कळत गुप्तपणें चार किल्ल्यांवर बंदोबस्तानें रवाना केले. चालतीं औषधें, खडीसाखर वगैरे उपयोगी जिन्नस बरोबर दिल्हे.' ( जानेवारी १७८० ).*

**४. गुजरात मोहिमेंतील फसगती.**—बाबाजी भिकाजी व राघो भिकाजी हे दोघे ( बंधु ? ) पेशव्यांच्या तर्फेनें अमदाबादच्या कारभारावर होते. ता. २६-११-१७७९ रोजीं त्यांनीं पुण्यास पंत प्रधानास पत्र लिहिलें त्यांतील मतलब. 'फत्तेसिंगाकडे कारकून व पत्रें कुमक करण्याविशीं पाठविलीं. त्यांनीं कळविलें, कीं आमचा अर्थ किमपि दुसरा नाहीं. परंतु आमचा प्रांत इंग्रजांचे तोंडांत, आश्विन मासीं सरदारांच्या फौजा इकडे यावयाच्या, त्यास अद्यापपावेतों ठिकाण नाहीं. फौजा आल्या म्हणजे मजला इंग्रजांचे पारिपत्यास चुकावयाचें नाहीं, असें उत्तर आलें. चंद्रराव पवारावर येथील फौज रवाना केली. त्यांची व पवाराची लढाई कार्तिक व॥ ५ स ( २८-११-१७७९ ) पेटलादेनजीक जाहली. परस्परें घोडीं व माणसें ठार व जखमी फार जाहलीं. माघारे फिरून येतांना दोन तोफा पवारांकडे गेल्यामुळें सेर बाजू त्याची जाहली. सांप्रत बोरसदेस शह बसला आहे. अमदाबादेसही बसेल. मुलकी ऐवज बंद जाला, कर्ज मिळत नाहीं. तथापि हिंमत धरोन दिवस काढीत आहों. सरकारची फौज आली म्हणजे गायकवाडही

---

* भा. व. २ प. या. ५४, ६०, ६६, ७०, ७४, ७५, ७७; ग्वा. ३-५; का. सं. प. या. २२४; डफ.

सामील होतील. या उपरी फौज येण्यास विलंब लागल्यास केली चाकरी व्यर्थ जाऊन संस्थानास अपाय झाल्यानें गुजरात प्रांतच गेला असें समजावें. दिनावधि होऊन उपेक्षा न झाली पाहिजे.' या नंतर पुनः हे गृहस्थ ता.१०-१२-१७७९ रोजीं लिहितात, 'चंद्रराव पवाराचा जमाव वाढत चालला आहे. आम्ही येथील ठाण्याचा बंदोबस्त केला आहे. पवाराचा सरंजाम भारी म्हणून आम्ही त्याजवर चालून जाण्याचा घाट करीत नाहीं. सिंदे होळकरांच्या फौजा रवाना झाल्या असें धणी लिहितात, तें खोटें कसें मानावें! परंतु अद्यापि फौज आली नाहीं. ती येते म्हणून चातक न्यायें वाट पहात आहों. ती फौज आल्यावर मिळणें त्यास प्राप्त आहे. जिकडे अमदाबाद तिकडे बडोदेकरांस राहणें प्राप्त. येथें शिबंदीचें देणें पांच सात लक्ष रुपये आहे. बडोदेकर कुमक करीत नाहींत. सुरतेहून जलचर (इंग्रज) व योगिराज या प्रांतीं येणार, या आवईनें आमचे शिबंदीचा धीर सुटूं लागला आहे. या उपरी जलदीनें फौज येऊन पोंचली तरच परिणाम आहे. रात्रीचा दिवस करून रवानगी व्हावी. आम्ही पुढें जाऊन फौजेस घेऊन येऊं आणि पवाराचें पारिपत्य अगोदर करूं. याउपरी उपेक्षा झाल्यास स्थळास अपाय होईल. आम्ही अर्थें प्राणें जाऊंच, परंतु सरकारचें मातबर संस्थान जाऊन माळव्यासही वेध लागेल. संस्थानचा बचाव व्हावयास्तव या समयीं अवज्ञा करून विनंति लिहिली आहे.' असें निक्षून लिहिणारे स्वामिनिष्ठ सेवक त्या वेळीं होते. या दोघांनीं पुढें अहंमदाबादचे लढाईंत कसा अद्वितीय पराक्रम केला, त्याचें वर्णन यथावकाश येईल.

गुजरातेंत येतांना खानदेशांत 'इसरवाडी व नबाबपुर हे दोन गांव होळकरानें लुटले व जाळले. पेवें नेलीं. पाटीलबावांचे राऊत मारिले, त्यामुळें इभ्रतींत विक्षेप जाला. होळकरास या वेळीं चापून सांगावें तर बाहेर फूट दिसेल. आंत कसेंही असो, बाहेर दाब राखून मसलत पुरी केली पाहिजे. पाटीलबावाही सांगावयास चुकत नाहींत. त्यांचें वचस्येकं मनस्येकं आहे त्यास काय करावें! सांगावयाचे रीतीनें सांगत गेलों व पुढेंही सांगूं म्हणतात. तदनंतर बावांनीं होळकरांचे नारो गणेश व सुलतानजी लांबहाते यांस शब्द लाविला. नारो गणेशानें उत्तर केलें, आमचे येथील कारभारांत कांहीं बंद राहिला नाहीं, माझें कोणी ऐकत नाहीं, तेव्हां मी तेथें राहणेंही योग्य नाहीं. तुमचेजवळ

येऊन राहतो. बावांनीं म्हटलें, आपण मोहिमेवर चाललों, त्यास तुमचें साहित्य काय आहे ! त्यांनीं उत्तर दिलें, 'आम्हांजवळ दहाहजार फौज आहे, त्यांस पोटास नाहीं, यावें कोठून !' बावांनीं ऐकून घेतलें. परिहार कांहीं जाला नाहीं. इंग्रज गायकवाड एक झाले, त्यांचे शहास जाणें, सरंजाम पोख्त पाहिजे. विसाजी आपाजी आठवले, पाराशर दादाजी व भगीरथराव सिंदे यांस अहंमदाबादचे शहावर पाठविलें. त्यांचे कुमकेस आणखी फौज पाठविण्याचें ठरलें.' ही हकीकत बावांनीं सांगितल्यावरून सदाशिव दिनकरानें ता.२१-२-१७८० च्या पत्रांत नानास लिहून कळविली. सदाशिव दिनकर करमरकर (?) व नारो शिवदेव पोंक्षे हे दोन नानांच्या भरंवशाचे इसम व्यवहारांत व लेखांत विशेष प्रवीण असे महादजीजवळ पुढील दहापांच वर्षे केव्हां बरोबर तर केव्हां एकएकटे असे राहत असून, त्यांचा पत्रव्यवहार विस्तृत व मनोरंजक आहे. वरील पत्रावरून मराठ्यांकडे कशी अव्यवस्था होती हें लक्षांत येईल. ( ग्वा. ४-१०,१३ ).

ता. २७-२-८० रोजीं सदाशिव दिनकर लिहितो, 'इंग्रज व फत्तेसिंग अमदाबादेवर चालून गेले. तेथील मामलेदार व शिबंदी व आरब यांनीं एकीकरून लढाईची शर्थ केली. बाहेर निघोन इंग्रज–गायकवाडांवर कोसळले. आराड्यावर चालून जाऊन तलवारीचें झुंज करून सरदार मारणें, कंपेश हजार माणूस ठार व इतकेंच जखमी करणें, दोन तोफांचे कानेंत खिळे मारून फिरून शाबूद शहरांत जाणें, या कर्मास मातबराच्यानें हिंमत होणार नाहीं, तें त्यांनीं केलें. दोन वेळ बाहेर निघोन झुंजोन इतकें कर्म केलें तेणेंकरून त्यांची हिंमत चढली. इंग्रजांनीं दोन वेळ तोंडांत खाऊन खजील जाले. तिसऱ्यानें शहरावर चालून आले. त्याजवर इंग्रजांनीं कृत्रिम तोफा चालविल्या. लांकडाचे तुकड्यांनीं माणूस फार जाया जालें. राहिलें तें बेहिंमत होऊन पळून शहरांत गेलें. तेव्हां इंग्रज शहरांत शिरले. शहर व भद्र घेतलें. सीदी व आरब फार मारले गेले. मामलेदार निघोन लुणावाड्याकडे गेले. पाठीमागून मदत असती तर शहर वांचून इंग्रजांचें पारिपत्य होतें. पाटिलबावानीं विसाजीपंत, भगीरथराव, पाराजीपंत यांस फार लिहिलें; परंतु फत्तेसिंगाचे खतऱ्यामुळें संशयांत राहिले. तापी उत्तर तीरास बावा येतांच त्यांस अंमदाबाद गेल्याचें वर्तमान समजलें. तेव्हां सुरतेच्या तलाव्यास फौजा पाठवून लगोलग कूच करून चालले. सदाशिव मल्हार व विसाजीपंत यांनीं

जंबूसर परगण्यांत दंगा आरंभिला. पाटीलबावांचें मानस इंग्रज गायकवाडांशीं गांठ घालावी हेंच आहे. चहूंकडून ताणून जकड बसविली तर आयास येतील. उद्यांच नर्मदापार होतात.'

गुजरातच्या मसलतीचा सर्व भार कुलअखत्यार गायकवाडांचे मसलतीचा सुद्धां आपल्याकडे असावा अशी शिंद्यांची मागणी असून नानानेंही गायकवाडांस व इतर सर्वांस तसेंच कळविलें होतें. महादजी म्हणतो, 'गायकवाडांची शिफारस दरपत्रीं लिहून येते, कीं त्यांसीं साधनक्रम राखावा. त्याप्रमाणें राखीत असतां, मुद्दे देखील कबूल करीत असतां, गोंदोबांनीं इंग्रजांचें आर्जव करून दरबार खर्च गांव इनाम घेऊन, फत्तेसिंगास बगलेंत मारून आपण झुंजावयाला सिद्ध जाले आहेत. बाहेर गोड बोलतात, पत्रें मातबर लिहितात. त्यांस पुण्याहून बाळाजीपंत रानडे समजावितात, त्यांजवर पक्का विश्वास. रानडा फौजा तिकडून पाठवितो, त्यांस दस्तकें सरकारांतून मिळतात, कोंडाईबारी बंद करावी, आमच्या देखील फौजा येऊं न द्याव्या, असें लिहीत असतां गायकवाडाच्या फौजा येतात. रानड्यानें सर्वस्वी सरकारचा नाश केला, हें नानांनीं ध्यानास आणूं नये. कारकुनांवर विश्वास धरून ते सांगतील त्याप्रमाणें करीत जावें, सरकारच्या हरामखोरांचें पारिपत्य व्हावें, त्यांच्या जप्त्या व्हाव्या, तें न होतां, उलटी फौज कुमकेस येते, शिफारस पत्रें येतात, त्यास काय म्हणावें? कारभारी गोंदबानें भारी सुरतेपासून इंग्रजांकडे अंग दिलें. धन्यास समजाविलें, कीं आम्ही हरिपंत तात्यांच्या समागमें चाकरीस असतां, उफराटा सरकारांतून आम्हांस रुपया मागतात. इतर सरदार नवे सरंजाम घेतात. आम्हांस कां नाहीं नवी जहागीर देत! असें फत्तेसिंगास समजावून गोंदबानें आपले घोरणीं लाविलें. इंग्रजांकडे पक्कें अनुसंधान केलें. आपण गांव घेऊन फत्तेसिंगास फसविलें. मनसबा करणें तो गोंदबानेंच करावा. गायकवाड सरकारलक्षांत आहेत असें समजून सोनगड पासून नर्मदेपावेतों गायकवाडांचा मुलूख आम्हीं राखवला. रक्षणच केलें. त्यांचे महालांस उपसर्ग दिला नाहीं. दहा बारा पत्रें फत्तेसिंगास पाठविलीं, उत्तरच नाहीं. राजकारणाची वाट पाहिली कीं आज उद्यां येऊन भेटतील. शेवटीं आम्ही होऊन संदर्भ लाविला असतांही त्यांचे गांवीं नाहीं. इंग्रज व गोंदबा एक शरीर, पक्का खंबीर नेट धरून आहेत.

तथापि आम्ही मनसब्याचे रीतीस चुकत नाहीं. देहावर आले उत्तम. निदान श्रीमंताचें दैव थोर आहे. सरकारांत गायकवडांची एकनिष्ठता त्यांचें बोलणारांनीं समजाविली, तीच आपणास खचित वाटते. झाडून सरकारचा मुलूख अमदाबाद सुद्धां गायकवाडांनीं घेतला असतां त्यांजबद्दल नानांचे मनांत वांकडें येत नाहीं, विषाद वाटत नाहीं, हें अपूर्व वाटतें. हरामखोर हें ध्यानांतच येत नाहीं. तर मग आम्हांस तरी इकडे गोंवून पाडावयाचें कारण काय! हरामखोराचें पारिपत्य करावें, एकदम देशच्या व गुजरातेंतील महालांची जप्ती बेमुलाजा करावी. गायकवाडांचा प्रतिकार न केल्यास आम्ही मोकळे जाणावें, शब्द लावूं नये. गायकवाडांनीं इंग्रजांकडे संदर्भ लाविला त्याचाही अनुभव घेतला. केवळ कृतिमाची राशी. त्यांत मदिरापानी. यांस आधार लागल्यास देहावर राहत नाहींत, तद्वत् त्याचा विचार जाला. गोंदबांनीं त्यास बगलेंत मारिलें. त्यांजकडील बाळाजीपंत रानडे पुण्यास भलतेंच समजवितात तें मान्य होतें.' हा सर्व खेळ गोंदबा व रानडे खेळत होते.

ता. २६-१-१७८० रोजीं इंग्रजांशीं कायम तह केल्यावर सुद्धां गायकवाड १-३-१७८० रोजीं नानास लिहितो, 'आजपर्यंत ममतेचें लक्ष आपलें आमचे ठायीं जाणोन आम्ही सर्वस्वीं अर्थें प्राणें सरकारसेवेंत तत्पर. दुसरा अर्थ नाहीं. सांप्रत जलचरांचा प्रकार वृद्धिंगत. कोणीकडील साहित्य समयास न आलें. प्रांताचा विध्वंस. कारस्थानी समयोचित ते करावी लागली. परंतु ज्यांत सरकार मसलतीस उपयोग त्याजवर नजर आहे. यांत अंतर असेल तर शपथ असे.' प्रत्यक्ष महादजीला सुद्धां तो त्याच वेळीं लिहितो, 'आपण थोर, सर्व प्रकारें सांभाळ करीत आलां, पुढेंही करतील. आम्ही आपल्याशिवाय काडीमात्र नाहीं. आम्ही सेवक पदरचे असों. या दरबारचा बंदोबस्त पक्के रीतीचा करून देणें. सर्व भरंवसा आपला आहे.' म्हणजे इंग्रजांस सामील होऊन पुनः ही भाषा. यासच म्हणावें मराठ्यांचा स्वभाव.

या प्रकरणावरून मराठशाहीच्या कारभारांतील गोंधळ उत्कृष्ट व्यक्त होतो. कारकून व हेर सांगतील त्या भरंवशावर कारभार चाले. लहानापासून मोठ्यापर्यंत प्रत्येकाचा मतलब. सरकारच्या हिताचा दरकार कोणासही नाहीं. नाना लिहितो, 'होळकर वीस हजारांचा सरदार असतां, फौजेची व कारभाराची ही गत. भाद्रपदापासून सुरतेच्या तोंडावर उभयतां सरदारांनीं जावें म्हणजे

गायकवाड येऊन मिळतील, इंग्रजांचा फैलाव होणार नाहीं, असें सांगत आलों. त्याप्रमाणें फौजा गेल्या असत्या तर इतका नाश न होता. असो. होणार तें जालें, आतां तरी उभयतांनीं गांठ घालून पारिपत्य करावें. सर्व जिंमा पाटिलबावांचाच आहे, ते सर्व करतील.' त्यावर पाटिलबावानें उत्तर केलें. 'फौजा इकडे वेळेवर कां नाहीं आल्या! फौजा न आल्यामुळें गायकवाड इंग्रजांशीं मिळाले कीं अगोदरच अनुसंधान व तहरहाचा निश्चय करून मिळाले!' अशा बोलाचालींत मसलत बिघडत गेली. एक हुकमत किंवा व्यवस्था बिलकूल नाहीं. कारभाऱ्यांनीं व कारकुनांनीं यजमानास वाटेल तें समजवावें, आणि नानातऱ्हेच्या अडचणी उपस्थित कराव्या, असा प्रकार चाले. या चार महिन्यांतलें नाना महादजींचें वाग्युद्ध व तत्संबंधींच्या कागदपत्रांचा प्रचंड विस्तार पाहून मराठ्यांचें राजकारण कसकसें बिघडत गेलें तें चांगलें समजून येतें. महादजीच्या शिफारसीप्रमाणें नानानें गायकवाडांचीं व त्यांच्या साहाय्यकांचीं घरेंदारें सर्व जप्त केलीं. (ता. ६-५-१७८० ). $

'राजश्री फत्तेसिंगरावाचें राजकारण अंमलांत येईना सबब गोविंदरावांस पदाचीं वस्त्रें देण्याविशीं नानानें पुण्याहून सरदारांस लिहिलें, त्याप्रमाणें सरदारांनीं वस्त्रें दिलीं; आणि दहा हजार फौजेनिशीं त्यांची रवानगी अमदाबादेकडे केली; आणि फत्तेसिंगरावांचे मुलकाची जप्ती करविली, (८-६-१७८०). गोविंदरावास फत्तेसिंगानें प्रथम आपल्याकडे मिळवून घेतलें होतें, पुढें तो फुटला असें ग्वा. ४-९ वरून दिसतें. हा लेखांक एक सांकेतिक पत्र असून अवश्य वाचण्यालायक आहे. त्यांत प्रकृति पुरुषाचें रूपक अमदाबादेवर बसविलें आहे.

गोविंदराव गायकवाड लुनावाड्याहून निघून उभयतां सरदारांस येऊन छावणींत भेटले. हेही सामोरे जाऊन त्यांस घेऊन आले. फत्तेसिंगासंबंधानें अहल्याबाई बोलली, 'पाटीलबावांनीं त्यांस आपल्याकडे निघून येणें म्हणून सूत्र लाविलें, त्यावर फत्तेसिंगांनीं कोणा भल्या माणसा हातीं सांगून पाठविलें कीं पहिले श्रीमंतांस व तुम्हांस जितकें लिहिणें तितकें लिहून चुकलों. परंतु कोणाकडून कांहीं न झालें. आतां मी इंग्रजांचे अटकेंत आहें. यांस कांहीं

$ ग्वा. ३-५; ४-११, १३, १४, १५, १९; स. मा. रो. २२१; खंड १९-१४४ व खंड १०-२५३-५५.

सुगावा लागला तर, मुलेंमाणसें सुद्धां एखादे जागीं अटकावून टाकतील. यास्तव तुम्ही आम्हांशीं कांहीं बोलूं नका. पाटीलबावांचा विचार आहे कीं, एक वेळ लढाई करून फत्तेसिंगासही घेऊन यावें.' परंतु समोर लढाईस येण्याचें उभयतांनीं टाळिलें. एकंदरींत चार महिने मोहीम करून इंग्रजांसही लभ्यांश कांहीं झाला नाहीं. पुढें मुंबईकरांनीं गॉडर्डास कोंकणच्याच मोहिमेस बोलावून नेलें; आणि तो छावणीसाठीं मे महिन्यांत नर्मदा उतरून सुरतेच्या बाजूस आला. सुरतपासून दमण वसई पावेतोंच्या भागांत व पूर्वेस खानदेशांत अनेक खटपटी त्यानें चालूच ठेविल्या होत्या. फत्तेसिंगराव जरी इंग्रजांस मिळाला, तरी त्याजबद्दल त्यांस संशयच होता. म्हणून त्यास स्वतंत्र न सोडतां जवळ जवळ कैदेदाखल स्वतःचे नजरेंत गॉडर्ड ठेवीत असे. महादजीनें मात्र त्याजकडे संधान चालू ठेवून शिवाय गोविंदरावास हाताशीं धरलें आणि त्याजवळ थोडी फौज गुजरातच्या बंदोबस्तास ठेवून, मृगारंभीं तो प्रांत सोडून आपण व होळकर उत्तरेकडील हालोल गोहदच्या वाटेनें माळव्यांत आले.

गुजरातची मोहीम तशीच टाकून सरदार लगोलग स्वस्थानीं गेले, त्यांनीं मागें फौज वगैरे ठेविली नाहीं, असा नानानें आक्षेप घेतला, पण ही गोष्ट खरी नाहीं. फत्तेसिंग इंग्रजांस मिळाल्याबरोबर महादजीनें गोविंदरावास हाताशीं धरून त्याची स्थापना पांच सात हजार फौजेसह इंग्रजांस शह देण्याकडे केली. परत जातांना गोविंदराव चंबळ पावेतों सरदारांबरोबर बोलाचाली करीत गेला. त्याचे स्वतःचे दोन हजार स्वार, शिवाय होळकर सिंद्यांकडील एक एक पथक मिळून सहा हजार फौज दिली आणि गुजरातेंत विदा केलें, तेव्हां त्यानें अंमदाबाद बडोद्याकडे हंगामा सुरू करावा असें सांगितलें. पण त्याचे रवानगीविशीं तट पडला; लोक कोणी माघारे जाण्यास कबूल नव्हते. तथापि जमवाजमव करून गोविंदराव जुलईंत परत गेला आणि तिकडे सरदार, पठाण वगैरे जमवून उद्योग करूं लागला. 'गोविंदरावावर आतां श्रीमंतांची कृपा झाली, फत्तेसिंगास गुजरातेंतील अंमल करूं देणार नाहींत. आनंदीबाई सुरतेहून बडोद्यास जाणार, सबब कीं गायकवाडांस आपले पक्षीं आणावें. निदान कांहीं खर्चास तरी मागावें.' अशी हवाल गुजरातेंत चालून तिकडे या गायकवाड बंधूंचे खटके उडूं लागले.*

---

* म. द. बा.१-७,१०-१२,१७; का.सं. प. या. ३२६. ता. ४. ८. १७८०.

एकदां महादजीला अशी बातमी कळली, कीं पुण्याहून नानाचे वकील फत्तेसिंगाकडे येऊन परभारें दादा व इंग्रज यांच्यांशीं बोलणें करीत आहेत. यामुळें आपणास तोंडघशीं पाडणार, असें वाटून महादजीचा संताप झाला.

'बावांकडे वर्तमान आलें कीं, पुण्याहून गोपाळराव रामचंद्र फत्तेसिंगाकडे आला, त्याजबरोबर श्रीमंतांकडून कारकून व हुजरे आले. येते समयीं सुरतेस सांबाकडे जाऊन मग गायकवाडांकडे आले. दोन तीन दिवस राहून मागती सांबाकडे सुरतेस गेले. याजवरून पाटीलबावा बहुत क्रुद्ध आहेत कीं यांस परभारें अनुसंधान व सलूख करावयाचा होता, तर मसलतीचा जिमा आमचा म्हणोन आम्हांस वारंवार लिहितात याचा अर्थ काय ! बहुत विषण्ण आहेत.' (२-५-१७८०). इकडे फत्तेसिंगास तरी इंग्रजांचा विश्वास बिलकूल वाटला नव्हता. पुण्याकडील फौजा आल्या नाहींत, तेव्हां पेंच पडून तो इंग्रजांचे हातांत गेला. 'फत्तेसिंगाकडील दोघे गृहस्थ नोव्हेंबर १७८० त अहल्याबाई, तुकोजी व महादजी यांस पत्रें घेऊन आले. जाबसाल कीं आम्हीं इतके दिवस इंग्रजांचे पेंचांत होतों. त्यांच्या सलुखानें कांहीं स्थळें मोकळीं केलीं. आतां तुम्ही व आम्ही मिळून इंग्रजांचें पारिपत्य यथास्थित करूं या.' सारांश, युद्धांत लढण्यापेक्षां कारस्थानीवरच मुख्य भिस्त राहिली.

फत्तेसिंगास इंग्रजांचे कच्छपीं ओढणारा मुख्य गृहस्थ त्याचा गोंदबा. हा गोविंद गोपाळ कामतेकर सारस्वत ब्राह्मण, उपनांव कोलवाळकर, राहणार जि० रत्नागिरि. याचें घराणें बडोद्यांत सुप्रसिद्ध आहे. पानिपतचे पूर्वीच हे गायकवाडांचे पदरीं राहूं लागले. दमाजी गायकवाडानें पूर्वी बडोद्याहून ता. ७-६-१७६१ रोजीं राघोबादादास लिहिलें, 'आम्ही पानिपतस्वारींतून ता. ६-५-१७६१ रोजीं बडोद्यास आलों. सर्व मवासी उठले आहेत. भडोचकर जंबूसर मारणार असें कळतांच बडोद्याहून फौज पाठविली. त्या वेळीं गोविंद गोपाळ जंबूसरीं होते. त्यांनीं सर्व निवेदन केलेंच असेल.' (ऐ.टि.१-५३). प्रथम वाडा सिनोर, काठेवाड वगैरे ठिकाणीं मुलूखगिऱ्या करून, मोहिमा, हिशेब व मुत्सद्देगिरीच्या सर्व बाबतींत गोंदबानें आपली हुशारी प्रगट केली, तेणेंकरून फत्तेसिंगाची मर्जी त्याजवर बसली. त्यानें पैशाचीही मदत गायकवाडांस पुष्कळ केली. तथापि दोघांचें पुढें जमलें नाहीं आणि फत्तेसिंगानें त्यास कारभारांतून काढिलें, त्याचें कारण बहुधा असें असावें, कीं इंग्रजांशीं संधान करून फत्ते-

सिंगाचा व गॉडर्डाचा तह त्यानें जमवून आणिला, तो पुढें मराठेमंडळास जाचक झाला. त्यावरूनच नाना महादजी वगैरे सर्व प्रमुख मंडळी गोंदबास पाण्यांत पाहूं लागली. पुढें स. १७९४ त गोविंदराव गायकवाड बडोद्यास स्थानापन्न झाल्यावर नानाफडणिसानें गोंदबास त्याचा कारभारी नेमिलें. नंतर त्यानें आबा शेलूकर व मल्हारराव गायकवाड यांजवर मोहिमा करून त्यांस नरम आणिलें. गोंदबाचा मुलगा गोपाळ गोविंद हाही बापाबरोबर कामें करीत असतां तरुणपणीं निवर्तला, त्यामुळें गोंदबास वार्धक्यांत फार दुःख झालें; आणि तो कारभारांतून निवृत्त झाला. प्रस्तुतच्या इंग्रजांशींच चाललेल्या युद्धांत या गोंदबा दिवाणाचें नांव एक दोन वर्षें वारवांर येतें. ( वंशावळ पहा ).

**५. नाना महादजींच्या उखळबेऱ्या.**—या वेळच्या घडामोडी, सरदारांचे व कारभाऱ्यांचे रुसवे, त्यांचीं परस्पर वैमनस्यें व स्वार्थासाठीं इतरांस खालीं ओढण्याचे प्रयत्न, तसेंच कित्येकांची राष्ट्रसेवा व कर्तव्यनिष्ठा इत्यादि अनेक बाबतींसंबंधीं इतका कांहीं प्रपंच तत्कालीन पत्रव्यवहारांत झालेला आहे, कीं त्यावरून जरी तत्कालीन अवनतीचेंच आविष्करण होतें, तरी ऐतिहासिक दृष्ट्या तोच आज आपणांस बोधप्रद असल्यामुळें, त्याचा अल्प उल्लेख येथें करणें जरूर आहे.

या स्वारींतील नानाविध भानगडी सांगूं लागल्यास त्यांचें एक स्वतंत्रच पुराण होईल. महादजी व नाना यांचीं मनें एकमेकांविषयीं इतकीं संशयग्रस्त झालीं होतीं, कीं एकानें यत्किंचित् कांहीं केलें कीं दुसऱ्यास भरपूर संशय येई. त्यांत खरा कोण व खोटा कोण हें ठरविणें सुद्धां आतां मुष्किलीचें आहे. स. १७७९च्या आश्विनांतच सिंदे होळकर मोहिमेवर निघून कां गेले नाहींत, त्यांस काय अडचणी होत्या, व त्या अडचणींचें निरसन नानाकडून होणें किती शक्य होतें हें खात्रीनें समजणें कठिण आहे. डिसेंबरांत नाना महादजींची उघड फाटाफूट झाली. त्याच वेळेस नानानें चौकडींचें जंगी कारस्थान उभारलें होतें. आश्विन कार्तिकांत सिंदे होळकर गुजरातेंत येते तर फत्तेसिंग त्यांस मिळून गॉडर्ड हलका पडला असता. फेब्रुवारींत ते नर्मदेवर आले, त्यापूर्वींच फत्तेसिंग व गॉडर्ड यांचा तह होऊन अहंमदाबाद म्हणजे गुजरातची राजधानी हातची गेली. बरें, पुढें तरी इंग्रजांशीं समोर सामना करावा, तर त्यांच्या तोफांपुढें आपला निभाव लागेल अशी महादजीस खात्री वाटेना.

पराभव झाल्यास सर्वच डाव आटपला असता. तुकोजी होळकर महादजीस मनापासून साह्य करीत नव्हता. अस्तनींतल्या निखाऱ्याप्रमाणें त्यास महादजीनें जवळ बाळगिलें होतें. अशा परिस्थितींत, रात्रीं बेरात्रीं छापे घालून, अन्नपाण्याची टंचाई पाडून इंग्रजांस दमविण्यापलीकडे आपल्या हातून जास्त कांहीं घडणें शक्य आहे असें महादजीस वाटलें नाहीं. कोणीकडून पावसाळ्यापावेतोंचे दोन तीन महिने कसेबसे लोटून परभारें इंग्रजांस थकविण्याचा बेत महादजीनें ठरविला. त्यांचे दोन वकील उगाच महादजीजवळ चैनींत खाऊन पडले होते, त्यांस सोडून दिल्यानें इंग्रज खूष होतील व तहाच्या हुलकावणींत त्यांस गुरफटवून कांहीं लभ्यांश साधला तर पाहवा, अशा इराद्यानें त्यानें ते वकील आपण होऊन परत पाठवून दिले. आज नाहीं उद्यां त्यांना सोडून देणें भागच होतें. त्यांचीं डोचकीं मारल्यानेंही इंग्रज नरम येणारे नसून, उगाच जास्त चिडून निष्कारण मराठ्यांच्या पाठीस लागते. अशा दूरवर विचारानें महादजीनें ते वकील सोडले. ही गोष्ट नानास आवडली नाहीं. महादजीनें इंग्रजांशीं सख्य करण्याची हूल उठविली, ती नानास कांहीं काळ खरीच वाटली. अशा रीतीनें नाहीं नाहीं तीं खुसपटें काढण्याची उभयतांची प्रवृत्ति झाली, तीच त्या वेळच्या कागदांत दिसून येते महादजी काय लिहितो पहा.

'फार्मर वगैरे इंग्रज सोडले. या अन्वयावरून मजकूर विस्तारयुक्त पत्रीं आज्ञापिला तीं पत्रें बाबांनीं पाहून उत्तर केलें जे, 'आमची विकृति कारभारी यांस फार आली, म्हणून जांबगांवींच आमचें पारिपत्य करीत होते. तो डाव चुकला. पण चित्तांतलि दंश कसा जातो! मसलतीचा जिमा कबूल केला असतां आतां कुमक कां मागतात! आंतून गायकवाडाशीं संदर्भ आहेच. इंग्रजांस त्यांनीं मेळवून घेतलेच आहेत. एक होऊन तोफखान्यानें इंग्रज (शिंद्यांस) सडकील, फौजेनें गायकवाड दमवील, असा मनसबा कारभारी यांनीं आरंभिला. परंतु ज्याचे निष्ठेत भंग नाहीं तो कधींच अपेश पावणार नाहीं. दोन महिने इंग्रज-गायकवाडांशेजारीं दों कोसांवर आमचा मुक्काम. सोबती अस्तनींत, त्यांनीं अंगसूत्रें अनुसंधानें खेळविलीं. चिंतो विठ्ठल, सदाशिव रामचंद्र वगैरेंनीं कोणेविशीं कसूर केला नाहीं. बातम्या मनस्वी पाठवून छापे आणिले, दगे केले, तेणेंकरून इंग्रजगायकवाड फजित पावत गेले. झुंजांत घोडे माणूस जखमी अगर ठार मारत गेले ते आमचेच. इतर कोणाचें

मेलें नाहीं. होळकरांनीं चार दिवस मेहनत केली, त्यांसही मना केलें, कीं तुम्हीं कोठें जाऊं नये, कांहीं करूं नये. अशा घरांतच जुटी पडल्या. याप्रमाणें संगत असोन, आम्ही तों भ्याडच. झुंजाचे समयीं आम्हांस हींवताप येत असतो. असे आम्ही इंग्रजांवर काय चालून जाणार ! इंग्रजच चालून आला, तेव्हां श्रीमंतांचे प्रतापानें फजित पावला. आमच्या तरवारीस अगर गोळीस शक्तिच नाहीं. श्रीमंतांचे कृपेंकरूनच इंग्रजांचे सरदार मरत गेले. असें दोन तीन महिने होत असतां दरम्यान फत्तेसिंगाचे कारभारी गोंदबा यांनीं आपण होऊन दोन तीन वेळां मध्यस्त पाठवून राजकारणें लाविलीं. शेवटीं निश्चय केला, कीं 'इंग्रजांचें कूच होऊन पुढें चालले ते दिवशीं आम्ही खास फुटून येतों, तुम्ही आम्ही एक होऊन इंग्रजांचें पारिपत्य करूं.' यावरून कराराची याद मखलाशी करून दिली. त्यावर त्यांनीं इंग्रजांचें कूच करवून आम्हावर गफलतींत घेऊन आले. इंग्रजांस रसद अगर वैरण मिळेना. घोड्याउंटांस झाडपालाही मिळेना. आम्ही बेजरब गळां पडावें म्हणून रात्रीस स्वारी करून गेलों. ईश्वर सर्वांचा आहे. ते दिवशीं इंग्रजांचे अनुकूल काळानें आम्हांस चकवून पाण्याचा तोटा पाडिला. काबू साधला नाहीं. दहा प्रहर घोड्याची स्वारी करून मध्यरात्रीं मुक्कामास आलों. तोफा मागें राहिल्या, आणावयास रात्र खपवून गेलों, तों इंग्रज तयार झाल्याचें वर्तमान कळतांच पुनः तयार होऊन गेलों, तों इंग्रज अर्धरात्रीस कूच करून माघारा गेला. गायकवाडाचें पत्र आलें जे, कारकून पाठवून देणें. केसो अनंत पाठाविले. त्यास रात्रीस गोटास नेऊन गोंदवांनीं कळविलें कीं, 'आम्ही इंग्रजांचे पोटांत नाना प्रकारचीं भयें घालून इंग्रज माघारा फिरविला, त्यांस आम्ही सुरतेस पावते करितों, तुम्ही पाठीमागें येऊं नये.' त्यावर केसोपंतानें उत्तर दिलें, तुम्ही सरकार उपयोगी काय पडलां ! तेव्हां गोंदबा म्हणतो, इंग्रज फार खजील जाला, माझी फजिती जाली, मुंबईकर मजला हांसतील, हें गॉडर्डाचें बोलणें गोंदबा बोलला. केसो पंतानें साफ जाब दिला जे, आम्ही वाटेल तें करूं, तुम्ही शास्त्रार्थ सांगणार कोण ? इतकें बोलणें होऊन पहांटेचे सहा घटका रात्रीस गोटाबाहेर करून दिला. दिवसा ठेविल्यास पुण्याहून चौघे कारकून राजकारणास आले आहेत, त्यांशीं गांठ पडेल, म्हणून केसो पंतास गोंदबांनीं वाजवीच काढून दिलें. पुण्याहून पत्रें येतात, राजकारणाचा अखत्यार पाटीलबांवाचा, तर

मग सरकारांतून कारकून हुजरे परभारें कां पाठवावे! आम्हांस प्रथम भेटून कां पाठविले नाहींत? आम्हांस चिठी देखील नाहीं; सुरतेस जाऊन श्रीमंत दादांस भेटले. दहा रोज तेथें राहून इंग्रजांशीं व दादांशीं राजकारणें करून आले. आम्हांस हें ठीक दिसत नाहीं. धनीपणा कारभाऱ्यांकडे आहे. आमचें पारिपत्य मनांत म्हणून अशीं कारस्थानें करतात. करोत. आम्हांस त्यांसी बेइमान करणें नाहीं. दुरून चाकरी करूं. आम्ही नसावेंच असें मानस असल्यास उत्तम. आणीक कोणाचे छायेस पोट भरूं. याउपर रेवापार होणें नाहीं, अशी लिहावयास आज्ञा केली. पुण्याचे कारकून गोंदबाशीं बोलून गॉडर्डास भेटले. त्यानें उत्तर केलें, 'दादासाहेबांचे पत्रावाचून मला कांहीं कबूल नाहीं.' सबब पुनः दोघे दादाचें पत्र आणावयास गेले आहेत. आमचें साहित्य करून सरकार काम करून घ्यावें तें न करितां, आमचे पारिपत्याचीच विवंचना करतात. गोंदबा स्पष्ट सरकारचे नाशास प्रवर्तला हें त्यांस कळत नाहीं. सांप्रत त्यानें धन्यास न विचारतां सिनोर, चांदोर, करनाळीच्या सनदा इंग्रजांस दिल्या, आणि डभई किल्ला व परगणा आपले बायकोचे चोळीबद्दल घेतला. इंग्रज कूच करून जातांच डभईत गोंदबानें आपला अंमल बसविला. चौघे गृहस्थ पुण्याहून आलेले गोंदबाजवळ आहेत. तेव्हां गोंदबास हरामखोर कीं हिंदु काय म्हणावें! आम्हीं इकडून राजकारण करतां, ते तिकडून करितात, तेव्हां आम्हांस तोंडघशीं पाडावें हीच कीं नाहीं मसलत! धन्याचें हित करितात, सुखें करोत. आम्हांस लिहितात, एक वर्ष लागो, दोन वर्षें लागोत, इंग्रज नेस्तनाबूद करावा, सलूख करणें तर निजाम, भोसले, हैदर व सरकार चौघांचे संमतें करावा, आणि आंतून गृहस्थ पाठवून राजकारणें दादांशीं, इंग्रजांशीं, गायकवाडांशीं करितात. कसेंही करून आम्ही तोंडांत खावी हे मनोरथ सुफल होवोत. याउपर आम्ही नर्मदा उतरत नाहीं. कारभारी यांनीं इंग्रज व दादांस सांभाळून घ्यावें. उत्तर लौकर यावें.' यावर नानाचें उत्तरही असेंच मजेदार व लांबलचक आहे, पण या वाग्युद्धाचा मासला म्हणून तेंही येथें देणें अवश्य आहे. ता. २४-५-१७८० रोजीं नाना लिहितो, 'चार कारकून राजकारणासाठीं सुरतेस व गोंदबाकडे गेले हें ऐकून अपूर्व वाटलें. बोलणारच पुण्याहून कोणी गेले नाहींत, मग पुढील गोंदबाचे बोलण्यांत काय खरेपणा राहिला? ते कारकूनच मुळीं येथें आणविले आहेत. याचा विस्तार लिहितां फारच

आहे. आंतून कांहीं एक राजकारण आम्हीं केलें नाहीं. गोंदबा सरकारचे नाशास प्रवर्तक असें कळल्यावर आम्हीं काय उणें केलें? रांडा पोरें धरून किल्ल्यावर कैदेंत घातलीं. चोळीबद्दल महाल घेतले, ही चोळी किल्ल्यावर अडकविली आहे. हें समजूनच जप्त्या करून गोविंदराव गायकवाडांस पद द्यावें म्हणोन लिहून पाठविलें, याखेरीज दुसरा जाबसाल येथून कांहीं झालेला नाहीं. ही मसलत कारभारी बुडवितात म्हणोन लिहिलें, त्यास कोण बुडवतें हें ध्यानांत यावयाजोगेंच आहे, त्याचा विस्तार लिहितां फारच आहे. तह करणें तरी चौघांचे विचारें करावा, वगैरे जे निश्चय ठरले आहेत तेच कायम आहेत. सुरतेस इंग्रज आला किंवा कोठेंही गेला तरी पाटीलबावांसच पारिपत्य करावें लागेल. सर्व भार त्यांजवरच असतां आणि जे दौलतेचे स्तंभ, ज्यांवर दौलतेची मदार आणि आमचा अकृत्रिम भाऊपणा, असें असतां, जांबगांवींच आमचें पारिपत्य करीत होते हें बोलणें कसें निघालें, ईश्वर जाणे! ज्यांनीं लबाड्या केल्या तेही फजित पावले, हें यथार्थ. पाटीलबावांची निष्ठा तशीच आहे. ईश्वर दिवसेंदिवस अधिकच यश देईल हीच इच्छा आमची आहे. पुण्याहून गोपाळ रामचंद्र पाठविले येविशीं पूर्वीं लिहिलेंच होतें. हल्लीं चौघे सुरतेस जाऊन दादाशीं बायकांशीं राजकारण करून गायकवाडांकडे आले, तेव्हां गांठ पडेल म्हणोन केसोपंतास रात्रीसच काढून दिला, या लिहिण्यावरून आपणास बातम्या किती यथार्थ कळतात, व सांगणार कसें सांगतात, तें समजोन येतें. जे इसम तिकडे गेले असें पाटीलबावा म्हणतात, ते येथेंच आहेत, त्यांस समक्ष आणून पाटीलबावांचा कारकून येथें आहे त्यांस भेटाविलें. यावरून विपरीत ग्रंथ गोंदबांनीं कसा बनविला तो ध्यानांत आला. 'दुरून चाकरी करूं, बेइमानी होणार नाहीं. रेवा उतरणें नाहीं,' हीं बोलणीं मात्र बोलावीं; परंतु श्रीमंत लहान, सर्व भार पाटिलबावांवर व दौलतेंत जीव काय आहे, ती सांभाळावयास योग्य कोण आहे, हें सर्व ते जाणतात. मग या गोष्टी बोलण्यांत देखील येऊं नयेत; व याचें कारणही नाहीं. त्यांच्या चित्तांत दुसऱ्यांचे छायेस पोट भरूं हीं अक्षरेंच येणार नाहींत, ही खातरजमा आहे. पाटीलबावांचें वांकडें व्हावें हें चित्तांतही नाहीं. कोणेही प्रकारें मसलत चांगली शेवटास जावी, पाटीलबावांस यश यावें, भाऊपणा दिवसें दिवस अधिक चालावा, हीच इच्छा आहे.'

नानासंबंधानें महादजी उघड चर्चा करी तेणेंकरून कसें नुकसान होई तें नानानें खालील ३०-४-१७८०च्या पत्रांत दर्शविलें आहे. 'तथें पाटीलबावांचीं बोलणीं विक्षेपाचीं होतात, त्यांचीं लिहिलीं इकडे लोकांच्या घरीं येतात, तेव्हां ती बातमी इंग्रजांकडेही जातच असेल. ही गोष्ट मसलतीस वाईट हें त्यांच्या ध्यानांत येतें कीं नाहीं! वांकडें असलें तरी थोर आहेत ते वांकडें दाखवीत नाहींत. मग येथें तर भाऊपणा अकृत्रिम, वांकडें रतिमात्र नसतां, उगेच कोते अंदेश माणसांच्या लिहिल्यावरून व सांगितल्यावरून मनांत आणावे, निष्कारण विपरित अर्थ करून बोलावें हें तर फारच विलग दिसतें. या गोष्टींपासून उमेदही सरते. बोलण्यानेंच संतोष असेल तर, एकांतीं बोलत जावें. दुसऱ्यांस कळूं नये असें तरी व्हावें. येथें पाटीलबावांचीं पत्रें येतात त्यांत एकही पत्र दरबारांत सर्वांचे वकील बसले असतां जाहीरपणें वाचून दाखवावें, आणि आंतील बाहेरील शत्रूंस एकत्वाचा व स्नेहाचा दाब पडावा व इष्ट आहेत त्यांस गोड वाटावें, असें पत्र कधींच येऊन पाहिलें नाहीं. पत्र जासूद घेऊन आला म्हणजे लाखोटे फोडण्यापूर्वीं चित्तांत येतें कीं, काय विक्षेपाचा नवा ग्रंथ रचला असेल. मग फोडून पत्र पाहवें, तों तेंच निघतें. जीं पत्रें येतात त्यांत मनांत कल्पना नाहींत त्या असावयाच्या. कित्येक रोषेंकरून व कित्येक विपरीत अर्थ करून लिहून येतात तीं पत्रें एकांतीं वाचावीं, त्याचे पाऱ्हेरे उत्तरें लिहून पाठवावीं, याखालींच दिवस गेले. पुढें ईश्वरी इच्छा असेल तसें घडेल. ईश्वरच त्यांच्या बुद्धीस काय साक्ष देईल ती खरी. अशीं विक्षेपाच्या मजकुरांचीं पत्रें वाटेंत इंग्रजांकडून धरलीं गेलीं तर काय होईल याचाही विचार करावा. त्यांनीं कितीही वाईट वाटावयाजोगें लिहिलें किंवा बोललें, तरी आम्ही चित्तांत वांकडें काडीभर आणणार नाहीं. कारण एक तर आम्ही शुद्ध बुद्धीनें पाटीलबावांचे ठायीं चालतों, दुसरें खावंदांचे कार्यावर नजर मग वाईट कशास वाटेल!! पाटीलबावा दक्षिणेकडे आले तर दगाफटका कोणी कोणास करूं नये असें बावांचे उत्तर सदाशिव दिनकरानें नानास लिहिलें, त्या वरून 'अपूर्व वाटलें. परस्पर सुखदुःखाचे साबिती पाटीलबावा व आम्ही, खावंद एक, त्यांत भाऊपणा, खावंदांच्या चाकरीवर एकनिष्ठ, असें असतां, दगाफटक्याची शंका चित्तांत येते हें काय! तुमचा इलाज नाहीं. तेथील

सारी मंडळी बोलतां बोलतां चित्त बेहरम होऊन गेलें असेल. त्यास या गोष्टी घडावयाच्याच नाहींत. मग लिहावें काय?' (ता. २४-५-१७८०).*

असे फितुर त्या वेळीं फारच बोकाळले होते. 'पुण्यास नानास व हरिपंतास दगा करावा अशी मसलत एप्रिल सन १७८० त झाली. वर्तमान कळल्यावर सर्वांस कैद केलें. या राजकारणांत पार्वतीबाईसही सामील करून घेतलेलें होतें. बाईसाहेबांनीं एक वेळ तोतयाचें राजकारण करून सारें ब्राह्मण्य बुडवावयास सिद्ध झाली. महादजीच्या छावणींतही फितुर झाले. नारो गोपाळ, महादजीपंत गोगटे, त्रिंबक भालेराव हे इंग्रजांकडे फारसी पत्रें पाठवीत होते, तींच बजिन्नस सांपडलीं, त्यांत मजकूर कीं सोमवारीं तुम्हीं येऊन छापा घालावा. त्यावरून त्रिवर्गांस कैद करून किल्ले मंदोसर येथें पाठविलें; आणि सदाशिव रामचंद्र व चिंतो अनंत देवस्थळे यांस उज्जनीस पाठविलें. चिंतो विठ्ठल इंग्रजांकडे पळून जात होते त्यांसही कैद करून उज्जनीस रवाना केलें.' (एप्रिल १७८०).

वरच्या या गोंधळांत अनेक क्षुल्लक बाबतींसंबंधानें नानामहादजींचीं मनें एकमेकांबद्दल सारखीं कलुषित होत गेलीं. एक तर हा त्यांच्या स्वभावांतला फरक होय. फौजेचे बळावर महादजी आपणास नमवूं पाहतो ही नानाची भावना, उलट महादजीचा स्वभाव फार चिकित्सखोर, वितंडवादी व मतलबी. त्यामुळें वास्तविक पाहतां सवाई माधवरावाचा इतिहास ह्या दोघांच्या चुरसी-नेंच मुख्यतः भरला आहे. एक दुसऱ्याचे कह्यांत जाण्यास नाखूष हेंच त्याचें बीज. यावज्जन्म दिलसफाई अशी कधीं झालीच नाहीं. मात्र दोघेही समजूत-दार असल्यामुळें प्रत्यक्ष राज्यनुकसानीची गोष्ट त्यांचे हातून घडली नाहीं, हाच फायदा समजावा. दोघे एक मतानें चालते तर इंग्रजांस हिंदुस्थानांतून साफ उखडून देण्याची ऐपत त्यांच्यामध्यें खास होती. महादजीचें मनोधारण नाना अनेक उपायांनीं सदैव करीत असे. आपाजीराम लिहितो, 'राणेखान-भाईनीं एकच गोष्ट सांगितली, कीं मी पाटीलबावापाशीं आहें तोंपर्यंत नाना-विशीं निखालसताच राखली आहे. पुढें ही खातरजमा असावी कीं नाना-विषयीं तिलप्राय वांकडा अर्थ पडणार नाहीं, आणि श्री. रावसाहेबांचे

* का. सं. प. या. २०१-२०३, २०६; ग्वा. ३-११.

कल्याणाविशीं येथून अंतर कदापि पडणार नाहीं. भाईंनीं खातरजमा केली कीं पाटीलबावांच्या बोलण्यांत नानाशीं किंवा श्रीमंतांच्या पायांशीं दुसरा अर्थ नाहीं. ज्यांत श्रीमंतांचें कल्याण व राज्याचा बंदोबस्त तीच गोष्ट होईल इतर गोष्टींविशीं चित्तांत विकल्प आणूं नये. रा. बाळाराव, आबा चिटणीस, राणेखान, रायाजी पाटील, या सर्वांनीं पुरतेपणीं खातरजमा केली.' हीच मंडळी महादजीची मुख्य सल्लागार. सर्वांस महादजीचा धाक एवढा होता कीं इतरांप्रमाणें महादजी सल्लागारांचे मुठींत कधींच वागला नाहीं. उलट त्यानेंच सर्वांस आपल्या मर्जीप्रमाणें वागावयास लाविलें. नारो शिवदेव, सदाशिव दिनकर, आप्पाजीराम हे नानाचे वकील तर मोठे नेकीचे व स्पष्टवक्ते होते. (ग्वा. ३,४).

---

प्रकरण नववें

# अखिल हिंदुस्थानचा इंग्रजांवर उठाव

## सन १७८० चा उत्तरार्ध

१. कोंडाईबारीवरील छावणीचा वाद.
२. इंग्रजांच्या शक्ती आंखडण्याचे उपाय.
३. हैदरनायकाचा इंग्रजांवर घसारा (पावसाळा १७८०).
४. कृष्णाजी नारायणाची हैदराकडे वकिलात.
५. दुर्दैवी दादाची कहाणी.
६. कल्याण व वसई इंग्रजांनीं जिंकली, (मे व डिसेंबर १७८०).
७. वज्रयोगिणीचें सुदर्शन, रामचंद्र गणेशाचा आत्मयज्ञ.

* * * *

**१. कोंडाईबारीवरील छावणीचा वाद** (स. १७८० पावसाळा).—जून १७८० त पर्जन्यकाळामुळें मराठ्यांची गुजरातेंतील मोहीम बंद पडली, तेंव्हां

पुण्याहून नानानें सिंदेहोळकरांस असें सुचविलें, कीं सरदारांनीं पावसाळ्याची छावणी खानदेशच्या उत्तरभागीं पूर्वेस बऱ्हाणपुरावर अगर तेथून थेट पश्चिमेस गुजरातेंत उतरण्याची खिंड कोंडाईबारी $ म्हणून आहे तेथें करावी, म्हणजे पुढें शत्रूचा जोर होईल तिकडे फौजा नेण्यास सुलभ पडेल. परंतु हा बेत महादजीस पसंत पडला नाहीं. एक तर दादाबद्दल इंग्रजांचा आदर आतां सर्व ओसरला होता. इंग्रज आतां दादासाठीं लढत नसून मुंबई इलाख्यांत आपला पाय भक्कम करण्यासाठीं प्रमुख म्हणून लढत होते. महादजीला नरम केल्याशिवाय मराठे ठिकाणावर बसणार नाहींत, हें त्यांस कळून चुकलें. हिंदुस्थानचे सार्वभौम सत्ताधीश आपण अशी मराठ्यांची घमेंड असून, तिचा मुख्य आधार महादजीच होता. होळकर बिलकूल स्वतंत्र वृत्तीनें वागणारा नसून, भोसले व गायकवाड हे दोन प्रमुख सरदार अगोदरच थोडे बहुत इंग्रजांच्या पचनीं पडले होते. तेव्हां महादजीला शह देणें हेंच इंग्रजांनीं आपलें मुख्य कर्तव्य ठरविलें. मराठ्यांच्या साम्राज्यसत्तेचा आधार महादजी आणि त्या सत्तेचें अधिष्ठान माळव्यांत. माळव्यांतूनच महादजीचा शह दिल्लीकडे बादशहास पोंचे. दिल्ली हेंच बादशाही सत्तेचें केंद्र. ह्या केंद्रांतून महादजीचा शह पश्चिमेस राजपुतांवर, उत्तरेस अयोध्येच्या वजिरावर व पूर्वेस काशी, गयापर्यंत लागू पडत असे. तेव्हां महादजीचें माळव्यांतील अधिष्ठान उखडून दिलें कीं मराठी सत्तेचा मुख्य जोर संपला, असें दूर दृष्टीनें इंग्रजांनीं ताडून, त्यांनीं गोहदच्या * जाठ राण्यास महादजीविरुद्ध उठवून आपल्या हाताशीं धरिलें, आणि त्याच्या मदतीस फौजा पाठवून ग्वाल्हेरचा मजबूद किल्ला त्याजकरवीं सन १७८० च्या पावसाळ्यांत महादजीच्या हातून हिसकून घेतला. इंग्रजांचे हे डाव ओळखून महादजीनें छावणीकरितां गुजरातेंतून माळव्यांत उज्जनीस जाण्याचें मनांत ठरविलें, मात्र हा अंतस्थ बेत त्यानें एकदम उघड करून दाखविला नाहीं. बऱ्हाणपुरावर अगर दुसरे कोठें छावणी करावयाची तें सवडीप्रमाणें पाहतों, असें बोलत तो जो पावागडावरून परभारें उज्जनीस गेला, तो फिरून सन १७९१ पर्यंत दक्षिणेंत उतरला नाहीं. इंग्रज हळू हळू सार्वभौम सत्तेची हाव धरूं लागले. ह्या दृष्टीनें आतां

$ धुळ्याचे पश्चिमेस ५० मैल खानदेश गुजरातचे हद्दीवर, चिंचपाडा रे० स्टे० चे पूर्वेस १० मैल. * ग्वालेरच्या ई० सुमारें ३० मैल.

पुण्यास महत्त्व राहिलें नव्हतें. पुण्याचें रक्षण म्हणजे इंग्रजांस बोरघाटांतून वर येण्याची बंदी करणें. हें काम हरिपंत वगैरे मंडळीस शक्य होतें. एकवार त्याचा प्रयोग आदल्या वर्षांत घडून चुकला होता. त्यासाठीं महादजीनें इकडे गुंतून पडण्याची जरूर नव्हती. महादजी दक्षिणेंत बसता, तर इंग्रजांनीं थेट नर्मदे-पावेतों उत्तर हिंदुस्थान ग्रासलें असतें. इंग्रजांच्या हालचाली व वाटाघाटी लष्करी दृष्टीनें महादजीनें जशा ताडल्या, तशा त्या नानास पुण्यास बसून उमजल्या नाहींत, म्हणून त्यानें महादजीस दक्षिणच्या हद्दीवर छावणी करण्याचा आग्रह केला. शिवाय आतां पावसाळा लागल्यानें मुंबईपासून पुण्यापर्यंतच्या प्रदेशांत कोणतीही मोहीम शक्य नव्हती. उलट पक्षीं माळव्याकडे विशेष भीति पर्जन्य काळांतच होती. तेव्हां महादजीनें उत्तरेकडे लक्ष ठेविलें तें अगदीं योग्य होतें. सारांश, या छावणीच्या बाबतींत पुढें मोठाच वितंडवाद वाढला, त्याचा प्रस्ताव असा.

उज्जनीहून महादजी नानास लिहितो, 'अंबूजी इंगळे माळव्याचे बंदोबस्तास आहेत. त्यांचें पत्र आलें कीं गोहदकर जाठ व इंग्रज यांनीं नरवरानजीक अंत्रीवर येऊन छावणीचा सरंजाम केला, तेथूनही कूच करून सिप्रीवर आले, पुढें चाल करावयाची उमेद आहे, यावरून ते हावभारी झालेसे दिसतात. उज्जनीपासून एकशें पंधरा कोसांवर शत्रू या पर्जन्यकालांत हिंमत वाढवून आले, तेव्हां दसऱ्यापावेतों किती मुलूख घेतील ! आम्ही उज्जनींत व होळकर इंदुरांत असतां इतकी हिंमत वाढवून प्रसार करीत आले, तेव्हां आम्ही देशीं गेल्यावर काय करतील न कळे ! सरकारचीं पत्रें येतात जे, उभयतां सरदारांनीं कोंडाईबारीस छावणीस यावें. त्यास नोकरीस उजूर नाहीं. आधीं खावंदांचें घर रक्षावें हा मुख्य पक्ष. कारभारी म्हणतील तें मान्य खरें. विचारदृष्टीं पाहतां सुरत मुंबईस इंग्रज आहेत, त्यांस कोंकणांत व गुजरातेंत मोहीम आहे. बाहेरून खुष्कीची मदत त्यांस नाहीं. विलायतेस लढाई लागली, तिकडील इंग्रज तिकडेच गुंतले. कलकत्त्याहून जलमार्गें कुमक येईल तर मध्यें हैदर नाईकाची लढाई सुरू आहे, दक्षिणेस खुष्की नाहींच. जलमार्ग हैदर-खानानें धरिला, पूर्वेकडील जिंमा, निजाम व भोसले यांचा आहेच. तिकडील वर्तमान सरकारांत येत असेल. आतां दिसण्यांत मुर्शिदाबादेपासून अयोध्ये-वरून अंतर्वेदपावेतों मार्ग मोकळा, तिकडून कंपूचे कंपू येत आहेत. हा मार्ग

मोकळा जाणून इंग्रजांनीं हिंमत धरून भारी मनसबा आरंभिला. अंतर्वेद, रोहीलखंड हाताखालीं घातलेंच. द्रव्यलोभ दाखवून पातशहा मेळवून तोरा हाताखालीं घालावा, मग बादशहाचे वजीर नजफखान सामील जाले उत्तम, न जाल्यास तोरा आपणाजवळ असतां करतात काय, मारून घेऊं, अशी हिंमत धरून साधन करितात. पातशहा व नजफखान समजलेच आहेत, ते सरकारच्या ( मराठ्यांच्या ) फौजेची कुमक इच्छितात. आधीं सरकारचीं पत्रें येविशीं त्यांस गेलींच होतीं. आम्हींही गुजरातेंतून पत्रें पाठविलीं, आमच्या आधारावर त्यांनीं इंग्रजांशीं बिघाडाची हिंमत धरिली. तथापि आमच्या फौजा येऊन त्यांस सामील होतील असा भरंवसा पुरवत नाहीं. दक्षिणेंत इंग्रजांची लढाई; साऱ्या दक्षणी फौजा तिकडे जातील असा अंदेशा चित्तांत आणून, पातशहा नजफखानांनीं इंग्रजांचें सूत्र लावून ठेविलें आहे. आम्ही त्यांस सामील जाल्यास ते इंग्रजांशीं बिघाड करतील. आम्ही सामील न जाल्यास इंग्रज, पातशहा व नजफखान एक होणार. एकूण हिंदुस्थानांतून इंग्रजांस वाट मोकळी. हल्लीं इंग्रज व गोहदकर एक होऊन दक्षिणेस चाल धरली. मुलूख घेत घेत पुढें चालत येतात. आम्ही देशीं आल्यावर इकडे यांस अटकाव नाहींच. निःसंदेह दसऱ्यापावेतों नर्मदा गांठतील. जितका मुलूख मागें टाकतील, तितका त्यांचा झालाच. पुढें चाल करावयाची हिंमत वाढली, सुरतमुंबईस कुमक आली, याचा परिणाम दृष्टीस यावासा आहे. सिप्रीकोलारापासून शंभर कोसांवर शत्रू आले असतां, आम्ही दक्षिणेंत गेल्यास पळून गेले म्हणतील, आणि जास्तच जोरानें लांबलांब मजली करीत येतील. आम्ही उभयतां सरदार व लहान मोठे सारेच, एक खावंद कायम आहेत तोंवरच सर्वत्रांची कायमी, हें आबालवृद्धांस कळतें, आम्हांस न कळावेंसें नाहीं. परंतु मनसुब्याचें धोरण चांगलेंच असावें. परिणाम लावणार श्री किंवा खावंदांचें प्रालब्ध. हिंदुस्थानांतून इंग्रजांची खुष्कीची वाट बंद करावी, हा उत्तम पक्ष आहे. आम्ही देशीं गेल्यापासून इकडे एकतंत्री मसलत पडत गेली. ते सारे एक झाले. गुदस्तां देश, गुजरात व हिंदुस्थान तीन प्रकार झाले, तेच यंदां सबळ होत चालले. त्यांत श्रीमंतांचे दैवें करून एक गोष्ट मोठी झाली कीं हैदर नायकानें तहनामा करारांत आल्याप्रमाणें वचन सांभाळून इंग्रजांवर मोहीम केली. येणेंकरून इंग्रजांचे मसलतीस उणेपणा आला. हैदरखानाप्रमाणेंच भोसले मना-

पासून कराराप्रमाणें मोहीम करते, तर श्रीमंतांस सारे लहान मोठे सरदारां-सहित एकच पश्चिमेकडील मुंबई सुरतेची मोहीम राहती. निजाम तर घरींच आहेत. आम्ही इंदुर उज्जनीस आलों, तरी देश, गुजरात व हिंदुस्थान तिहींचे चिमट्यांत शह राखून आहों. लहान मोठे दौलतींत आहेत, तितक्यांनीं **स्वामिसेवेचे पोटीं आपलें कल्याण समजून श्रम करावे.** विखरली मसलत जिकडील तिकडे आटोपावी. उत्तर हिंदुस्थानांतून इंग्रजांचे चढाईचा मार्ग पडला, हें तोंड भारी. थोडक्या फौजेनें हें तोंड धरवत नाहीं. आम्ही उभयतां सरदारांनीं पातशहा व नजफखान मेळवून घेऊन, आणखी संस्थानिक व राजेरजवाडे आपले करून घ्यावे, आणि इंग्रजांचे गळां पडावें, तरच इक-डील बंदोबस्त होईल. गुजरात व दक्षिणचे लहान मोठे सरंजामी यांनीं सुरत-मुंबईचें तोंड राखून, होऊं शकल्यास, गुजरातेस गोविंदराव गायकवाडांची रवा-नगी केलीच आहे, त्यांचें साहित्य करावें. सुरतमुंबईचें तोंड भारीच आहे, तें गुजरातच्या सरंजाम्यांनीं सांभाळावें, पुढें वाढूं देऊं नये. गोविंदराव गायकवाड व आपण एक होऊन गुजरातची मसलत करावी, एकानें हिंदुस्थानची मसलत पातशहा नजबखान मेळवून घेऊन करावी; हिंदुस्थानांतले इंग्रज मागें हटवले तर मोठीच गोष्ट जाली. श्रीमंतांचे दैवेंकरून होईल; न होईल तर पुढें तरी वाढूं देऊं नयेत. पुढें वाढले तर सुरत-मुंबई-करांची कुमक होणार नाहीं. देश व गुजरातची मोहीम हलकी जाईल असें मनसब्यानें वाटतें. कारभारी यांनीं विचार पाहवा. लिहिला मनसबा ध्यानास आला, तर कोणी कोणती मसलत करावी त्याचा ठराव करावा. आम्हीं देशीं जावें, देशींच्यानें हिंदुस्थानांत यावें हें ठीक दिसत नाहीं. देशीं आहेत, त्यांस माहीतगारी जाग्याजुग्याची, साधनांची, माणूस कोठील कसे याची आहे. त्यांनीं तिकडील मसलत आटोपावी. हिंदुस्थानची माहीतगारी आम्हां उभयतांस आहे, त्यांत नवीन गुजरातची मिळाली. दोन मसलती दोघांस नेमाव्या. ज्यास जी कबूल असेल ती पृथक् पृथक् सांगावी. म्हणजे काळजी धरून आपल्या जिम्यानें काम करतील. आम्हांस पुसतील तर गुजरात किंवा हिंदुस्थान दोहोंतून जी मसलत सांगतील ती कबूल आहे. इतकेंही सोडून देशींच या म्हणतील तर तेंही मान्य आहे. कोठेंही चाकरी करावी. डोईवर घ्यावें लागत नाहीं. हिंदुस्थानची मसलत शिरोपस्थायीची

बरी नाहीं. कोणतेंही काम माहीतगारी व वळणाशिवाय होत नाहीं. हें सर्व मनन करूनही देशींच यावयाची आज्ञा आली तर, जों गोहदकर, इंग्रज व नजफखान यांची फौज जवळ आली नाहीं, तों अगोदर निघोन जाऊं. येणें करून पळून गेल्याचा आरोप दूर होईल. आम्ही गेल्यावर ते मुलूख घेत येतच आहेत, येऊत. सांगतील तेथें जातीनें अगर ऐवजाप्रमाणें राहूं. कदाचित् इकडीलच मसलतीस कारभाऱ्यांचें संमत पडलें, तर या मसलतीचीं साधनें आतांपासून त्वरेनेंच करावीं लागतील. महत्साधनें अल्प यत्नेंकरून साधत नाहींत. यास्तव अगोदर जपलें पाहिजे. हिंदुस्थानांतून इंग्रज कंपू एकामागून एक येऊं लागले, याजकरितां इकडील मसलत भारी, उभयतांनींही असावें, असेंच काम आहे. कदाचित् सरकारची मर्जी दोघांस दोन मसलती योजण्याचीच जाली, तर गुजरातची मसलत करणारानें इकडील मसलत करणाराची कुमक करावी, खावंदाचीही मदत असावी. मनन होऊन मनसुब्यास उपयोग असेल त्याप्रमाणें उत्तर लौकर सादर जालें पाहिजे. मसलतीस दिवस राहिले नाहींत, उत्तर येईल त्या प्रमाणें वर्तन करूं.' ( ३१-७-१७८० ).

महादजीच्या या पत्रांत एकंदर राजकारणाची परिस्थिति उत्कृष्ट वर्णिलेली आहे. आतां तत्संबंधीं निरनिराळ्या व्यक्तींचे व स्थलांचे पर्याय कसे बनले होते तें प्रथम त्या वेळच्या इतर कागदांतून दाखवितों. मे अखेर गुजराथेंतील मोहीम महादजीनें आवरली. 'देश वाईट, येथें छावणीची सोय नाहीं. उदईक कूच करून हालोल दोहद बदनावरचे मार्गें (म्ह० हल्लींच्या आगगाडी मार्गेंच) माळव्यांत जाऊन छावणीचा विचार कोठें ठरेल ती विनंती करीन,' असें त्यानें पुण्यास कळविल्यावर नानानें लिहिलें, 'इंग्रजांच्या पाठीवरील फौज काढिली, येणेंकरून ते गुजरातेंत मोकळे झाले. निदान गोविंदराव गायकवाडांबराबर फौज द्यावयाची नेमिली असेल, तीच कांहीं दिवस इंग्रजांच्या शहावर असती तर ते फैलाव करूं न पावते. असो, आतां उभयतां सरदारांनीं माळव्यांतून जलदीनें कोंडाईबारीबर येऊन छावणी करावी हें मनसुब्यास उपयोगी चांगलें. बऱ्हाणपुरावर छावणी केली असतां मसलतीचा रोख सुटतो. उज्जनीस छावणी झाली तर फारच विलग सर्व गोष्टींस पडेल.' या संबंधानें आपाजीराम नानास ता. ७ जून रोजीं लिहितो, 'मी बावांस एकांतीं गांठून विनंति केली, कीं उज्जनीस जाणें मनसुब्यास फार विलग पडतें. परंतु आपलाच हेका करून

अवंतिकेस जाणें ठरविलें. जवळील मंडळींचें ऐकत नाहींत, व कोणी निष्ठुर बोलतही नाहीं. सर्व खुशामतीच्या गोष्टी सांगतात. ईश्वरें त्यांच्या बुद्धीस काय प्रेरणा केली आहे न कळे.' पुढें महादजी ता. २४ जून रोजीं उज्जनीस दाखल झाला, त्या वेळच्या महादजीच्या दिनचर्येचें चमत्कारिक वर्णन आपाजीरामानें केलें आहे, त्याचा उपयोग त्याचा स्वभाव समजण्यास होईल. 'उभयतां सरदार छावणीस उज्जनीस आले, यामुळें मसलत टाकून गेले असा सर्वत्र लौकिक झाला. निदान बऱ्हाणपुरास छावणी होती, तरी भ्रम राहता. येथें येऊन दोन मास जाले, अद्यापि मसलतीची किंवा राजकारणाची तर्तूद किमपि नाहीं. जेव्हां विनंति करावी त्या वेळेस उत्तर होतें, कीं आम्हांस सांगाल ती चाकरी करूं. मसलत मनसबा आम्हांस कांहीं कळत नाहीं. तूर्त ऐषआरामीवर नजर आहे. सायंकाळ झाली म्हणजे भोजन करावें आणि माडीवर जनानखान्यामध्यें जावें. प्रातःकाळीं चार घटका दिवस उठावयास येतो. उपरांत देवपूजा व पुराण, गंध लावणें, याखालीं दोन प्रहर होतात. उपरांत भोजन करून निद्रा करावी. सायंकाळच्या चार घटिका दिवसास उठावें. उपरांत दरबार होतो. त्यांतही कांहीं विनोद, थोडाबहुत कारभार व खलबत होत असतें. अशी येथील वर्तणूक आहे. आजपर्यंत इतकें निक्षून लिहिलें नव्हतें, परंतु तेथील प्रकार एक रीतीचा दिसतो, याजकरितां लिहिणें प्राप्त झालें. दुसऱ्याचें व्यंग त्याचें मात्र वर्णन करावें, आपल्या गुणदोषाचे लोप करावे हें आज आठ महिने पाहतों. हल्लीं ग्वाल्हेरचा किल्ला इंग्रजांनीं दगा करून ४ ऑगष्ट रोजीं घेतला. यामुळें त्यांस बसावयास या प्रांतीं मजबुदी झाली. तिकडे केसोपंत दातारानें सोनगड व व्यारें येथें इंग्रजांचीं ठाणीं बसवून पुढें खानदेशांत आला. पत्र एकांतीं अवलोकन करून फाडून टाकावें.' $

ता. १३ ऑगष्ट रोजीं सदाशिव दिनकर पाटीलबावाचें बोलणें पुण्यास लिहितो, 'गोहदकर, जाठ व इंग्रजांनीं एक होऊन सिप्री कोलारवर छावणी केली. म्हणजे उज्जनहून शंभर कोस. तसेंच नजफखान व जयपुरकर एक होऊन त्यांनीं होळकरांकडील रामपुरा, टोंक हीं ठाणीं उठवून आपलीं कायम केलीं.

---

$ ता. २०-८-१७८०, ग्वा. ३–२०, १३, १४, १६; का. सं. प. या. २६६.

असें असतां, पाटीलबावा म्हणतात, आम्ही देशीं गेल्यास इकडे विलग, हा देश राहणार नाहीं, शत्रू घेतील, आणि सुरत, मुंबईवाल्यांची कुमक करतील. इंग्रजांची वाट दक्षिणेस जावयाची अंतर्वेदींतून पडली ही वाईट.¶ ती वाट मना केली म्हणजे सुरतमुंबईकरांची कुमक होणार नाहीं. आज वर्तमान आलें जे श्रावण शु० ४ शुक्रवारीं गोहदकर व इंग्रजांनीं मिळून ग्वाल्हेरचा किल्ला घेतला. अंबूजी इंगळे कुटुंब सुद्धां किल्ल्यावर होते, ते सडे माणसें मात्र उतरून खालीं येऊन रात्रंदिवस करून शहाबादेस§ आले. किल्लेदार रघुनाथ रामचंद्र ठार झाले. वर्तमान ऐकून त्यांची बायको, पुत्र लहान होता त्यास मारून टाकून आपण व भावजया कटारी मारून मेल्या. आतां आम्ही येथून दक्षिणेंत गेल्यास शत्रूस किती हिंमत येईल, पळून गेले म्हणतील, आणि पर लावून येतील. केसो कृष्णास बगलेंत मारून घेऊन ते खानदेश आटोपितात. सर्व ठिकाणीं मसलत पडली. आम्ही सारेच देशीं आल्यानें चहुंकडून मसलता कशा आटोपतात ! विचारास आलें तर देश व कोंकणची मसलत पुण्याहून सांभाळावी. भोसले व निजाम यांच्याही फौजा आणाव्या. सुरतमुंबईकरांस ठांसून राखावें. खानदेशांत महाल गेले व आहेत त्यांसाठीं होळकरांस खानदेशांत नेमावें. आम्हांस आज्ञा जाल्यास पातशहा, नजफखान व राजेरजवाडे मेळवून घेऊन इंग्रजांशीं गांठ घालतों. खावंदांचे प्रतापेंकरून चाकरी घडोन येईल ती खरी. प्रारब्ध धन्यार्चे, कष्ट सेवकाचे. समय तर नाजूक आला. आम्हांस हिंदुस्थानांत जाण्याची परवानगी पाठवावी, म्हणजे राजकारणें असतील तीं साधून साहसास लागतों. हें मर्जीस नये, देशींच यावें असा आग्रह असेल तर लाचार. इकडील सर्व निराशा करून आटोपून सडे खावंदाजवळ येऊं, सर्वांत आम्हीही आहों. म्हणजे सर्वांचे नाशांत आमचाही नाश आहेच. परंतु शत्रु उत्तर हिंदुस्थानांत येऊन नर्मदापार येतात, सुरतमुंबईकर एक होऊन बळ येऊन दौलत घेतात. आम्ही सारे लाचार होऊं, कोणाच्यानें कांहीं होणार नाहीं. फार निकड जाली, अवधि राहिली नाहीं, म्हणून खोलून लिहिण्यास आज्ञा जाल्यावरून विनंति लिहिली आहे. ( १३-८-१७८० ). या-

¶ सन १७७८ च्या उन्हाळयांत प्रथम महादजीनें स्वतः गॉडर्डास परवाने देऊन ही वाट पाडिली, नाना त्यास विरुद्ध होता. पहा प्र. ५ क. १.

§ ग्वाल्हेरच्या नै० ७५ मैल, झालावाड हद्दींत.

संबंधानें नानानें जबाब पाठविला तो असा. 'पाटीलबावांविशीं अन्यथा कल्पना उत्पन्न होणेंच नाहीं, त्यास ईश्वर किंवा परस्पर चित्त साक्ष आहे. येदां त्यांनीं श्रम फार केले. मसलत शेवटास नेण्याविषयीं कसर्तीत कमी केलें नाहीं. करणेंही दूरंदेशी युक्तीचें. निरंतर शत्रूशीं सन्मुखता; सर्वांविशीं अडचणींत. म्हणूनच इंग्रज जरबेस येऊन मनसब्याचे जातीनें माळव्यांत यावयाची सल्ला ठरली. गुजरातेंत गोविंदराव गायकवाडांस ठेविलें. बाजतबरसाद मसलतीचा नेट चांगला आहे. अशी मसलत शत्रूसही राहिली. पुढील कर्तव्याविषयीं मजकूर अलाहिदा लिहिला आहे, त्याचीं उत्तरें सत्वर यावीं. श्रीमंतांचे दौलतीचे कल्याणाविषयीं, व येथील संपादिले ऐक्याचे कामाविषयीं, अर्थे-प्राणें पाटीलबावांचा दुसरा प्रकार नाहीं, ऐसें ऐकोन संतोष, व हें निजाम व हैदरखानास लिहून पाठवावयाविषयीं भूषण वाटतें.'‡

महादजीनें आपल्या पत्रांत सर्व व्यवस्था स्पष्ट व दूरदृष्टीनें लिहिली आणि सिंदेहोळकर या दोघांस दोन कामगिऱ्या निरनिराळया द्याव्या असें कळविलें. तें बहुतेक मान्य केल्याशिवाय नानास गत्यंतरच नव्हतें; आणि ग्वाल्हेर गेल्याचें ऐकिल्यावर तर महादजीच्या दूरदृष्टीबद्दल सर्वांची खात्रीच झाली. मात्र पहिल्या-प्रथम नानास महादजीचें माळव्यांत परभारें जाणें पसंत पडलें नाहीं. त्यानें लिहिलें, 'सर्वत्र जाहिराणा जाला, कीं सरदार मसलत सोडून घरास गेले. पाटीलबावा इंग्र-जांशीं गांठ घालून पारिपत्य करीपर्यंत बाहेर सर्वांस विलगपणाचीं बोलणीं बोला-वयास कारणें जालीं. यास्तव इंग्रजांच्या उरावर मातबर सरदार मसलत योजून हैदरखान व भोसले यांस दुहेरी पत्रें पाटीलबावांनीं पाठवावीं, कीं इंग्रज जर-बेंत आल्यामुळें सुरतेस छावणीस निघोन गेले. पुढें भारी फौजेस त्या प्रांतीं रहावयास अडचण, यास्तव आम्ही इकडे छावणीस आलों. सर्व तयारी जारी आहे. बरसात होतांच इंग्रजांचे पारिपत्यास जाणें घडेल. छावणीस राहिलों हेंही इंग्रजांचे तोंडावरच आहे, व पल्लाही नजीक आहे, जलदीनें जाऊन पोहोंचूं. करार ठरल्याप्रमाणें ज्यानें त्यानें आपआपले तर्फेचें इंग्रजांचें पारिपत्य करावें. येणें प्रमाणें पत्रें जरूर पाठवावीं, म्हणजे त्यांची खातरजमा पटेल आणि मसलत सोडणार नाहींत. पत्रें न गेल्यास त्यांस वाटेल कीं सिंदेहोळकरांनीं मसलत

‡ ता. १४-८-१७८०; ग्वा. ४–२१, २२.

सोडिली. आजपावेतों खटपट करतां करतां हैदरखान चालून गेले; आणि भोसलेही बंगाल्यानजीक गेले. निजामांनीं आपले चिरंजीव बाहेर काढिले आहेत. असा मनसबा तोंडास असतां उज्जनीचे छावणीचें वर्तमान कळल्यावर सर्वांस संदेह पडेल. यास्तव पत्रें पाठवावीं म्हणजे दसरा होतांच मनसबा रंगास येईल. उज्जनीस जाणेंच होतें तर गुजरातेंत इंग्रजांचे उरावर दहा हजार फौज ठेवावयास पाहिजे होती.' ( २३-७-१७८०. )* माळव्यांतील स्वतःचा मुलूख शत्रूंस उघडा ठेवून आपण गायकवाडांच्या मुलखांत उगाच लढत बसणें महादजीस गैर वाटलें, म्हणून तो आपल्या मुलखांत गेला. पेशव्यांचें मध्यवर्ती राज्य कोसळलें तर आपआपला प्रदेश तरी थोडाबहुत बचवावा, अशीच भावना, भोसले गायकवाडांच्या उदाहरणांवरून सिंदेहोळकरांसारख्यांची सुद्धां कांहीं अंशीं होऊं लागली असावी असा संशय येतो.

पुढील मसलतीसंबंधानें नानानें पाटिलबावांस लिहिलें कीं, 'इंग्रजांच्या तीन मसलती करणें प्राप्त; एक हिंदुस्थान, एक गाडर व एक मुंबईकर. पैकीं पातशहा नजफखान अनुकूल याजमुळें हिंदुस्थानची मसलत हलकी जाईल अशी आहे. खानदेश, गुजरात व देशची मसलत औघड आहे, यास्तव पाटीलबावांनींच कोंडाईबारीकडे येणें चांगलें. नाहींपक्षीं होळकर, पवार व शिवाजी विठ्ठल मिळून भाद्रपद मासीं कोंडाईवर यावें आणि पाटीलबावांनीं हिंदुस्थानचे मसलतीवर नमूद व्हावें. होळकरास येथून पत्रें पाठवून जाबसालांत दिवसगत लागते, म्हणोन पाटीलबावांनींच होळकरांस अगर त्यांचे कारभाऱ्यांस बोलावून, साफ पुसावें आणि मसलत कोणती ती त्यांचे माथीं मारावी. परंतु पत्राची वाट न पाहतां आपापल्या कामावर रुजू व्हावें. निजाम भोसल्यांची फौज इकडे न यावयाचीं कारणें पूर्वींच लिहिलीं आहेत.' ( २-८-१७८० ).

महादजीनें सर्व राजकारण स्पष्ट सांगितल्यावर त्या संबंधानें नानाची खात्री पटलीशी दिसते. बादशहा, वजीर व सर्व रजवाडे तोंडापुरतें हो म्हणणारे, परंतु दोन दगडींवर पाय ठेवून प्रसंग पडेल त्याप्रमाणें वागणारे होते. गुजरात खानदेशांत महत्त्वाची मोहीम पुढें पडणार नाहीं हें महादजी जाणून होता, म्हणूनच त्यानें कोंडाईबारीवर येण्याचें नाकारिलें; आणि पुढील सालच्या

*का. सं. प. या. ३२१, ३२५.

मोहिमेवरून महादजीचाच अंदाज खरा ठरला. होळकरास कामास लावण्याचें एक नवीनच घोंगडें नानानें महादजीच्या गळयांत या वेळीं अडकवून दिलें. होळकराचे घरांत अपरिहार्य अडचण होती. राज्यकारभार व पैसा अहल्याबाईच्या हातीं आणि लष्करी कामास जबाबदार तुकोजी. त्या दोघांचा सदैव बेबनाव. तुकोजी समरांगणांवरील कामास तेवढा उपयोगी होता; परंतु स्वतः भानगडी सोडविण्याची पात्रता अंगीं नसल्यामुळें तो स्वार्थसाधु कारभाऱ्यांच्या मुठींत वागे. त्यांत आणखी व्यसनाची भर. हिशेबाची तर क्षितिच नाहीं. इकडे अहल्याबाई मोठी हिशेबी व करारी, परंतु तिला स्वारीच्या भानगडी व अडचणी घर बसल्या पटत नसत. त्या वेळीं प्रत्येक नामांकित सरदारास रणशौर्य व कारभार या दोनही बाबती अवश्य संभाळाव्या लागत. तुकोजीला कारभार कधीं साधला नाहीं, म्हणून स्वतंत्र जोखीम शिरावर घेऊन तडीस नेण्यास तो सर्वथैव असमर्थ होता. अहल्याबाई पुरुष असती तर असा प्रसंग आला नसता. ही दुहेरी राज्यव्यवस्था नुसती होळकरांसच नव्हे तर सर्व मराठशाहीस अंतीं बाधक झाली. महादजीस जो मान किंवा किफायत मिळे, तो आपल्यास असावा, अशी सदैव तुकोजीची इच्छा. दोघेही सरदार बरोबरीचे, ही कल्पना तुकोजीनें हृदयाशीं घट्ट बाळगिलेली. कारभाऱ्यांस हा तंटा तुटेना. मोकळा सोडला तर तुकोजी मोरोबा फडणिसासारख्यांच्या कारस्थानास बळी पडणारा. स्वतंत्र बुद्धि नाहीं, स्वतंत्र निश्चय नाहीं. तेव्हां त्यास वागवून घेण्याचें जोखीम नानानें हलकेच महादजीचे गळयांत अडकविलें. ही नवीन भानगड महादजीस निभावतां आली नाहीं. हें होळकर प्रकरण उत्तरोत्तर फारच रंगलें.

**२. इंग्रजांच्या शक्ती आंखडण्याचे उपाय.**—'पातशहा व नजफखान यांस मेळवून घेऊन त्यांचा आपला करारमदार पक्का करावा, उभयतांकडील दहा बारा हजार फौज त्यांजकडे पाठवून इंग्रजांशीं बिघाड करावा, एकानें कोंडाईबारीकडे येऊन एकानें हिंदुस्थानची मसलत करावी, हें पातशहास फारच अनुकूल पडेल,' असें नानानें त्याच वेळीं महादजीस कळविलें, यावरून सर्व हिंदुस्थानभर इंग्रजांवर झोड उठविण्याचा केवढा प्रयत्न नानानें केला हें दिसून येतें. 'पाटीलबावांस श्रीमंतांचे दौलतीची काळजी आहेच व भारही सर्व त्यांवरच. इंग्रजांची मस-

लत शेवटास नेली तरच सर्व गोष्टींचा परिणाम उत्तम. त्याची तर्तूद लौकर भाद्रपदमासींच व्हावी. गोविंदराव गायकवाडाबरोबर दहा बारा हजार फौज घेऊन अमदाबाद बडोद्याकडे हंगामा सुरू करावा. साल मजकूर इंग्रजांचा विचार कोंडाईबारीनें खानदेशांत येऊन पुढें पुण्यावर चाल करावी. मद्रासेंतून तीन हजार माणूस मुंबईस आलें आहे तेथें साहित्य भरपूर तयार होत आहे; तरी आपण ढील करूं नये, व फौजेस निरोप देऊं नये. हैदरखानानें सरकाराशीं स्नेह संपादून इंग्रजांशीं बिघाड केला, हा ये समयीं मोठा उपयोग आहे. इंग्रजांचें मानस कीं हैदरखान, श्रीमंत व निजाम तिघांच्याही दौलती घ्याव्या, एकाशीं शकटभेद करून दुसऱ्यास खालीं पाडावें, असें करतां एक राहिल त्यास शेवटीं गुंडाळावें, असें वर्तमान गुप्त बातमींत आलें आहे तें पाटीलबावांस सांगावें. इंग्रजांचीं कांहीं पलटणें गुलजारखानाचे मदतीस सोनगडास आलीं, त्या तोंडावर कोणीच नाहीं, असें जाणून तिकडे गणेशपंत बेहेऱ्याची छावणी करविली. विसाजी आपाजीस सुद्धां त्याजकडेच पाठविलें. ते टोंक्याकडे आले. कोंकणांत फौज होती तिची छावणी तळेगांवावर करविली, कारण मुंबईनजीक, कसा प्रसंग येतो कळत नाहीं. करवीर प्रांतांत परशुरामभाऊची छावणी करविली; रामाजी महादेवाचा पुत्र आनंदराव राम व धुळप यांस कल्याणानजीक मलंगगडास राहून कल्याणास व बेलापुराकडे झोंबट लाविलें आहे. या सर्व व्यवस्थेनें फौजांचा विस्तार फार जाला; पायींच्या माणसांचा दरमहा वीस लाख, व फौजेचें देणें पाऊण कोट चढलें आहे, तीं संकटें काय लिहावीं ! पाटीलबावा श्रीमंतांच्या पायांशीं एकनिष्ठ, बरें वाईट सांगावयास जागा इतकीच जाणून लिहिलें आहे.' § ( १८-८-१७८० ).

चहूंकडून आटोकाट प्रयत्न केल्याशिवाय इंग्रजांची पुरी खोड मोडणार नाहीं, असे विचार स. १७७९ च्या पावसाळ्यांत पुण्यास घाटले, त्यापूर्वीच निजामाचा, वगैरे आशय कळून आला होता. या संबंधांत महादजी व नाना यांनीं प्रथम वाटाघाट करून पुढील बेत ठरविला; आणि मग हरिपंत फडके व कृष्णराव काळे यांच्या मार्फतीनें अत्यंत गुप्तपणें ठिकठिकाणीं पत्रव्यवहार चालवून नानानें इंग्रजांविरुद्ध चौघांचा संघ स. १७७९ च्या दसऱ्याच्या मुहूर्तावर स्थापन केला. संघाच्या उभारणींत कृष्णराव काळे निजामाकडच्या,

§ का. सं. प. या. ३०४, ३०५, २२४, ३२२, ३२६.

व देवाजीपंत चारेघोडे भोसल्यांकडच्या कारस्थानींत वावरत होते. हैदराकडे आरंभीं थोडा उपक्रम झाल्यावर पुढें कृष्णराव नारायण या शहाजोग इसमास नानानें श्रीरंगपट्टणास पाठविलें. सबंध हिंदुस्थानांत हीं कारस्थानें घाटून सिद्ध होण्यास स. १७८० चें साल गुदरलें. बहुधा कोणतेही सत्ताधीश या कारस्थानांतून वगळलेले नव्हते. बनारसच्या चेतसिंगास नानानें पत्र लिहून इंग्रजांविरुद्ध उठविलें. त्यानंतर ता. २१-६-१७८० रोजीं नानानें दिल्लीचा वकील हिंगणे यास लिहिलें, कीं 'खंडूजी भोसले यांस बादशहाचें फर्मान जावें कीं तुम्ही व रावप्रधान पेशवे एकदील होऊन, इंग्रजांचे तंबीची मसलत ठरविली ही गोष्ट रास्त आहे. इंग्रजांची सजा करणें मंजूर आहे. खातरजमानें हा मनसुबा अंमलांत आणावा.' नजफखानानें बादशहाकडून असें फर्मान भोसल्यांस पाठविलें. यांशिवाय पोर्तुगीज, फ्रेंच, व डच यांनाही नानानें इंग्रजांविरुद्ध चेतविलें. फ्रेंच व डच इंग्रजांशीं अगोदरच लढत होते. डच वसाहतींचा मुख्य वांद्ग्राफ ( Vandegraef ) म्हणून होता, त्याशीं नानानें पत्रव्यवहार करून इंग्रजांचा सुरत किल्ला हस्तगत करण्याचा घाट रचिला. पोर्तुगिझांशीं तर ता. ३-६-१७८० रोजीं स्नेहभावाचा तह करून नानानें त्यांचें साह्य संपादिलें; आणि अशा प्रचंड उठावानें त्यानें इंग्रजांचा नक्ष उतरविला, ही गोष्ट त्याच्या कर्तबगारींतील उच्चतम कामगिरी समजली पाहिजे. $

तथापि होळकर प्रकरण वगैरे अनेक भानगडी उपस्थित होऊन पुढील मोहिमेची व्यवस्था लागेना, तेव्हां महादजीनें नानास सुचविलें, कीं 'तुमचे आमचे भेटीचा योग करावा, भेटींत मसलतीचा ठराव करून आपलाले कामावर जाऊं. सिरोंज भेलशाकडे मुख्य फौज ठेवून आम्ही थोड्या फौजेनिशीं बऱ्हाणपुरापावेतों येतों, तिकडून नानांनीं यावें, त्यांची आमची स्वच्छता होऊन जो लौकिक होईल तो मसलतीच्या उपयोगी पडेल. चारही मनसब्याचीं धोरणें ध्यानांत आणून मसलती वांटून जिमेवार लावाव्या. होळकरांनीं वाटेल ती मसलत पत्करावी, जड राहील ती आम्हांस द्यावी. ते आज सहा सात वर्षें फौज किती ठेवितात, चाकरी कशी करितात, ध्यानांत

---

$ स. मा. रो. २ पृ. ६६ व ले. ५४८–४९; दि. म. रा. १-७; का. सं. प. या. ४६४.

आहेच. यास्तव त्यांस पृथक् मसलत सांगावी म्हणजे मन घालून करतील. हिंदुस्थानचें काम जड आहे, त्यांजकडे कोंडाईबारीच द्यावी. सर्वांनीं एकत्रच राहूं म्हटल्यास माळवा राहत नाहीं.' ही भेटीची सूचना नानानें लगोलग स्वीकारिली. 'पत्र पावतांच होळकरांसह बावांनीं खानदेशांत यावें, आम्हीही कूच करून येतों, हा प्रकार आश्विनमासींच करावा, लांबला तर मसलतीस विरुद्ध,' असें नानानें कळविलें. ( १४-९-१७८० ).

खरोखरच ही नानामहादजीच्या भेटीची सूचना फार योग्य होती, पण ती घडून कां आली नाहीं तें समजून येत नाहीं. शंकाकुशंका घेऊन प्रकरण लांबणीवर टाकण्यांत महादजी मोठा वस्ताद होता. 'हिंदुस्थानांत दुसरा सरदार पाठवितात, तेव्हां आम्हांस उणेपण. - हिंदुस्थानची मसलत करावी म्हणोन लिहिलें, आतां आम्हांस काढून टाकणार.' अशी शंका महादजीनें घेतली. त्यावर नानानें लिहिलें कीं, 'ठराव करणें तो पाटीलबावांनीच करून सत्वर उत्तर पाठवावें, असें येथून लिहिलें असतां, कल्पना घेऊन वादविवाद घालावयास जागाच राहिली नाहीं. त्यांचे चित्तांत कल्पना उठतात, त्यांचें निवारण करणार ईश्वर. आम्ही जी गोष्ट चांगली, जींत दौलतीचें कल्याण व जी पाटीलबावांचे स्वरूपास उत्तम, तीच समजून लिहितों. उभय पक्षीं भेटीचा प्रकार लिहितात, हा चांगला आहे. परंतु पाटीलबावा व होळकर दोघांसही येणें लागेल. तेव्हां तिकडे इंग्रज, पातशहा, नजफखान यांस वाटेल कीं सरदार देशीं गेले. जाणून बखेडा करतील. इकडे मुंबईकडून गॉडरच्या बातम्या पै दर पै हंमेश येतात. या संधींत आम्ही गंगापार गेलों म्हणजे ते काय उपद्व्याप करतील कळत नाहीं, हा पेंच मोठाच दिसतो. श्रीमंतांचे पाय ध्यानांत आणून स्वच्छ अंतःकरणें संदेह सर्व टाकून पूर्वी मसलती लिहिल्या त्यांतून कोणता तो ठराव करून, आपापले कामावर जाऊन निकड करावी. घरांतील गोष्ट तर एका आईचीं लेकरें, संदेह टाकले म्हणजे स्वच्छताच आहे, नवें जडावें लागत नाहीं. दुसरें लिहिलें, कीं, होळकरांचे घरांत फूट. त्याची तोड पडल्याशिवाय फौजेची तर्तूद होत नाहीं, ही गोष्ट फार विलग दिसते. दिवस तर फार नेटास आले. भेटीचा प्रकार चांगला आहे. उभयतां सरदारांनीं खानदेशांत यावें, आम्ही येऊं.' (१५-९-१७८०). इतक्यांत 'सालेरचा किल्ला हस्तगत करण्यासंबंधानें दादा व इंग्रज यांचीं सूत्रें खेळूं लागलीं, तेव्हां

कोंडाईबारीचा बंदोबस्त सरदार करतात काय ? नाहीं तर आम्हांस येथून कळेल तसें करावें लागेल ' असें नानानें विचारिलें, आणि भेटीचा विचार सुचविला, त्या-संबंधानेंही तर्कवितर्क चालूं लागले. नाना लिहितो, ' सरदारांनीं बऱ्हाणपुरा अलीकडे चाळीस कोस यावें, भेटीनंतर फिरोन संदेह उत्पन्न न व्हावेत. आम्हांस कोणे गोष्टीची अडचण पाडूं नये. मुंबईचे तोंडावर रा. हरिपंत राहतील. हिंदुस्थान व सुरतेकडील दोन मसलती सरदारांनीं सांभाळाव्या. सरकारचें काम पूर्वी येथें मन घालून पाटीलबावा करीत होते, त्याप्रमाणें करावें. आंतबाहेर वांकडें कोठेंही नसावें. इतक्या गोष्टींची पुरती खातरजमा होऊन चिठी आली म्हणजे आम्ही निघून येऊं. आम्ही येथून गेल्यावर श्रीमंतांचें राहणें पुण्यास ठीक नाहीं, सबब पुरंदरास राहतील.' (२७-९-१७८० ). आश्विन व. ७ स नानानें निघून खडकीवर मुक्काम केला.

ता. १७-११-१७८० रोजीं आपाजीराम नानास लिहितो, ' आपलें स्वदस्तूर पत्र पाटीलबावांस आलें. सत्वर देशीं यावें येविशीं लिहिलें त्यास कार्तिक व० २ (१४ नोव्हेंबर) डेरेदाखल होण्याचा निश्चय जाला तों अगोदर इंदुवारीं दोन प्रहरीं घरांतून निघण्याविशींची प्रतिकूलता जाहली. सबब फिरोन व० १० चा निश्चय होऊन डेरेदाखल जाले, तों इंग्रजांची फौज चालून आली, त्यांशीं गांठ घालावी असा विचार आहे. सबब तूर्त देशीं येण्याचा विचार घडत नाहीं. येथून रामजीपाटील जाधव रवाना केले आहेत, ते सविस्तर सांगितील. तुकोजी होळकर रेवा उतरले, देशीं येणार. ' एवंच महादजीनें देशीं येण्याची नुसती हूल दाखविली. मनांतून नानास भेटण्याचें नव्हतेंच असें दिसतें. नाना तर आपण होऊन महादजीकडे एकटा कधीं जाण्याचा संभव नव्हता. †

' पाटीलबावांचे चित्तांत सर्व गोष्टी आल्या. जाहालें तें जाहालें, याउपर मागील अर्थ लिहिण्यांत न यावे, ' असें महादजीकडून सुचविल्यावर नानानें लिहिलें, ' आम्ही मागील अर्थाचा विस्तार पूर्वीपासूनच करीत नाहीं. कोठें कोठें लिहिण्यांत येतें, याचें कारण पुढें तरी सरकार काम चांगलें व्हावें. तेही

† का. सं. प. या. २२०, २९१, २२१, [illegible] ३१५, २१२, २९१; ग्वा. ३-१८–२०.

थोर आहेत, समंजस आहेत, उत्तम तेंच करितील.' (३०-९-१७८०).
'तुकोजी होळकरांशीं इकडे येण्याचा मजकूर बोलण्यांत आला कीं नाहीं, नाहीं तर आइते समयीं दिक्कत काढतील. आतां त्वरेनें येणें होऊन मसलतीवर नमूद व्हावें, नाहीं तर अशाच खालीं दिवस जातील.' असें नानानें २६-१० रोजीं लिहिलें. यावरून पुढें होळकर प्रकरण उपस्थित होऊन तेंच कांहीं दिवस पुरलें, त्याचा विचार अन्यत्र स्वतंत्रच केला आहे. अशा विवंचनेंत मसलतीस कोठेंच कांहीं ठिकाण नाहींसें पाहून नाना १३ नोव्हेंबर रोजीं वैतागानें लिहितो, 'आश्विन व॥ ७ स (२० ऑक्टो.) निघतों म्हणून पत्रें आलीं त्यास दीड महिना होऊन गेला. आम्ही त्याच दिवशीं निघून खडकीवर मुक्काम केला. अद्याप उभयतां सरदार आपापले घरीं. फौजांची तर्तूद नाहीं, मसलतीचा निश्चय नाहीं. गॉडर्ड वसई घेतो. पैक्याचे ओढीमुळें प्रसंग कठिण पडला आहे. परिणाम दौलतीचा ईश्वराधीन. लिहिण्याची बोलण्याची अवधि याउपर कांहीं राहिली नाहीं. ईश्वर इच्छा असेल तशा बुद्धीही सरदारांस होतील. आषाढ मासापासून लिहीत गेलों. तिहीं ठिकाणीं इंग्रजांची लढाई लागली. दिवसगत लागल्यामुळें दौलत पेंचांत आली. याउपर सरदारांचे थोरपणास उचित तें करतील. त्यांनीं तूर्त ईर्षा सोडलीसें दिसतें. वसई गेली त्यापक्षीं कोंकणपट्टी राहणें कळतच आहे. असें असोन देशीं जाण्याची निकड दिसत नाहीं. लिहिण्याची व इशारतीची परमावधि झाली. तुकोजी होळकर आज दीड महिना इंदुराहून निघाले, परंतु अद्याप रेवातीरींच आहेत. उभयतां सरदारांची चित्तशुद्धि नाहीं. होळकर निघाले ते पाटीलबावांचें संमत घेऊन गेले नाहींत.' अशा नानाप्रकारच्या वाटाघाटी त्या वेळच्या कागदांत दिसून येतात.

नाना जसा पानपत अगोदरपासून मराठ्यांच्या राजकारणांत अनुभवानें तयार झाला; तसाच, किंबहुना त्याच्याहून पंधरा वर्षें वयानें वडील असल्यामुळें महादजीनें नानासाहेब पेशव्याच्या सर्व स्वाऱ्या पाहिल्या, नंतर उत्तर हिंदुस्थानांतील पानिपतची व पुढें माधवरावाची मोठी स्वारी त्यानें पाहिली, स्वतः त्यांत मुख्य भाग घेतला. अलीकडे इंग्रजांशीं दोन वेळां गुजरातेंत व तळेगांवावर व कोल्हापुरावर इत्यादि ठिकाणीं जो नानाविध अनुभव त्यानें मिळविला, त्याचा इत्यर्थ इतकाच कीं, इंग्रजांप्रमाणें आपले कवाइती कंपू व

तोफखाना तयार केल्याशिवाय त्यांच्याशीं सामना करणें शक्य नाहीं. या तत्त्वास अनुसरून तो पुढें वागला. अनुभवाच्या जोरावर लष्करी व मुत्सद्दी या दोनही बाजूंनीं तो नानास पाहिजे तसा दाबूं शके. एक प्रकारें स्वतःचा अंत लागूं न देतां तो नानाफडणिसास कसा खेळवी, हेंही वरील पत्रव्यवहारांत दिसतें. मात्र त्याचें बोलण्यांत बोलणें नसावयाचें, देखावा पुष्कळ करावयाचा, स्वतःचें अंग बचावून दुसऱ्यास गोत्यांत आणावयाचें, वगैरे त्याचे स्वभावविशेषही वरील पत्रांत दिसून येतात. स. १७२७ त जन्मलेला, त्याच्याइतका वृद्ध व अनुभवी प्रमुख पुरुष सखारामबापूनंतर महाराष्ट्रांत दुसरा कोणी नव्हता. नाना मोठा हिशेबी, व्यवस्थित, सर्वांचीं अनुसंधानें ठेवून प्रकरणें लगोलग उलगडणारा, लेखणीचा व वचनाचा खंबीर, या योगानें शत्रुमित्रांचा त्याजवर विश्वास असे.

स. १७८० च्या नोव्हेंबरांत आतां नवीन मोहीम सुरू व्हावयाची, त्यास या वेळच्या अवांतर गोष्टी प्रथम लक्षांत घेतल्या पाहिजेत. हल्लीं चाललेल्या या प्रचंड युद्धांत दोनही पक्षांची मुख्य भिस्त पैशावर असून इंग्रजांस बंगाल्यांतून सालीना एक कोट रुपया अविच्छिन्न पावत असे. हा पैशाचा ओघ तोडल्याशिवाय इंग्रज नरम होणारे नव्हते. बंगाल प्रांतांत धामधूम केली कीं इंग्रजांच्या नाड्या आंखडल्या. हा प्रकार महादजी पूर्णपणें जाणत होता. बंगाल्यांत इंग्रजांस ताण बसल्याशिवाय त्यांचें बल कमी होणार नाहीं, हें महादजीचें सूत्रवाक्य अनेकवार व्यक्त झालें आहे. (ख. ले. २६३६). बंगाल्यांतूनच उत्तरेस अयोध्या, अंतर्वेद, दिल्लीपावेतों इंग्रजांचा शह होता. काशीचा राजा व वजीर हे हेस्टिंग्सचे कधीं न ओसरणारे पैशाचे झरे होते. ज्याच्या हातांत बादशहा, तो सार्वभौम सत्तेचा मालक. या सर्व गोष्टी लक्षांत आणून महादजीनें नानास सुचविलें, कीं आपणास माळव्याकडे जाऊं द्यावें, भोसल्यांस पुण्याचे मदतीस घाटांत आणावें व तुकोजीस खानदेशाकडे गुजरातचे हद्दीवर ठेवावें. परंतु ही योजना नानानें मान्य केली नाहीं. बारभाईचा मुख्य आधार महादजी होता. त्यांचा दादाशीं शत्रुभाव तीव्र होता. भोसले दक्षिणेंत येते तर कदाचित् दादास मिळून त्यांनीं भलताच प्रकार केला असता. म्हणून नानास जसा महादजीचा भरंवसा तसा भोसल्यांचा नव्हता. मूळचा बंगाल प्रांत भोसल्यांचा, तो सोडविण्यास ते जितके उत्सुक होते तितके पुण्यास

येऊन पेशव्यांच्या घरगुती लढाया लढण्यास तयार नव्हते. सन १७७९ च्या जून महिन्यांत दादा सुरतेस जाऊन गॉडर्डानें त्यास आश्रय दिल्यावर पावसाळ्यांत पुढील मसलतींची वाटाघाट पुण्यास सुरू झाली, तींत वरील मतभेद तीव्र होऊन नानामहादर्जींमध्यें सडकून वैषम्य आलें; आणि महादजीला माळव्याच्या प्रदेशाची आशा सोडून गुजरातेंत जाणें भाग पडलें. इकडे राहिल्यानें पैशाची पैदास न होतां महादजीची अनेक बाजूंनीं पुढें मोठी कुचंबणा झाली. इंग्रजांनीं तिकडे त्याचेच प्रदेशावर धाड घातली. त्यांचे तोफांपुढें गनिमी काव्याचा टिकाव लागेना. एकंदरींत या युद्धांतून कशीबशी निभावणी करून, प्रथम पाश्चात्य धर्तीवर फौजा तयार केल्याशिवाय इंग्रजांशीं सामना करावयाचा नाहीं, असा महादजीचा निश्चय झालेला दिसतो. पुण्याचें रक्षण मी माळव्यांत राहूनच करीन, असें महादजी पुनः पुनः नानास सांगे त्याचें बीज हें असें वर प्रमाणें आहे.

**३. हैदर नायकाचा इंग्रजांवर घसारा,** (१७८० चा पावसाळा).—इंग्रज फ्रेंचांचें युरोपांत युद्ध जुंपलें, त्याचा संपर्क पूर्व वहिवाटीप्रमाणें हिंदुस्थानास पोंचला आणि येथें इंग्रजांस सर्वत्र फ्रेंच कारस्थानाचा वास येऊं लागला. त्यासाठीं पश्चिम किनाऱ्यावरचें माहे बंदर कर्नल ब्रेथ्वेटनें १९-३-१७७९ रोजीं घेतलें. तें पूर्वी हैदराचे कक्षेंतलें स्थळ असून तेथून त्यास फ्रेंचांची मदत होत असे. ती बंद झाल्यामुळें हैदरास इंग्रजांविरुद्ध शस्त्र उचलणें भाग पडलें. स्वामित्व निर्बाध असावें हा इंग्रजांचा हट्ट पूर्वीपासूनचाच आहे. मराठ्यांपासून ठाणें, वसई, वगैरे ठिकाणें घेण्यांत त्यांचा हाच हेतु होता. मद्रास व बंगाल या दोन प्रांतांत स. १७५६-६३ पावेतों इंग्रजांची सत्ता कायम झाल्यावर त्या दोहोंच्या दरम्यान आपल्या लष्कराचा संचार अनिरुद्ध असावा अशी त्यांस इच्छा झाली. हेस्टिंग्सला ही अडचण अतिशय भासूं लागली, याचें कारण त्यानें युद्धाचा वणवा सर्व देशभर पेटवून दिला होता. हैदराशीं युद्ध सुरू होतांच बंगालची फौज मद्रासेकडे पाठविण्यास मध्यें दोन सत्तांचा विरोध आला. ओढ्या प्रांत म्हणजे कटक जिल्हा नागपुरकर भोसल्यांचा. त्याच्या दक्षिणेस निजामाचा प्रदेश नेलोरपर्यंत होता. कृष्णेच्या उत्तरेकडील ओढ्यापर्यंतचा किनारा 'उत्तर-सरकार' या नांवानें प्रसिद्ध असून तो पूर्वीच इंग्रजांनीं हस्तगत केला होता. फक्त कृष्णामुखाचे दक्षिणेकडील

किनाऱ्याचा प्रदेश ज्यास गुंटूर जिल्हा असें नांव होतें, तो निजामानें आपला भाऊ बसालतजंग यास जहागीर म्हणून दिलेला होता. हा बसालतजंग अडोनीस राहत असे. निजाम इंग्रजांचा मच्छलीपट्टण येथें पूर्वी तह झालेला होता, त्यांत त्यानें आपल्या हद्दींत फ्रेंचांना आश्रय देऊं नये असें कलम होतें. परंतु बसालतजंगानें आपल्याजवळ एक लहानसें फ्रेंच पथक नोकरीस ठेविलें, तें इंग्रजांच्या डोळ्यांत खुपे; आणि त्याबद्दल उभयबंधूंकडे इंग्रजांच्या तक्रारी चालू होत्या. तशांत हैदरानें बसालतजंगावर स्वारी करून चार लाख रुपये खंडणी घेतली, त्यांत फ्रेंच पलटणांचा बसालतास उपयोग झाला नाहीं, म्हणून त्यानें मद्रासचा गव्हर्नर रंबोल्ड याजकडे इंग्रजांची मदत स्वसंरक्षणार्थ मागितली, आणि त्याचे खर्चास गुंटूर प्रांत लावून दिला. या कृत्यानें निजामली व हैदर दोघेही चिडून गेले. निजामली राज्याचा मालक आणि बसालत भाऊ झाला तरी त्याचा एक जहागीरदार. तेव्हां त्यानें आपला प्रांत परभारें इंग्रजांस कायमचा देऊन त्यांचा खुष्कीचा रस्ता मोकळा करणें म्हणजे इंग्रजांचें सैन्य निजामलीनें आपल्याच अंगावर ओढून आणण्यासारखें होतें. मराठशाहींतील भोसले गायकवाड वगैरे सरदार जसे इंग्रजांनीं फोडिले, तसाच निजामलीचा भाऊ बसालतजंग त्यांनीं फोडून आपल्या आश्रयाखालीं घेतला. इंग्रजांविरुद्ध इतकी चीड निजामास येण्याचें हेंच मुख्य कारण आणि याच कारणास्तव चौघांची जूट उभारण्यांत त्यानें एवढा पुढाकार घेतला. इकडे गुंटूरच्या पश्चिमेचा अडोनी प्रांत हैदराच्या कक्षेंतला, तो इंग्रजांनीं घेतला, कीं आपल्यावर चालून येण्याचा त्यांचा मार्ग बंगालपासून खुला झाला, ह्याबद्दल हैदरासही मोठें वैषम्य वाटलें. हैदरानें या वेळीं खुद्द दिल्लीच्या बादशहाकडे संधान लावून सर्व दक्षिणच्या सुरसुभेदारीची सनद मिळविली, त्या आधारावर तो कृष्णेच्या दक्षिणेकडील सर्वच प्रदेश आपला म्हणे. परंतु रंबोल्डनें बसालतशीं केलेला तह हेस्टिंग्सनें मंजूर केला नाहीं; आणि रंबोल्ड प्रकृति बिघडल्यामुळें एकदम काम सोडून स्वदेशीं निघून गेला. तेव्हां हेस्टिंग्सनें गुंटूर प्रांत निजामलीस परत देऊन त्याची समजूत केली; म्हणून इंग्रजांविरुद्ध जोराची उचल करण्याचें त्यास कारण उरलें नाहीं. एवंच नानाच्या कारस्थानीनें एकवटलेल्या चार शत्रूंपैकीं हेस्टिंग्सनें केवळ राजकारणाच्या जोरावर निजाम व भोसले या दोघांस गप्प बसवून, इंग्रजांविरुद्ध झालेली जूट निमजोर केली. गुंटूर प्रांत पुढें सन १७८८ त कॉर्नवॉलिसनें निजामापासून मिळविला.

स. १७८० च्या जून महिन्यांत हैदर सत्तर हजार जय्यत फौज व १०० तोफा घेऊन श्रीरंगपट्टणाहून निघाला तो थेट अर्काटवर चालून आला. अर्काटचा नबाब महंमदअली इंग्रजांचा आश्रित आणि हैदराचा पक्का शत्रु. कारण महंमदअलीस नाहींसा करून सर्व दक्षिणची मालकी आपली असें सिद्ध करण्याचा हैदराचा घाट होता. त्याच्या फौजेंत लाली नांवाचा एक फ्रेंच अंमलदार चारशें फ्रेंच शिपाई घेऊन लढाईची शिस्त पाहत होता. पूर्वीं डुप्लेनंतर लाली इकडे आला होता तो हा नव्हे. हैदरानें या युद्धाची पुकारणी जिहाद म्हणून केली आणि परधर्मी इंग्रजांस हांकून लावण्याचा संकल्प जाहीर केला. नबाब महंमदअली इतका व्यसनी व कर्जबाजारी झाला होता कीं हैदर चालून येतांच महंमदअलीची प्रजा हैदरासच साह्य करूं लागली. सर्व मुलूख जाळून लुटून उद्ध्वस्त करीत हैदर प्रथम अर्काटला वेढा घालून पुढें धडाक्यासरशीं मद्रासपासून दहा मैलांवर येऊन थडकला. (खं. १९-७३).

जळणाऱ्या गांवांचा धूर पाहून मद्रासचें इंग्रज कौन्सिल चपापून गेलें. दाणावैरण म्ह० गवताची काडी सुद्धां हैदरानें त्या प्रदेशांत शिल्लक ठेविली नाहीं. मद्रासचा सेनापति सर हेक्टर मन्रो पूर्वीं बक्सार येथें मीरकासीमचा पाडाव करण्यांत प्रसिद्धीस आलेला, या वेळीं वृद्ध व हीनबल झाला होता. त्याच्याजवळ एकंदर आठ हजार फौज होती, त्यापैकीं अडीच हजार लोक कर्नल बेलीच्या हाताखालीं गंटूर प्रांत हस्तगत करण्यास गेले होते. त्यांस तावडतोब परत बोलावून, त्यांच्यासह मन्रोनें हैदराशीं सामना करावा असा मद्रास कौन्सिलनें हुकूम सोडिला. हैदरास ही बातमी कळून त्यानें आपला मुलगा टिपू यास बेलीवर पाठविलें, आणि मन्रो निघून कांचीकडे येत होता, त्याजकडे लक्षच दिलें नाहीं. बेली परत येत असतां त्यास टिपूनें अडवून धरिलें, तेव्हां बेलीनें मन्रो सेनापतीस सर्व फौजेनिशीं आपल्या मदतीस बोलाविलें. परंतु स्वतः पुढें न जातां फ्लेचरच्या हाताखालीं आणखी ११०० फौज बेलीस सोडविण्यास मन्रोनें पाठविली. त्यांचा मिलाफ होऊन ते मन्रोस सामील होण्यासाठीं कांचीकडे येत असतां ता. ६-९-१७८० रोजीं त्यांजवर टिपूनें एकदम हल्ला केला. तरी टिपूस धुडकावून ते पुढें येऊं लागले. जवळच दोन मैलांवर मन्रो होता. तो जागचा हालला नाहीं. ता. ९ रोजीं हैदरानें बेलीस वेढून तोफांनीं त्याच्या बहुतेक फौजेचा फन्ना उडविला. दुसरे

दिवशीं १० तारखेस ही लढाई पुनः चालून बेलीच्या ३७०० लोकांपैकीं ७० इंग्रज अंमलदार व बहुतेक सर्व फौज मृत्युमुखीं पडली. फक्त ३०० युरोपियन्स उरले; आणि ते नाइलाजानें हत्यारें ठेवून हैदराचे स्वाधीन झाले. या वेळीं मन्रोनें स्वस्थ न बसतां हैदरावर दुसऱ्या बाजूनें चाल केली असती, तर इंग्रजांस जय मिळण्याचा पुष्कळ संभव होता. परंतु मन्रोनें आपल्या सर्व जड तोफा तळ्यांत फेंकून दिल्या आणि सामानसुमान टाकून आपण मद्रासेकडे परत आला. इतकीं वर्षें शौर्य व हिंमत या गुणांनीं अजिंक्य अशी जी इंग्रजांची ख्याति झाली होती ती अशा रीतीनें हैदरानें तत्काळ नाहींशी केली. आपण बेलीच्या फौजेची कशी चंदी उडविली, त्याचीं चित्रें त्यानें श्रीरंगपट्टणाच्या वाड्यांतील भिंतींवर ऐटीनें काढिलेलीं अद्यापि पाहवयास मिळतात. मद्रासच्या या कठिण प्रसंगांत हेस्टिंग्सनें सर आयर कूट यास बंगालची फौज देऊन जलमार्गानें व क० पियर्स यास खुष्कीनें मद्रासेस पाठविलें. पण कूटला सुद्धां सुमारें वर्षभर हैदरानें दाद दिली नाहीं. याप्रमाणें स. १७८०–८१ त इंग्रजांची स्थिति अत्यंत खालावली. आपण जगतों कसे, असें त्यांस होऊन गेलें. हेस्टिंग्सचे डोळे पांढरे झाले. निष्कारण कुरापती काढून हा आपल्या राष्ट्राचा संहार करणार अशी कांहीं काळ येथें व इंग्लंडांत सर्वत्र समजूत झाली. स. १७८१ च्या जून महिन्यांत लॉर्ड मेकार्टने मद्रासचा गव्हर्नर नेमून आला. त्यानें ही परिस्थिति पाहून वरिष्ठांच्या परवानगीशिवाय केवळ स्वतःच्या जबाबदारीवर वाटेल त्या प्रकारें तह घडविण्यासाठीं निरनिराळ्या शत्रूंकडे पत्रें देऊन स्वतंत्र वकील पाठविले. या उपक्रमानें जो गोंधळ उडाला त्याचें निरसन हेस्टिंग्सलाच करावें लागलें. बिघडलेला डाव शक्य तितका सुधारल्याबद्दल इंग्रज ग्रंथकार अद्यापि हेस्टिंग्सची वाहवा करितात.

नाना फडणिसाचें राजकारण समजण्यासाठीं हैदराच्या हालचालींचा इतका विस्तार करावा लागला. सन १७८० च्या ऑगस्टांत हैदरानें नानास लिहिलें, 'आम्ही घांट उतरून कित्येक गड, किल्ले व ठाणीं घेतलीं. इकडील फौज मद्रासचे चौबीर्दे मारामारी करीत फिरत आहे. ते जमा होऊन मैदानास निघतील तरी लढाई करावी, म्हणोन मुकर केलें आहे.' त्यानंतर ता. ६-१० रोजीं तो पुनः लिहितो, 'जनरल मन्रो नामें सरदार दोन हजार गोरे, आठशें तुरुब स्वार, दहा हजार बार व तीस तोफां सुद्धां लढाईचे इच्छेनें कांचीस

आल्यावरून आम्ही त्याचे फौजेस घेरा दिला. त्याचे कुमकेस जनरल बेली जंगी सरंजामानें येत असतां त्याचे तंबीस इकडूनही फौज पाठविल्यावर पुढें येऊं न शकतां कंचीपासून तीन कोसांवर गढीचे आश्रयानें राहिले. त्याच वख्तीं आम्ही कंचीस आलों. मारामारी करून बेलीचे फौजेस कत्तलआम केलें. शिवाय तीस सरदार व गोरे पांचशें सरकारांत पाडाव आले. त्यांचें सर्व लष्कर लुटून घेतलें. मन्रो रातचे वख्तीं फरारी जाहले. त्यांची सर्व जमियत मारून घेतली. आपणास कळावें. कांहीं जुजबी जमियेतनिशीं चेंगलपट येथील गढीचे आश्रयास जाऊन तो पोंचला. आम्हीं त्या गढीस घेरिलें आहे.' हैदर व नाना फडणीस यांचा पत्रव्यवहार काव्येतिहास संग्रह पत्रें यादी ले. ४५७–४८७ चा या मोहिमेसाठीं अभ्यासकांनीं अवश्य पाहण्यालायक आहे. विस्तारभयास्तव सर्वांचे उतारे येथें घेतां आले नाहींत.*

ता. १-१-१७८१ चें वर्तमान हैदर पुण्यास लिहितो,—'इंग्रजांची फौज गारद जाली हे खबर कलकत्यास पोंचतांच जनरल कूट भारी जमावानिशीं चेनापट्टणास आला. इंग्रजांनीं नागपुरकर भोसल्यांशीं गुप्त जाबसाल करून सलूख करून घेतला. निजामाकडे तर त्यांचा मातबर बोलणारा जाऊन दार-मदार जाहलाच आहे. कोणीही वजेनें श्रीमंत पेशव्यांशीं सलूख करून मुंबईचा सरंजाम इकडे घेऊन येणें म्हणोन मुंबईकरांस व गॉडर यास चेनापट्टणचीं पत्रें गेलीं आहेत. कर्नाटकगड$ वगैरे कित्येक किल्ले व महंमदअलीखांचा भाऊ अबदुल वाहबखां हस्तगत जाहले.' अशाच मजकुराचें पत्र हैदराचें महादजीस गेलें. त्यावर त्यानेंही निभावणी-पत्र उलट पाठविलें. ( ग्वा. २-२५१ ).

**४. कृष्णाजी नारायणाची हैदराकडे वकिलात** (स. १७७९-८१).—नानानें जेव्हां हैदराशीं तह करून इंग्रजांविरुद्ध चौघांचें कारस्थान उभें केलें, तेव्हां हैदरानें मराठ्यांचा एक प्रतिष्ठित वकील सर्व कामें बोलून ठरविणारा असा पुण्याहून आपल्याकडे बोलाविला. तदनुसार कृष्णराव नारायण जोशी सातारकर यास इतमामानिशीं पुण्याहून रवाना केलें. हा गृहस्थ नारायणरावाचे वधानंतर बारभाईच्या अंतरंगांत असून साबाजी भोसले व निजामली यांस दादाचे विरुद्ध बारभाईकडे खंबीरपणें ठेवण्याची कामगिरी करीत होता. खं. १०

---

* खं. १०. २६१, २६७; का. सं. प. या. ४५७-४८७. $ अर्काट ?

ले. ८९-१४२ च्या पत्रांत याचा उल्लेख वारंवार असून त्याचा बाप नाना जोशी पुरंदरास होता. नाना जोशी साबाजी भोसल्याबरोबर नागपुराजवळ मारला गेला. कृष्णाजी नारायणाच्या हैदराकडील वकिलातीचा पत्रव्यवहार सुमारें २०० कागदांचा राजवाड्यांनीं इतिहास संग्रहांत १९ व्या खंडांत छापला आहे. त्यांतील महत्त्वाचे मुद्दे येथें ध्यानांत ठेवणें जरूर आहे. प्रथम हैदरास नानाचें पत्र गेलें कीं 'आपणाकडील वकील नरसिंगराव, इकडील कृष्णराव नारायण, सिंदे यांजकडील त्रिंबकराव, व रास्ते यांजकडील गोविंदराव नारायण व गणेश केशव आपल्याकडे तहाची याद करार करून घेऊन जात आहेत, त्याप्रमाणें आपणाकडून निभावणींत यावें.' हे वकील स. १७७९ च्या ऑक्टोबरांत निघून जानेवारींत श्रीरंगपट्टणास पोंचले. तेथें सर्व हिंदी राजकारणाची वाटाघाट होऊन नानातऱ्हेच्या शंकाकुशंका काढून हैदरानें पांचसहा महिने फुकट घालविले. पुण्यास नानाकडे व गुजरातेंत व माळव्यांत सिंद्यांकडे याप्रमाणें शेंकडों टपालवाल्यांचा धूमधडाका चार सहा महिने किंबहुना वर्ष दोन वर्षे चालला. कारण हैदर व मराठे दोघेही एकमेकाविषयीं अत्यंत साशंक होते, आणि लेखी वचनें पाळलीं जातील अशी कोणासच खात्री नव्हती. खरें म्हटलें तर चौकडीची ही जूट केवळ मारून मुटकून बनविलेली होती.† ती भक्कम बनती तर इंग्रजांस हिंदुस्थानांतून साफ उखडून देण्याचें सामर्थ्य तींत होतें. ज्याप्रमाणें हल्लींच्या काळांत राष्ट्रसंघ बनला तशाच स्वरूपाचा हिंदुस्थानांतील प्रमुख सत्ताधीशांचा एक संघ बनविण्याची ही शक्कल नानानें काढली होती असा तर्क होतो. त्याचे योगानें इंग्रजांचे वाढत्या शक्तीस आळा बसवायचा होता.

सर्व सिद्धता करून कृष्णराव तात्या निघाला, त्याचा मुक्काम वारणेच्या कांठीं कोडोलीवर १४-११-१७७९ रोजीं झाला. पुढें डिसेंबरांत तो हैदराकडे पोंचणार त्यापूर्वीच इंग्रजांनीं बसालतजंगाच्या मदतीस अदवानीस फौज पाठविली, त्याबरोबर हैदरानें स्वतःच त्या प्रांतावर फौज रवाना केली. त्यामुळें निजामास वैषम्य वाटून जमलेलें चौकडीचें कारस्थान ढांसळण्याचा प्रसंग आला. 'कसेंही करून अदवानीस उपसर्ग देऊं नये, त्यामुळें निजामास उगाच वैषम्य वाटून इंग्रजांवर चालविलेल्या मुख्य मसलतीस बाध येईल,' अशा

† खरे २५१०; खंड १०. २३५, २३६; का. सं. प. या. ४८३, २४१.

गोष्टी नानानें कृष्णरावामार्फत हैदरास वारंवार कळविल्या. त्यावरून हैदरानें अदवानीचा उपसर्ग मना केला. अशा नाना भानगडी उपस्थित होऊन पत्रव्यवहार वाढला. प्रथमच तहनाम्यांतील कित्येक कलमांस हैदरानें हरकत घेतली; व सिंद्याकडील निभावणीचीं पत्रें ठीक नव्हतीं तीं सर्व त्यानें दुरुस्त करून मागितलीं. असें करण्यांत पुष्कळ काळ गेला. ता. ७-२-१७८० रोजीं नानानें खालील मजकूर हैदरास लिहिला. $

'इंग्रजांस सांप्रत काळीं गर्व फार जाला. पांच वर्षें त्यांचे चालीस पक्केपणें माहीतगारी जाली. कौल करार इमान त्यांचे गांवींच नाहीं. प्रथम लिहिणें व बोलणें परम गोड. दुसऱ्यास असें वाटावें कीं काय इमान व वचन आहे तें यांपाशीं, खरेपणाची रास, ऐसी भूलथाप पडावी. परिणामीं उमजतें. त्यांची नजर केवळ वांकडी. सर्व मुलूख कबज केला. एकास मिळवून घ्यावें, एकास हलकें करावें, हे जात करण्याची. फोडाफोड करावी, नाद राखावा, ऐसें आहे. ज्याचें इमान सुटलें आणि वचनाची कायमता नाहीं, ते दौलत एका दिवसांत बुडते हा नेम. ईश्वरें असें जाणूनच राव पंतप्रधान, निजाम, हैदर व भोसले इतक्यांचा एका होऊन त्यांस ताण बसवावे ऐसें ठरविलें. दौलत देणें हा अखत्यार ईश्वराचा.' तहाचे पूर्ततेसाठीं हैदरानें महादजींचें निभावणीपत्र मागितलें तें आणण्यासाठीं गुजरातेंत नारो शिवदेव यास मुद्दाम नानानें पाठविलें. या वेळीं दर्यांतूनही पेशव्यांचे व इंग्रजांचे आरमाराची लढाई सारखी चालू होती. प्रथम हैदरानें दिरंगाई चालविली, त्याजबद्दल वकिलामार्फत नानानें त्यास फारच निकड लाविली; आणि दादाचा मिलाफी बाजीराव बर्वे हैदराचे नोकरींत होता, त्यास दूर करविलें, तेव्हां बर्वे निघून इंदुरास अहल्याबाईचे आश्रयास गेला. नाहीं होय करतां हैदर १३ जून सन १७८० रोजीं श्रीरंगपट्टण सोडून इंग्रजांवर निघाला आणि लगोलग कृष्णराव नारायण जुलई महिन्यांत निघून परत देशीं आला. हैदराच्या मनावर त्यानें चांगला परिणाम करून कारस्थान यशस्वी केलें, असें पुढें कैक दिवस त्यास हैदराचीं पत्रें येत होतीं, त्यांवरून दिसतें. 'सांप्रत अंगरखा शिवणेकरितां गुजराती शहाणा शिंपी सावनुराहून आणविला आहे, आपणांस जरूर असल्यास आपल्याकडे घेऊन येतों,' असें

$ खंड १९. ४९, ५६, १०२, ११२, ११४, १४७, ११७, १३०, १५१, २०६; भा. व. २ प. या. ५९.

एक गृहस्थ कृष्णरावास लिहितो, त्यावरून गुजराती शिप्यांचें माहात्म्य समस्त देशांत त्या वेळीं सुद्धां फार होतें असें दिसतें.

निभावणीपत्र पाठवितांना हैदरासंबंधानें महादजीनें व्यक्त केलेला अभिप्राय ध्यानांत ठेवण्याजोगा आहे. तो म्हणतो, 'आम्हांस नाइकाचे गुण ठाऊकच होते. परंतु उत्तरप्रत्युत्तरांत वेळ घालविण्याचा आज समय नाहीं. आम्ही मसलतीस आलों, लांब माळ्यांत पडलों. थोरल्या दौलता वचनावर चालत असतात. तो बळकटीचा प्रकार एक वेळ वचन जालें, त्यावर चालावा. नाइकांच्या वचनाची सचोटी नाहीं. आजचे कालीं पुण्यांत फौजा नाहींत असें मनांत आणून, नवीन तहनामा व निभावणीपत्रें मागतात. नाईक वचनाचा धड असता तर आजपावेतों इंग्रजांस पक्का ताण देता. तें न करितां फेर-पगडी बदलली, आपले नफ्याचीं कलमें लिहून पाठविलीं, हरएक कामांत सरकारची नुकसानी व दगाबाजी. माझे सल्ल्याखेरीज इंग्रजांशीं परभारें तह करूं नये म्हणतो. दोन अर्थ आपले उणे पडले, यांत वर्चस्व त्याचें होईल. सबब नरमगरम अंदेशे आदिकरून शब्द लावून त्यास लिहिलें आहे. येणेंकरून देहावर येईल. स्वच्छ चित्तें खंबीर पक्का धरून इंग्रजांस ताण देईल तर याच वर्षांत शेवट होतो. नाहीं तर आंतून इंग्रजांशीं संधान लावून पैका घेईल; आणि वर्षांची वर्षें मसलत चालेल.' (२७-२-१७८०, ग्वा. ४-१०.)

**५. दुर्दैवी दादाची कहाणी.**—पूर्वीं सांगितलेंच आहे कीं दादास इंग्रज आतां विचारीनातसे झाले. तळेगांवच्या मोहिमेपूर्वीं इंग्रजांच्या वर्तनांत दादाविषयीं जो आदर दिसत होता तो त्या मोहिमेनंतर पार नाहींसा झाला. मराठ मंडळ आपणांस अनुकूल आहे, मुंबईहून आपण निघण्याचा अवकाश कीं सरदार मुत्सद्दी वगैरे झाडून आपल्यास भराभर येऊन मिळतील, सर्व महाराष्ट्रांत आपल्या तोडीचा पराक्रमी व कर्तबगार दुसरा कोणी नाहीं, वगैरे ज्या बढाईच्या बाता इंग्रजांस झोंकून त्यानें त्यांस आपल्या नादीं लाविलें होतें त्यांबद्दलचा इंग्रजांचा भ्रमाचा भोंपळा फुटला. मराठ मंडळाची दादास कितपत अनुकूलता आहे याचा पुरा प्रत्यय तळेगांवावर इंग्रजांस येऊन खुद्द दादाच्या शहाणपणाची व कर्तबगारीचीही पण इंग्रजांस पुरी ओळख पटली. दादाच्या नादास लागून आपण फुकट फसलों, बारभाईच्या तंत्रानेंच वागतों तर आपला कांहीं तरी फायदा झाला असता, असें त्यांस आतां वाटलें; आणि त्यामुळें

दादाच्या खर्चाकरितां दरमहा दहा हजार रुपये त्यास पुढें देण्याचें त्यांच्या मोठें जिवावर आलें. स. १७७९ जून ते स. १७८३ जूनपर्यंतचीं चार वर्षें दादा सुरतेंत मोठ्या विपन्नावस्थेंत होता. त्याची बायको आनंदीबाई त्याच्यापेक्षां किती तरी शहाणी व धोरणी होती. तिनें म्हणून थोडी तरी सावरासावर केली. शरीर कृश व व्याधिग्रस्त, बुद्धीस थोडाबहुत भ्रंश, व मन अत्यंत निराश व उदास, अशा रीतीनें दादा अगदीं मृत्युपंथास लागला. कर्मठपणाच्या ढोंगांत त्याची कालक्रमणा होऊं लागली. ता. ५-६-१७८० रोजीं नानाचा वकील लिहितो, 'सुरतेंत दादासाहेब शरीरें करून फार श्रमांत आहेत. तिघां शिष्यांनीं धरून उभें करावें तेव्हां सूर्यअर्घ्यं देऊन एक घटका उभे राहतात. तदोत्तर बसणें अथवा शयन. बारा घटका रात्रीं तीन पैशेभार राळ्याचे तांदूळ व पैसाभार मूग ऐसे एकत्र खिचडी करून भक्षितात. आठ दहा दिवसांनीं सौ० आनंदीबाईचें दर्शन. एक अर्धा घटका येऊन जवळ बसली तर त्यांसीं भाषण करीत नाहींत. बाजीरावास बाईकडे फारसें जाऊं देत नाहींत. वारंवार आपले मंडळीचें पुण्याचें स्मरण करितात. खर्चाचीही गिराणी फार आहे. इंग्रजांनीं अडीचा महिन्यांनीं पंचवीस हजार रुपये खर्चास दिले. आनंदीबाईही शरीरें फार कृश झाली आहेत. दादासाहेबांची कनिष्ठ स्त्री मथुराबाई देवी निघून गत झाली. सुरतेभोंवताले गणेशपंत बेहेऱ्यांनीं फार धूम केली आहे. त्यांनीं सारा प्रांत उजाड केला. दादा हे सुरतशहरास अरिष्टरूपच आहेत. पुणेंकरांशीं सलाह करण्यांतच कल्याण, असें चिंताग्रस्त सावकारांस वाटतें. दादासाहेबांस गॉडर स्वारीस जाऊं देत नाहींत. गुदस्तां दादासाहेब पुण्याजवळ आले, पण पुणें पाहिलें नाहीं. श्रीमंतांस सोनगडास ठेवून सर्व कर्ती आनंदीबाई, बाजीराव मुख्य व दिवाण अमृतराव, ऐसे पुढें दक्षिणेस येऊन पुणें पाहवें, ही इर्षा मातुश्रीस फार आहे. इंग्रजांनीं दादांस वसईचा किल्ला लिहून मागितला. ते बोलले, किल्ला आम्हांस देणें नाहीं, त्यावरून इंग्रजांचे मर्जीस ठीक न पडलें. तेव्हां आनंदीबाई व अमृतराव यांनीं दादांच्या शिक्क्यानिशीं वसई लिहून दिली. तें वर्तमान दादांस कळलें. फार रागें भरले. बाईशीं व श्रीमंतांशीं कडवीं भाषणें फार झालीं. सुरतेंत दादांच्या शरीरास पाऱ्याचा उपद्रव जाला होता. अंगास जागांजागां फोड आले. इंग्रजांनीं औषधोपाय

करून उपद्रव दूर केला, पण हवालदील आहेत.' बार्क नांवाचा औषधी पदार्थ दादानें मुंबईहून वारंवार मागितलेला आढळतो, तो काय वर्ख असावा कीं सिंकोना बार्क म्हणजे क्विनिन असावें याचा बोध होत नाहीं. 'नाटकशाळांमुळें आनंदीबाई फार रुष्ट आहेत. ज्यानें जी मसलत दादास सांगावी ती ते बरीच म्हणतात. बाई व अमृतराव मात्र योजना करणें त्या करितात. इंग्रजांसही दादांचा प्रकार कळला, यास्तव सल्ला मसलत त्यांच्याशीं करीत नाहींत. दादांच्या बुद्धीस कांहीं विपर्यास पडला आहे म्हणून कित्येक बोलतात. श्रीमंतांस कान दुखावयाची व्यथा आहेच. बहुत हैराण आहेत. कान फुटून फोड येऊन पू वाहतो. कान देखील खरोखर स्थानभ्रष्ट करून उदंड उपाय केले, परंतु अद्याप वाहतच आहे. रात्रंदिवस ठणक लागते, अलीकडे हवालदील. बुद्धि स्थिर नाहीं. अन्योन्य भाषणें करितात. बाई दादाचा शेवट करील.' मार्च स.१७७५ पासून १७८३ च्या जूनपर्यंत तब्बल आठ वर्षें दादा इंग्रजांच्या आश्रयास होता. मुंबईस असतां बाईनें त्यास लिहिलें, 'उगीच इंग्रजांच्या घरीं पोटास मात्र खाऊन कितीक दिवस पडून राहवें; एवढे पराक्रमी भारती योध्यांसारखे म्हणवितां आणि मुंबईस राहून कांहीं उद्योग न करतां काळ घालवितां, यास काय म्हणावें!' 'इंग्रज केवळ गळेकापू, आपला मतलब मात्र साधणारे' असेही दादाचे उद्गार वारंवार निघत. $

स.१७८० त सुरतेस असतां 'दादांनीं थोर तोफा ओतावयाचा कारखाना सुरू केला. त्यांनीं हैदराकडे दोन खिजमतगार गोमंतकाचे जहाजावरून मुंबईहून पाठविले,' अशी मुंबईची बातमी नानास लिहून आली होती. 'दादांच्या व इंग्रजांच्या माणसांची ऑगस्ट १७८१ त खटकट होऊन ते रुसून गळ्याकांबळ्याच्या मुक्कामास गेले. वर्तमान गाडरास कळल्यावर त्यानें मुंबईहून येऊन समजूत पाडली, तेव्हां अश्विनीकुमारास येऊन राहिले. तूर्त सात लक्ष रुपये द्यावयाचा ठराव करून गाडरानें समजूत केली. पुढील महिन्यांत दादांनीं नागर ब्राह्मणाची मूल जबरदस्तीनें धरून आणिली, यास्तव तिच्या आईबापांनीं प्राण दिला. तेव्हां गाडर सुरतवाल्यांस रागें भरोन बोलला, तुमच्या स्वाधीन राघू केला असतां, अशा बदफैलीच्या गोष्टी व्हाव्या! सुरतवाला म्हणाला, ब्राह्मण होऊन याच्या बुद्धीस भ्रंश झाला; अर्से म्हणून वाड्यांत बंदोबस्ती

$ म. द. बा. १-८,१२, १३, २७-३०; खं. १२.२२२, २२६, २३३; भा. व. २. प. या. ४९.

करून ठेविला, बाहेर निघों देत नाहींत.' ( ६-१०-१७८१ ). याच सालच्या ऑगस्टांतील खालील बातमी उपलब्ध आहे. गाडर सुरतेस दादास भेटून म्हणाला, 'तुम्हीं स्वारीस निघा.' दादा म्हणाले, 'तुम्हांबरोबर सारें पायदळ. आमचे फौजेची तर्तूद करा म्हणजे आम्ही स्वारीस निघतों. पैका द्या, म्हणजे आम्ही फौज ठेवितों. फत्तेसिंग गायकवाडांस दहा लक्ष रुपये इंग्रज मागतात. दादांनीं मना केलें. त्यांजपाशीं पैका मागूं नये.' एकंदरींत दादाचें हें लोढणें जसें मराठी राज्यांत कोणास नको होतें, तसें तें इंग्रजांसही अगदीं नकोसें झालें; आणि शेवटीं शेवटीं आंत बाहेर सर्वत्रच दादाची पुरती नाचक्की झाली. त्याचा संपर्क नको असें ज्यास त्यास वाटे. तो प्रकृतीनें व परिस्थितीनें अगदींच हताश झाला होता. बायका मुलें सुद्धां त्याची परवा करीनात. इंग्रजांस तर तो नकोसाच होता. चिंतो विठ्ठल, सखाराम हरि, मोरोबा फडणीस, तुळया पवार, बाजीराव बर्वे वगैरे त्याचे सर्व साथीदार ठिकाणीं लागले. सर्व दुनियेंत त्याचें नांव बद्द झालें. पुण्याचें दर्शन नाहीं. इहलोकची आशा राहिलीच नाहीं, पण पापाचरणामुळें परलोकही त्याचे मतें दुरावला.

दादानें प्रयत्नाची मात्र पराकाष्ठा केली. त्यानें आपले दोन वकील हणमंतराव व मणियार पारशी इंग्लंडच्या राजाची फौज मदतीस आणण्यासाठीं ता. ११-९-१७८१ रोजीं इंग्लंडास रवाना केले. तेथें त्यांची फारच आबाळ झाली, ती सर एडमंड बर्क याचे नजरेस आल्यावर त्यानें त्यांस आपल्या गांवीं बीकन्सफील्ड येथें नेऊन स्वतंत्र घर राहण्यास दिलें. या ठिकाणीं ते आपला स्वयंपाक स्वतः करून खात आणि धर्माचीं बंधनें बरोबर पाळीत. बर्क व त्याची बायको यांनीं त्यांचा फार चांगला परामर्ष घेतला म्हणून ते निभावले. बीकन्सफील्ड येथें त्यांस पुष्कळ लोक येऊन भेटत. परंतु इंग्लंडांतून दादास मदत मिळणें दुरापास्त आहे असें पाहून, सन १७८२ च्या पावसाळ्यांत ते परत हिंदुस्थानास आले. उपरांत दादानें बर्क यास पत्र लिहून त्याचे आभार मानले. दादाच्या या पत्रास बर्कनें लिहिलेला खालील जबाब त्याच्या छापी पत्रांत उपलब्ध आहे. हा जबाब स. १७८२ अखेर किंवा १७८३ चे आरंभीं लिहिलेला असावा.

' आपलें पत्र आलें, त्याबद्दल मी आपला फार फार आभारी आहें. आपल्यासारख्या थोर व्यक्तींना लिहिण्याचे मायने किंवा पदव्या मला बरोबर माहीत

नसल्यामुळें, त्यांत कांहीं उणें वाटल्यास आपण मला कृपा करून त्याबद्दल क्षमा केली पाहिजे. तुमचे वकील हणमंतराव व मणियार पारशी हे येथें आले असतां त्यांच्यासाठीं जी कांहीं अल्प सेवा मीं केली, तिचा तुम्हीं एवढा गौरव करण्याचें बिलकूल कारण नाहीं. कोणीही मनुष्य एक दुसऱ्याकरितां सामान्यतः जें करील त्यापेक्षां अधिक असें मी कांहींच केलेलें नाहीं. हणमंतराव माझ्याच येथें कांहीं थोडे दिवस राहिले. आपल्या धर्माचीं बंधनें तंतोतंत पाळण्यांत ते अत्यंत दक्ष असल्यामुळें, आणि त्यांत त्यांनीं स्वतःच्या प्रकृतीचीही पर्वा न केल्यामुळें, शक्य तितकी सोय मी त्यांस आपल्या घरांत करून दिली. त्यांच्या सहवासाचा आम्हांस एक फायदा झाला तो असा कीं, तुमच्या देशाचे रीतरिवाज आम्हांस थोडेसे कळून आले. यापुढें अशा प्रकारें धर्माचीं व जातीचीं बंधनें पाळणारे हिंदु गृहस्थ कोणत्याही कामाकरितां जर इकडे यावयाचे असतील, तर आम्हांस त्याची आगाऊ वर्दी व त्यांच्या आगमनाबद्दल इकडील अधिकाऱ्यांची परवानगी मिळाल्यास, आम्ही त्यांच्या राहण्याची सोय शक्य तितकी चांगली करून देऊं. म्हणजे त्यांच्या आमच्या समागमास व्यत्यय न येतां त्यांस इकडील त्रासदायक हवेची बाधाही होईल तितकी कमी करितां येईल. आमचे इकडे फार फार तर वर्षांतले सहा महिनेच साधारणतः सुखावह असतात, म्हणून आगाऊ तजवीज न केल्यास त्रास झाल्याशिवाय राहत नाहीं. या दोघां गृहस्थांस आमच्या हवेंत फार कष्ट सहन करावे लागले याचें कारण आम्हांस तुमच्या रीतरिवाजांची माहिती नाहीं हेंच होय. आमचा निष्ठुर स्वभाव त्यानें कारण खचित नव्हे. तुम्हांस आमच्या देशाहून जी फौजेची मदत पाहिजे ती येथून मिळण्याचा बिलकूल संभव नाहीं हें कळविण्यास मला मोठें दुःख होतें. ज्या गोष्टी शक्य नाहींत, त्या एकदम स्पष्टच सांगितलेल्या बऱ्या. हणमंतराव हे मोठे लायक व तुमचे हितास जपणारे आहेत; आणि मणियार पारसी यांनीं सुद्धां तुमच्या कामीं कष्ट करण्यास कमी केलें नाहीं. तुमची इच्छा सफल झाली नाहीं हा कांहीं त्यांचा दोष बिलकूल नव्हे. कळावें.'

**६. कल्याण व वसई इंग्रजांनीं जिंकिली** (मे व डिसेंबर १७८०).—गुजरातेंतील मोहीम रेंगाळत चाललेली पाहून मुंबईकर हवालदील झाले. बोर घांटांतून मराठी फौजा खालीं उतरून मुंबईकरांची नाना प्रकारें अडवणूक करीत. विशेषतः युद्धोपयोगी साहित्याचा पुरावा ठिकठिकाणाहून करण्यास

मुंबईचे आसपासचा उत्तर कोंकणचा सुपीक टापू इंग्रजांस फारच सोयीचा होता. या टापूंत ठाणें, कल्याण व वसई हीं तीन नाक्यांचीं ठिकाणें ज्याचे हातांत, त्याचें स्वामित्व या प्रदेशावर चाले. हल्लीं हा टापू ठाणें व कुलाबा अशा दोन जिल्ह्यांत विभागला जाऊन कल्याण रेल्वेचा मार्ग वांकडा गेल्यानें, त्या प्रदेशाचें खरें स्वरूप लोपलें जातें. मुंबईहून खाडीपलीकडे थेट पूर्वेस पनवेल; तेथून समोर पूर्वेस खोपवली व खोपवलीचे वर सह्याद्रीचा माथा म्हणजे खंडाळा. वास्तविक वसई कल्याणची खाडी स्वभावसृष्ट हद्द आहे. स. १७७४ त ठाण्याचा किल्ला इंग्रजांचे कबजांत आल्यानें, साष्टी बेटावर त्यांचा शह बसला तो पुनरपि सुटला नाहीं. परंतु खोपवली कल्याणच्या मार्गानें खालीं वसईवर परभारें फौजा पाठविणें पुणेकरांस सुलभ असल्यामुळें, वसई कल्याण वगैरे कोंकणाचा प्रदेश जिंकला तरच पुण्यास तंबी बसेल असें मुंबईकरांनीं ठरवून, गॉडर्डास सुरतेहून परत बोलाविलें. परंतु फत्तेसिंगाशीं स्वतंत्र तह करून गुजरातचें एक नवीनच घोंगडें गॉडर्डनें आपल्या गळ्यांत अडकवून घेतलें होतें. स. १७८० त गॉडर्ड गुजरात सोडून जाता तर सिंदे होळकरांनीं फत्तेसिंगाच्या चिंधड्या उडवून अंमदाबाद सुद्धां गुजरात प्रांत लगोलग हस्तगत केला असता. यासाठीं गॉडर्डास गुजरातेंतच कांहीं काळ टांसून राहवें लागलें. पर्जन्यकाळांत सुद्धां सुरतेस छावणी करणें त्यास भाग पडलें. मात्र हार्टलीस त्यानें बडोद्याहून ८ मे रोजीं मुंबईस रवाना केलें. शिवाय दादा या वेळीं सुरतेस रिकामा माशा मारीत बसला होता. गॉडर्डला तर ही ब्याद बरोबर मोहिमेंत नको असल्यामुळें, मुद्दामच देखाव्यासाठीं अमृतरावास गॉडर्डनें आपल्या स्वारींत बरोबर घेऊन दादास सुरतेसच ठेविलें होतें. दादा बरोबर असल्यानें दररोज शेंकडों भानगडी उपस्थित होत. परंतु सुरतेस आनंदीबाई व दादा यांस बिलकूल चैन पडेना. गॉडर्डची युद्धपद्धति त्यांस पसंत पडली नाहीं. गुजरातेंत कितीही युद्धप्रसंग केले तरी त्यामुळें पुण्याची पेशवाई दादास कशी मिळणार? पुण्यास पेंच पडण्यास मुंबईजवळचा कल्याण प्रांत व वसई तालुका हस्तगत केला पाहिजे. हा समृद्ध प्रांत हातीं आल्यानें मुंबईपासून सुरतेपर्यंतचा टापू इंग्रजांस सलंग व रणांगणाचा पाया म्हणून उपयोगी पडण्याजोगा होता. हा प्रकार दादानें सुरतेस बसून मुंबईकरांस पटविला. यापूर्वीच पुण्याच्या फौजांनीं घांटाखालीं उतरून मुंबईची बहुतेक नाकेबंदीच केली होती. अर्थात् मुंबईच्या चरितार्था-

साठीं तरी कल्याण–पनवेल भागांत मोहीम सुरू करणें मुंबईकरांस आवश्यक झालें. याच वेळीं युरोपांत इंग्रज फ्रेंचांचें युद्ध सुरू असून, मुंबईची बहुतेक फौज गुजरातेंत होती. वसई व कल्याण या ठिकाणीं मराठ्यांच्या फौजा जय्यत होत्या. बाजीपंत जोशी व सखारामपंत पानसे घांटाखालीं उतरून मुंबईची नाकेबंदी करीत चालले होते, आणि समुद्रांत धुळपाचें आरमार वावरत होतें. शिवाय प्रत्यक्ष मुंबईवरच अचानक घाला घालावा असा व्यूह नानानें रचिला. होता. ता. ३०-४-१७८० च्या पत्रांत मुंबईच्या गव्हर्नरानें गॉडर्डास ही स्थिति स्पष्ट लिहून कळविली आणि हार्टलीस ताबडतोब परत बोलाविलें. परंतु तो येण्यापूर्वीच मुंबईकरांनीं कांहीं थोडी फौज बेलापुरास उतरविली. ते पारसिक घेऊन पनवेलीवर आले. त्यांजवर पानसे व बाजीपंत जोशी यांनीं चाल केली. हल्ला करून चार पांचशें माणूस ठार, गोरे वगैरे मिळोन मारले. तोफा चार पाडाव आणिल्या, ( मे १७८० ). कांहीं गोरे धरले, त्यांत एक सरदारही पाडाव आला होता. ( का. सं. प. या. २०१, खरे २५३७ ).

याच संधींत ठाण्याच्या संरक्षक इंग्रज फौजेनें कल्याणवर अचानक झडप घालून ता. ११-५-१७७९ रोजीं तें ठिकाण हस्तगत केलें. हें शहर म्हणजे मराठ्यांची राजधानी, शिवाजीनें आदिलशहापासून हस्तगत केलेली. याच ठिकाणच्या मुसलमान सुभेदाराची सून शिवाजीसमोर पकडून आणली होती. चिमाजी आपानें वसई हस्तगत केल्यापासून कल्याणचें माहात्म्य वाढलें. व्यापार दांडगा चालत असल्यामुळें तेथें धनाढ्य सावकारांची मोठी वस्ती होती. त्यांत मुख्यतः ब्राह्मण प्रमुख होते. श्रीवर्धन जंजिरा हद्दींत पडल्यामुळें, ठाणें, कल्याण, वसई हींच पेशव्यांचीं मोठ्या किफायतीचीं उत्तरेकडचीं ठिकाणें असून, तेथें त्यांच्या खास भरंवशाचे नांवाजलेले अधिकारी बंदोबस्तास असत. रामाजी महादेव बिवलकर व विसाजीपंत लेले हे त्यांपैकीं होत. मूठभर इंग्रजांनीं जरी कल्याण हस्तगत केलें, तरी तें कायमचें हातांत ठेवण्याची ऐपत तेव्हां त्यांस नव्हती. व्यापारी व सावकार केव्हां बंडावा करून उठतील याचा नेम नव्हता, म्हणून इंग्रजांनीं शहर हातीं आल्याबरोबर प्रथम तेथील धान्य व संपत्ति लुटतां आली तितकी घेऊन मुंबईस रवाना केली. सर्व ब्राह्मणांचीं घरें जाळून टाकावीं असा त्यांचा इरादा होता. तो बंद पाडण्यासाठीं पानसे व बाजीपंत त्वरा करून कल्याणावर आले. पश्चिमेकडून मराठ्यांचीं लढाऊ जहाजेंही

आलीं. त्यांनीं कल्याणास वेढा घातला. तेथें इंग्रज फार थोडे होते, त्यांच्यानें टिकाव धरवेना. मराठयांनीं कर्नल फाइफ, सात गोरे व कित्येक हिंदी गृहस्थ पकडून कैद केले. कॅप्टिन कँपबेल म्हणून तेथें इंग्रजांचा लष्करी कामगार मुख्य होता, त्यास बाजीपंतानें कळविलें, 'तुम्ही धान्य वगैरे नेलें आहे त्याची पुरेपूर किंमत द्या आणि कल्याण व बेलापुर तावडतोब सोडून द्या, नाहीं तर पकडलेल्या सर्व गोऱ्यांस ठार मारितों.' कँपबेलनें या धमकीकडे दुर्लक्ष करून नेटानें लढाई चालविली. इंग्रजही चिडलेच होते. इतक्यांत कर्नल हार्टले गुजरातेंतून आपली तुकडी घेऊन ता. २४ मे रोजीं कल्याणनजीक येऊन पोंचला. ता. २५ रोजीं सकाळीं मराठी फौजा कल्याणवर निकराचा हल्ला करण्यासाठीं कूच करून निघाल्या, तोंच हार्टलेनें त्यांजवर मागून अनपेक्षित रीतीनें असा कांहीं तोफांचा भडिमार केला, कीं पुष्कळ लोक जायां होऊन मराठे मागें हटले. पुनः कांहीं उद्योग करावा तों पर्जन्य आला, त्यामुळें कल्याण परत घेण्याचा संकल्प सोडून मराठी फौजांना मागें घांटाचे तोंडाखालीं परत येऊन तेथेंच छावणी करून राहवें लागलें. एवंच ठाणें व कल्याण हीं दोन ठिकाणें मराठ्यांचे हातचीं गेलीं. फक्त वसई राहिली, ती काबीज करण्याचा उद्योग पावसाळ्यांतच इंग्रजांनीं हातीं घेतला; आणि ता.११-१२-१७८० रोजीं चिमाजीआपाच्या पराक्रमाचें स्मारक असें तें ठिकाण गॉडर्डानें अचानक काबीज केलें, तो प्रकार असा.

गुजरातच्या मोहिमेंत इंग्रजांस म्हणण्यासारखा लभ्यांश झालानाहीं. वेळ व पैसा फुकट जाऊन युध्यमान परिस्थिति पहिलीच कायम राहिली. एकदम चहूंकडे चढाई केल्याशिवाय मराठे नरम होणार नाहींत, अशी खात्री पटून स.१७८० च्या पावसाळ्यांत मुंबईकरांनीं वाटाघाट करून असें ठरविलें, कीं बोरघांटाचे खालील सर्व कोंकण प्रांत थेट सुरतपावेतों प्रथम हस्तगत करावा, आणि नंतर पुण्यावर चालून जावें. पैकीं प्रथम वसईचा किल्ला हस्तगत केला कीं उत्तर किनारा सलंग मोकळा होईल, अशा उद्देशानें गॉडर्डला सुरतेहून फौजेसह येऊन वसई काबीज करण्याची कामगिरी सांगितली. तदनुसार गॉडर्ड १६ ऑक्टोबरला सुरतेहून निघून १२ नोव्हेंबरास घोलवाड येथें आला; आणि नंतर लवकरच त्यानें वसईस वेढा घातला. २८ नोव्हेंबरास त्यानें तटावर तोफांचा मारा सुरू केला. 'गॉडर्ड सरंजामानिशीं खुष्कीनें वसईनजीक आला. वरकड ठाणीं तालुक्यांतील

घेतलीं. पूर्वी रास्त्यांचे पथक व मुसा नारन वसईकडे रवाना केले. आतां रामचंद्र गणेश व बाजीपंत यांजबरोबर हुजरातेची रवानगी करितों. पैक्याचे ओढीमुळें प्रसंग कठिण पडला आहे.' (१३-११-१७८०). वसईवर विसाजीपंत लेले शिकस्तीनें झगडत होता. इंग्रजांच्या हालचालींची वर्दी पुण्यास सारखी पोंचत होती. 'इंग्रज तयार झाला. एक दोन दिवसांत वसईस जाऊन उतरणार. राऊत व गाडदी दादरावर लगोलग पाठवावे. लौकिकांत वसईचीच मसलत ऐकिल्यांत येते. करणें एक, डंबर दाखवावें दुसरीकडे, अशी इंग्रजांची चाल आहे.' अशी इशारत सेप्टेंबरांतच वसईहून पुण्यास लिहून आली होती.

ता. १०-११ डिसेंबर रोजीं किल्ल्यावर मोठ्या तोफा चालू झाल्याबरोबर मराठे जेरीस आले. ता. १२ रोजीं किल्ला हवालीं करतों म्हणून गॉडर्डकडे विसाजीपंताचें बोलणें नागोपंताबरोबर आलें. शिबंदीनें आपलीं हत्यारें ठेवून निघून जावें असें गॉडर्डनें त्यांस कळविलें; आणि आपल्या फौजेंतला जेकब जॉन्सन नांवाचा इंग्रज फितुरी करून मराठ्यांकडे गेला आहे त्यास प्रथम आपले हवालीं करावा, अशी मागणी केली. त्या प्रमाणें जेकब जॉन्सनला हवालीं करून विसाजीपंत सुद्धां चार हजार लोक किल्ला इंग्रजांचे हवालीं करून गेले. या लढाईंत इंग्रजांकडील एक अधिकारी व बारा इसम पडले. पश्चिम किनाऱ्यावरील सर्वांत मोठें सुपीक प्रदेशाचें हें मजबूद नाकें इंग्रजांचे ताब्यांत आल्यानें त्यांस तर अतिशय आनंद झालाच, पण पेशव्यांच्या अखिल कर्तृत्वाचें हें दृश्य चिन्ह गमावल्याबद्दल समस्त महाराष्ट्रास व प्रत्यक्ष दादास सुद्धां तीव्र उद्वेग वाटून हा भावी विनाशाचा आरंभच होय, अशी कित्येक मंडळींची भावना झाली. कल्याणहून हार्टले गॉडर्डचे कुमकेस जात असून, त्याचे पाठीवर मराठ्यांकडील सुप्रसिद्ध पोर्तुगीज गोलंदाज मुसा नारन हाही त्वरेनें वसईचे साह्यास येत होता. पण ते पोंचण्यापूर्वीच वसईचें ठाणें मराठ्यांचे हातांतून गेलें.

'वसईच्या किल्ल्याची मजबुदी पक्की व सरंजाम पोख्त, फौजा उपराळ्यास जाऊन पोंचल्या होत्या. तशांत गॉडराकडून मारागिरी व लढाई सुरू होती. किल्लेदारानें हरामखोरी करून मकाण त्यांचे हवालीं केलें. आपण निघोन जात असतां सरकारची दौड जाऊन पकडून आणिला. हरामखोरास शिक्षा होईल. मात्र मकाण तूर्त त्यांचे हातीं गेलें.' असें नाना फडणीस हैदरास

लिहितो. त्यावरून गॉडरानें वसईचें ठाणें लढाईपेक्षां लालुचीनें घेतलें यांत संशय नाहीं. एक दोन दिवस किल्लेदार टिकाव धरता तर वज्रेश्वरीवरील फौजा लगोलग वसईस पोंचल्या असत्या. वसई पडल्याचें समजल्यामुळें त्या फौजा परत चौकाकडे आल्या. §

**७. वज्रयोगिणीचें सुदर्शन, रामचंद्र गणेशाचा आत्मयज्ञ,** (ता. १२-१२-१७८०).—गॉडर्डनें वसईवर जाण्याचें ठरविलें, त्याच वेळीं मराठी फौजा वसईचे बचावास येतील त्यांस अडविण्याची कामगिरी त्यानें हार्टले यास सांगितली. याप्रमाणें सर्व कल्याण प्रांत सोडवून त्यांतील साहित्यानें फौजेची समृद्धि करून मग पुण्यावर चालून जावें, असा इंग्रजांचा बेत पावसाळ्यांतच ठरला. आश्विन लागतांच गॉडर्ड व हार्टले यांनीं मोहिमेची त्वरा केली. कल्याणचे दक्षिणेस बाबा मलंगचा डोंगर आहे तो ३ ऑक्टोबर रोजीं हार्टलेनें कल्याणहून जाऊन हस्तगत केला. या हालचालींची बातमी नानास होती. त्यानें पावसाळ्यांतच कोंकणच्या फौजा जमा केल्या. 'वसई–कल्याण व खानदेश प्रांतीं इंग्रजांनीं धामधूम चालविली आहे, त्यास सर्वांची तयारी असावी. कल्याणकडे सरकारचा जमाव होता तेथें इंग्रजांची लढाई झाली. इंग्रज बाबा मलंगचे माचीस बसले आहेत, त्यांचा जमाव भारी सबब काट चालेना, म्हणून सरकारचा जमाव चार कोस माघारा आला. इंग्रज पुढें सरून खोपोलीस आले होते ते माघारे तळ्यावर गेले. वसईस ऑक्टोबरांत त्यांनीं गडबड केली परंतु फजीतच पावले. तीन जहाजें वसईच्या गोळ्यांनीं जायां झालीं. आनंदराव रास्ते, चिमापा पानशे, मुसा नारन तोफा गाड्यांसुद्धां घांटाखालीं इंग्रजांवर गेले. ता. ५ ऑक्टोबर रोजीं कुडकी येथें हार्टलेची व मराठ्यांची गांठ पडून, मराठे मागें हटून चौकावर गेले. पुढें हार्टले चौकावर येतांच ते मागें खालापुरास गेले. घांटाचे पायथ्याशीं खोपवली येथें मराठ्यांचा तळ होता. ता. ११ रोजीं हार्टलेनें बदलापुराजवळ कुळगांव येथें मुक्काम केला असतां, त्यांजवर मराठ्यांनीं तारीख १६ रोजीं हल्ला केला, पण त्यांत हार्टलेचें कांहीं नुकसान झालें नाहीं. कोंकणांतील या झटापटींची बातमी ऐकून नाना व हरिपंत तळेगांवास येऊन राहिले, आणि तेथून खालील

§ भा. व. २ प. या. ६१; का. सं. प. या. २९१ व ४८७.

फौजेचें साहित्य करूं लागले. रामचंद्र गणेश, परशुरामभाऊ वगैरे सर्वांस त्यांनीं घाईनें बोलाविलें. हार्टलेवर अचानक छापा घालण्याचा इरादा होता. हें ऐकतांच हार्टले कल्याणचे उत्तरेस देवळी येथें आपला तळ करून राहिला. मराठे त्याच्या अंगावर धावले. माहुलीचे किल्ल्यावरून त्यांनीं भिवंडीचें ठाणें व दुसरीं कित्येक गांवें जाळलीं आणि हार्टलेचा उच्छेद उडवून दिला. तथापि त्यानें मराठी फौजांस वसईचे बाजूस फिरकूं दिलें नाहीं. रास्ते, पानशे व मुसा नारन यांनीं उलट हार्टलेस बिलकूल चैन पडूं दिलें नाहीं. ६ डिसेंबर रोजीं हार्टलेचा मुक्काम कल्याणचे ईशान्येस टिटवाला येथें होता. त्यास चुकवून वसईचा उपराळा करण्यांत मराठ्यांनीं किती शिकस्त केली हें रामचंद्र गणेश कानडे याच्या मृत्यूनें विशेष मनांत भरतें, तो प्रकार असा.

रामचंद्र गणेश हा जुना अनुभवलेला सेनापति. नानानें त्यास मुद्दाम घाई-घाईनें वसईस मदत घेऊन घांटांतून रवाना केलें. हा परभारें वसईस जाणार अशी बातमी आल्यावरून हार्टले ता. ८ डिसेंबर रोजीं त्यास अडविण्यास टिटवाल्याचे वाटेनें आला असतां, त्याच्याशीं योगिणीच्या जवळ रामचंद्र गणेश व मुसा नारन यांनीं ता.१०-११ डिसेंबर रोजीं असा निकराचा सामना केला कीं हार्टलेची गाळण उडाली. वसईचा किल्ला हातून जाऊं द्यावयाचा नाहीं अशी रामचंद्र गणेशाची मोठी हिंमत होती. ता. १२ रोजीं सकाळीं अभ्राच्छादित वातावरणांत रामचंद्र गणेश हार्टलेस पकडण्यासाठीं अगदीं गोळीच्या टप्प्यांत नजीक येऊन आतां त्यास हस्तगत करणार, इतक्यांत अभ्रसुदर्शन एकदम दूर होऊन चक्क सूर्यप्रकाश पडल्याबरोबर हार्टलेच्या लोकांस हे मराठे शूर गडी जवळ दिसून त्यांनीं लगोलग त्यांजवर गोळ्या झाडल्या. तेणेंकरून रामचंद्र गणेश ठार व मुसा नारोन जखमी झाला. इकडे आदल्या दिवशीं ता. ११ रोजीं वसई गॉडर्डचे हातीं पडली. असा प्रकार झाल्यानें मराठे बोरघांटाचे पायथ्याशीं मागें हटले. या अनपेक्षित पराभवास वज्राबाई, वज्रयोगिणी ऊर्फ वज्रेश्वरीचें सुदर्शन असें नांव देतां येईल.

हार्टले व रामचंद्र गणेश यांची वज्रयोगिणीची लढाई परमेश्वरी घटनेंत गणतां येईल. हार्टलेनें मुख्य पाया कल्याण येथें ठेवून घाटांतून येणाऱ्या मराठी फौजेस वसईस जाऊं द्यावयाचें नाहीं असा संकल्प केला होता. आतांपर्यंतच्या लढण्यांत त्याचे पुष्कळ लोक जायां होऊन सहाशें जखमी बरोबर

होते. खंडाळ्याहून खालीं डोंगराच्या पायथ्याशीं खोपवली गांव असून तेथून उल्हास नदीच्या कांठानें म्हणजे जवळजवळ हल्लींच्या आगगाडीच्या वाटेनेंच कर्जत, वांगणी करून बदलापुरास रस्ता येतो. तेथून वसईकडे जावयाचें म्हणजे मुख्य वाट कल्याणवरून जलमार्गानें होड्यांतून आहे. कल्याण हातचें गेल्यामुळें हा मार्ग मराठ्यांस बंद झाला. मुंबई कल्याणचा साष्टीचा सर्व प्रदेश खाडया व खाजणें यांच्या योगानें पायीं चालण्यास अशक्य आहे. कल्याणची खाडी वसईवर जाते, परंतु दहावीस हजार फौज होडयांतून लगोलग खालीं नेणें शक्य नसून, कल्याण हातांत नल्यामुळें, जलमार्गानें वसईस कुमक बिलकूल नेतां येईना. म्हणून कल्याणच्या पूर्वबाजूनें बदलापुरावरून थेट उत्तरेस माहुली किल्ल्याचा आश्रय घेऊन तेथून पश्चिमेस वज्रेश्वरीच्या डोंगरावरून खालीं कामणला येऊन तेथून वसईस जावयाचें. नगरकडून माहुलीवरून वसईस जाण्याचा हल्लीं सुद्धां हा मार्ग प्रचारांत आहे. वज्रेश्वरी ऊर्फ वज्रयोगिणीचा पर्वत सुप्रसिद्ध असून त्याचा आश्रय लढाऊ फौजांस चांगलाच होतो. त्यावरील देवीला वज्राबाई असें म्हणतात. रामचंद्र गणेश व मुसा नारन माहुलीवरून वज्रयोगिणीकडे मोठ्या फौजेनिशीं चाललेले ऐकून हार्टले त्यांस अडविण्याच्या इराद्यानें कल्याणहून ८ डिसेंबरला निघून टिटवाळ्यावरून दुगाड येथें आडवा आला. दुगाड हें वज्रेश्वरीच्या दक्षिण पायथ्याशीं मोठें गांव आहे. जीव गेला तरी बेहत्तर, पण वसईस कुमक नेल्याशिवाय राहवयाचें नाहीं अशा निकरानें रामचंद्र गणेशानें ता. १० रोजीं हार्टलेवर हल्ला केला. त्यांत त्या दिवशीं १८ इंग्रज पडले. पुनः ता. ११ रोजीं तसाच हल्ला केला त्यांत शंभर लोक पडून हार्टलेचें फारच नुकसान झालें. तथापि तोफांच्या सामर्थ्यानें एवढ्या मोठ्या फौजेशीं दोन दिवस चांगली टक्कर दिल्याबद्दल त्यानें आपल्या लोकांची मोठी वाहवा केली. पुनः ता. १२ रोजीं आपणावर जर मराठ्यांचा हल्ला आला तर निभाव कठिण असें वाटून हार्टलेनें आपल्या बचावाची सिद्धता ता. ११ च्या रात्रीं केली ती अशी कीं, त्याच्या तळाच्या दोन बाजूंस दोन लहान टेंकड्या होत्या. त्यांवर एक लहानसा मातीचा उंच बांध करून त्यावर एक लहान तोफ ठेवून दिली. जेणेंकरून कोणीकडूनही हल्ला आला तरी या तोफेनें थोडाबहुत बचाव व्हावा. ता. १२ रोजीं सकाळीं रामचंद्र गणेश हार्टलेच्या उजवीकडील टेंकडी काबीज करण्याकरितां एक घोडे-

स्वारांची तुकडी व मुसा नारनची आरबी पायदळाची एक तुकडी घेऊन गेला. त्या दिवशीं सकाळीं धुकें इतकें दाट पसरलें होतें कीं समोर कोणास कांहीं दिसत नव्हतें. या धुक्याचा फायदा घेऊन रामचंद्र गणेश व नारन नऊ वाजण्याच्या सुमारास हार्टलेच्या तोफेनजीक येऊन दाखल होतात तोंच श्रीकृष्णानें सुदर्शन काढून घेतलें त्याप्रमाणें दाट धुक्याचा तो विस्तृत पडदा वज्रयोगिणीनें निमिषमात्रांत दूर सारिला, त्याबरोबर एकदम चक्क ऊन पडून इंग्रजी तोफेपुढें मराठे आयते सांपडले; परंतु बिलकूल न डगमगतां ते तसेच पुढें ती तोफ हस्तगत करण्यास धावले. इतक्यांत तोफ सुटली तिचा गोळा लागून कांहीं स्वार व खुद्द रामचंद्र गणेश एकदम ठार झाले आणि नारन जखमी झाला. हें पाहून मराठे साफ कचरले; आणि रामचंद्र गणेशाचा मुर्दा व नारन यांस सोडवून घेऊन परत तळावर गेले. आदल्याच दिवशीं म्हणजे ११ तारखेस वसई इंग्रजांचे हातांत पडून पांच चार दिवसांत गॉडर्डला हार्टलेची बातमी कळली नव्हती, म्हणून वसईचा ताबा घेऊन तो लगोलग वज्रेश्वरीस गेला; जवळच दुगाड येथें ता. १४ रोजीं त्यांची भेट झाली. मराठ्यांचा तळ माहुलीस होता. ता. १८ रोजीं आर्नाला किल्ला इंग्रजांचे ताब्यांत आला. तेव्हां मोहिमेचें पुढील स्वरूप साफ बदललें. कांहीं अल्प काळ इंग्रज हावभरी होऊन पुण्यावर चाल करून येऊं लागले. हार्टले मात्र लवकरच परत स्वदेशीं गेला.

रामचंद्र गणेश कानडे हा नानासाहेबाच्या वेळेपासून कसलेला योद्धा. माधवरावाची त्याजवर अत्यंत कृपा. दिल्लीच्या स्वारींत सिंदे होळकरांशीं बेबनाव होऊन परत आल्यावर तो कांहीं दिवस अत्यंत उद्विग्न राहिला. पुढें नानाफडणिसानें त्यास पुनः काम दिलें. प्रस्तुत वसईच्या संकटांत नानानें घाईघाईनें फौजा घांटाखालीं पाठविल्या, त्यांत सिंदे, होळकर, परशुरामभाऊ वगैरे दूर असल्यामुळें नानानें रामचंद्र गणेशास हें कुमकेचें काम सांगितलें आणि त्यानेंही आपला पराक्रम नानास दाखविण्याची ही संधि आयती आलेली पाहून जिवावरचा प्रयोग स्वीकारिला. वास्तविक लढणें असें त्या दिवशीं अल्पच झालें. रामचंद्र गणेशाचें भरलें म्हणावें, किंवा वज्राबाईचा इंग्रजांवर वरदहस्त म्हणावा, धुक्याचें आवरण एकदम दूर झालें आणि रामचंद्र गणेश बळी पडला. वसई पुढें मराठ्यांचे हातीं परत आली हा भाग वेगळा, परंतु राष्ट्राचा खरा जोम

संकटकालांतच बरोबर अजमावतां येतो, हें तत्त्व खरें असेल तर, रामचंद्र गणेशाच्या मृत्यूनेंच जो प्रचंड आवेश पुढें हरिपंत, परशुरामभाऊ व तुकोजी होळकर, पानशे, रास्ते वगैरे सर्वांच्या अंगीं तत्काळ प्रगट झाला, तेणेंकरून गॉडर्ड-सारखा जहांबाज सेनापति जेरीस येऊन नामुष्कीनें वाटेल तसा तह जमवून बचावाच्या उद्योगास लागला. या दृष्टीनें वज्रेश्वरीची ही चकमक मराठ्यांच्या इतिहासांत विशेष स्मरणीय मानिली पाहिजे. रामचंद्र गणेशानें जगून जी कामगिरी केली नसती, ती वास्तविक त्याच्या मृत्यूनें सिद्ध झाली असें स्पष्ट दिसतें. मराठी राष्ट्राचें तेज अशा अनेक संकटप्रसंगांतच निदर्शनास आलेलें आहे. नारायणरावाच्या वधाच्या निमित्तानें इंग्रजांनीं जो निष्कारण अतिक्रम केला त्याचें निवारण सात वर्षें केवळ्या चिकाटीनें मराठ्यांनीं केलें हें लक्षांत आणावें.$

---

प्रकरण दहावें

# चौकडीच्या जुटीचा फलितार्थ

## सन १७८१



१. बंगाल्यांतून इंग्रजांस उखडण्याचा नानामहादजींचा प्रयत्न.
२. चौकडीच्या कारस्थानांत भोसल्यांची कुचराई.
३. भोसल्यांस फोडण्याची हेस्टिंग्सची कारवाई.
४. दिवाकरपंत चोरघोडे, मृत्यु (ऑगस्ट, १७८१).
५. बोरघांटाखालीं इंग्रजांचा संहार, गॉडर्डाचें पलायन.
६. माळव्यावर इंग्रजांची चढाई, (फेब्रुवारी १७८०–ऑगस्ट ८१).
७. स. १७८१ च्या बरसातची छावणी, महादजी व म्यूर.

* * * *

$ खरे २५६२ व २५६४; डफ, फॉरेस्ट इ०.

**१. बंगाल्यांतून इंग्रजांस उखडण्याचा नानामहादजींचा प्रयत्न.**—बंगालसारखा सुपीक व अविच्छिन्न पैदासीचा प्रांत इंग्रजांस मिळाल्यामुळें त्यांस पैशाच्या जोरावर देशभर युद्धें चालवितां आलीं. दरमहा चाळीस लाख म्हणजे सालीना पांच कोटींचा ऐवज बिनतक्रार त्यांचे हातीं पडे. हा द्रव्यौघ भोसल्यांच्या मार्फत तोडण्याचें नानानें ठरविलें. बंगालवर मूळ मालकी बादशहाची व कारभार मुर्शिदाबादचे नबाबाचा. पुढें भोसल्यांनीं तो जिंकून त्याजवर चौथाई बसविली. ती त्यांस इंग्रजांकडून मिळेना. यास्तव मराठी राज्याचे संरक्षणाचा भाग सोडला तरी देखील केवळ स्वतःचे हक्क सांभाळण्यासाठीं, निदान स्वतः जगण्यासाठीं तरी असेल नसेल तें सामर्थ्य खर्चून बंगालची चौथाई वसूल करणें, व तेथील आपला ताबा शाबूद राखणें, भोसल्यांचें पहिलें कर्तव्य होय. तें बजावण्याचे त्यांचे प्रयत्न सारखे जानोजीच्या वेळेपासून चालू होते. या प्रयत्नांची कर्मकहाणी पर्शियन कॅलेंडर्सच्या पुस्तकांत पाहवी. इंग्रजांचा हा बंगाल प्रांत त्यांजकडून हिसकून घेण्याची तजवीज नानानें महादजीच्या विचारानें चांगलीच केली होती, हें चेतसिंगास त्यानें लिहिलेल्या पत्रावरून स्पष्ट होतें.

ता. ४-२-१७८१ रोजीं म्हणजे गॉडर्ड बोरघांट चढून पुण्यास येण्याचे वेळीं खालील महत्त्वाचें पत्र नानानें चेतसिंगास लिहिलें. 'इंग्रज बेइमान, छिद्रान्वेषी. बंगाला वगैरे ज्या दौलतींत त्यांचा पाय शिरला तेथील अहवाल काय झाला व इमान देऊन स्नेह कसा राखतात हें महशूर आहे. दक्षिणेंत सुद्धां याच प्रकारचें त्यांचें कपट वाढवीत चालले. खुषकींत टोपीकरांची चाल वाईट, सबब यांस पोख्त सजा करून काढून लावावें, हीच नेक सल्ला जाणून इंग्रजांचे तंबीचा नक्षा सरकारांत मुकरर झाला. त्याप्रमाणें सरकारांतून लढाई सुरू आहे. भोसले बंगाल्याचे सरहद्दीवर जाऊन पोंचले. हैदरखान यांणीं चेनापट्टण, अर्काट वगैरे कुल ठिकाणें कबजांत आणिलीं. निजामलीखां बहादूर यांच्याही फौजा शिकाकोल राजमेंद्रीकडे जाणार, असा चौकडून ताण बसला आहे. इंग्रज पांवप्यादे म्हणजे पायदळ शिपाई किती दिवस टिकणार! ईश्वरसत्तेनें होईल तें दिसेल. सरकारांतून आणखीही मातबर फौज बंगाल्यांत कलकत्त्याचे सुमारें रवाना होत आहे. फौजेच्या सरंजामाचे तजविजेविशीं आपल्यास पेशजी लिहिण्यांत आलें. त्याचा जबाब अद्याप आला नाहीं.

सबब वाट पाहत आहों. इंग्रजांची चाल बादशहा आदिकरून सर्व दौलतदारांस वाईट हें दूरदृष्टीचे मार्गे समजोन त्यांची तंबीची शक्कल अंमलांत आणावी. आपणाकडून उत्तर आलें कीं बंगाल्याकडे पोख्त फौज आली ऐसें समजावें. कितेक जाबसाल बोलण्यास राघो मल्हार आपणाकडे पाठविले आहेत, ते सविस्तर बोलतील त्याप्रमाणें तर्तूद व्हावी. हा ऐन वख्त आहे. पुनः अशी संधि मुद्दाम आणून येणार नाहीं. पत्रांचे जाब जलद येऊन पोंचावे.' असेंच पत्र चेतसिंगाचा कारभारी बाबू सुभानसिंग यासही नानाचें गेलें. चेतसिंगास नानाचें व पेशव्याचें अशीं वेगळीं पत्रें गेलीं. चेतसिंगास हें पत्र गेलें तेव्हां त्याचा हेस्टिंग्जशीं बेबनाव झाला नव्हता. पुढील १६ ऑगस्ट रोजीं हेस्टिंग्जनें चेतसिंगास पकडिलें. नंतर चार महिन्यांनीं तो महादजीचे भेटीस माळव्यांत आला, आणि त्याच्या मदतीनें इंग्रजांस बंगाल्यांतून उखडून देण्याच्या उद्योगास लागला. यापूर्वींच नानानें महादजीस स. १७८१ च्या पावसाळ्यांत सुचविलें होतें कीं, 'पातशाही फौज व पलटणें सामील करून घेऊन इंग्रजांस बंगालपावेतों रखडीत नेऊन मुलूख सोडवून खुशकींत त्यांची वसती न होय तें करावें. इंग्रजांनीं करोडों रुपयांचा मुलूख कबजांत आणिला आहे, तो सोडविला असतां मोठेच नफे व नक्ष आहे. इंग्रजावर सरकारचे फौजेची व हैदर नायकाचे फौजेची जबरदस्ती पडली म्हणजे पाण्यांतील जाग्यांत जाऊन राहतात. फिरून कांहीं दिवस बाहेर निघतात. असें जाणून सरकारांतून नानांनीं फरांसीचे पातशहास पत्रें पाठविलीं. ते व वलंदेज मिळोन साठ जहाजें व माणूस लढणार पाठविलें. सरदारही मातबर फुलचरीस येऊन दाखल जाले. याउपर इंग्रजांचें काय होतें ऐकाल.' अशा हिंमतीनें नानानें प्रचंड मसलतीची उभारणी केली. त्यावर महादजी म्हणतो, 'आम्ही पुण्याचे मुक्कामीं पातशहाचें सूत्र व बंगाल्याचे मसलतीचें नानास बोललों होतों. पातशहाचें सूत्र पक्कें होतें. पण ते दोहींकडे संधानें राखून, इंग्रजांस न मिळते, ऐसे मात्र राहिले. बंगाल्याची मसलत पुण्यांत स. १७७९ च्या पावसाळ्यांत सांगितली, तेव्हां इंग्रजांचीं पलटणें माळव्यांत आलीं नव्हतीं. गुजरातची मसलत मात्र होती. ती संभाळून आम्हांस बंगाल्याची मसलत सांगावी ऐसें आमचें बोलणें होतें. ते समयीं फौजेची व पैक्याची तर्तूद होती. अलीकडे इंग्रजांचा शह संभाळून वागावें लागत आहे. तेव्हां आतां बंगाल्याचे

मसलतीचें पहिलें बोलणें कसें घडतें! दोनही मसलती आम्हीं कशा कराव्या?'¶

मराठ्यांचा मूळचा बेकैदी व फुटीचा स्वभाव बाजूस ठेविला, तरी नागपुरकर भोसले आरंभापासूनच मराठशाहीशीं एकजीव नव्हते. रघूजीचा व पेशव्यांचा सारखा बेबनाव असून शाहूनें स. १७४३ त त्यांचा स्वतंत्र सुभा तोडल्यापासून पेशवे व भोसले एवमेकांच्या भानगडींत पडत नसत. रघूजीच्या पश्चात् नानासाहेबानें भोसल्यांस युक्तीनें मराठशाहींत सामील केलें; आणि जानोजी पानिपताचे वेळीं फौज घेऊन नानासाहेबाबरोबर बुंदेलखंड पावेतों गेला होता. पुढें माधवरावानें भोसल्यांचें प्रकरण धसास लावून स. १७६९ त कनकापुरच्या तहानें त्यांची एकंदर व्यवस्था त्यांच्या व मराठी राज्याच्या फायद्याची अशी ठरवून दिली, ती पुढें अव्याहत चालविणें भोसल्यांचें कर्तव्य होतें. जरी घरगुती भांडणांमुळें ते पुष्कळसे पंगु बनले होते तरी नानाफडणिसानें पुनः पुनः वाटाघाट करून भोसले वंधू व दिवाकरपंत वगैरे सर्व मुत्सद्दी यांस व्यवस्थित कार्यभाग नेमून दिला. असें असूनही क्षुद्र फायद्याच्या नादीं लागून त्यांनीं स्वीकृत कार्यभाग पुरा केला नाहीं. मराठशाहींतून साफ फुटून केवळ इंग्रजांच्या छत्राखालीं राहण्याचा निश्चय ठरवून तसे ते उघड वागते तर तेंही एका अर्थानें क्षम्य म्हणतां आलें असतें. कारण इंग्रज पातशहाचे मांडलिक होऊन राहण्याची आपली मोठी इच्छा आहे, असें त्यांनीं हेस्टिंग्सला लिहून दिलें होतें, तें तरी मग खरें झालें असतें. दोहोंकडचा फायदा मात्र पाहिजे, पण जबाबदारी तेवढी नको असें वर्तन त्यांनीं ठेविलें, यामुळें अखेर त्यांचें स्वतःचेंच मोठें नुकसान झालें.

हिंदुस्थानांत फुटकळ सत्ताधीश स्वतंत्रतेनें नांदण्याचा काळ संपला होता. मोगल बादशाहीची मध्याकर्षी शक्ति संपल्यावर मराठ्यांनीं आपली सार्वभौम सत्ता सन १७७२ चे सुमारास परिपूर्ण केली. ही सत्ता जरी अनेक सरदारांच्या साह्यावर उभारलेली होती, तरी प्रत्येक अवयवास मध्यवर्ती सत्तेचा पाठिंबा असल्यामुळेंच त्याचा निभाव लागे. पुण्यास मध्यवर्ती पेशव्यांची सत्ता नष्ट झाली म्हणजे मग तुमचीं आमचीं राज्यें कोठें राहिलीं, असे उद्गार महादजी व अहल्याबाई यांचे तोंडीं वारंवार निघत, त्यांचा अर्थ असा कीं

¶ का. सं. प. या. ४६४, ऐ. टि. २-२८; दि. म. रा. १-४५ व ६४; प. द. म. व. पृ. ६६.

मराठे सरदार मुख्य सत्तेतून अलग झाले तर त्यांचा निभाव क्षणभर लागला नसता. चौकडीच्या कारस्थानाची एवढी भीति हेस्टिंग्सला वाटली त्याचें कारण हेंच. प्रत्यक्ष इंग्रजांची सत्ता हिंदुस्थानांत प्रबळ झाली, ह्याचें आद्य कारण युरोपांतून इंग्रज राष्ट्राचा येथील कंपनीस मिळणारा पाठिंबा हेंच होय. लायल प्रभृति विचारवंत लेखकांनीं हें स्पष्ट केलें आहे. सारांश, पुण्याचें मध्यवर्ती नियंत्रण झुगारून देण्यांत भोसल्यांनीं आपलें स्वतःचें नुकसान करून घेतलें, आणि राज्यसंवर्धनाची उत्कृष्ट संधि फुकट घालविली. मुधोजी भोसले अव्वलपासून मराठशाहींत वावरलेला हुशार होता. त्याचे हातून ही भयंकर नुकसानीची चूक झाली. पुढें दुसरा रघूजी मोठा होत चालला तशी ही चूक त्यास पटली आणि हळू हळू त्यानें पुढें नाना फडणिसाशीं आपला कार्यभाग जमवून घेतला. स. १८०३ सालीं इंग्रजांशीं झालेल्या दुसऱ्या युद्धांत रघूजीनें मराठशाहीचा पुढाकार घेतला हें सुप्रसिद्धच आहे. पण त्या वेळीं मराठ्यांचा बहुतेक डाव अनेक कारणांनीं संपल्यासारखाच झाला होता.

भोसल्यांची ही तुटक वृत्ति महादजीच्या पूर्ण परिचयाची होती. भोसले कांहीं एक उद्योग करणार नाहींत, चाललेल्या गाड्यास उलट खीळ मात्र घालतील, तेव्हां त्यांचे भरंवशावर न राहतां आपणच सर्व भार घ्यावा अशी महादजीची नानास सल्ला होती. त्यानें नानास सांगितलें, 'माळवा व बंगाल इकडील कामगिरी मी स्वतः अंगावर घेतों, तुम्ही व होळकर मिळून दक्षिण सांभाळा.' नानाला ही सल्ला दोन कारणांकरितां पटली नाहीं; एक तर यांत महादजीची सत्ता वाढून तोच सर्वस्वी मालक होऊन बसेल अशी भीति. दुसरें असें कीं, सिंदे बंगाल्यांत उतरतील तर त्यांचा व भोसल्यांचा खटका उडून त्यांतच मराठी राज्यास अपाय होईल. सारांश, अशा साधकबाधक तपशिलांची पूर्ण वाटाघाट होऊनच मग चौकडीचें कारस्थान सिद्ध झालें होतें. भोसल्यांकडे दिवाकरपंत, भवानी काळो, वेणीराम शिवभद्र व त्याचा भाऊ विश्वंभर पंडित; तसाच चिमणा बापूचा कारभारी राजाराम पंडित इत्यादिकांच्या भिन्न भिन्न काव्यांनीं मुधोजी व त्याचा मुलगा चिमणा बापू यांचे मनाचा गोंधळ उडे. सर्वांचें ऐकून निश्चित हुकूम देण्याची ऐपत त्यांच्यांत नव्हती. व्यक्तिशः सर्व भोसले बंधु पराक्रमी व चतुर होते, पण जवळचे कारभारी व सल्लागार त्यांस आपापल्या मतलबासाठीं वाटेल तसे

फसवीत. ही त्या वेळीं सर्वच प्रमुख मंडळीची स्थिति होती. कारभाऱ्यांचे छंदानें वागला नाहीं असा एकच पुरुष महादजी तेवढा होता. वेणीराम व विश्वंभर हे बंधु भोसल्यांचे तर्फे हेस्टिंग्सजवळ राहून कारस्थानें करीत. बहुधा हेस्टिंग्सनें त्यांस पैशानें मिंधे केलें होतें. नाना तऱ्हेच्या अडचणींतून त्यांनीं हेस्टिंग्सला साह्य करून धन्याचा कार्यभाग बुडविला. सन १७८१ च्या जुलईंत हेस्टिंग्स कलकत्त्याहून निघून बनारसला चेतसिंगाकडून पैसे काढण्याकरितां गेला. तेथेंच दिवाकरपंतास बोलावून भोसल्यांस आपल्या तंत्रांत आणण्याचा त्याचा विचार असल्यामुळें, ह्या कामीं त्यानें वरील दोघां वकिलांस आपल्याबरोबर ठेविलें. नानाच्या कारस्थानाचा सुगावा हेस्टिंग्स यास होताच, आणि चेतसिंग जर पैशाचा पुरवठा महादजीस करूं लागला, तर बंगाल्यावरच मराठयांची धाड येईल, ती बंद पाडून उलट शक्य तर महादजीलाही नानाचे जुटींतून फोडावा अशा खटपटीसाठीं हेस्टिंग्स मुद्दाम काशीस गेला. ती वेळ मोठी आणीबाणीची होती, आणि भोसल्यांचे वकील जर फितले नसते तर हेस्टिंग्सचा संहार होण्याचीच संधि आलेली होती. काशी क्षेत्र भागीरथीच्या उत्तर कांठीं आहे आणि समोरच दक्षिणकांठीं रामनगर येथें चेतसिंगाचें वास्तव्य होतें. याशिवाय खुद्द काशी क्षेत्रांत भागीरथीचे शिवालयघांटावर चेतसिंगाचा वाडा होता. हेस्टिंग्स काशीस येऊन नंदेश्वर बंगल्यांत म्हणजे शिवालय घांटापासून सुमारें दोन मैलांवर उतरला, आणि त्याच्या भेटीसाठीं चेतसिंगही रामनगर सोडून काशींत शिवालय घांटावरील आपल्या वाड्यांत येऊन राहिला. हेस्टिंग्सनें चेतसिंगास आपल्या मुक्कामावर भेटीस बोलावून त्याजकडे पैशाची मागणी केली. आपणास एवढी रक्कम देण्याचें सामर्थ्य नाहीं असें सांगून चेतसिंग परत आपल्या मुक्कामावर शिवालय घांटावर येऊन राहिला. त्या ठिकाणीं ता. १६-८-१७८१ रोजीं हेस्टिंग्सनें गोरे अंमलदार पाठवून चेतसिंगास बाहेर जाण्याची अटक केली, आणि वाडयावर कडक पाहारे बसवून चेतसिंगाचे सर्व लोक बाहेर काढून दिले. फक्त चार दोन खास नोकर तेवढे जवळ ठेविले. ही बातमी शहरांत पसरून लोकांनीं चवताळून राजास सोडविण्याकरितां वाड्यास वेढा घातला. त्या वेळीं हेस्टिंग्सबरोबर तोफा किंवा फौज नव्हती. चेतसिंगास लोकांनीं सोडविलें आणि खुद्द हेस्टिंग्सलाही ते पकडणार होते. पण वेणीराम व विश्वंभर यांनीं त्यास

वेष पालटून आपल्या पालखींतून दूर गंगेवर नेऊन होडींत घालून पलीकडे चुनारगडास सुरक्षित पोंचविलें. या ठिकाणाहून पुढें हेस्टिंग्सनें फौजा जमवून बंडावा मोडला. त्यांत चेतसिंग पळून महादजीच्या आश्रयास गेला. या उपकाराबद्दल हेस्टिंग्सनें भोसल्यांचे वकिलांस बक्षिसें व इनामें करून दिलीं. अशा रीतीनें नागपुरकर भोसले हेस्टिंग्सच्या एकसारखे उपयोगी पडत आले. मात्र त्यामुळें खुद्द भोसल्यांचें व त्यांच्याबरोबर मराठशाहीचेंही अंतीं नुकसानच झालें. ( Forrest Imp. series Vol. 3. )

चौकडीचें कारस्थान ठरलें त्यांत भोसल्यांनीं बंगाल्यांत फौजा नेऊन चौथाईचा पैसा वसूल करावा व इंग्रजांच्या फौजा बाहेर जातील त्यांचा संचार बंद पाडावा, अशी कामगिरी त्यांनीं स्वीकारिली होती. ही जर भोसल्यांनीं शुद्धांतःकरणानें तडीस नेली असती तर पियर्स, पोफॅम, म्यूर, कॅमक वगैरे इंग्रज सेनापति माळव्यांत व मद्रासेकडे आले ते येऊं शकले नसते. आणि मुळांतच इंग्रजांच्या नाड्या आंखडल्या गेल्यानें, त्यांचें आस्थान सर्व देशांतून उछिन्न होऊं शकलें असतें. खंडोजी भोसल्याच्या फौजेची हेस्टिंग्स यास केवढी धास्ती पडली होती, तें ध्यानांत घेतलें म्हणजे बंगाल प्रांत हस्तगत करणें भोसल्यांस सर्वथा शक्य होतें याविषयीं संशय राहत नाहीं. हें काम सोडून ते इंग्रजांच्या भूलथापांस कां वश झाले आणि त्यांत त्यांनीं काय कमाई केली याचाही विचार करावा लागतो. खंडूजी बंगाल्यांत धडाडीनें जातात तर,—रघूजी व भास्करराम यांची पूर्वीची तडफ त्यानें दाखविली असती तर,—त्यास किती तरी पट जास्त पैसा मिळता. तर मग भोसल्यांना कर्तव्यपराङ्मुख होण्याचें कारण काय याचा बोध होणें जरूर आहे.

ता. ९-२-१७८२ रोजीं नानास महादजी सिंदे लिहितो, 'भोसल्यांनीं गुदस्तां ( म्ह० स. १७८१ त ) बंगाल्याची मसलत कबूल करून केली, तिचा शेवट अंतीं त्यांचा व इंग्रजांचा सलूख होऊन पंनास लाख रुपये भोसल्यांस एकसाली फौजेचा खर्च दिला; आणि पगडीबद्दल भाईचारा केला आणि तहामध्यें ठराव केला जे, हैदरखानाचे पारिपत्यास इंग्रजी पलटणें जाणें, त्यास भोसल्यांनीं पंतप्रधानांचे सांगितल्यावरून आम्हांशीं बिघाड करूं नये. या तहाअन्वयें काशीहून इष्टिनानें भोसल्यांस लिहून पाठविलें आहे कीं, तुम्हीं गुदस्तांप्रमाणें फिरून एक मातबर सरदार देऊन बंगालियास पाठविणें, म्हणजे

ती फौज व आम्ही एक होऊन इकडे माळव्यांत मसलत भारी पडली आहे ही तडीस नेऊं. अशी बातमी चेतसिंगाचा वकील आला, त्यानें सांगितली. इष्टिनाची मसलत दक्षिणीयांची पुरी तंबी करण्याची होती, परंतु काशीच्या राजानें गलबल केल्यामुळें इंग्रजांचे इभ्रतीस गोष्ट कमी पडली.' भोसले इंग्रजांचा वरील तह गुप्त होता, तो महादजीला अँडरसेननें दाखविला, तेव्हां भोसल्यांचे कपटी कृतीवर चक्क प्रकाश पडला.

**२. चौकडीच्या कारस्थानांत भोसल्यांची गफलत.**—मराठे, इंग्रज व हैदर हे तिघे या वेळीं जवळ जवळ समबल असून, या तिरंगी सामन्यांत कोणतेही दोन तिसऱ्यास भारी होते. हिंदुस्थानांत मराठ्यांची सार्वभौम सत्ता चालू असून, ती त्यांजकडून खेंचून आपण घ्यावी असा इंग्रजांचा डाव प्लासीच्या वेळेपासून चालला होता. जोंपर्यंत मराठे-हैदराचें वैर होतें, तोंपर्यंत इंग्रजांचा डाव यशस्वी झाला. ही गोष्ट ओळखूनच पुणें दरबारानें तुंगभद्रेच्या दक्षिणेकडील स्वतःचा सर्व प्रदेश हैदरास देऊन त्यास मोठ्या मिनतवारीनें आपल्याकडे वळविलें. नानाच्या मुत्सद्दी धोरणाची ही पराकाष्ठा होय. बाजीरावाच्या वेळेपासून, किंबहुना, शिवाजीच्या वेळेपासून मराठयांचे ताब्यांत असलेला तुंगभद्रेच्या दक्षिणचा सर्व प्रदेश कायमपणें सोडून देणें हा केवढा स्वार्थत्याग होता, याची कोणासही सहज कल्पना होईल. उद्देश हा कीं सर्वांसच लुबाडणाऱ्या इंग्रजांचा कांटा एकवार साफ नाहींसा करावा. हिंदुस्थानांतील अनेक दूरदृष्टि अक्कलवानांच्या अंतःकरणांत एकसमयावच्छेदेंकरून जी ही स्फूर्ति उत्पन्न झाली तिचाच परिणाम नानानें निर्माण केलेलें चौकडीचें कारस्थान होय. याचा मूळ उगम जरी खुद्द नानाच असला तरी त्यांत अनेक सत्ताधीश व मुत्सद्दी सामील होते. शिवाय बादशहा व त्याचा वजीर नजफखान, लखनौचा आसफुद्दौला, काशीचा चेतसिंग, मुर्शिदाबादचे नामधारी नबाब, भोसले व निजाम यांच्या दरबारांतली प्रमुख मंडळी असे सर्व लहान मोठे गृहस्थ इंग्रजांविरुद्ध चाललेल्या या कारस्थानाचा परिणाम मोठ्या कौतुकानें पाहत होते. त्यास फ्रेंच लोकांचा अंतस्थ पाठिंबा भरपूर होता. इंग्रज फ्रेंचांचें युरोपांत युद्ध सुरू होतें. अमेरिकेच्या वसाहती हातच्या गेल्यानें इंग्रजांचा काळ पडता आलेला होता. अशा या अमूल्य संधीचा फायदा घेऊनच चौकडीच्या कारस्थानाची उभारणी झाली. सर्व ठिकाणीं हें कारस्थान पूर्ण-

पणें यशस्वी झालें. एक बंगाल्यांतील कार्यभाग तेवढा भोसल्यांनीं पार पाडला असता तर इंग्रजांचा येथून समूळ उच्छेद होण्याची वेळ आली होती. अर्का-टचा महंमदअली तेवढा अगतिक म्हणून इंग्रजांचे बाजूस चिकटून होता. निजामानें जरी या कारस्थानांत विशेष उद्योग केला नाहीं, तरी त्याच्या विरुद्ध असेंही आचरण त्यानें केलें नाहीं. यास्तव कारस्थान फिसकटल्याची जबाबदारी एकट्या भोसल्यांवर येते.

मुधोजी भोसल्याचें अंतरंग बारभाईस पूर्ण अनुकूल असें कधींच नव्हतें. त्याची वृत्ति बहुधा द्विधा असे. ता. २८-१-१७७९ रोजीं बाबूराव वैद्य नाग-पुराहून पुण्यास आपल्या मुलास लिहितो, 'इंग्रजांची तयारी पाहून निजाम संदेहांत आहेत, अंतस्थ दोनही सूत्रें ठीक असें लिहून आलें, त्यावरून मुधोजीबावा आम्हांस म्हणों लागले, ऐकलें का, तुम्ही नबाब आपला म्हणतां ना ? आम्ही उत्तर केलें, या दिवसांत नबाबांनीं केलें हेंच पुष्कळ, आपण तर कांहींच केलें नाहीं. नबाब परका, हिंदुमुसलमान हे दोन पक्ष, त्यांचा वैरभाव भगवंत निर्मित आहे. या अर्थीं त्यांनीं फार केली, तुम्ही केल्याचें आश्चर्य काय ? ही नागपुरची दौलत आणि ती पुण्याची दौलत भिन्न हा भावच आपल्या घरीं नसावा.' यावर काय उत्तर करतात ! यांनीं (भोसल्यांनीं) गॉडराकडे व कलकत्त्यास पत्रें लिहिलीं आहेत. (खंड १०-१९९).

मुधोजीचें चित्त अशा प्रकारें द्विधा असतां सन १७७८ च्या उन्हाळ्यांत गॉडर्ड फौज घेऊन दक्षिणेंत आला, तेव्हां भोसल्यांनीं नर्मदेवर त्याची सरब-राई करून त्यास आपल्या हद्दींतून पुढें व्यवस्थेनें रवाना केलें, तेणेंकरून तळे-गांवीं तोंडास लागलेली काळोखी इंग्रजांस धुवून काढतां आली आणि दादास पुनरपि पळून जाण्यास संधि मिळून त्यास सुरतेस गॉडर्डाचा आश्रय मिळाला. त्यामुळें संपलेलें युद्ध फिरून जोरांत आलें. या आगळिकीबद्दल नानानें भोस-ल्यांस सडकून तंबी दिली, तेव्हां भोसल्यांनीं दिवाकरपंतास पुण्यास पाठवून पेशव्यांशीं नवीन तह करून त्यांच्याशीं गोडी केली. हा तह सवाल जबाबाचे स्वरूपाचा वाचण्यालायक आहे. मागणी भोसल्यांची असून जबाब पेशव्यांचा आहे. इंग्रजांविरुद्ध चौकडीची जूट या वेळीं घाटत होती, तींत भोसल्यांनीं भाग घेण्याचें कबूल केलें त्या वेळीं हा तह घडून आला.

१. कै. माधवरावांनीं ब्रह्मेश्वराचा तह केला त्या वेळीं दोन वर्षें प्रचीत पुरवून मग काय ती विनंति करावी हा निश्चय होता, त्यास सांप्रत काय तें सांगितलें पाहिजे. उ. उचित असेल तें बोलावें.

२. पांच वर्षांपूर्वीं तह झाला कीं दादांचा पक्ष सोडावा, पुणें दरबाराचा धरावा. त्याप्रमाणें आमचेकडून घडून आलें कीं नाहीं ! उ० दादांचा पक्ष सोडल्याबद्दल आमची खातरजमा आहे व लोकांतही प्रसिद्ध आहे.

३. इंग्रजांचीं पलटणें दोन महिने हुशंगाबादेवर बसलीं. आम्हीं त्यांशीं स्नेहाचे रीतीनें दिवसगत घेतली, त्यावरून चोंहींकडे आमचा अंदेशा आला, पण आपले संबंधानें आमचे लक्षांत रतिमात्र अंतर झालें कीं काय ? उ० आमची खातरजमा झाली, अंदेशा नाहीं.

४. इंग्रजांचा व सरकारचा बिघाड होऊन ते दौलतीस उपद्रव देऊं लागले, तेव्हां कटक प्रांताबद्दल दरसालचे चौदा लाख व बंगालच्या चौथा-ईची तुंबलेली बाकी भोसल्यास इंग्रजांकडून यावयाची ती ते बुड-वितील हा पेंच पडला, त्याची वाट भोसल्यांनीं कशी काढावी? भोसल्यांस हरएक प्रकारें सरकारांतून मदत केली जाईल.

५. इंग्रज किंवा हैदर यांजबरोबर युद्धप्रसंग पडला तरच भोसल्यांस फौजेनिशीं बोलवावें, इतर स्वाऱ्यांत पेशव्यांचे फौजेबरोबर घडोघडीं भोसल्यांस बोलवूं नये. कारण त्यांचे घरांत भावाबंदांचे पेंच, वऱ्हा-डांत उपद्रव; संबळपुर, मंडलें, भोपाळ, वगैरे रजवाडे बिघाडास तत्पर, याकरितां फौज पाठविण्याची माफी करावी. जबाब–मातबर मसलतीस बोलाविलें जाईल, तेव्हां भोसल्यांनीं फौजेसह यावें. इतर मसलतींत दरसाल बोलावणें होणार नाहीं.

६. तेरा लक्ष रुपयांचा रोखा आहे तो माफ करावा. उ० बंगाल्याची मसलत अंतःकरणपूर्वक कबूल केली सबब १३ लक्ष रु. माफ केले आहेत.

७. आमच्या येथून नाराज होऊन गेलेल्या इसमांस आश्रय देऊं नये. उ० अशा गोष्टी घडणार नाहींत. खातरजमा असावी.

८. आमचा मुलूख, त्याचा वसूल व संसाराचा आणि बंधूंचा खर्च वगैरे लक्षांत घेऊन आम्ही फौज कायम किती बाळगावी? उ० समजून सावधपणें खर्च करावा.

९.–१३, १५, १७ किरकोळ स्वरूपाचीं कलमें निजामसंबंधीं वगैरे आहेत.

१४. मंडलेवाल्याचा बंदोबस्त करून द्यावा. उ० खंडोजी चिमणाबापूस "सेनाबहादर" किताब व मंडल्याचा सरंजाम दिला जाईल. त्यांनीं प्रथम बंगाल्याची मसलत करून मग मंडल्याची हातीं घ्यावी.

१६. इंग्रजांचा बिघाड जाल्यास बंगाल्यावर फौज जाईल, पण मग नागपुरचे बंदोबस्तास फौज नाहीं, त्यास सरकारांतून मदत व्हावी. उ० सरकारांतून मदत होईल. मातबर पेंच पडल्यास मुलें माणसें गाविलगडावर पोंचवावीं.

१८. आमच्या निष्ठेंत रतिमात्र अंतर नाहीं, याजकरितां सरकारची कृपा सदैव निदर्शनास यावी. उ० समजोन उचित तें केलें जाईल.

१९. खंडूजी भोसले आमचे धाकटे बंधु बेहोष जवांमर्द आहेत. फौजेची व सरदारीची हमेश उमेद राखतात. सबब त्यांस परभारां सरकारांतून बंदोबस्त घडावा. उ० जवांमर्दी जाणूनच मंडल्याचा सरंजाम आलाहिदा कलम १४ त करार केला आहे.

एकूण कलमें १९ मु. गारपीर (ता. १२-९-१७७९ ना. भो. का. ११).

या तहा रून एकंदर मराठमंडळाची रचना व मनःस्थिति आजमावतां येते. वादविवाद आणाशपथा, करार यांची सर्वदा रेलचेल; पण ठरल्याप्रमाणें वर्तन मात्र केव्हांही घडलें नाहीं. नागपुरकरांनीं पुढें कसें वर्तन केलें त्याची हकीकत लाला सेवकरामानें दिली आहे ती अशी. ता. ८-३-१७८० रोजीं तो लिहितो,—

'हैदराची प्रबलताई ऐकून हेस्टिंग्स घाबरे होऊन जनरेल कूटास पत्रें पाठवून सत्वर बोलाविलें. या कूटानें नबाब वजिराचे मुलुखांत जकाती बसवून एक करोड ऐशीं लक्ष रुपये नगद वसूल केले. वजिरांनीं पागोटा भुईवर आपटून तीन उपास केले, पण कांहीं चाललें नाहीं. मग ३० आक्टोबरीं कलकत्त्यास कौंसल केली. बडेसाहेब बोलले, 'दाक्षि-

णचे मोहिमेवर चार पांच करोड रुपये खर्च झाले. रुपयांची ओढ बहुत आहे. म्हणून बंगाली व्यापारी हुजुरीमल्ल, लबा किशोर, दिवाण काशीनाथ, रामहरि मलीक, व रामरतन ठाकूर वगैरे मातबर लोकांपासून करोड रुपये वसूल करून खजिन्यांत दाखल केले, आणि लगेच कूट व अठरा असामी मातबर अंग्रेज व फौज व ५० लक्ष नगद जहाजावरून मद्रासेस रवाना केलें. मग ता. १-११-१७७९ रोजीं वेणीरामपंतांचे धाकटे बंधु विश्वंभरपंत यांस एक लक्ष जवाहीर, दोन लक्षांचे पोषाख, चार लक्ष मोहोरा, व सात हजार रुपये व सरंजाम देऊन खंडूजी भोसले सेनाबहादुर यांजकडे रवाना केलें. पंन्नास लक्ष रुपये बडे साहेबांनीं देऊं केले म्हणतात. सेनाबहाद्दरांशीं सल्ला करावा, बंगालचे मुलखांत हंगामा होऊं देऊं नये याचा बंदोबस्त करतात. वेणीरामापुढें बडेसाहेबांजवळ कोणाचें कांहीं चालत नाहीं.* भोसले फौजेनिशीं कटक प्रांतीं आहेत व कर्नल पियर्सचें जाणें त्याच वाटेनें, यामुळें बडेसाहेबांस बहुत

---

*सेवकरामाचा वंश




सेवकरामाचे पूर्वज आद्यछत्रपतीपासून मराठशाहींत नोकरीवर होते. पेशवाईंत कामावर असलेल्या अनेक घराण्यांचा प्रवेश पूर्वींच मराठीराज्यांत झालेला होता. सेवकराम ता. २२-७-१७८७ रोजीं लिहितो, 'माझे चुलते लाला भगीरथ झुल्फिकारखानांनीं नव्वद वर्षांपूर्वी कै. शाहूछत्रपतींबरोबर मुनसी करून दिले होते. त्यांचे पश्चात् माझे तीर्थरूप भवानीदास यांनीं चाळीस वर्षें मुनसीगिरी केली. चि. चिमणलाल व गुलाबराय कुटुंबसहित येथें आहेत. (ऐ. टि. ६-२४ ले. २). लाला कृपाराम व तुळजाराम हे सवाई जयसिंगाजवळ बाजीरावाचे वकील होते ते याच कुटुंबापैकीं होत. या सर्वांस मराठी भाषा व मोडी लेखन वाचन चांगलें येत होतें. सेवकरामही आरंभीं जयपुरासच वकिलीवर असून त्यास स. १७७५ त नानानें हेस्टिंग्सजवळ कलकत्त्यास नेमिलें. (प. द. म. व.).

प्रकारें समजाविलें, कीं आपण क० पियर्स यांस रवाना करावें, चिमणाजी भोसले बिघाड करणार नाहींत. त्यावरून वीस हजार रुपये वेणीराम पंतास इनाम दिले. पियर्स मेदिनीपुरापावेतों गेले, पुढें गेले नाहींत. बेनीरामचे मसलतीमुळें बडेसाहेबांस श्रीमंत पेशवे सरकारचा द्वेष अतिशय लागला आहे. हे आपल्या मगदुराप्रमाणें विरोध व हंगामा करावयास कमी करीत नाहींत व पुढेंही चुकणार नाहींत. बंगालचा मुलूख खराब जाल्यानेंच वाटेवर येतील.'

ता. २२ फेब्रुवारीस खबर आली कीं विश्वंभरपंतानें चिमणाजी भोसल्यांची दोस्ती पक्की व मामला फडशा करून, पियर्सचे कंपूस वाट देण्याची आज्ञा घेतली. मेजवानी करून बहुत स्नेहानें कटकेचे वाटेनें जाऊं दिलें. बडेसाहेब बहुत खूष झाले. वेणीराम व विश्वंभर यांस सिरपाव व इनाम दिलें, (८-३-१७८० चें पत्र, ऐ. टि. ३-२३ ).

ता. १०-१०-१७८० रोजीं सेवकराम कलकत्त्याहून पुण्यास लिहितोः--

' वेणीरामपंत भोसले यांजकडील व राजारामपंत दादासाहेबांकडील या उभयतांनीं बडेसाहेबांस दक्षणेची आशा बहुत प्रकारें दाखवून पुणें दरबाराशीं विरोधावर आणिलें. दोनहीकडून दक्षणा हस्तगत करावी हें मानस. मराठे सरदारांची सुस्ती व परस्परविरोध पाहून बडेसाहेबांनीं गुदस्तां दोन कोट रुपये नगद जहाजावर कर्नल गॉडराकडे पाठवून ताकीद लिहिली, कीं गुजरात हस्तगत करावी. तसेंच सात महिन्यांपूर्वीं कर्नल पामर यास गोहदचे राजाकडे पाठविलें, कीं उभयतांनीं मिळून श्रीमंतांचा हिंदुस्थानमधील मुलूख हस्तगत करावा. हल्लीं ( ऑक्टोबर १७८० त ) त्यांनीं कर्नल कॉमक ( Camac ) यास पलटणांसह गोहदकडे पाठविलें. जुलई व ऑगस्ट मासांत दादासाहेबांकडील खलिते कलकत्त्यास आले, मजकूर हाच कीं हरएक प्रकारें आम्हांस पुण्यास पावतें करावें. यावरून बडेसाहेबाचा व फ्रॅन्सिसचा विरोध वाढून उभयतां १७-८-१७८० रोजीं सकाळीं ६ वाजतां बागांत लढले. तेव्हांपासून दोन महिने कौन्सल करीत नाहींत. खंडूजी भोसले तीस हजार फौज घेऊन कटक प्रांतीं आल्याची खबर ज्येष्ठांत आली, तेव्हां वेणीरामपंतास बोलावून पुसलें, तुम्ही म्हणतां भोसले स्नेही आहेत, मग हें काय ! वेणीरामांनीं जबाब दिला, पुण्याहून ताकीद निकडीची आहे म्हणून आले, पण

बिघाड करणार नाहींत. दसरा झाल्यावर आपले मुलखास परत जातील. तेव्हां बडेसाहेबांनीं खबरदारीसाठीं क. अप्टन व कॅ. मॅक्फरसन यांस सात पलटणें देऊन भोसल्यांच्या तोंडावर ठेविलें आहे. वेणीरामपंतांनीं नागपुरास लिहून मुधोजींचीं ताकीदपत्रें खंडोजीचे नांवें आणिलीं, कीं आमचा व बडेसाहेबांचा स्नेह बहुत. तुम्ही बंगाल्यांत उपद्रव न करणें. पत्रदर्शनीं परत येणें. या दक्षिणी फौजेमुळें बंगाल प्रांतांत बहुत गडबड उडाली आहे. वस्तीचे लोक पळतात. भोसल्यांची ही फौज व हैदर नायकाचा अर्काट प्रांतीं प्रलय यांमुळें बडेसाहेब व इंग्रज फार घाबरले. बंगाल्याचा वसूल इंग्रजांस चाळीस लक्ष दरमहा नगद येतो, तो मुलूख खराब जाल्यानें बंद होऊन बडेसाहेबांचें बळ मोडेल, तरच ते सलाह करतील. आम्ही बडेसाहेबांशीं बहुत जाबसाल केले, पण दादासाहेबांचे पक्षामुळें एकही उत्तर सरळ दिलें नाहीं. आम्हांस शत्रूसमान जाणतो. महिनाभरांत एकवार जाऊन रामराम मात्र करून येतों.'

भोसल्यांची फौज कटक येथें आलेली अत्यंत निरुपयोगी होती. तेथील वकील पुण्यास लिहितो, 'जनावरें फार मेलीं. फौजेंत हाल राहिला नाहीं. त्यांत पैका नाहीं. वोढ्या प्रांत सर्व खराब जाला. भवानीपंतावर फौजेचा पेंच भारी आहे. काम पडल्यास अवघे फौजेंतून पांच हजार लोक जाऊन धावणी करून माघारे येतील असा दम कोणामध्यें नाहीं. प्रसंग इंग्रजांशीं. मुलूख ताराज करावा, तेव्हां धावणीचें काम. सेवकरामाचें पत्र आम्हांपावेतों पावत नाहीं. बडेसाहेबानें मुलकाचा पैसा आणावयास क० कोट फरखाबादेस पाठविला होता, तो एक करोड पसतीस लक्ष घेऊन आला, त्यास साहेबानें जहाजावरून मद्रासेस रवाना केलें. त्यांतील दोन जहाजें बुडालीं. दोनशें माणूस वांचलें, बाकी गेलें. वर्तमान कळल्यावर हिष्टीन बहुत घाबरा होऊन चार दिवस दरबार कारखाने बंद केले. वकिली बेणीराम पंताची आहे. चोर जिवंत आहेत. बडेसाहेबाच्या व भोसल्यांच्या भाऊपणांत तिलप्राय अंतर नाहीं. (जाने० १७८१). खंडोजी चिमणाबापूनें मुत्सद्यांचें व भवानीपंतांचें हरद्द न घेतां वेणीरामपंताचे भावाशीं बोलोन ठीक केलें, कीं शिबंदीचा पेंच वारावयासाठीं बडेसाहेबांचे सांगण्याप्रमाणें करितों. हल्लीं इंद्रसेन बडेसाहेबांकडून बोलणें करावयास आला. आहे तो बारा

लक्ष देतो. पूर्वी तीस लक्ष दिले. त्यास भवानीपंत म्हणतो, माझा प्राण गेल्यावर पाहिजे तें करा, परंतु मी ही गोष्ट घडूं देणार नाहीं. मुधोजींनीं लिहिलें, कीं शिबंदी वारून परत या. सारांश, सरकारमसलतीचें यांच्याकडून काडीमात्र घडेलसें दिसत नाहीं. चिमणाबापूचें व कोणा मुत्सद्याचें बनत नाहीं. यांनीं कलकत्त्यास कळविलें, कीं पंनासपर्यंत जाल्याशिवाय सामील-तेचा प्रकार घडत नाहीं. पाटीलबावाकडून कृष्णाजी बाबूराव कारकून कल-कत्त्यास आला आहे. कलकत्त्याहून पांच पलटणें चेनापट्टणचे कुमकेस जावया आलीं. तेव्हां चिमणाबापू भोसले शहास गुंतले. माघारे फिरतां नये. अंग्रे-जांशीं लढाई घेऊन नक्ष करून दाखविणेस सामर्थ्य नाहीं. पुढें बंगाला मारून ताराज करावा तर प्रस्तुत येथेंच कलागत वाढते,. तेथवर जाणेंही घडत नाहीं. तेव्हां यांस मार्ग देणें प्राप्त जाला. पियर्सच्या फौजेचें कूच होऊन पुरीपावेतों गेले. बडेसाहेबांस बहुत समाधान झालें.' ‡ एवंच अल्पसंख्य इंग्रजांपुढें बहुसंख्य मराठे कसे लटपटत, आणि हेस्टिंग्सनें हरएक अडचणींस कशा कावेबाजीनें तोंड दिलें, हा प्रकार वरील लेखांवरून स्पष्ट होतो.

खंडोजी चिमणाबापूनें पुढें काय केलें त्यासंबंधानें सेवकराम पुण्यास ३-७-१७८१ रोजीं लिहितो, 'चिमणाजी भोसले नीलगिरीचे डोंगरांतून कूच करून पुढें आले. नऊ दहा गांव लुटून जाळून वैरान केले. बरद्वान व मकसुदाबादेचे लोक पळूं लागले. कलकत्त्यांत बहुत गडबड झाली. सुभेदारा-कडील दोन कदीम वकील व जगतशेट सावकार आणि लहानथोर जमीन-दार यांनीं भोसल्यांजवळ जाऊन सांगितलें, कीं तुम्ही एकवार या प्रांतीं यावें, आम्ही माहिती देऊन आंग्रेजांचा अंमल सहज दूर करून देतों. कल-कत्त्यांत बिलकूल फौज नाहीं. कर्नल पियर्सबरोबर बेगारी माणसें बलात्कारें धरून पाठविलीं. म्हणून भोसले मनावर घेऊन बंगाला लुटते, तर बडेसाहेब बहुत लाचार व जेरदस्त होऊन मायलतीचे (चौथाईचे) रुपये देऊन सल्ला करते.परंतु भोसल्याचें वर्तमान आपल्यास माहीत आहे. वेणीरामपंतांनीं गॉडरास काल्पीचा घांट उतरून छत्रपुरपावेतों नेला. बराणपुराहून मुधोजींनीं आपले जासूद व माणसें देऊन सुरतेस पावता केला. देवाजीपंत व मुधोजी यांनीं

‡ ३-५-१७८१, ऐ. टि. ४-२०. प. द. म. व. पृ. ६३-६८.

चिमणाजी जवळचे दिवाण भवानीपंत काळो यास साफ लिहिलें, कीं तुम्हीं इंग्रजांशीं बिघाड न करणें. तेव्हां लष्करांत दोन चार माणसांचे हातपाय कापून ताकीद केली, कीं इंग्रजांचे मुलखांत हंगामा न करावा. त्यावरून बडेसाहेबांनीं वीस लक्ष रुपये नगद भोसल्यांस देवविले. बडेसाहेबांनीं आजपावेतों चाळीस लक्ष रुपये नगद, दहा लक्ष जवाहीर वगैरे मिळून पन्नास लक्षांचा ऐवज भोसल्यांस पोंचविला, तेव्हां चिमणाजी भोसले कूच करून परत गेले.'

भोसल्यांचा हा विश्वासघात ऐकून नानाचा अत्यंत जळफळाट झाला. छत्तीसगडास बिंबाजी भोसले सदैव रामभजनांत निमग्न असे, त्यास नानानें मुधोजीच्या विरुद्ध भर देऊन नागपुरावर चालून येण्याची सिद्धता करविली, तेव्हां मुधोजी पुनः स्वीकृत उद्योगांत सामील झाला, अशी हकीकत नागपुर बखरींत आहे.

**३. भोसल्यांस फोडण्याची हेस्टिंग्सची कारवाई** (स. १७८१).— कटक प्रांताच्या सुभ्याचें काम नेहमींच भोसल्यांस अवघड वाटे. पूर्वी गणेश संभाजी व शिवभट साठे यांची तेथें डाळ शिजली नाहीं. नंतर राजाराम मुकुंद याची नेमणूक तेथें होऊन, खंडूजी चिमणाबापू पंधरा सोळा वर्षांचा होतांच, स. १७८० त अनुभवादाखल त्याची नेमणूक मुधोजीनें सुभ्याचे जागीं करून, राजाराम मुकुंदास त्याचे हाताखालीं कच्चा कारभार करण्यास ठेविलें. यांस हेस्टिंग्सनें आपल्या बाजूस कसें वळविलें त्याची हकीकत त्यानेंच युरोपास ता. ३०-४-१७८१ रोजीं लिहून कळविलेली मनोरंजक आहे ती अशी.$

हेस्टिंग्स लिहितो, 'स. १७८० च्या सेप्टेंबरांत आम्हांस बातमी आली कीं हैदरानें मद्रासकडील भागावर स्वारी करून बेलीच्या लष्कराचा फन्ना उडविला, आणि जनरल मन्रोला पिटाळून लाविलें. या वेळीं मराठ्यांशीं सुद्धां आमचें युद्ध चालूच होतें. तपास करितां असें कळलें, कीं नागपुरकर भोसले, पेशवे दरबार, निजामअलीखान व हैदरअली अशा दोन हिंदु व दोन मुसलमान सत्ताधीशांनीं इंग्रजांविरुद्ध मोठें कारस्थान रचिलें असून, त्याचाच परिणाम ही हैदराची स्वारी होय. निजामानें उत्तर सरकार प्रांतांत, नागपुरकरांनीं बंगाल्यावर, पुणेकरांनीं मुंबईचे बाजूस, व हैदरानें मद्रासेंत,

$ Forrest's Warren Hastings Vol. 2.

असा चौघांनीं चार ठिकाणीं एकदम उठावा करण्याचा बेत ठरला होता. पैकीं नागपुरकर भोसल्यांनीं गेल्या दोन तीन वर्षांत आमच्याशीं अत्यंत स्नेहभावाचें वर्तन ठेविलें होतें. इंग्रजांविरुद्ध चाललेल्या कारस्थानांची बातमी आम्हांस प्रथम या भोसल्यांनींच दिली. त्यांनीं कळविलें, 'आमचा नाइलाज झाला म्हणून आम्ही वरील जुटींत सामील झालों. पण बाहेरून आम्ही कांहीं जरी देखावा केला, तरी इंग्रजांवर समोरासमोर शस्त्र धरण्याचा प्रसंग आम्ही कधीं आणणार नाहीं.' ठरल्याप्रमाणें भोसल्यांनीं आपली सुमारें ४०,००० फौज खंडोजी ऊर्फ चिमणाबापू याजबरोबर ता. १९-१०रोजीं बंगाल्याकडे रवाना केली. बहार प्रांतांतून नीट समोर ही फौज येती तर तिनें दोन् महिन्यांत बंगाल गांठला असता. पण केवळ आमच्या वचनाकरितां म्हणून खंडोजीनें पूर्वेकडे ओढ्या प्रांतांत कूच केलें. कटक येथें पोंचण्यास या सैन्यास मे महिना लागला. पावसाळा जवळ आल्यामुळें त्यांस तेथेंच छावणी करणें भाग झालें.

'या कारस्थानाच्या प्रमुख उत्पादकांपैकीं निजाम हा एक होता. पण पैशाची थोडी फार मदत करण्यापलीकडे त्यानें त्यांत कांहीं केलें नाहीं. इंग्रजांवर शस्त्र धरण्याच्या कामापासून तो अलिप्त राहिला. या वेळीं फ्रेंच लोक हिंदुस्थानांत प्रळय उडवितील अशी आम्हांस मोठी धास्ती होती. या संकटाचें निवारण करण्याकरितां आम्ही लगोलग मद्रासेस कांहीं फौज समुद्रमार्गानें पाठविली, आणि खुष्कीच्या मार्गानें जाण्यासही कांहीं फौज तयार केली. पण रस्त्यांत भोसल्यांचीच फौज असल्यामुळें तिला चुकवून पुढें जाणें शक्य नव्हतें. दुसरें, पुणें दरबाराशीं एकदम मिटतें घेण्याच्या इच्छेनें आम्ही एक तहाचा मसुदा तयार करून ॲंडर्सन वगैरे वकिलांस नागपुरकर भोसल्यांकडे पाठवून विनंति केली, कीं मुधोजीनें पुणें दरबाराशीं आमचा सलूख जुळवून द्यावा. पुढें पुष्कळ दिवस वाट पाहिल्यावर ता. ८-१-१७८१ रोजीं मुधोजीचा जबाब एकदांचा आला, परंतु त्यांत इतक्या बयादा लिहिलेल्या होत्या, कीं त्याचे हातून तह जुळून येईल अशी आशाच आम्हांस वाटली नाहीं. उलट मुधोजी आपल्या विरुद्ध फिरला अशीच आमची भावना झाली. तथापि मद्रासेस जाणारी फौज आम्हीं कर्नल पिअर्सचे हाताखालीं लगोलग पाठविली; आणि रस्त्यांत चिमणाबापूची समजूत करण्याकरितां बरोबर आमचा वकील जेम्स ॲंडर्सन यास रवाना केलें. तो

३१ जानेवारी रोजीं कटक येथें पोंचला, त्या वेळीं चिमणाबापूची फौज तेथून दूर होती. त्यास भेटण्यास चिमणाबापूनें विश्वंभर पंडित यास पाठविलें; आणि पियर्सच्या फौजेस कांहीं एक अडथळा न करितां पुढें जाण्यास वाट दिली. इतक्यांत मुधोजीकडून भवानी पंडिताचे हातचीं पत्रेंही त्याच आशयाचीं चिमणाबापूस आलीं. बंगालच्या चौथाईची रक्कम आम्ही त्यांस देत नाहीं, हा त्यांच्या पोटांतील मोठा दंश. कोणीकडून आमच्याकडून पैसे उपटावे ही त्यांची मसलत.' हेस्टिंग्सनें अँडरसन वकिलास इशारा देऊन ठेविला तो असा. 'चिमणाबापूस एक मधाचें बोट लावून ठेवावें कीं, 'आम्ही तुम्हास साताराचें छत्रपतिपद मिळवून देऊं. तुमचे वडील बंधु नागपुरचे राजे आहेत, पण खुद्द तुमची पुढली व्यवस्था काय! आमच्या मदतीनें तुम्ही छत्रपति होऊन सर्व मराठशाहीचें धुरीणत्व तुम्हांस प्राप्त होईल.' हल्लीं नागपुरास सर्व मुखत्यारी दिवाकर पंडिताची आहे. राजमंडळी व कारभारी एकूणएक दिवाकर पंडिताच्या तंत्रानें चालतात. भवानीपंडित तर त्याचे केवळ मुठींत आहे, आणि आमचेकडे असलेले दोघे वकील बंधु वेणीराम व विश्वंभर हे तर केवळ भोसल्यांचे नोकरच, मग त्यांची सत्ता ती किती! म्हणून चिमणाबापूशीं कोणतीही गोष्ट बोलतांना फार सावधगिरी ठेवा. त्यांच्या पोटांतलें काढून घ्या, आपली दाद त्यांस लागूं देऊं नका. 'मुधोजीच्या हयातींतच काय करणें तें करून घ्या, पुढें सर्व कारभार रघूजीचे हातीं जाईल; मग तुमचें कांहीं चालणार नाहीं,' असें आमिष चिमणाजीस लावा. हैदरअली सर्वांचाच शत्रु आहे, त्याचा पाडाव न केल्यास कोणाचीच धडगत राहाणार नाहीं. चिमणाबापूजवळ सर्व कारभार राजाराम पंडित पाहतो, त्यास व इतरांस थोडेसे पैसे देऊन सुद्धां वश करण्यास तुम्हांस आमची परवानगी आहे.' अशा प्रकारें हेस्टिंग्सनें ऍंडरसनला खूप पढवून पाठविल्यावर १३ मार्च १७८१ रोजीं ऍंडरसननें चिमणाबापूची भेट घेतली. पांच दिवस उभयतांची बोलणीं होऊन निकाल कांहीं एक न ठरतां वकील २६ मार्च रोजीं परत कलकत्त्यास आला. चिमणाबापूच्या फौजेस खर्चास नव्हतें, म्हणून त्याची मोठी तारांबळ होती, त्यासाठीं त्यानें ५० लाख रुपये हेस्टिंग्सकडे मागितले. पण हेस्टिंग्सनें फक्त १६ लाख दिले. भोसल्यानें २५ लाख निदान कर्ज म्हणून मागितले, तेही हेस्टिंग्सनें दिले नाहींत. पुढें ता. ६ एप्रिल १७८१ रोजीं हेस्टिंग्स व चिमणाबापूचा

कारभारी राजारामपंडित यांजमध्यें तह ठरला, कीं भोसल्यांनीं दोन हजार फौज इंग्रजांचे मदतीस हैदरावर पाठवावी; आणि तिच्या खर्चाबद्दल दरमहा एक लाख रुपये इंग्रजांनीं भोसल्यांस द्यावे. ता. ३०-४-८१ रोजीं इंग्लंडास कंपनीकडे हेस्टिंग्सनें जो खलिता लिहून पाठविला त्यांत ही हकीकत आहे. यावरून या चौकडीच्या कारस्थानाबद्दल हेस्टिंग्सला केवढें भय पडलें होतें, तें दिसतें. लाला सेवकराम ता. २-३-१७८१ च्या आपल्या पत्रांत लिहितो, 'खबर आली कीं निजामअली खानाकडील कोणी मातबर सरदार फौज घेऊन पुण्याच्या मदतीसाठीं गेला. बडेसाहेबांनीं वर्तमान ऐकून नबाबाकडील वकील राजा गोविंदराम याच्या मार्फत खलिता लिहून पाठविला कीं 'पुण्यास फौज रवाना केली याजकरितां तुमचे आमचे स्नेह्यांत खलेल होईल.'

सारांश काय, कीं हेस्टिंग्सकडून मोठी रक्कम मिळाल्याबरोबर नागपुरकर भोसले स्वस्थानीं बसले. स्वराज्याकरितां त्यांनीं कांहीं खटपट या वेळीं केली नाहीं, हें उघड आहे. प्रत्यक्ष रक्कम हेस्टिंग्सकडून भोसल्यास किती मिळाली याचा नक्की आंकडा समजत नाहीं. सेवकराम पंनास लाख म्हणतो, तर हेस्टिंग्सच्या लेखांत १६ लाख दाखल आहेत. भोसल्यांची हेस्टिंग्सकडे बंगालच्या चौथाईची मागणी फार दिवस चालू होती; त्यांनीं इंग्रजांचे मदतीस फौज द्यावयाची त्याचे खर्चाची रक्कम यावयाची होती. शिवाय कर्ज म्हणूनही भोसले इंग्रजांकडे रकमा मागतच होते. तेव्हां त्यांनीं इंग्रजांवर न उठावें म्हणून सर्वच पंनास लाख रक्कम लांच म्हणून दिलेली असेल असें म्हणतां येत नाहीं. एकंदरींत सन १७७९ च्या दसऱ्यापासून १७८१ च्या दसऱ्यापर्यंत भोसल्यांनीं करारप्रमाणें स्वराज्याचें कांहीं एक काम केलें नाहीं. 'खंडोजी भोसले यांनीं इंग्रजांपासून एक वेळ तीस लक्ष, एक वेळ पंधरा लक्ष, एक वेळ सात लक्ष येणेंप्रमाणें बावन लक्ष, रुपये घेऊन इंग्रजांच्या पलटणांस चिनापट्टणास जाण्यास मार्ग दिला, म्हणून पातशहांनीं व नजफखानांनीं वर्तमान सांगितलें. इंग्रजांकडून सांत्वन मिळून भोसल्यांनीं इंग्रजांचे कंपूंस मार्ग दिला,' अशी त्या वेळीं बाहेर प्रसिद्धि होती. कटकचा सुभेदार राजाराम मुकुंद पंडित हा स. १७८१ च्या उन्हाळ्यांत कलकत्त्यास हेस्टिंग्सचे भेटीस गेला असें वर आलेंच आहे. त्यानें तेथें ता. ६-५-१७८१ रोजीं तह ठरवून इंग्रजांकडून कांहीं रकमा घेऊन कटकमधून फौजा नेण्याची

इंग्रजांस मोकळीक दिली.‡ हा तह म्हणजे चौकडीच्या कारस्थानाचा उघड उपमर्द होय. त्याच्या योगानें मराठमंडळांत भोसल्यांची अगदीं नापत होऊन पुढें नानाच्या नाकदुराया काढतां काढतां रघूजींस पुरेवाट झाली.

मुधोजी हेस्टिंग्सचें हें आख्यान येथेंच संपविणें युक्त होईल. स. १७८१ चे अखेरीस अँडर्सन तहासाठीं महादजीकडे गेला, तेव्हांच हेस्टिंग्सनें मि. चॅप्मन यास मुधोजीकडे नागपुरास तहाकरितां पाठविलें. हा चॅप्मन हेस्टिंग्सच्या अत्यंत मर्जींतला, कांहीं दिवस त्याचा सेक्रेटरीच होता. पूर्वीं यालाच सन १७७८ त हेस्टिंग्सनें कोचीनचायनाचे प्रदेशांत कांहीं नवीन फायद्याचें बीळ पाडण्यासाठीं पाठविलें होतें. पुढें स. १७८१ त इंग्रज युद्धांत हरले ही गोष्ट त्या वेळीं जगजाहीर झाल्यामुळें, मुधोजींचा इंग्रजाविषयींचा प्रेमा ओसरून तो पुणें दरबाराकडे झुकला. यापुढें दोन तीन वर्षें मुधोजीनें नानाफडणिसाशींच सख्य करण्याचा प्रयत्न केल्यामुळें हेस्टिंग्सला फार वाईट वाटत असे. मुधोजी इंग्रजांवर रुष्ट झाला होता. म्हणूनच पुढें हेस्टिंग्स गेल्यावर मुधोजीनें महादजी मार्फत पुनः एकवार इंग्रजांकडून चौथाई वसूल करण्याचा प्रयत्न केला. ता. २२ जानेवारीपासून १४ मार्च सन १७८२ पावेतों चॅप्मन नागपुरास होता. ' त्यांनीं जाऊन सफाईचीं बोलणीं बोलून कटकचे सुभे राजाराम मुकुंद यांजला ताकीद आणिली, कीं इंग्रज फौजांस बेखलश हैदरावर जाऊं द्यावें.' अशा प्रकारें इंग्रजांच्या दोस्तीकरितां मुधोजींनीं करोड रुपयांची नुकसानी करून घेतली. त्यावरून पंतप्रधानांचे मनांत खलश आला, तो दूर करण्यासाठीं स.१७८३त बाळाजी विष्णु व भवानीपंत मुनशी यांजला सौरसाचें बोलणें बोलण्यास पुण्यास पाठविलें. तेव्हां नानांनीं तोड काढली कीं माधवरावांचें लग्न झाल्यावर मोहिम आहेच. त्यांत सामील व्हावें.' असा हा भोसल्याचे कुचराईचा परिणाम झाला. उघड आहे कीं भोसले जर मनापासून युद्धांत सामील होते तर निदान बंगालची चौथाई तरी त्यांस अविच्छिन्न मिळूं लागली असती. फुटीच्या स्वभावानें यांत भोसल्यांचेंच नुकसान झालें. हेस्टिंग्सच्या थापांस न भुलतां भोसले ठरलेल्या इमानास जागते, तर खंडोजीनें सर्व बंगाल प्रांत साफ उद्ध्वस्त करून टाकला असता, असें डफही लिहितो.

‡ हा तह Wills' Nagpur State पृ. २३१ वर दिला आहे. दि. म. रा. १ ले. ५२. ५३. ५४; ना. भो. का. पृ. २७ टीप ८ व बखर पृ. १२८–३०.

४. **दिवाकरपंत चोरघोडे**, (मृत्यु, ऑगस्ट १७८१).—मराठशाहींतील साडेतीन शहाण्यांपैकीं हा गृहस्थ म्हणजे भोसले शाहींतली तीस वर्षे एक शक्ति होती. याची थोडी हकीकत पूर्वीच्या भागांत येऊन गेली आहे. हा सखारामबापूचा समकालीन, जवळ जवळ त्याच्याच वयाचा असावा. दि. म. रा. १-४२ वरून दिवाकरपंत स. १७८१ च्या जुलईत खास जिवंत होता असें दिसतें. 'भोसल्यांकडील पत्रें दिवाकरपंताचा काळ जाल्यावर आलीं' असें विधान ३१-८-१७८१ च्या पुण्याच्या पत्रांत आहे, त्यावरून या ऑगस्ट महिन्यांत तो वारला असें अनुमान होतें. हेस्टिंग्जनें १६-८-१७८१ रोजीं काशी येथें चेतसिंगास अटकेंत ठेविलें, तेव्हां त्यास दिवाकरपंत काशीस भेटणार होता. भोसल्यांचे बखरींत, 'दिवाकरपंताचा काल नागपुरांत जाला,' एवढेंच विधान आहे. भा. व. २ प. या. १२ ता. १२-११-१७८१ या कागदांत 'दिवाकरपंत निजामाकडे जावयाचे असतांना वारले, असें लिहिलें आहे, त्या अर्थीं नोव्हेंबरपूर्वी तो वारला हें निश्चित होतें. ता. ७-१-१७८२ च्या सेवकरामाच्या पत्रांत पुढील मजकूर आहे. 'देवाजींपंत म्हणून कारकून नागपुराहून १७ दिवसांत काशीस आले. छ १३ मोहरमास बेणीरामपंतांनीं बडेसाहेबांशीं नावेवर भेटविले. लोक म्हणतात, कीं भोसल्यांनीं बेणीरामास दूर करून यांस पाठविले आहेत.' तसेंच 'वेणीरामांनीं देवाजीपंतास बडेसाहेबांजवळच आणून पोषाख देऊन रवाना केले, २२ मोहोरम,' असे उल्लेख आहेत. छ १३ मोहोरम म्हणजे २९ डिसेंबर १७८१. त्यापूर्वीच दिवाकरपंत मृत्यु पावला असल्यामुळें सेवकरामाची वरील माहिती ऐकीव असावी. स.१७८०च्या डिसेंबरांत दिवाकरपंत लिहितो, 'माझे शरीरास आराम नाहीं. शूळ पंधरा दिवसांत जातो. अखंड वायु उदरांत, जेवण बंद, दहशतीनें राहिलों. आजवरी रोग मोठा कारीगार होता. एकदां कसेंही अरिष्ट दूर होऊन श्रीमंतांस यश आलें. कुरापत जळून गेली. श्रीमंत मुधोजींची मरजी फार कीं श्री० बाल पेशव्यांस पहावें.' सखाराम बापूच्या तोलाचा व समस्त हिंदी राजकारण अकलेनें हालविणारा हा हुशार मुत्सद्दी नाहींसा झाल्यानें भोसल्यांचें फार नुकसान झालें. सखाराम-बापू व दिवाकरपंत यांच्या इतका विस्तृत कारभार तिसरा शहाणा विठ्ठल सुंदर याचा उपलब्ध नाहीं. जुन्या पिढींतल्या ब्राह्मण मुत्सद्यांपैकीं हा शेवटला. एक सबंध पिढी त्यानें नागपुरकर भोसल्यांच्या कारभारांचीं सर्व सूत्रें

प्रमुखत्वानें हालविली. यास्तव या प्रकरणाअखेर त्याच्या मृत्यूचा उल्लेख अवश्य होता. कागदपत्रांतून याचें नांव केव्हां केव्हां 'देवाजीपंत' असेंही लिहिलेलें आढळतें.*

**५. बोरघांटाखालीं इंग्रजांचा संहार, गॉडर्डचें पलायन.**—(फेब्रुवारी–एप्रिल, १७८१). हार्टलेचा पाडाव करण्याकरितां हरिपंत फडके व रघुनाथराव पटवर्धन पुण्याहून मोठी फौज घेऊन कोंकणांत उतरले आहेत असें गॉडर्डास वसईस कळतांच, तो आपली फौज घेऊन लगोलग हार्टलेचे कुमकेस निघाला. त्याचा तळ वज्रेश्वरीवर असतां. हरिपंताचा मुक्काम कर्जतला लागून दहिवलीवर होता. बाजीपंत अण्णा तोफा गारदी सुद्धां तेथून पुढें बदलापुरावर होता. गॉडर्डची मसलत काय होती याचा अंदाज मराठ्यांस नव्हता. इतक्या फौजेस न जुमानतां गॉडर्डची छाती घांट चढून पुण्यावर चाल करण्याची होईल असें त्यांस वाटलें नाहीं. तथापि गॉडर्ड जसजसा पुढें येऊं लागला, तसतसे मराठे सांभाळून मागें हटूं लागले. जानेवारी अखेर परशुरामभाऊ कोल्हापुराहून व तुकोजी होळकर खानदेशांतून पुण्यास दाखल झाले. ता.२९-१-१७८१रोजीं तुकोजीनें बाल पेशव्याची भेट घेतली. गॉडर्ड पुढें चालून आला, तेव्हां हरिपंताची व त्याची बदलापुराजवळ थोडी चकमक उडाली. इंग्रजांस मुद्दाम पुढें ओढीत हरिपंत मागें हटला. कोंकणांतील जागा लढाईस अत्यंत अडचणीची, ते घांटावर आल्यास पूर्वीप्रमाणें त्यांचा आपण कोंडमारा करूं, अशी नाना व हरिपंत यांची खात्री होती. इंग्रज पुढें आल्याचें कळतांच नानानें होळकरास लगोलग दहा हजार फौजेनिशीं घांटाखालीं पाठविलें. मागाहून परशुरामभाऊही फौजेसह आला. ता.९-२-१७८१ रोजीं गॉडर्ड बोरघांटांतून लिहितो, 'काल सकाळीं आम्ही खोपवलीस आलों. सभोंवार घिरट्या घालण्यापलीकडे मराठ्यांनीं आम्हांस कांहीं त्रास दिला नाहीं. मात्र घांटाचें मध्यद्वार त्यांनीं तोफांच्या बंदोबस्तानें बंद केलें होतें, म्हणून आम्ही मध्य रात्रीस घांट चढूं लागलों. आम्ही त्या द्वारापाशीं येतांच मराठे मागें हटून वरच्या द्वाराजवळ गेले. आमच्या लहान तोफांनीं आम्हीं द्वार हस्तगत केलें.' अशा रीतीनें घांट

* ख. ले. २६३८; प. द. म. व. पृ. ७३–७४, ले. ६-७; खंड १०-२६५; Duff II P. 454, Cal- Ed.

हस्तगत करून गॉडर्ड वर खंडाळयास पोंचला, आणि तेथील तळयावर मुक्काम करून राहिला. तो लिहितो, 'अद्यापपर्यंत तहाचे संबंधानें नानाचें कोणतेंही बोलणें मजकडे आलेलें नाहीं. त्यांस कांहीं तरी चांगली अद्दल घडल्याशिवाय ते तहास कबूल होणार नाहींत. माझी अशी सूचना आहे कीं, आपण हें बोरघांटाचें द्वार मजबुदीनें आपल्या ताब्यांत ठेवावें, म्हणजे कोंकणांतील खालच्या प्रदेशावर व पुण्यावर आपला शह कायम राहील. येथें सर्व साहित्य व सामान पुरेसें जमा करून मग आपल्या सवडीप्रमाणें पुण्यावर चाल करावी.' पण हा गॉडर्डचा सल्ला मुंबईकरांनीं मंजूर केला नाहीं. १५ एप्रिलपर्यंत गॉडर्डचा मुक्काम खंडाळयास होता.

'परशुरामभाऊ व हरिपंत यांनीं स्वतः सभोंवार फिरून खंडाळयावरील इंग्रजांच्या छावणीची टेहळणी केली. इंग्रज अडचणीच्या जागीं बातेऱ्या बांधून राहिल्यामुळें त्यांजला हैराण करण्याचा लाग साधेना. जागा अडचणीची, सबब गाडरास मैदानांत काढून लढाई द्यावी या तजविजींत आहेत. पुढें बाहेर निघेना तेव्हां मग सर्व सरदारांनीं खलबत करून ठरविलें, कीं घांटाखालून, इंग्रजांस रसदेचा पुरवठा होतो, ती बंद केल्याशिवाय ते जेरीस येणार नाहींत.' ही रसद बंद करण्याची कामगिरी परशुरामभाऊला सांगण्यांत आली.

'गॉडर्ड घांट चढून आला, तेव्हां हरिपंत व होळकर अलीकडे कारल्यावर आले. बाजीपंत अण्णा त्यांचे पिछाडीस घांटाखालीं आहेत. श्रीमंतांस पुरंदरास पाठविलें. पुणें पळूं लागलें. घांट चढतांना हरिपंत व होळकरांनीं इंग्रजांचें कांहींच नुकसान केलें नाहीं, याबद्दल नानांनीं त्यांस रागें भरून लिहिलें. 'तात्यांनीं चुकली गोष्ट,' म्हणून उत्तर पाठविलें. होळकरांनीं 'तात्यांनीं लिहिलें आहे त्यावरून कळेल,' असें लिहिलें. सारांश गोष्ट गेली असें जालें. पुण्यास यावें ही इंग्रजांची मोठी कस्त आहे. एक वेळ पुणें पहावें हें त्यांचे मनांत आहे. पुण्यांतील लोक फार करून गेले. दोन दिवस मोठी गडबड होती. आतां भाडें हलकें झालें. भोसले व नबाबांनीं कांहीं केलें नाहीं, तरी चिंता नाहीं. आपण दोघांनींच इंग्रजांचें पारिपत्य करूं, अशी हिंमत हैदरानें लिहून पाठविली.' (१६-२-१७८१).

गॉडर्डच्या चढाईमुळें मराठ्यांचा धीर बिलकूल खचला नाहीं. २८ फे० रोजीं परशुरामभाऊ लिहितो, 'रसद बंद झाल्याशिवाय गाडर पेंचांत येत नाहीं. सर्वांचे विचारें आम्हींच घांटाखालीं जावें असें ठरोन आज कोळंब्याचे घांटाखालीं

जातों. गाडर लवकर कूच करीलसें दिसत नाहीं. घाटमाथ्यावर अडचणीच्या जागेंत इलाज चालत नाहीं. गुदस्तांप्रमाणें पुढें मैदानांत तळेगांवच्या सुमारें आल्यानंतर श्रीगजानन हिंमत देऊन करील तें करो. फौजेंत पोटाचाच गवगवा मोठा, तेथें काम कसें होईल! सर्व भार श्रीवर आहे. हें शिवशाही राज्य आहे, केवळ यवनाक्रान्त होतें असें नाहीं.'

यापुढील समग्र मोहिमेचें संक्षिप्त पण मुद्देसूद वर्णन नाना फडणिसानें सातारच्या छत्रपतींस ता. १७-६-८१ रोजीं लिहिलें तें असें. 'इंग्रज घांटावर आला, ते समयीं श्री. महाराज व मातुश्री आईसाहेब आम्हांस यश यावें व शत्रूचा पराभव करावा म्हणून चिंतन करीत होतीं, त्या प्रमाणें घडलें. आपल्यास संतोष झाला, सविस्तर वर्तमान लिहून पाठवावें म्हणोन आज्ञा, त्यास, गाडर इंग्रज भारी जमाव व पोख्त सामान, सरंजाम व तोफा घेऊन लढावयाचा हिंमत धरून बोरघांट चढून अडचणीची जागा धरून राहिला होता. तेथें मातबर फौजेचा एलगार व्हावयाचा इलाज नसतां, रा. हरिपंत फडके फौज सुद्धां खडकाळयानजीक मुक्काम करून तेथून अहर्निश इंग्रजांकडे तलाव्यास (टेहळणीस) जाऊन बाण सोडून मारगिरी व करोल वगैरे लोक पायउतारां निकड करीत गेले. परशुरामपंतांची रवानगी घांटाखालीं रसद बंद करून इंग्रजांस ताण द्यावयाबद्दल केली. त्यांणीं घाटाखालीं जाऊन, गाडराचीं पलटणें रसद घेऊन बोरघांटास येत होतीं, त्यांजवर दोन वेळां निकड करून व लढाई मारून तीन चारशें माणूस त्यांचें ठार केलें. डेरे, राहुट्या, दारूचे छकडे व रुप्याचीं भांडीं व पांच हजार बैल घोडीं वगैरे लुटून आणिलीं. त्यांजवर पनवेलीहून पांच पलटणें, गाडराकडे कुमकेस येणार ही बातमी येताच, तुकोजी होळकरही कोंकणांत गेले, आणि इंग्रजांच्या पलटणांवर ह्यांनीं व भाऊंनीं चालोन घेतलें. समागमें तोफा नसतां करोल (Cavalry) पाय उतार करून घोडे उठवून इंग्रजांचे आराब्या पावेतों जाऊन हत्यार लाविलें. निकडीनें झुंजले. त्याही लढाईंत चार पांचशें माणूस इंग्रजांचें ठार झालें. उंटें, छकडे, बंदुका वगैरे त्यांजकडील पाडाव आलें. घाबरे होऊन खोपवलीचा पल्ला जवळ, व गाडरानें दोन पलटणें कुमकेस पाठविलीं यामुळें तीं पलटणें खोपवलीस येऊन पोंचलीं. परंतु त्यांची बाकी खराबी बहुत जहाली. इकडूनही हरिपंतांनीं फौज, तोफा, गाडदी घेऊन गाडरावर निकड भारी केली, दुतर्फा मातबर शह व जरब

बसली. फिरून कुमक अथवा रसद येऊन पोचण्याची मुष्कील पडली. त्यांचे लष्करांत दाणावैरणीची महागाई, सबब नेट धरून रहावयाची हिंमत न राहिली. अशा विचारांत पडून गाडर व जमियत व सामान सरंजाम सुद्धां १८ एप्रिलास घांटाखालीं उतरूं लागला. हरिपंतास बातमी लागतांच तयार होऊन गेले तों ते खालीं उतरले. यांणीं वरून मारगिरी केली, तेव्हां दुसरे रोजीं खालून इंग्रज कूच करून जाऊं लागला. यांनींही खालीं उतरून त्यांशीं गांठ घातली. तिकडून होळकर व भाऊ यांनीं दुसरी-कडून निकड बसविली. बरी लढाई जाहली. यामुळें इंग्रज घाबरा होऊन शें दीडशें मुर्दे टाकिले. त्यांस काढावयाची फुरसत न पडली. गाडे, छकडे, दारू व हजारों गोळे तोफांचे पाडाव आले. ते दिवशीं तीनचारशें माणूस इंग्रजांचें ठार झालें. भारी गळाठा त्यांचा होऊन खालापुरास राहिला. तेथून गाडर चौकास जाऊं लागला. तेव्हांही हरिपंत, होळकर व भाऊ असे तिघे तिहींकडून घेरून लढाई दिली. त्या दिवशींही इंग्रजांचें पांचसातशें माणूस ठार जखमी जहालें. दारूगोळे, बंदुका, छकडे आले. तेथून २३ एप्रिलास कूच करून पनवेलीस जाऊं लागला. तेव्हांही यांणीं गांठून फारच निकड केली. आराब्यापावेतों घोडे चालवून लढाई मारिली. हजार बाराशें माणूस त्यांचें ठार जखमी जहालें. चार सरदार त्यांजकडील मातबर पडले. त्यांत एक दोन खुद्द गाडरचे प्रतीचे मर्द होते. बंदुका व तोफा बेसुमार पाडाव आल्या. बुणगें वगैरे लुटलें गेलें. दारूगोळे तर मुबलक सोडविले. इकडीलही घोडें माणूस बरेंच जाया जखमी जाहलें, परंतु इंग्रजांस जरब चांगली बसली. फार खराबी जहाली. मुडदे देखील काढावयास फुरसत न सांपडली. शिकस्त होऊन गाडर मुंबईकडे बंदर किनारां गेला. महाराजांचे प्रतापें यश आलें. पुढेंही महाराजांच्याच प्रतापें राज्याचें कल्याण होईल. सोनगडाकडे इंग्र-जांचीं पलटणें होतीं, त्यांसही गणेशपंत बेहेऱ्यांनीं जरब पोंचविली. प्रस्तुत बाजीपंतास फौज सुद्धां वसई तालुक्यांत सुरतेपर्यंत गर्दी करून ताण द्यावया-बद्दल रवाना केलें असे. श्रीमंतांस देवी येऊन आरोग्य जहालें. स्वारी पुण्यास आली. बहुत काय लिहिणें.' †

† का. सं.प.या. ५००, २०९ व १२२; खरे २५७६, २५८२–८५; फॉरेस्ट.

'सरकारचे सरदार व लोक, व गाडदी व हशमी, यांनीं स्वामिसेवा, एकनिष्ठता, महाराजांचे चरणांचें चिंतन करून, इंग्रजांचा जंगी मार होत असतां, खात्रेस न आणितां, मोठ्या तारफेचें मर्दुमीनें युद्ध केलें. गाडरानें हिंदुस्थानांत जागां जागां लढाया केल्या, त्याच तौरानें इकडे मर्दुमी दाखवावयास आला. परंतु स्वामींच्या तेजप्रतापें त्याचा गर्वपरिहार झाला. दारूचें बळ फार. लढवय्या चांगला, म्हणूनच मुक्कामास जाऊं शकले. कालचे लढाईंत एक तोफ व बंदुका पाडाव आल्या. मार्गांनें लोकांस दारू फार सांपडली. एकंदर एकुणीस असामी मातबर इंग्रज लढाईंत पडले; आणि जखमी व ठार सरासरी माणूस तीन हजार; चारपांच हजार बंदुखा लुटली गेली. अशी जरब आजतागाईत इंग्रजांस बसली नव्हती. मुंबईंतील सारें जन हासतें. जिन्नस तेथून महाग जाला. पैसा कोपिनींत नाहीं. तमाम सावकाराचीं दिवाळीं निघालीं. रयत पळोन जाऊन भरली. खावयास नाहीं. मोठा कल्लोळ आहे. आपले जागां सर्द आहे. आंतील बोलणें आहे कीं साष्टी, उरण खेरीज घेतले जागे सारे देऊन तह करावा. दादासाहेबांचें मन आतां परिपाकास आलें आहे. आतां इंग्रजांस कोंडून आंतले आंत राखावा. एक वेळ चांगलें तोंड फुटलें. गोऱ्या कातडीचे पांच मुर्दे गोणत्यांत बाधलेले मुंबईस येऊन लागले आहेत.' हें मुंबईच्या बातमीदाराचें ता. ५-५-१७८१ चें पत्र आहे. तसेंच गॉडर्डाचे बातमीदार मराठी फौजेंत फिरून त्यास बातमी पोंचवीत. अशा बातमीदारांस मराठ्यांनीं पकडून त्यांच्या स्वारींत जबान्या घेतल्या त्या वाचण्यालायक आहेत. 'शेखअबदुल खिजमतगार दिल्लीचा दिंमत अप्टिन याजकडून बातमीस लष्करांत आला होता, तो सांपडला, त्यास विसापुरच्या किल्लेंत अटकेंत ठेविला. (ता. १०-४-१७८१). 'इंग्रजांचा बातमीदार कुवरसेन खत्री पुण्यास राहून इंग्रजांकडे व दिल्लीस, बादशहाकडे बातम्या पुरवी व इंग्रजांची वरिष्ठता लिही,' त्यास पुण्यांतून काढून द्यावा असें पत्र दिल्लीहून हिंगण्याचें नानास आलें. अशा अनेक तपशिलाचीं पत्रें पुष्कळच आहेत. $

$ खरे ले. २६६३४; ऐ. टि. ३.१८ व २८; स. मा. रो. ४९४; भा. व. २ प. या. ५१; दि. म. रा. १-१४, ३१.

इंग्रजांस हरवून परत घालविल्याबद्दल महाराष्ट्रास मोठा आनंद वाटला. दोनदां लागोपाठ इंग्रजांची कडेकोट तयारी पुण्यावर चाल करण्याची निष्फळ ठरली. त्यांतल्या त्यांत स. १७७९च्या बोरघांटावरील मोहिमेंत इंग्रजांचा कारभार अत्यंत अव्यवस्थित होता. गळ्यांत दादाचें लोढणें, सेनापति नालायक, अधिकार बहुमुखी, इत्यादि कारणांनीं आपणांस अपयश आलें असें ते म्हणत. शिवाय मराठ्यांकडे महादजी सुद्धां सर्व योद्धे हजर होते. परंतु हल्लींच्या गॉडर्डीच्या मोहिमेंत वरील कांहीं एक अडचणी नव्हत्या. गॉडर्डासारखा कल्पक व हिंमतवान सेनापति, आणि तोफखान्याची वगैरे भरपूर तयारी त्याजपाशीं असून, अडीच तीन महिनेपावेतों खंडाळ्यासच त्यास बसून राहवें लागलें. या वेळीं पेशव्यांकडे तुकोजीशिवाय ब्राह्मणेतर सेनापति दुसरा कोणी नव्हता. त्यांची फौज एकंदर वीस पंचवीस हजार होती, त्या मानानें इंग्रजांची त्याच्या पंचमांशही नसेल परंतु हा प्रश्न संख्येचा नाहीं. पाश्चात्य कबाईत व पाश्चात्य शास्त्रानें बनविलेला तोफखाना हींच दोन इंग्रजांच्या वरचढपणाची मुख्य कारणें वरील तीन महिन्यांच्या मोहिमेंत स्पष्ट होऊन त्यांत गनिमी पद्धतीचा विजय झाला. गनिमी पद्धत पाश्चात्य शास्त्रापुढें निष्फळ ठरली तरी मराठ्यांच्या अंगीं ती किती भिनलेली होती हेंही या प्रसंगानें व्यक्त झालें. या पद्धतींत संख्या मोठी लागते, काल हरण होतें, विजयाची खात्री नसते. तथापि बाजू अंगावर आली तर सर्वस्व संहारही होत नाहीं. महादजीशिवाय आपलें अडणार नाहीं, हेंही नानानें या वेळीं सिद्ध केलें. मागें आपण चिंचवडावर राहून नाना सर्व सिद्धता करून देत होता. परशुरामभाऊ लिहितो, 'हरिपंताची मिठी भारी. आम्ही ता. २ मे रोजीं चार घटका रात्रीस घांटमाथां आलों; आणि दुसरे दिवशीं तळेगांवास पोंचलों. आमचा वर्ज्य वार होता, म्हणून नानांचे भेटीस न जातां परभारें मुक्कामास आलों. उपरांतिक नाना आमचे डेऱ्यास आले. भेट झाली. आगत स्वागत चार घटका बसोन बोलणें झालें. हरिपंत व होळकर अद्यापि घांटाखालींच आहेत. बाजीपंतास सुरत अठ्ठाविशीकडे तालुका लुटून इंग्रजांस पेंच बसविण्यास पाठविणार. पुढें नानाचा निरोप घेऊन पुरंदरास श्रीमंतांचे दर्शनास गेलों. रात्रीं किल्ल्यावरच राहिलों. दुसरें दिवशीं श्रीमंतांचा निरोप घेतला. चि० हरिहरराव यास शिरपेंच, रघुनाथरावास मोत्याचा तुरा, गणपतरावास चौकडा, आम्हांस मोत्याची कंठी, दौलतराव हिंदुराव घोरपडे

यांस शिरपेंच, हत्ती, वस्त्रें, याप्रमाणें श्रीमंतांनीं सर्वांचा बहुमान केला.'

या युद्धांत पैशाच्या अडचणीची हाकाटी जशी मराठ्यांचे बाजूस दिसते तशीच इंग्रजांकडेही कांहीं थोडीथोडकी नव्हती. पुढें हेस्टिंग्सचे कारभाराचा तपास इंग्लंडांत झाला, त्यांत गॉडर्डवर सुद्धां पैशाची अफरातफर केल्याचा आरोप आला होता. त्या संबंधानें हेस्टिंग्सनें जबाब दिला कीं, ता. १-५-१७७८ पासून ता. ३१-१०-१७८१ पावेतोंच्या साडेतीन वर्षांत गॉडर्डाच्या फौजेचा एकंदर खर्च रु. १२०३८३८५ झाला, म्हणजे दरमहा सरासरी रु. २८६६२८ पडला. यावरून गॉडर्डनें अफरातफर केल्याचें सिद्ध होत नाहीं. फार तर त्यानें हिशेब चोख ठेविले नाहींत इतकेंच म्हणतां येईल.' §

६. **माळव्यावर इंग्रजांची चढाई** (फेब्रु० १७८१–ऑगस्ट १७८१).—महादजीला माळव्यांत पायबंद दिल्याशिवाय पुणेकर वठणीस येणार नाहींत, असें गॉडर्डनें हेस्टिंग्सला सुचविल्यावर त्यानें माळव्यावर फौजा रवाना केल्या, हें मागें सांगितलेंच आहे. कॅप्टिन पॉफम बंगालची अडीच हजार फौज व थोड्या तोफा घेऊन फेब्रुवारींत काल्पीवर यमुना उतरून गोहदच्या राण्याचे मदतीस आला. हा राणा पूर्वी मराठ्यांचा अंकित असतां या वेळीं तो हेस्टिंग्सच्या कारस्थानास बळी पडला. जयपुर, जोधपुर वगैरे संस्थानिक व गोहदचा जाट राणा पूर्वी मराठ्यांनीं जिंकलेले असून महादजीच्या ताब्यांत होते; पण सवड सांपडतांच महादजीच्या विरुद्ध उठून स्वतंत्र होण्याची त्यांची इच्छा कायम होती. गोहद अगदीं महादजीच्या घरांतच असल्यामुळें राण्याच्या या फितुराबद्दल महादजीनें पुढें त्याचा चांगलाच सूड उगविला. इंग्रजांनींही त्यास साह्य न करितां त्यास कसें तोंडघशीं पाडिलें हें पुढें दिसून येईल. पॉफमनें गोहदजवळ असलेल्या मराठ्यांस हांकून देऊन राण्याचे सांगीवरून लाहरच्या ठाण्यावर चाल केली. हें ठिकाण काल्पीचे पश्चिमेस ५० मैलांवर सिंध नदीच्या आसमंतात होतें. या ठिकाणीं कैक दिवस जंगी रणसंग्राम होऊन इंग्रजांचे पुष्कळ लोक पडले, पण स्थळ पॉफमच हस्तगत झालें. नंतर लगोलग ग्वाल्हेरवर चाल करून तोही किल्ला फितुरीच्या साधनानें ता. ४-८-१७८० रोजीं पॉफमनें घेतला. हा किल्ला पुढें तीन वर्षांनीं महादजीनें परत मिळविला.

---

§ ड्रॉडवेल पृ. १४४, खरे २६२३, २६३२.

या संबंधानें पॉफमनें लिहिलेलें एक पत्र उपलब्ध आहे तें असें. 'ग्वालेरीचा किल्ला अगम्य. डोंगराच्या टोंकावर, सर्व बाजूंनीं उंच, बळकट तटबंदीचा, अभेद्य होता. तो घेण्यांत महाराजाधिराज सवाई सिकंदर सरूपचंद गुप्त यांचें कळकळीचें साह्य नसतें तर, आम्हांस कोणत्याही उपायानें किल्ला सर करतां आला नसता. किल्ल्यावर जाण्यास एक चोरवाट होती, ती अत्यंत प्रयासानें समजून घेऊन आम्हांस त्यांनीं कळविली, म्हणूनच विनाश्रम किल्ला हस्तगत झाला. ब्रिटिशांशीं एवढी राजनिष्ठा ठेवून त्यांनीं ही सेवा केली, सबब त्यांच्या कुटुंबाचे हक्क, व त्यांचे हे उपकार आम्ही सदैव ध्यानांत वागविले पाहिजेत.' सरूपचंद गुप्त हा एक जैन व्यापारी गोहदचे राण्याचे पदरचा होता. (नातू; Duff; भा. इं. मं. त्रै. व. ६ पृ. १६३).

लाहर व ग्वालेर या ठिकाणांवर चढाई करण्याचा पॉफमचा उद्देश हेस्टिंग्सला कळतांच, या दुर्घट कामांत त्यास खचित अपयश येईल असें वाटून मेजर जेकब कॅमक यास हेस्टिंग्सनें उत्तरेकडून घाईघाईनें स. १७८० तच पॉफमचे जोडीस गोहदकर राण्याचे मदतीसाठीं पाठविलें. तो काल्पी सिप्री घेऊन ता. ६-२-१७८१ रोजीं सिरोंजला येऊन दाखल झाला. आदल्या वर्षापासूनच महादजीनें इंग्रजांशीं लढण्याची तयारी केली असून इंग्रजांच्या हालचालींवर त्यानें अंबूजी इंगळे व खंडेराव हरि यांस नेमिलें होतें, पण त्यांचा परस्पर थोडाबहुत बेबनाव होता. इंग्रज सिप्री, कोलारस पर्यंत चालून आल्याचें कळतांच महादजी जानेवारींत आपण स्वतः उज्जनीहून पूर्वेस सारंगपुरावरून भेलशाकडे गेला; आणि इंग्रजांस मागें रेटींत ग्वाल्हेरच्या व गोहदच्या दरम्यान नेट धरून राहिला.

कर्नल कॅमक फेब्रुवारींत भेलशापर्यंत पुढें आला होता. भेलशा ठाणें व परगणा पूर्वीं नानासाहेब पेशव्यानें भोपाळचे नबाबापासून जिंकून घेतलेला हल्लीं सिंद्यांचे ताब्यांत होता. गॉडर्ड स १७७८ च्या अखेरीस माळव्यांतून बऱ्हाणपुरास आला, तेव्हां त्यानें भोपाळचे नबाबाशीं सख्य केलें. त्यांत हा आपला भेलशा परगणा मराठ्यांकडून परत घेऊन आपणांस द्यावा, अशी नबाबानें गॉडर्डास विनंति केली; पण त्या वेळीं तें प्रकरण तसेंच राहिलें. हल्लीं कॅमक येतांच पुनः भोपाळकर नबाबानें त्याशीं बोलणें लाविलें, कीं आम्ही तुम्हांस तीन लक्ष रुपये देतों, भेलसें सिंद्यांकडून घेऊन आम्हांस द्यावें. कॅमकनें ही गोष्ट मान्य

करून सिरोंजपावेतों चाल केली. त्याबरोबर महादजीनें फेब्रुवारी अखेरीस कॅमकशीं गांठ घेतली; आणि त्यास घेरून सात दिवस तोफांचा सडकून मार दिला. ता. ७ मार्च रोजीं कॅमक मागें हटून महत्पुरास गेला. तेथें धान्य वगैरे सामुग्री मिळवून २४ मार्च रोजीं त्यानें सिंद्यावर छापा घातला. प्रथम ता. १ मार्चपासून अहोरात्र ७ दिवस कॅमकवर तोफांचा मारा सुरू राहिला. त्यांतून निसटून ९ तारखेस तो महत्पुरास गेला, आणि अयोध्येहून ताबडतोब त्यानें जास्त मदत मागविली. महादजी त्याचे मागोमाग होताच. झटापट थांबली नव्हती. २४ मार्च रोजीं रात्रीं कॅमकनें एकदम महादजीवर छापा घातला. आणि पुष्कळ लोक कापून काढले; १३ तोफा, तीन हत्ती, मुख्य निशाण व घोडे हस्तगत केले. यामुळें महादजीला इंग्रजांची थोडीबहुत दहशत बसली. पूर्वी मदत मागितल्याप्रमाणें ले० कर्नल म्यूर आणखी इंग्रज फौज घेऊन ४-४-१७८१ रोजीं कॅमकला येऊन मिळाला. त्यांनीं लगोलग ग्वाल्हेरचा किल्ला गोहदकर राण्यास देण्याचें कबूल केलें. तेव्हां राण्यास आनंद होऊन त्यानें अनेक राजपुत राजांस महादजीविरुद्ध उठण्याची भर दिली. म्हणजे सन १७८१ च्या उन्हाळ्यांत दक्षिणेंत गॉडर्डाशीं पुणेकरांचा निकराचा सामना चालू असतां, तिकडे माळव्यांत महादजीचाही तशाच तोडीचा सामना चालू होता. या सामन्यांत जो अनुभव महादजीस आला, त्यामुळेंच पुढें सालबाईच्या तहाची उभारणी झाली, हें लक्षांत ठेविलें पाहिजे.

कर्नल म्यूर येऊन कॅमक यास सामील झाला तेव्हांपासून गनिमी काव्यानें लढून महादजीनें पावसाळा येईपर्यंत निभावणी केली. ता. १३-३-८१ रोजीं पटवर्धनांचा कारकून पुण्याहून लिहितो, 'भूपाळवाल्यांनीं तीन लाख रुपये कबूल करून भेलसें घेऊन द्यावें या अर्थे इंग्रज आणिले आहेत म्हणून लिहिलें, ऐशास शिंदळीचे इंग्रज आहेत तरी किती! जेथें तेथें तेच उद्भवतात हें काय आहे न कळे. शिंदे त्यांचें पारिपत्य करतील तेव्हां खूळ मोडेल.' यावरून इंग्रजांसंबंधानें सामान्य मराठ्यांचें केवढें अज्ञान होतें हें दिसून येतें. (खरे २६०३).

कलकत्त्याहून हेस्टिंग्स एकामागून एक फौजा माळव्यांत पाठवूं लागला, तेव्हां त्यास बंगाल कौन्सिलांत फ्रॅन्सिस व व्हीलर यांनीं सडकून विरोध केला, पण हेस्टिंग्सनें जादा मताच्या जोरावर फौजा पाठविल्या. तसेंच ग्वाल्हेरवर

चढाई करण्याचा आपला उद्देश पॉफमनें जाहीर केला. पण पुढें अनायासें ग्वाल्हेर हस्तगत झाली त्यामुळें हेस्टिंग्सचा लौकिक वाढून तितक्यापुरती मराठ्यांची कळा उतरली. गोहदचे राण्यानें आनंदाचे भरांत हेस्टिंग्सचें अभिनंदन केलें आणि किल्ल्याचा ताबा मागितला. ही ग्वाल्हेर घेतल्याची आनंदाची बातमी हेस्टिंग्सनें लगोलग युरोपांत कंपनीचे अधिकाऱ्यांस मोठ्या फुशारकीनें लिहून कळविली. ग्वाल्हेरचा आपणास उपयोग कसा करतां येईल व तेथील बंदोबस्तास फौज वगैरे किती पाहिजे, त्याचा तपशील तूर्त पॉफमनें हेस्टिंग्सला लिहून पाठविला, आणि किल्ला आपले कबजांत ठेविला. येणेंकरून राण्यास फार वाईट वाटलें. युद्ध संपल्यावर किल्ला तुमचे ताब्यांत देऊं, तोंपर्यंत पुढील संग्रामास त्याची आपणांस जरूर आहे, असें हेस्टिंग्सनें राण्यास कळविलें; आणि इकडे पुणें दरबारास आपल्या तहाच्या अटी कठिण अशा कळविल्या. तसेंच एक पत्र ता. १२-१०-१७८० रोजीं महादजीसही त्यानें लिहिलें. परंतु नुकसान सोसून शरण आल्यासारखा तह करण्याची गोष्ट महादजीनें मनांत सुद्धां आणिली नाहीं. या वेळच्या इंग्रजी कागदांतील हकीकती विकृत आहेत, त्या मराठी कागदांवरून दुरुस्त केल्या पाहिजेत.

ग्वाल्हेर हातची जाऊन महादजीवर एकामागून एक इंग्रज सेनापति चढाई करून येऊं लागले, तेव्हां त्यानें दक्षिणेंत फौज घेऊन यावें म्हणून जो नानाचा आग्रह चालू होता, तो अर्थात् बंद पडला. इतकेंच नव्हे, तर शूर पुरुषांचें प्रखर पाणी अडचणींतच विशेष प्रगट होत असतें, हा अनुभव या वेळीं उत्तरेंत महादजीनें व दक्षिणेंत पेशव्यांचे सरदारांनीं गाडर्डाशीं लढतांना, भरपूर खरा करून दाखविला. हें एकंदर युद्धच मराठ्यांचें शौर्य व राजकारण या दोनही गुणांचें निदर्शक आहे, ही गोष्ट मराठी कागदांत उघड होते. सदाशिव दिनकर नानास लिहितो, 'पातशहा व नजफखान यांनीं इंग्रजांचा वकील काढून दिला. मोहिमेचे तर्तूदंत आहेत. शिप्रीस इंग्रज पलटणें आलीं, त्यांजवर अंबूजी इंगळे पाठविले. सिरोंजेंतही इंग्रजांचा दाब पडला. महेश्वरीहून अहल्याबाईनीं अंबूजी इंगळे याचा बाप त्रिंबकजी इंगळे § यास दीड हजार फौजेनिशीं रवाना केलें.

§ अंबाजीचा बाप त्रिंबकजी इंगळे या वेळीं अहल्याबाईचे नोकरींत होता, असें यावरून दिसतें.

मागाहून सदाशिव मल्हार बक्षी बावांनीं रवाना केले. बळवंतराव धोंडदेवही अंबूजीस सामील होण्याकरितां भलेशापुढें गेले. ( फे० १७८१ ). महादजी २१-१-१७८१ रोजीं लिहितो. 'अंतर्वेदींतून कुमक नामें इंग्रज सरदार पलटणें घेऊन ग्वालेर प्रांतांत आला. त्याचे पारिपत्यास फौज रवाना जाली आहे. बंगालपावेतों इंग्रजांस हांकून लावावें असा कस्त आहे. इंग्रजांशीं सलूख करूं नये. चहूंकडून तंबीच करावी. भोसले मोगलांनीं कराराप्रमाणें मसलती कराव्या हें उचित होतें. पण हा कालपर्यंत घडत नाहीं.' 'इंग्रज सिरोंज भेलसें घेऊन भोपाळकरास सामील करून नर्मदा उतरणार हे बातमी ऐकतांच पाटिलबावांनीं लांब लांब मजलीनें येऊन सिरोंजवर गांठ घातली. दहा अकरा दिवस तोफांची गोळागोळी होऊन इंग्रज पळाला, (ता. ८-३-१७८१).' ता. २८ एप्रिल रोजीं कलकत्यास खबर आली कीं महादजींनीं कॅमकचें पारिपत्य केलें. ते चाळीस कोस मागें सरून सिप्रीवर आले. सिंद्यांनीं चहूंकडून घेरून रसद बंद केली. नबाब नजफखानानेंही मेजर मजकुराशीं लढाई केली. दहा तोफा व अकरा इंग्रज हस्तगत व चार पलटणें गारद केलीं. खबर ऐकून बडेसाहेब फिकीरमंद झाले. पंधरा दिवस दरबार केला नाहीं. मेजर पॉफम ग्वालेरीस होता, त्यानें वर्तमान ऐकोन दोन कुंपणी सुद्धां शहराबाहेर येऊन राहिला. त्याजवर कूपरसिंग व पदमसिंग गुजर यांनीं ग्वालेरकर जमीदारांचे विद्यमानें लाग लावून पांच सातशें माणूस जाळून पाडलें; पॉफम इंग्रज सुद्धां दोन कंपनी कापून काढून किल्ल्यावर जाऊन निशाण भगवें चढविलें. किल्ला स्वाधीन जाला.$ ग्वालेर इंग्रजांकडून गेली तेव्हां पॉफम माघारा फिरून चंदेरीचे झाडींतून झांशीकडून अंतर्वेदींत जावें या विचारें काल शनिवारीं (३०-३-८१) सिंध नदी उतरून पचावलीस मुक्काम करून होता. लालाजी बल्लाळ कोटेकर जालमसिंग हाडे यास घेऊन आले. पाटीलबावा येतातसें ऐकून इंग्रजानें सुरंजेजवळ मुक्काम केला. राणेखानभाई व राजगडवाले यांच्या फौजा जाऊन पोंचल्या. त्यांनीं इंग्रजांची रसद बंद केली. भूपाळकरांनीं इंग्रजांशीं राजकारण केलें आहे कीं तीन लक्ष रुपये घेऊन भेलसें घेऊन देणें. त्यावर 'पाटीलबावाच इंग्रजांवर चालून गेले, त्यापक्षीं जथ चांगला पडून पारिपत्य करतील यांत गुंता नाहीं. युद्धाचे कार्यास पाटीलबावा दीक्षित. इंग्रजांची पक्की बंदी करून निकड

$ हें वर्तमान पुढें लटकें ठरलें.

केल्यास काम चांगलें होईल,' असें नानानें लिहिलें. अशा रीतीनें रेटारेटींत महादजीनें तीन महिने काढिले. 'प्रस्तुत बावांस दिवसांतून फिरावें लागतें. रात्रीं सडे घोडे राऊत घेऊन फिरत असतात, ते प्रातःकाळीं चार घटका दिवस चढेतोंपर्यंत. मग इंग्रजांचे कूच मुक्कामाची बातमी आल्यानंतर कोस अर्धाकोस ओढ्यावर येऊन आणखी चार सहा घटका तसेंच राहतात. इंग्रज यावयाचें घडत नाहीं असें समजून जीन घोडयावरील उतरावें. तें स्नानभोजन लवकर उरकून मागती सिद्ध व्हावें. सायंकाळ होतांच रानांत आडवाटेवर बसावें. सांप्रत असा प्रसंग आहे. जिकडे इंग्रज जाईल तिकडे त्याचे पाठीवर बावांचें कूच होईल. छाप्याचे दिवसापासून लोकांचें सत्वच गेलेंसें जालें आहे. इंग्रजांवर झड घालीत नाहींत. यामुळें लोकांवर बावा रुष्ट आहेत. लोकांस गूळ नाहीं, गूळसें बोलत नाहींत, यामुळें ते बावांवर रुष्ट.' या मोहिमेंत इंग्रजांचीं पलटणें सहा, व गोहदकराचीं दोन मिळून आठ, तोफा चौदा, व तीन गरनाळा, दोनसें तुरुपस्वार इतका जमाव त्यांचा. महादजीकडे तोफा अकरा व एक गरनाळ व निरनिराळे बरेच सरदार होते. इंग्रजांचे लष्करांत कैद भारी. नवे माणूस आढळल्यास बातमीदार असेल असें जाणून देहान्त करितात, या दहशतीनें कोणी लष्करांत जात नाहींत. इंग्रजांचे अंतःकरणीं मराठ्या फौजेचें भय नाहीं. यांनीं यांजबरोबर लढावें तर यांजपाशीं तोफा नाहींत, इंग्रजांजवळ तोफा असल्यानें यांच्यानें मातबर लढाई होत नाहीं. छावणी योजना बावांस विचारतां, इंग्रज ग्वालेरीकडे गेला तर त्याचे मागें आपणही जातच आहों. इकडे सिप्री कोलारस धरून राहिला तर याच प्रांतीं भेलशाचे सुमारें अगर अहिरवाडयांत छावणी करणें प्राप्त. प्रस्तुत यजमान एके स्थळीं, दिवाणजी ( बाळाराव ) बुणग्यांत, याप्रमाणें आहेत. जालमसिंग कोटेकर, बुंदेले, खेची, चंदेरीकर, सिमथरकर, दतियेकर, हे सारे पाटीलबावांस मिळाले आहेत. एक वेळ मातबर लढाई करावी हा विचार आहे.' सदाशिव दिनकर ता. २-५-१७८१ रोजीं लिहितो, 'इंग्रजांस मराठ्याफौजेचें भय अंतःकरणीं नाहीं. यांनीं लढाईस जावें तर यांजपाशीं तोफा नाहींत. इंग्रजांचा मुक्काम असतां यांच्यानें त्यांजवर चढाई होईल असा अर्थ नाहीं. इंग्रजांचें कूच चालू असतां बाणांची मारगीर वगैरे एक दोन वेळ होऊन पारिपत्य होत गेलें. इंग्रज सिप्री कोलारस धरून राहिला. एक एक

पलटण वेगळालें जाऊन भूम्यांचे माहीतगारीनें रसद आणितात. आपली फौज उपाशीं मरते. यांस पैका नाहीं. छावणीस या प्रांतीं राहणें झालें तर मोठा पेंच पैक्याचा आहे. तूर्त लढाई रूबकार रात्रंदिवस आहेच. आम्हीं सांगितलें, नानांनीं आपणांस देशीं बोलाविलें आणि नारो शिवदेव बोलतच होते कीं ज्या पक्षीं आपली मर्जी इकडीलच मसलत कबूल करावयाची आहे, त्यापक्षीं वरचेवर देशीं जाऊन नानांची आपली भेट जाल्यानें परस्परें स्वच्छता होऊन जनापवादही दूर होतो. मसलती समक्ष ठरवाव्या.' असे अनेक प्रकार सदाशिव दिनकर, नारो शिवदेव, आपाजीराम व महादजीचा विश्वासु दिवाण बाळाराव गोविंद यांनीं वारंवार महादजीस सांगितलेले आढळतात. $

**७. स. १७८१ च्या बरसातची छावणी, महादजी व म्यूर.—** महादजी लिहितो. 'आम्ही इंग्रजांचे मसलतीवर आलों. त्यांचें सामान भारी. आपले फौजेनें ते आयास येतील हें घडावयाचें नाहीं. त्याकरितां गोसावी व बैरागी व खेची व चंदेरीवाले व सिमथरकर गुजर हल्लीं नवे आले ते, अशा साऱ्यांस दरमहा कबूल करून ठेविले आहेत. दिसण्यांत मात्र लौकिक. आंतून अर्थ पाहतां साऱ्यांनीं दरमहा करून घेतले. इंग्रजांचे मसलतीमुळें अशा ओढी येऊन पडल्या आहेत.' 'अंबुजीचा व इंग्रजांचा मुकाबला लागला. समोर लढाई करून पुरें पडणें कठिणच. पण खांद्यावर भाला टाकून भोंवताले हिंडून चारापाण्यावांचून जेर केलें. पुढें ग्वालेरीचे मैदानांत आले; तेथें अंबोजी व महादजी यांनीं घेराघेरी आरंभिली. हिंदुस्थानची एवढी मसलत महादजीनें एकट्यानें कबूल करावयाची नव्हती, अशी जवळच्या सल्लागारांची त्यास टोंचणी होती. ( ग्वा. ४-४१ ). तसेंच अधून मधून नाना व पाटीलबावा यांचीं बोलणीं परस्पर वितुष्टाचींही होत असत. स. १७८१ च्या मे महिन्यांत लढणें बंद होऊन छावणीचा विचार झाला. निदान इंग्रजांस महादजीनें वरचढ होऊं दिलें नाहीं इतकाच या मोहिमेचा उपयोग झाला.

ता. १-७-१७८१ रोजीं सिप्रीनजीक एक शेवटची निकराची लढाई होऊन म्यूर पराभव पावला. 'गोहदकर राणा कर्नेल म्यूर सुद्धां भारी जमाव घेऊन

---

$ मे. १७८१; ग्वा. ४.२५–४२; ग्वा. २. २५१; का. सं. प. या. २८६, ३१५; प. द. म. व. प. ६९.

सिप्रीस आले. तेथून हजार बैल रसदेचे घेऊन मागील प्रहर रात्रीं शेसईहून कोलारसास आले. राणेखानभाई, व इंगळयांची फौज व सदाशिव मल्हार ऐसे बातमी ठेवून, एके बाजूनें गोसावी बैरागी व दुसरे बाजूनें फौजा, याअन्वयें लगट करून इंग्रजांकडील ८० माणूस ठार व सवाशें जखमी केलें. तीस बंदुका व चाळीस बैल रसदेचे आणिले. पांच तुरुप स्वार ( troops ) ठार पडले. इकडीलही शंभर सवाशें माणूस ठार व जखमी मिळोन जालें. महंत दर्यागीर मातबर माणूस गोळ्या लागोन ठार जाला. मुडदा उचलूं देईनात. त्यावर गोसाव्यांनीं बेलाशक चालून जाऊन दहापांच इंग्रजांस मारून प्रेत उचलून आणिलें. पाटिलबावांनीं महंताची क्षीत फार केली. पाटील-बावांचे मेहुणे तुळाजी जाधव ठार झाले. अशा प्रकारें इंग्रज अगदीं रड-कुंडीस आले. 'तळेगांवचें स्मरण त्यांस आहे.' अंबुजी इंगळ्याबरोबर बळवंतराव धोंडदेव यांचे लोकांनीं लढाईंत फार चांगलें काम केलें. त्यानें नेहमीं आघाडीस राहून विलक्षण झड घातली.' जुलई महि-न्यांत उभयतांच्या छावण्या झाल्या. इंग्रजांची छावणी सिप्री कोलारसचे दर-म्यान शेसईवर आणि महादजीची तेथून ईशान्येस वुढा पाहडावर म्हणजे काळी सिंध नदीवर रणोद व नारोद गांव आहेत त्या ठिकाणीं झाली. हीं सर्व ठिकाणें झांशीचे पश्चिमेस ५० मैलांचे आंत आहेत. याच प्रदेशांत फौजांचे तळ असतां म्यूर व महादजींचा शेसईचा तह ता. १३-१०-१७८१ रोजीं होऊन त्यावरूनच पुढें सालबाईचा तह ता. १७-५-१७८२ ला कायम झाल्यावर युद्ध संपलें. सालबाई ग्वाल्हेरच्या दक्षिणेस २५ मैल आहे.*

या वेळची युद्धपरिस्थिति २३-७-१७८१ चे पत्रांत नानास महादजी लिहितो, 'हल्लीं इंग्रजांचे छातीवर छावणी सडे फौजेसह लगती केली. अलीकडे दहाबारा लढाया जाल्या, तरी लढाईत इंग्रजांवरील जरब बरीच बसत गेली. त्यांचे जे मुडदे पडले व जखमी जहाले, ते लढाईतून टाकून मुक्कामावर माघारी गेले. आजपावेतों त्यांजकडील पंधरा सोळाशें पायदळ, गोरे चाळीस पन्नास, तुरुपस्वार पंन्नास साठ, व चार पांच पलटणांचे सरदार ठार पडले. कंपेश दोन पलटणें कमी झालीं. त्यांचे लोक बेजार झाले आहेत. कित्येक बंदुका

*ग्वा. ४-५५; इ. सं. हो. कै. पृ. १५; ऐ. टि. ६-३२.

टाकून पळून अंतर्वेदींत जातात. त्यांची रसद मारावयास सदाशिव मल्हार, गंगाधर गोविंद, शिवराम हरि झांशीकर वगैरे लाहरकडे पाठविले आहेत. सिकंदराकडे अंबूजीची फौज गेली आहे. आम्ही चार पांच महिने सडे फौजे-निशीं इंग्रजांचे लगत आहों. छावणीस मागें न जातां, बरसातींत इंग्रजांचे भोंवते दक्षणी राहिले, तेव्हां बाजत बरसात इंग्रजांचें पारिपत्य करतील, हें इकडील राजे रजवाडे वगैरे सर्वांस समजलें. त्यावरून नजफखान वगैरेंचे वकील आले आहेत. नबाब भोसले यांचा सरकाराशीं स्नेह असतां त्यांनीं भलताच प्रकार केला. विना बंगाला मारल्याशिवाय इंग्रजांची मसलत ठरली, तेव्हांच आम्ही सर्वांस सांगितलें, कीं भोसल्यांचा व इंग्रजांचा दांडा भेंडा (=शेजारस्नेह) आहे. त्यांच्यानें इंग्रजांची मसलत होणार नाहीं. पुर्णेकर व हैदरखान दोघां-वरच मसलत पडेल. याजकरितां आम्ही सुचविलें, कीं भोसल्यांस देशीं आणून गाडराची मसलत सांभाळावी; आणि आम्हांस हिंदुस्थानांत जाण्याचा निरोप द्यावा. बंगाल्याची मसलत करण्याचा जिंमा आमचा. हें त्या वेळीं नानाच्या चित्तास न आलें. त्या समयीं (म्हणजे स. १७७९ च्या पावसाळ्यानंतर) आम्हांस हिंदुस्था-नांत जावयाचा निरोप दिला असता, तर इंग्रजाचा इतका फैलाव झाला नसता. बंगाल्यास ताण बसता म्हणजे देशींही मसलत भारी न पडती. भोसले व नबाब यांनीं कराराप्रमाणें निदर्शनास आणून न दाखविलें. हैदरखानानें मात्र जरब चांगली बसविली. आतां विना बंगाला मारिल्याशिवाय इंग्रजांची मसलत आटपत नाहीं. पुढें तरी भोसले कोणती चाल धरतील याचा अंदेशाच आहे. तरी आमच्याच देशचे आहेत म्हणून बरें ! गुजरातचे स्वारीपूर्वींच इकडे आमचें येणें झालें असतें, तर इंग्रज इतके भारी न होते. देशीं जावयाचें म्हणून फौजेचा भरणा केला नाहीं. पुढें अकस्मात् मसलत येऊन पडली. अद्यापि श्रीमंतांचे पायांशीं आमची निष्ठा आहे, तर इंग्रजी पलटणांचें पारिपत्य करून बंगाल्यांत ताण बसवावा हेच उमेद आहे. मसलत आम्हांवरच आहे. यावर प्राण, मेहेनत करणें आम्हांकडे, होणें जाणें श्रीमंतांचा प्रताप. हैदरखानास वरचेवर पत्रें जाऊन कायम राखावा. मुंबईस गाडर-इंग्रजांचा मनसबा काय, याची पैरवी आतां-पासून राखावी. नबाब भोसल्यांशीं कागदोपत्रीं स्नेहाचाच शिलशिला चालवावा. माळव्यांत इंग्रजांचें पाऊल मागें पडलें म्हणजे बंगल्यापर्यंत मोकळें. इंग्रज दगाबाज आहेत. सलोख्याचा संदर्भ लावतील त्याजवर जाऊं नये. इंग्रजांशीं

आपलें बोलणें लागलें, कीं हैदर हातचा गेला म्हणून समजावें. ते दोघे एक होऊन सरकाराशीं विरुद्ध करतील तर दौलतीस मोठाच पेंच पडेल. होळकरां-कडून घरचा पेंच सांभाळून बंगाल्याची मसलत होणार नाहीं. त्यामुळें भोसले भडकतील; आणि नवाब व ते एक होऊन वांकडी चाल धरल्यास परिणाम ठीक नाहीं.' ( ख. ले. २६३६ ). महादजीच्या या पत्रांत एकंदर कारस्थानाची जी स्पष्टता आहे, त्यावरून त्याचें मुत्सद्दी व लष्करी दोनही प्रकारचें चतुराईचें धोरण चांगलें व्यक्त होतें. भोसल्यांस दक्षिणच्या कामगिरीवर आणावें आणि आपण नर्मदा पार राहून माळवा बंगालचा प्रदेश सांभाळतों, अशी स. १७७९ च्या पावसाळ्यांत महादजीची सूचना होती. ती नानानें मान्य न करितां महादजीस दक्षिणेंत ठेवून भोसल्यावर बंगालचा भरंवसा टाकिला; तो सिद्धीस न जातां शेवटीं इंग्रज बळावले व प्रत्यक्ष माळवा प्रांत हातचा जाण्याचा प्रसंग आला. पेशव्याच्या संरक्षणासाठीं महादजीला नानानें दक्षिणेंत ठेविलें. आपण उत्तरेंत राहूनच पुण्याचा बचाव करूं, असें जें महादजी म्हणे, त्याचें इंगित हें असें होतें. हिंदुस्थानच्या सार्वभौम सत्तेचें केंद्र पुण्याहून उत्तरेकडे सरकलें, याची जाणीव महादजीप्रमाणें इतरांस नव्हती.

ता. ३-५-१७८१ रोजीं रा. पाटीलबावा आपाजीराम व गंगाजी आव्हाड यांस बोलावून बोलूं लागले, 'इंग्रजांची मसलत देशीं आहे व इकडे आहे. देशीं इंग्रजांचीं दहा पलटणें, त्यांवर हुजरात, होळकर पटवर्धन मिळून साठ हजार फौज जमा असतां इंग्रज बोरघांट चढून वरता आला. आमचेकडे इंग्रजांचीं चौदा पलटणें, सेचाळीस तोफा, आणखी चार पलटणें काल्पीकडून येणार, त्यास आमचा सरंजाम पंधरा वीस हजार. इतक्यानें सिरोंजपासून कोलारसपावेतों इंग्रज मारीत आणले. प्रताप श्रीमंतांचा. त्या उपर छाप्याचा प्रकार जाला. मागाहून इंग्रजांस आणखी कुमक येऊन पोंचली. आतां मसलत कशी करावी ! पैका नाहीं. छावणीचे दिवस आले. तेव्हां देशींहून दहाबारा हजार फौज चांगली आणून बादबरसात इंग्रजांचें पारिपत्य करावें.' त्यावर आपाजीरामानें उत्तर केलें, 'तुम्हीं रिकामे दिवस चार पांच महिने जुलई १९८० पासून उज्जनीस घालविले. देशीं जाणें झालें नाहीं, व इकडे इंग्रजांवरही येणें झालें नाहीं.' महादजी बोलला, 'देशीं जातों तर इंग्रज मागोमाग माळवा घेऊन देशींच येता. लवकर इकडे येऊन गांठ घातली म्हणून बरें.' अशी वाटाघाट कधीं रागानें, कधीं लोभानें महादजीची कारभाऱ्यांजवळ सारखी चालू होती.

प्रकरण अकरावें

# युद्धसमारोप,—सालबाईचा तह

## स. १७८२



१. म्यूर-महादजींचा स्वतंत्र सलूख ( १३-१०-१७८१ ).
२. चेतसिंगाचा महादजीकडून पुरस्कार ( डिसेंबर १७८१ ).
३. तहाच्या पूर्वगामी वाटाघाटी.
४. सालबाईच्या तहाचीं अव्वल अखेरचीं कलमें.
५. सालबाई तहांतील नफानुकसानीची विविध चर्चा.

* * * *

**१. म्यूर-महादजींचा स्वतंत्र सलूख,** ( १३-१०-१७८१ ).—स.१७८० मार्चपासून चौकडीचा प्रादुर्भाव थोडा थोडा निरनिराळया ठिकाणीं व्यक्त होऊं लागला. मार्च एप्रिलांत शिंदे होळकर गुजराथेंत गॉडर्डास ताणीत असतांच, चिमणाबापू भोसल्यानें इंग्रजांचा ओढयाचा मार्ग अडवून धरिला, आणि पुढें जुलई महिन्यांत हैदरानें आपल्या लाख फौजेच्या लोटानें मद्रास—अर्काटचे दरम्यान प्रळय उसळून दिला. मराठी आरमारही त्याच वेळीं पश्चिम-किनाऱ्यावर इंग्रजांस थोडेंबहुत अडवीत होतें. माळव्यांत इंग्रजांची फौज आली, तिला महादजी पावसाळयांतच आडवा आला. या सर्व गोष्टी एकदांच सर्व ठिकाणीं उद्भवलेल्या पाहून हेस्टिंग्सला जबर धक्का बसला, आणि मद्रास-कडे हैदरानें जेव्हां इंग्रजांस सडकून तंबी दिली, तेव्हां हेस्टिंग्सचें धाबें दणाणलें. चहूंकडून आकाश कोसळल्यासारखें त्यास झालें. निजाम, भोसले, हैदर व मराठे एकदम चहूंकडे इंग्रजांवर उठलेले पाहून, यांत कांहीं तरी अंतस्थ कारस्थान आहे अशी त्याची भावना झाली, आणि अर्काटचा महंमदअली, भोसल्यांचा वकील वेणीराम शिवभद्र, वगैरे त्याच्या दोस्तांनीं त्यास या प्रचंड गुप्त कारस्थानाची वर्दी दिली. काशीचा राजा, अयोध्येचा वजीर, दिल्लीचा बादशहा वगैरे सर्वच इंग्रजांवर उठून अंतस्थ खलबतें करतात असा त्यास

सुगावा लागला. युरोपांत इंग्रज फ्रेंचांचें युद्ध चालू असून मोठें फ्रेंच आरमार इकडे येत होतें. इंग्रजांचे पैशाचा चुराडा होऊन इतके दिवस लभ्यांश कांहींच झाला नाहीं. तेव्हां एकदम सर्वांशीं वितुष्ट न वाढवितां, त्यांतल्या त्यांत हैदर व मराठे या दोघांपैकीं एकाशीं तरी सल्ला करण्याचा विचार हेस्टिंग्सनें ठरविला. नागपुरकर मुधोजीस जरी त्यानें थोडा वेळ थांबवून धरिलें, तरी कारस्थानी मंडळीच्या तावडींत सांपडून तो केव्हां उलटेल याचा नेम नव्हता. निजामासही हेस्टिंग्सनें आवरून धरिलें, तरी त्याचाही कायम भरंवसा नव्हता. हिंदुस्थानभर चाललेल्या या प्रचंड कारस्थानाचा सुगावा हेस्टिंग्स यास एक वर्षपर्यंत लागला नाहीं, यांतच त्याची खात्री झाली, कीं सर्व देश आपणावर फिरला आहे. यासंबंधानें सर्व ठिकाणची परिस्थिति मुंबईकरांपेक्षां हेस्टिंग्सलाच चांगली कळली होती. त्यावरून पुणें दरबाराशीं समेट करून मग मराठ्यांच्या साह्यानें हैदरावर चाल करावी असा घाट त्यानें रचिला; आणि तहाच्या खालील अटी पुण्यास रवाना करण्यासाठीं स. १७८० तच त्यानें मुधोजी भोसल्याकडे पाठविल्या, आणि तहाची मध्यस्थी करण्याची विनंति केली.

१ अहंमदाबाद फत्तेसिंगाकडे व ग्वाल्हेर गोहदच्या राण्याकडे राहवी. २ वसई इंग्रजांचे ताब्यांत आली असल्यास त्यांजकडेसच राहवी. ३ याखेरीज जानेवारी १७७९ नंतर जिंकलेले सर्व प्रदेश इंग्रजांनीं परत द्यावे. ४ इंग्रजांनीं रघुनाथरावास आश्रय देऊं नये. ५ पुणेंकरांनीं त्याचे खर्चाची व राहण्याची व्यवस्था मर्जीप्रमाणें करावी. ६ पेशवे इंग्रजांनीं एक जुटीनें हैदराचा पाडाव करावा; आणि अशी जूट करणें नसेल तर निदान इंग्रज मराठ्यांनीं तरी चाललेलें युद्ध थांबवावें. या अटी हेस्टिंग्सनें ता. ९-१०-१७८० च्या पत्रानें मुंबईकरांस कळविल्या आणि पेशव्यांची कबुली आली तर एकदम युद्ध थांबवावें, आणि तशी कबुली न आली तर निकरानें युद्ध चालवावें, असा हुकूम केला. $

या अटी मुधोजीस मिळाल्या त्याच सुमारास त्यास बातमी कळली कीं ता. १०-९-१७८० रोजीं हैदरानें मद्रासेजवळ बेलीच्या फौजेचा साफ फन्ना उडविला. हा बनाव हां हां म्हणतां सर्व देशभर पसरून प्रत्यक्ष मुधोजीसही

$ Forrest Maratha Series P. 438, 445, 463; Duff.

वाटलें कीं आतां इंग्रजांची धडगत नाहीं. यास्तव त्यानें तहाच्या अटी पुण्यास नुसत्या कळविल्या सुद्धां नाहींत. हेस्टिंग्स मात्र दोन महिने मुधोजीच्या जबाबाची वाट पाहत तिष्ठत बसला. स. १७८० चे नोव्हेंबर डिसेंबर गेले. जानेवारी आला, तरी युद्ध थांबविण्याविषयीं पुणेकरांची सूचना गाडर्डास येईना. ता. १८-१-१७८१ रोजीं गाडरानें अर्नाळा किल्ला हस्तगत केला आणि मुंबईकरांस अशी बदसल्ला दिली, कीं पुनः एकदम पुण्यावर चालून जावें. इकडे मद्रासकर इंग्रज अगदीं टेकीस येऊन मुंबईकरांस सारखा दोष देऊं लागले कीं, राघोबाचें निमित्त करून निष्कारण मराठ्यांशीं युद्ध चालविण्यांत हे मुंबईकर सर्व इंग्रज राष्ट्राचा घात करीत आहेत. पण मद्रासच्या या ओरडीकडे गॉडर्ड हॉर्नबींनीं बिलकूल लक्ष दिलें नाहीं. ता. ९-२-१७८१ रोजीं गॉडर्डानें हॉर्नबीस लिहिलें, 'अद्यापि पुणेकरांकडून तहाच्या अटींसंबंधानें कांहींच निकाल येत नाहीं; आणि कल्याण प्रांत हस्तगत केलेला आहे तो कदाचित् ते फिरून घेतील, सबब आपण फौजेनिशीं जाऊन बोरघांटाचें द्वार ताब्यांत घेऊन मराठ्यांचा खालीं कोंकणांत उतरण्याचा मार्ग बंद करावा; आणि त्या नाक्यावर फौज जमवून मग पुण्यावर चाल करावी.' गाडर्डाची ही सूचना मान्य करून मुंबई-करांनीं ता. १२-२-१७८१ रोजीं त्यास हुकूम सोडला, कीं तुम्ही पुण्यावर चालून जावें. ह्यावरून गॉडर्ड लगेच खंडाळ्यास जाऊन तें स्थळ बळकावून बसला. गॉडर्डाच्या एकंदर आयुष्यांतील ही एक मोठी घोडचूक होय, असा अभिप्राय डफनें व्यक्त केला आहे.

इकडे मुधोजीनें स. १७८१ च्या जानेवारींत हेस्टिंग्सला कळविलें कीं, आपल्या हातून पुणेकरांशीं तहाची मध्यस्थी होणार नाहीं. चौकडीच्या जुटीं-तीलच एक इसम इंग्रजांकडे फितूर होऊन तहाची मध्यस्थी करतो, असा याचा अर्थ पुणेकर करतील, याची त्यास मोठी धास्ती वाटली. मात्र हें त्यानें पूर्वींच कळविण्यास हरकत नव्हती. गाडर्ड खंडाळ्यास वाट पाहत बसला, कीं मुधोजीनें तहाच्या अटी पुण्यास पाठविल्या असतील व त्यांचा जबाब येईल. पण तसा कांहींच इशारा पुण्याहून येईना. येणार कसा! मुधोजीनें त्या अटी पाठ-विल्याच नव्हत्या. पण पुढें जेव्हां गॉडरास कळलें कीं हेस्टिंग्सनें भोसल्यांच्या मार्फत पुण्यास तहाचा संदर्भ चालविला आहे, तेव्हां खंडाळ्याहूनच त्यानें त्या अटींची एक नक्कल नानाकडे पाठविली आणि लिहिलें, कीं या अटी पूर्वींच तुमच्या-

कडे मुधोजीकडून आल्या असतील. नानानें त्या अटी वाचून गॉडर्डास साफ कळविलें, कीं हैदरास वगळून इंग्रजांशीं तहाची वाटाघाट करण्यास आपण बिलकूल तयार नाहीं. माळव्यांत महादजी लढत होता, त्याची सुद्धां हीच भावना होती. गुजरातच्या सरहद्दीवर माधवराव रामचंद्र कानडे दहाहजार फौजेनिशीं दादा व गायकवाड यांस चापून दहशत घालीत होता.

गॉडर्ड खंडाळयास तळ देऊन बसला असतां ता. ५ मार्चचें नाना फडणिसाचें पत्र त्यास आलें, त्यांत असा आशय होता, कीं 'मुधोजीचे मार्फत हेस्टिंग्सनीं तहाचीं कलमें आमच्याकडे पाठविल्याचें तुम्ही लिहितां, पण त्यांजकडून आमच्याकडे कांहींच संदर्भ आलेला नाहीं. तुमचे पत्रासोबत मात्र जी नक्कल आहे तिचा आशय पाहतां त्या अटी आमचे इभ्रतीस शोभण्यासारख्या नाहींत. मुधोजी भोसलेही आम्हांस लिहितात, कीं 'कलकत्त्याहून तहाचीं कलमें आलीं आहेत, पण तीं आम्हांसच मान्य नसल्यामुळें आपल्याकडे पाठविण्याचें प्रयोजन नाहीं.' नाना पुढें म्हणतो, 'वास्तविक पाहतां इंग्रजांशीं युद्ध चालविण्याची आम्हांस बिलकूल इच्छा नाहीं, उलट आम्ही त्यांची दोस्तीच चहातों. युद्धाची आगळिक प्रथम कोणीं केली हें तुम्ही जाणतां, आम्ही सांगण्याची जरूर नाहीं. याहून जास्त काय लिहावें!'
तिकडून सेनापति सर आयर कूटनें ता. १-३-१७८१ रोजीं गाडर्डास खरमरीत पत्र लिहिलें तें असें. 'वसई काबीज केल्याबद्दल जरी तुमचें अभिनंदन केलें पाहिजे, तरी हैदरानें मद्रासेकडे प्रळय उडवून दिल्यामुळें, हिंदुस्थानांतील कंपनीच्या तमाम मुलखास प्रचंड धोका पोंचून इंग्रजांवर कठिण प्रसंग गुदरला आहे. अशा स्थितींत तुम्ही तिकडे पुणेकरांशीं मिटतें घेऊन मराठ्यांशीं कशाही अटींवर तह करून, मुंबईची मदत मद्रासेकडे पाठवाल, तरच इकडील तरणोपाय आहे. हें आम्ही तुम्हांस वारंवार कळवीत असतां, तुम्ही मराठ्यांशीं तहाचा प्रयत्न सुद्धां करीत नाहीं, हें पाहून मी अत्यंत निराश झालों आहें. कलकत्त्याच्या वरिष्ठ अधिकाऱ्यांचे हुकूम सुद्धां तुम्ही मानीत नाहीं, याजबद्दल खेद व आश्चर्य वाटतें. प्रत्यक्ष माझा सेनापतीचा हुकूम तोडल्याचा गुन्हा तुम्हीं केला आहे. मराठ्यांशीं लढण्यांत आपल्या राष्ट्राचा बिलकूल फायदा नाहीं. उलट सर्वस्वाचा नाश त्यांत आहे. म्हणून माझा तुम्हांस असा स्पष्ट इशारा आहे कीं, आपला राजा, आपलें राष्ट्र व आपले

धनी कंपनी, यांच्या हिताची तुम्हांस चाड असेल, तर हरतऱ्हेचा प्रयत्न करून मराठयांशीं तह घडवून आणणें हें तुमचें पहिलें कर्तव्य आहे. मुंबईची फौज इकडे उत्तरेकडून हैदराचे प्रांतावर चाल करून आल्याशिवाय मद्रासला बसलेली त्याची गगरमिठी सुटणार नाहीं. थोडयाशा फौजेनें मी येथें कसाबसा जीव धरून आहें. सर्व बाजूंनीं आमची कुचंबणा आहे. इंग्रज मराठयांचा सल्ला होऊं नये म्हणून हैदर नानाप्रकारें खटपट करीत आहे. हें सर्व ध्यानांत घेऊन तुम्ही लगोलग मराठयांशीं तह घडवून आणावा, असें आमचें तुम्हांस आग्रहाचें सांगणें आहे.'

हें पत्र दाखल झालें तेव्हां गॉडर्ड बोरघांटाखालीं साफ चेंगरला जात होता. ती त्याची दुर्दशा हेस्टिंग्सला कळली; आणि पुढें आतां चढाईची आशा सर्व सोडून कांहीं काळ पावेतों मुंबईकल्याणचा प्रदेश सांभाळीत केवळ बचावानें राहवयाचें, असा आपला पुढील बेत मुंबईकर व गॉडर्ड यांनीं कलकत्त्यास लिहून पाठविला, तेव्हां तर हेस्टिंग्सची तहाची उत्सुकता अतोनात वाढली. गॉडर्डाचे किंवा भोसल्याचे हातून पुणें दरबाराशीं समेट होईना, तेव्हां हेस्टिंग्स अगदीं रडकुंडीस आला; आणि पुनरपि मुधोजीस मध्यस्थी करण्याची गळ घालून, आपण स्वतः स. १७८१ च्या पावसाळ्यांत महादजीच्या सांनिध्यांत बनारसला गेला. मनांत दोन तीन डाव त्यानें योजले होत. खर्चासाठीं चेतसिंगाकडून पैसे काढावे आणि शक्य त्या प्रयत्नानें महादजीसच वश करून घ्यावें. त्याला माहीत होतें कीं, भोसल्यांचा दिवाकरपंत ही एक प्रचंड शक्ति आहे, त्याच्याशिवाय नागपुरांत पान हालत नाहीं, त्याच्याच तंत्रानें मुधोजी सर्वस्वी वागतो. यापूर्वीं दिवाकरपंतानें नानांस साह्य करून हेस्टिंग्सचे अनेक व्यूह मोडून काढिले होते, तेव्हां दिवाकरपंतासच काशी येथें भेटीस बोलावून त्याचे मार्फत पुढील राजकारण हेस्टिंग्सनें ठरविलें; आणि त्यास आपल्या भेटीस बनारसला बोलाविलें. त्याजला सर्व गोष्टी पढवून पुण्यास नानाकडे पाठवावें, आणि सलूख करावा अशी त्याची अपेक्षा होती. 'द्रव्येण सर्वे वशाः' हा मंत्र हेस्टिंग्सला पाठ असून दिवाकरपंत अगर महादजी यांना खूष करण्यासाठीं द्रव्य पाहिजे होतें, तें चेतसिंगाकडून उपटण्याच्या प्रयत्नांत पुढें निराळाच प्रसंग हेस्टिंग्सवर गुदरला. अयोध्येच्या बेगमांकडूनही पैसे उपटण्याचें प्रयोजन त्यास या युद्धामुळें प्राप्त

झालें. या सर्व उलाढालींत हेस्टिंग्सचा जहांबाजपणा व संकटास तोंड देण्याची हिंमत चांगली व्यक्त होते. हेस्टिंग्सला मुधोजीकडून ता. ११-६-१७८१ चा जबाब आला, कीं दिवाकरपंतास तुमचे भेटीस पाठवितों. यानंतर लवकरच म्हणजे ऑगस्टांत दिवाकरपंत वारल्याचें वर्तमान मुधोजीनें हेस्टिंग्सला कळविलें, तेव्हां त्याची मोठी निराशा झाली.

इकडे याच पावसाळ्यांत म्यूर व महादजी माळव्यांत सिप्रीजवळ छावणी करून एकमेकांवर टेहळणी ठेवीत लढाईच्या पवित्र्यानें राहिले होते. दिवाकरपंत वारल्यामुळें म्यूरच्या मार्फत खडा टाकून महादजीचा ठाव हेस्टिंग्सनें घेतला. महादजी सुद्धां लढाईस कंटाळलाच होता. सहा वर्षे तो सारखा मोहिमशीर होता. म्यूरनें हलकेच डाव टाकून महादजीस चांचपून पाहिलें, आणि तितकी अनुकूलता दिसतांच दोघांनीं केवळ आपापल्यापुरता संग्राम थांबविण्याचा खालील तह ता. १३-१०-१७८१ रोजीं ठरविला.

१ उभयतांनीं कायम दोस्ती राखून करार पाळावे.

२ तह कायम झाल्यापासून आठ दिवसांचे आंत उभयतांनीं आपापले ठिकाणीं म्हणजे म्यूरनें यमुनेपार व महादजीनें उज्जनीस निघून जावें.

३ महाराजा महादजींनीं इंग्रज पेशव्यांचा व इंग्रज हैदरांचा तह घडवून आणण्याची खटपट करावी. असा तह न घडून आल्यास महादजीनें तटस्थ राहवें, कोणत्याही पक्षास मदत करूं नये.

४ यमुनेच्या दक्षिणेस इंग्रजांनीं महादजीचा मुलूख जिंकला असेल तो परत द्यावा; आणि इंग्रजांचे दोस्तींत असलेले गोहदकर राणा छत्रसिंह आणि नरवर व चंदेरीचे राजे यांचा महादजीनें सांभाळ करावा, उच्छेद करूं नये.

याप्रमाणें तह ठरून एका अर्थानें महादजी चाललेल्या युद्धांतून बाहेर फुटला.

**२. चेतसिंगाचा महादजीकडून पुरस्कार** ( डिसेंबर १७८१ ).— युद्ध मिटविण्याकरितां म्हणून हेस्टिंग्स काशीस आला, तेव्हां चेतसिंगाशीं त्याचा बेबनाव होऊन आणखी एक लढाई उपस्थित झाली, तींत पराभव पावून चेतसिंग पळून माळव्यांत महादजीकडे आला, तेणेंकरून पुनः तह

बिघडण्याची वेळ आली, तो प्रकार असा. चेतसिंगाचा संबंध मराठी राजकारणाशीं असून त्याचे वंशास सिंदेशाहींत अद्यापि जहागीर मिळते ही गोष्ट फारशी कोणास माहीत नाहीं. बनारसच्या या राजवंशाचा उगम मोगलांच्या उत्तरावस्थेंत झाला. मनसाराम नांवाचा एक गौतमी भूम्यार ब्राह्मण सादतखान नबाबाचे वेळेस अंगच्या हुशारीनें प्रसिद्धीस आला. रुस्तुमअली नांवाचा सादतखानाचा हस्तक बनारसचे कारभारावर होता, त्याचे वशिल्यानें मनसारामानें बनारस येथें आपला जम बसविला; आणि सन १७३८ त जोनपुर, चुनार व बनारस या परगण्यांची जागीर मुलगा बळवंतसिंग याचे नांवानें बादशहापासून संपादन केली. त्याच वेळीं बळवंतसिंगास राजा बहादूर हा किताब मिळाला. मनसाराम स. १७३९ त मरण पावल्यावर बळवंतसिंगानें बनारसजवळ गंगापुर येथें आपलें ठाणें केलें; आणि भागीरथीच्या दक्षिण कांठावर ठिकठिकाणीं किल्ले व गढ्या बांधून आपली मजबुदी केली. अशा रीतीनें स. १७५४ त बनारसची जागीर त्याचे नांवानें स्वतंत्र झाली; त्या वेळीं तिचें उत्पन्न ३५ लाख होतें. स. १७६३ त बादशहा व शुजाउद्दौला यांनीं बंगाल प्रांतावर स्वारी केली, तींत बळवंतसिंग त्यांस सामील झाला; परंतु बक्सारचे लढाईत बादशहाचा पराभव झाल्यावर बळवंतसिंगानें इंग्रजांचा आश्रय करून त्यांजकडून जागिरीची सनद घेतली. पुढें बळवंतसिंग स. १७७० त मरण पावला आणि त्याचा मुलगा चेतसिंग जागिरीचा कारभार पाहूं लागला. बंगाल प्रांत हस्तगत केल्यावर पुढें अयोध्या प्रांतांत शिरकाव करतांना इंग्रजांस या बनारसच्या राजांचें चांगलें साह्य झालें; आणि स. १७७५ च्या तहानें वजिराचे ताब्यांतून चेतसिंगास काढून हेस्टिंग्सनें त्यास इंग्रजांचा ताबेदार बनविलें. पुढें हेस्टिंग्स त्याजकडून बेसुमार पैसा उकळूं लागल्यामुळें उभयतांचा कज्जा होऊन चेतसिंगास त्यानें कैद केल्यावर युद्ध झालें. त्यांत पराभव पावून चेतसिंग ता. १४-१२-१७८१ रोजीं ग्वालेरजवळ महादजीचे आश्रयास आला. परंतु मराठ्यांची सत्ता उत्तरोत्तर खालावत गेल्यामुळें त्यांजकडून इंग्रजांचा पाडाव करण्याइतका पाठिंबा चेतसिंगास मिळाला नाहीं. इकडे इंग्रजांनीं बळवंतसिंगाच्या मुलीचा मुलगा महीप-नारायण यास गादीवर बसवून जागिरीचा कारभार चालविला. महीप नारायण स. १७९५ त मरण पावल्यावर त्याचा मुलगा उदित नारायण गादीवर असतां मराठ्यांचें राज्य संपलें. चेतसिंगास

सिंद्यांनीं मात्र कधीं अंतर दिलें नाहीं. महादजी व दौलतराव यांचे आश्रयाखालीं राहत असतां चेतसिंग स. १८१० त ग्वालेर येथें मरण पावला. पेशव्यांशीं चेतसिंगाचा आरंभापासून घरोबा असून ता. ६-१०-१७७६ रोजीं त्यानें सवाई माधवरावास पोषाख पाठविल्याचाउल्लेख आहे. (स. मा. रो. ५९२.)

चेतसिंगानें काशी सोडून इंग्रजांशीं लढाई केली, तेव्हां त्यानें आपल्याबरोबर सहोदर बंधु सुजनसिंग, मुंगारसिंग नांवाचा दत्तक बंधु, आणि बळवंतसिंगाची विधवा राणी गुलाबकुवर व तिचा जांवई दुर्विजयसिंग अशी मंडळी घेतली होती, त्यांस विजयगडावर पाठवून आपण लढाईवर गेला. पुढें पराभव पावल्यावर तो प्रथम रेवामुकुंदपुरास व तेथून बुंदेलखंडांत पळून गेला. त्याचे मागोमाग हेस्टिंग्सनें विजयगडावर फौज पाठवून गुलाबकुवर, तिचा जांवई व जांवयाचा मुलगा महीप नारायण यांस पकडून आणिलें, आणि चेतसिंगास पदच्युत केल्याचा जाहीरनामा लावून ता.३० सेप्टेंबर १७८१ (आश्विन शु.१३) रोजीं महीप नारायण यास काशीचे राज्यावर बसविलें, आणि तो अल्पवयी असल्यामुळें त्याचे बापास कारभारी नेमिलें. येणेंकरून 'दीड महिन्याच्या अवधींत सबंध काशी प्रांत, जो चेतसिंगाचे बंडाव्यानें त्याचे हातचा गेलाच होता, तो मी ब्रिटिश राज्यास पैदा करून दिला,' अशी प्रौढी हेस्टिंग्सनें कलकत्त्यास लिहून कळविली.

ता. २७-११-१७८१ रोजीं नाना फडणीस महादजीस लिहितो, 'चेतसिंग राजा पांच हजार फौज व पन्नास हत्ती खजिना घेऊन बिजेगडास§ कुटुंब ठेवून रेवामुकुंदपुरास $ आला. तेथून निकडीचीं पत्रें आपणांस पाठविलीं. राजाचें मत फिरोन जमाव करून इंग्रजांवर जावें. आपल्याकडे वकील रवाना केला तो आल्यावर कांहीं पैक्याची तोड पडल्यास त्या प्रांतीं जावें असा विचार दिसतो, म्हणोन विस्तारें लिहिलें तें कळलें. त्यास मीर्झा अमानी वजीर इंग्रजांस मिळाला आणि फौजेंत फितूर झाल्यामुळें राजा हलका झाला, म्हणोन निघाला,परंतु हिंमत आहे. अशा समयीं त्याची कुमक करून इंग्रजांचें पारिपत्य करावें. पैक्यावरच दृष्टि ठेवूं नये. मसलतीवर नजर ठेवून करावें. समय आहे.'

§ काशीचे द०, जि० मीर्झापुर, रोठसगडाचे पश्चिमेस. $ रेवामुकुंदपुरचे ऐवजीं अघोरीखास असें फॉरेस्टमध्यें आहे. ( Forrest Imp. Series Vol. 3 ); का. सं. प. या. ४६४, २९४; ऐ. टि. ५-१०.

हिंदी एकीकरणाचे जितके म्हणून धागे आपल्या कबजांत ठेवणें शक्य होतें तितके नानानें सांभाळिले होते. गाजीउद्दिनास त्यानें काल्पीस जहागीर देऊन पोसलें, शहा आलमच्या मुलास पुण्यास ठेवून घेतलें; आणि पन्नाचा हिंदुपद व बनारसचा चेतसिंग यांस त्यानें आश्रय दिला. हिंदुपदपातशाहीचें सार्वभौम ध्येय राज्यचालकांचे दृष्टीपुढें जागृत होतें, असें यावरून दिसतें. महादजीनें चेतसिंगास झांशीजवळ पांच लक्षांची जागीर नेमून दिली, असें सदाशिव दिनकरानें जून १७८५ त पुणें येथें नाना फडणिसास लिहून कळविलें. ही जागीर स. १८१० पावेतों चेतसिंगास पावून ती त्याच्या मृत्यूनंतर बंद झाली. त्याचा भाचा महीप नारायण यास हेस्टिंग्सनें बनारसचें राज्य दिलें तें त्याच्या वंशाकडे चालू आहे. पण चेतसिंगाची बायको व तिचा मुलगा बलचंद्रसिंह सिंद्याचे आश्रयास राहिले, त्यामुळें इंग्रजांची त्यांजवर इतराजीच होती. पुढें बलचंद्रसिंहानें दौलतराव सिंद्याकडे अर्ज करून कांहीं थोडी जागीर आपल्या नांवानें ता. ११-१-१८१२ रोजीं करून घेतली, ती अद्यापि ग्वाल्हेर राज्यांत 'काशी नरेश' या नांवानें चालत असून, ती हिंदु रजवाड्यासंबंधानें मराठ्यांचा आदर अद्यापि व्यक्त करीत आहे.

## चेतसिंगाची वंशावळ

मनसाराम मृ. १७३९
|
बळवंतसिंग मृ. १७७०
१ राणी ली | २ री राणी गुलाबकुवर

| १ राणी ली | | २ री राणी गुलाबकुवर | |
|---|---|---|---|
| मुंगरासिंग | चेतसिंग मृ. १८१० | सुजनसिंग | मुलगी=ल. दुर्विजयसिंग |
| | बलचंद्रसिंग ( ग्वालेर येथें ). | | महीप नारायण ( वंश विद्यमान काशी येथें ) |
| | राजा चक्रसिंग | | |
| | बलभद्रसिंग | | |
| | राजा चिंतामणसिंग ( विद्यमान १९२९ ) | | |

**३. तहाच्या पूर्वगामी वाटाघाटी.**—तहाची वाटाघाट ऑगस्टांत सुरू झाली. ता.१६-८-१७८१ रोजीं सदाशिव दिनकर नानास लिहितो. 'शेसई-

च्या इंग्रजांकडून फोर्डसाहेब व मुनसी पाटीलबावांकडे आल्याचें वर्तमान पूर्वी विनविलेंच आहे. इंग्रजानें सहा कलमांची याद लिहून आणिली होती. कलकत्तेकराचें पत्र क. म्यूर यास आलें होतें, कीं तुमचा व पाटीलबावांचा सलुखाचा जाबसाल लागला आहे, उत्तम आहे. तुम्ही मुखत्यार आहां, जें कराल तें आम्हांस मान्य आहे.' तेंच पत्र मोहोरेनिशीं ब[illegible]स पाटीलबावांस दाखविलें. पाटीलबावांनीं सांगितलें, 'तळेगांवचा करार मोडून तुम्हीं सरकारच्या जागा घेतल्या, त्या साष्टीसुद्धां सोडून द्या, म्हणजे मग आम्ही तुमचा पुणेकरांशीं सलूख करितों.' त्यावर म्यूर बोलला, 'हा अखत्यार हेस्टिंग्सचा. त्यास लिहून उत्तर आणतों.' इतर कलमांचीं उत्तरें पाटीलबावांनीं योग्य तीं दिलीं. गोहदकरांस उपद्रव देऊं नये असें इंग्रजांचें एक कलम होतें. महादजी बोलला, आम्ही होऊन त्यांसीं वांकडे करणार नाहीं. त्यानें अंतर केल्यास ते व आम्ही समजोन घेऊं. इंग्रजांशीं सुद्धां गोहदकर विश्वासघातानेंच वागत होता. ता. १३-९-१७८१ रोजीं महादजीचा मुक्काम नरवरजवळ बुढा डोंगर येथें होता.

वरील तहाची नक्कल म्यूरनें ताबडतोब हेस्टिंग्सला बनारस येथें व गॉडर्डास मुंबईस पाठविली. महादजीशीं तह झाला, मोठा प्रतिस्पर्धी ठिकाणीं बसला, ही बातमी हेस्टिंग्सच्या ऐन संकटांत बनारस येथें पोंचून, आज आपणास प्रत्यक्ष परमेश्वरानेंच साह्य करून मोठ्या अडचणींतून सोडविलें असें त्यास वाटलें; आणि म्यूरच्या शहाणपणाची तारीफ किती करूं, असें त्यास होऊन गेलें. ता. २०-१०-८१ चे पत्रांत म्यूरनें हेस्टिंग्सला कळविलें, कीं 'कराराप्रमाणें उद्यां मी आपला मुक्काम हालवून इटाव्याजवळ यमुनापार जाणार. फौजेनें पुढें कोठें जावयाचें त्याचा हुकूम यावा.' लगोलग हेस्टिंग्सनें तहाची बातमी कलकत्त्यास व युरोपास कळविली. मोठ्या युक्तीनें हेस्टिंग्सनें मराठमंडळांतून महादजीला अलग केलें. एक गोष्ट उघड होती, कीं आतां पुढें युद्ध चालविण्यापासून कोणासच फायदा नव्हता. इंग्रजांची तर अब्रू बचावून माघार घेण्याची पूर्ण तयारी झाली होती. इतकीं वर्षें सारखा लढून महादजी अगदीं कंटाळला होता; आणि त्यानें तरी स्वतंत्र तह इतक्याच पुरता केला, कीं युध्यमान परिस्थितींतून सुटून पुढें आपण मुख्य तह घडवून आणण्यास उपयोगी व्हावें. स्वतः इंग्रजांकडून कांहीं स्वार्थ साधून त्यानें तह केला असें बिलकूल नाहीं. शिवाय दोन महिने चाललेली वाटाघाट तो पुण्यास नानास

सारखी कळवीत होता. नानानें या स्वतंत्र तहाबद्दल वैषम्य मानल्याचा उल्लेख आढळत नाहीं. बहुधा महादजीचा डाव त्यास पसंतच पडला असें का. सं. प. या. २९४ वरून दिसतें. तथापि 'इंग्रजांचीं पलटणें हेस्टिंग्स यास जाऊन मिळाल्यावर पुढें मसलत भारी पडेल, केवळ कोलारस सिप्रींत ठाणीं बसलीं याचा संतोष मानूं नये, चेतसिंग हिंमत धरून पाटीलबावांकडे येत आहे तर त्याची कुमक करून इंग्रजांचें पारिपत्य करावें, पैक्यावर दृष्टि न ठेवतां मसलतीवर ठेवावी,' असा इशारा नानानें ता. २७-११-१७८१ रोजीं महादजीस दिला. इकडे म्यूरनें केलेला तह तंतोतंत पाळावा असे हुकूम हेस्टिंग्सनें आपलया अधिकाऱ्यांस ठिकठिकाणीं पाठविले.

हैदराच्या उपसर्गानें मद्रासकर इंग्रज तर अतिशय टेकीस आले होते. फ्रान्सहून सफ्रां हा नामांकित फ्रेंच नाविक मोठें आरमार घेऊन इकडे येत होता. वृद्ध कूट तर हैदरापुढें अगदीं नाउमेद झाला. मद्रासेस लॉर्ड मॅकार्टने हा नवीन गव्हर्नर इंग्लंडहून जून १७८१ त कारभारावर आला, त्याजबरोबर जॉन मॅक्फर्सन हा एक कलकत्त्याच्या कौन्सिलचा नवीन मेंबर फ्रॅन्सिसच्या जागीं आला. त्यास डायरेक्टरांचे खास हुकूम होते, कीं पुणें दरबाराशीं लगोलग तह करून मराठ्यांचें युद्ध थांबवावें. मद्रासेस त्या वेळीं इंग्रज नौकापति एँ. ह्युइज होता. मिळून हा ह्युइज, सेनापति कूट, तेथील गव्हर्नर मॅकार्टने व कौन्सिल मेंबर मॅक्फर्सन या चौघांनीं मद्रासेस एकत्र खलबत करून, हेस्टिंग्सला कळविल्याशिवाय, पुण्यास ११-९-१७८१ रोजीं खालील आशयाचें पत्र पेशव्यास आपल्याच सह्यांनीं लिहिलें.

'इंग्रज बादशहाची व कंपनीची पेशवेसरकाराशीं कायम दोस्तीचा तह करण्याची उत्कट इच्छा आहे. हिंदुस्थानांत जास्त प्रदेश जिंकण्याची त्यांस बिलकूल इच्छा नसून, सर्वांशीं गोडीनें वागण्याचाच त्यांचा निर्धार आहे. खुद्द रघुनाथरावांचे वकील इंग्लंडांत जाऊन त्यांनीं पुष्कळ फायद्याची आशा दाखविली असतांही त्यांचें मागणें इंग्लंडचे सरकारानें मान्य केलें नाहीं. आम्ही चौघे आमच्या सरकाराची ही इच्छा या पत्रानें आपणांस कळवीत आहों; आणि हाच मजकूर अर्काटकर नबाबही आमचेतर्फे आपणांस लिहीत आहेत. आम्हांस इंग्लंडच्या सरकाराचे असे हुकूम आहेत, कीं तुमचे सरकाराशीं कायम दोस्तीचा तह आम्हीं ठरवावा, तो पार्लमेंट व बादशहा मान्य कर-

तील; हिंदुस्थानांत कोणतेही इंग्रज अधिकारी तो तह मोडूं शकणार नाहींत. आमच्या या उद्देशाची खात्री पटण्यासाठीं आम्ही सर्व ठिकाणच्या फौजांस युद्ध थांबविण्याचे हुकूम यासोबत पाठवीत आहों; आणि आपणही तसेच हुकूम आपल्या ठिकठिकाणच्या फौजांस पाठवाल अशी आम्हांस उमेद आहे. अशा तहासंबंधीं आपल्या ज्या कांहीं अटी असतील त्या आपण ताबडतोब ग० ज० यांस कलकत्त्यास लिहून कळवाव्या. या गोष्टी परमेश्वरास स्मरून अत्यंत पवित्र अंतःकरणानें व इंग्लंडचे राजाचे व पार्लमेंटाचे नांवानें आम्ही आपणांस कळवीत आहों. इतक्याउपर आपण आग्रहानें युद्धच चालू ठेवाल तर त्याची जबाबदारी आपल्यावर राहील.' असेंच पत्र अर्काटच्या नबाबाचेंही पुण्यास आलें. ( ऐ. टि. ३-४३ ).

अशा प्रकारचें पत्र परभारें या चौघां प्रतिष्ठित अधिकाऱ्यांनीं पुण्यास लिहिलें, आणि हिंदुस्थानांत सार्वभौमत्व स्थापण्याची आपली हाव समूळ त्यांनीं सोडून दिली, ही गोष्ट मुंबईस किंवा कलकत्त्यास बिलकूल इंग्रजास आवडली नाहीं, तरी पण त्याविरुद्ध ब्र काढण्याचीही कोणाची छाती झाली नाहीं. इतक्या दिवसांचा इंग्रजांचा खटाटोप व खर्च सर्व फुकट गेला. मुंबईसही या चौघांचें पत्र जाऊन तेथील अधिकाऱ्यांनीं गॉडर्डास अधिकार देऊन पुणें दरबाराशीं तह ठरविण्याची कामगिरी सांगितली; आणि तसा जबाब त्यांनीं त्या चौघां अधिकाऱ्यांस मद्रासेस पाठविला ( १३-१२-१७८१ ). गॉडर्डानें प्रथम पुण्यास पत्र लिहून तह ठरविण्यासाठीं मी आपला भरंवशाचा गृहस्थ बोलाचालीस पाठवितों, त्याजला आपला परवाना यावा, अशी मागणी केली. त्यावर २५ डिसेंबरचें नानाचें उत्तर गॉडर्डास गेलें, कीं 'हैदरखानाची व आमची पक्की दोस्ती असल्यामुळें त्यांस वगळून इंग्रजांशीं आम्ही एकट्यांनीं तह करणें शक्य नाहीं. हैदरखानाची तशी कबुली आणून आम्हांस कळवावी, म्हणजे आम्ही बोलणें करण्यास सिद्ध आहों.'

इकडे वॉरन हेस्टिंग्सनें सिंद्याचे मार्फत पुणें दरबाराशीं तह ठरविण्याचा निश्चय करून त्यासाठीं डेव्हिड अंडर्सन यास संपूर्ण अधिकार देऊन सिंद्याकडे जाण्याचा हुकूम केला आणि तारीख ४-११-८१ च्या पत्रानें मुंबईच्या गव्हर्नरास व गॉडर्डास लिहून कळविलें कीं मराठ्यांशीं कोणत्याही ठिकाणीं युद्ध चालवूं नये, चाललेलें युद्ध बंद करावें. 'एक वकील इंद्रसेन

मातबर अंग्रेज यांस बडेसाहेबांनीं इटाव्यास रवाना केलें. पौष कृष्ण १३ स (१४-१२-१७८१) राजे चेतासिंग महादजीजवळ गेले. सिंद्यांनीं आपला दिवाण २ कोस पुढें पाठवून बहुत सन्मानें करून चेतसिंगाची भेट घेतली; लष्कराजवळ राहवून घेतलें. बडेसाहेबांनीं हें ऐकून इंद्रसेनास लिहिलें कीं तुम्ही सिंदे यांसीं भेटावें. त्यावरून ३० डिसेंबर रोजीं खबर आली कीं, इंद्रसेन इटाव्याहून कूच करून २३ डिसेंबर रोजीं सिंद्यांस भेटले.' इकडे बडेसाहेबानें वेणीरामपंतास व विश्वंभरपंतास एक लक्ष रुपये इनाम व पंचवीस हजारांची जहागीर देऊन नागपुरास भोसल्याजवळ रवाना केलें, कीं आपण श्रीमंतांशीं सल्ला करून द्यावा. विश्वंभरपंताबरोबर कर्नल चापमन नागपुरास पाठविले आहेत. वेणीरामपंतानें चेतसिंगाचे बंडांत हेस्टिंग्सचा जीव वांचविला. पण पुढें चेतसिंग पळून महादजीकडे गेला, तेव्हां हेस्टिंग्सचें धाबें अतिशय दणाणलें. तह झाला नाहीं तर सर्व बंगाल प्रांत हातचा जाण्याचा योग आला होता. सदाशिव दिनकर लिहितो, 'काशीच्या राजाची तोड निघेल तशी काढून लिहावें म्हणोन लिहिलें, त्यास इंद्रसेन प्रथम आला ते समयींच त्यानें बोलणें लाविलें, कीं राजास तुम्ही लष्करांतून काढून द्या, म्हणजे आम्ही भेटीस येऊं. त्यावरोन बावांनीं इंद्रसेनास सांगून पाठविलें कीं, तुम्हांस येणें तरी यावें, नाहीं तरी न यावें. परंतु जो कोणी आम्हापाशीं आला, त्यास आम्ही काढून कसा देऊं; आणि अशी कोठें रीत नाहीं. त्यावर इंद्रसेन येऊन भेटल्यानंतर पहिलें बोलणें याविशींच जाहलें, कीं तुमची आमची दोस्तीच जहाली तर मग दोस्तीच्या पोटीं तुमच्या आमच्या विचारें घडेल तसें करावयास येईल. कदाचित् तुमचा आमचा तह न जाला, तरी राजा आमचा आम्हांपाशीं आहे तसा आहे.' सारांश, कलकत्ता, मद्रास, मुंबई इत्यादि सर्व ठिकाणांच्या इंग्रजांकडून तहाचे संदर्भ पुण्यास आले. नाना, हैदर, महादजी या तिघांनीं आणखी जरा चढाई केली असती तर मराठे सांगतील त्या अटींवर तह करून इंग्रजांस आपला निभाव करून घ्यावा लागला असता. महादजीनें एकट्यानेंच स्वतंत्र तह केल्यानें इंग्रजांची बाजू पुष्कळच बचावली.

या वेळीं म्हणजे स.१७८१ अखेर निरनिराळ्या पक्षांची परिस्थिति खालील पत्रांत दिसून येते. ता. २ जानेवारी १७८२ च्या पत्रांत नानानें महादजीस कळविलें कीं, 'गॉडरानें कल्याणजवळ युद्धाची तयारी केली. तसेंच मुंबई-

करानें सावकारांच्या महागिऱ्या धरून गलबतावरील लढाईची तयारी केली आहे. बारीक रीतीनें ऐकण्यांत येतें, कीं गॉडरानें घांटाकडे येऊन फौजेचा शह धरावा, मुंबईवाल्यांनीं रेवदंड्यावर जावें, असा घाट आहे. त्यास आम्ही सखाराम पानसे यास बोरघांटाकडे रवाना केलें. रंग दृष्टीस पडेल त्याप्रमाणें हरिपंतही जातील. होळकरांची खातरजमा करून रेवदंड्याचा उपराळा करावा, याप्रमाणें केलें आहे. फत्तेसिंग गायकवाड (इंग्रजांचे तर्फेनें) पांच सहा पलटणें जमा करून सुरतेपुढें आले. पुढें सोनगडावरून खानदेशांत येणार अशा बातम्या येतात. याजकरितां गणेशपंत बेहेरे यांजकडे आणखी फौज रवाना केली.' यावर महादजीनें नानास जबाब पाठविला तो असा. 'इंग्रजांचीं पलटणें यमुनापार गेलीं. काशीचा राजा ता. १४-१२-१७८१ रोजीं येऊन भेटला. आम्ही रणोदहून कूच करून दतियानजीक आलों. इंग्रज पलटणांचे मार्गे आमच्या फौजा दरकूच येतात असें इष्टिनास कळतांच, त्यानें सारीं पलटणें कानपुरीं जमा केलीं, आणि सलुखाचे जाबसालास इंद्रसेनास मुखत्यार नेमून रवाना केला तो ता. २३ डिसेंबर रोजीं येऊन भेटला. तीन चार बैठकी होऊन बोलणीं जालीं. इंद्रसेन आल्यावर दतियाकडून कूच केलें. गोहदकराचे मुलुखांतून इटाव्याचे सुमारें जाण्याचा विचार करून इकडे गोहदजवळ अठरा कोशांवर आलों. सरकारचे महाल खराब होतील म्हणून काल्पीकडे आलों नाहीं. शिवाय काल्पीकडे यमुनेस पायउतार नाहीं. गोहदकरानें ग्वाल्हेरकडील मुलूख दाबून इंग्रजांस सामील जाला, त्याचें पारिपत्य जातांना करावें म्हणून चार पांच गढ्या घेतल्या. बंदोबस्त करून पुढें जात आहों. यमुनातीरीं गेल्यावर अंतर्वेदींत उतरूं. (म्हणजे महादजी दतियाहून ईशान्येस काल्पीकडे न जातां उत्तरेस जाठास नरम करून इटाव्याजवळ यमुना उतरणार होता.) पातशहा व नजफखान अनुपगीर गोसाव्यास फौजसुद्धां इकडे रवाना करणार असें लिहून आलें आहे. राजकारणें सर्वांचीं आहेत. अंमलांत येतील तीं खरीं.' ता. ४ नोव्हेंबर १७८१ रोजीं हेस्टिंग्सनें अंडरसनास तहाची लेखी समजूत दिली, त्यांत त्यानें असें कळविलें कीं, इटावा येथें क० म्यूर यास भेटून तुम्हीं पुढें जावें. म्यू यांस महादजीच्या धोरणाची चांगली माहिती आहे, ती तुमच्या उपयोगीं पडेल. महादजीला आम्ही स्वतःच भेटून सर्व गोष्टी ठरवाव्या अशी आमची इच्छा आहे. त्यासाठीं अलाहबाद किंवा कान-

पुरपावेतों आम्ही येऊं. महादजींची मर्जी असल्यास त्यांनीं तेथें आमचे भेटीस यावें. फार तर इटाव्यापर्यंत आम्ही यमुनेवर येऊं.' यावरून समक्ष भेटींत आपले फायद्याचा तह महादजीकडून करून घेण्याचा हेस्टिंग्सचा उद्देश होता. हेस्टिंग्स ही व्यक्ति मोठी गुंड असून, मोठमोठ्या मी मी म्हणणारांस कोणत्या ना कोणत्या युक्तीनें कसें वळवून घ्यावें, व एखाद्यास आपल्या जाळ्यांत कसें ओढून आणावें हें तो उत्कृष्ट समजे. थोडा बहुत महादजी त्यास बळी पडला. वरील पत्रावरून अंतर्वेदींत इंग्रजांवर मोहीम करण्याचाच त्याचा प्रथम उद्देश होता. अंडरसनास तरी त्यानें तीन चार महिने वाटाघाटींत खूब नरम केलें. इंग्रजांशीं स्वतंत्र तह करून युद्ध तहकूब केलें असतां, महादजी पुनः मोहिमेच्या गोष्टी बोलूं लागला यावरून वाटतें, कीं सामदाम दोनही शस्त्रें तो जय्यत ठेवीत होता. केवळ इंग्रजांचे पचनीं पडला नव्हता. हेस्टिंग्स जुलई १७८१ पासून जानेवारी १७८२ पर्यंत बनारसचे बाजूस होता. युध्यमान परिस्थिती-संबंधानें भा. व. २ प. या. ५ हा कागद उपयुक्त आहे.*

स. १७८१ च्या ३ डिसेंबरपासून चांगली पांच महिने अंडर्सन व महादजी यांची वाटाघाट चालल्यावर १७ मे रोजीं तह कायम झाला. महादजी या वेळीं गोहदकर राण्यावर मोहीम चालवीत असल्यामुळें त्याचा मुक्काम चिन्होर, नूनकी सराई, सालबाई वगैरे ठिकाणीं झाल्याचा उल्लेख येतो. ता. २९-४-१७८२ रोजीं त्याचा मुक्काम सालबाईस असून, 'इंग्रजांनीं ग्वालेर किल्ला गोहदकर राण्यास दिला, तो परत घेण्यासाठीं थोरली मसलत पडली आहे,' असें तो लिहितो.

अंडर्सन येतांच त्याजपासून इंग्रजांच्या तहाच्या अटी घेऊन त्या रामजी पाटील व सदाशिव दिनकर यांजबरोबर महादजीनें पुण्यास नानाकडे रवाना केल्या. नानानें लगोलग त्यांवर आपले मुद्दे घालून मसुदे परत पाठविले ते घेऊन मार्चचे आरंभीं मंडळी परत महादजीकडे आली. ता. १५-४-१७८२ रोजीं नाना रामजी पाटलास विचारतो, 'तुम्ही निघोन लष्करांत गेल्यावर इंग्रजांचे

---

* ग्वा. ४. ४८; ३. ३६; २.२५२; जी. च. ले. ७, १२; ऐ. टि. ६.२५; प. द. म. व. पृ. ७१; का. सं. प. या. २५९, २८९, ३४२, ३१९, २१९, २८३. Forrest Imp and Mar. Series.

तह प्रकरणीं बोलणें होऊन पत्रें यावीं, तीं न आलीं म्हणून अपूर्व वाटलें. दादांस येथें आणून सरकारचे स्वाधीन करावें ही खातरजमा आहेच. नारो शिवदेव यांस परत पाठवावयाविशीं पाटीलबावांस लिहिलें आहे, त्याप्रमाणें करावें.'

चार प्रतिष्ठित इंग्रज अधिकाऱ्यांनीं मद्रासेहून स्वतः पत्रें तह करण्याविषयीं लिहिल्याबरोबर इंग्रजांची तहाची उत्कंठा अतिशय वाढली. त्यांतही चेतसिंग व उत्तरहिंदुस्थानांतील रजवाडे इंग्रजांवर उठल्यानें हेस्टिंग्स अतिशय घाबरा झाला. शिवाय फ्रेंच लोकांची मदत हैदरास आल्यानें त्यानेंही जास्त जोरानें इंग्रजांवर नेट बसविला. अशा स्थितींत मराठ्यांचें प्रकरण मिटविण्याची इंग्रजांस सर्वत्रच उतावीळ झाली. गॉडर्डनें कॅप्टन वॉदस्र्टन यास आपल्या तर्फेनें पुण्यास तहाची वाटाघाट करण्यास पाठविलें. म्हणजे जानेवारी स.१७८२त अंडरसन ग्वालेरजवळ महादजीशीं वाटाघाट करीत असतांच वॉदस्र्टन पुण्यास तेंच काम करीत होता. हा वॉदस्र्टन मुंबईस फारसी भाषाभिज्ञ असून पुण्याचीं फारसी मराठी पत्रें तोच मुंबईस समजून सांगे. परंतु दोन ठिकाणीं एकच वाटाघाट श्रेयस्कर नसल्यामुळें, हेस्टिंग्सकडून अंडरसन शिंद्याकडे गेल्याचें कळतांच मुंबईकरांनीं वॉदस्र्टनला परत बोलाविलें, पण नानानें त्यास लगेच परत जाऊं दिलें नाहीं. महादजीकडून अंडरसनच्या वाटाघाटीचीं बोलणीं काय येतात तीं पाहून मग तुम्हीं परत जावें,' असें त्यास नानानें १५-२-१७८२ रोजीं सांगितलें. या वेळीं हेस्टिंग्सकडून मि. चॅपमन हा आणखी एक गृहस्थ नागपुरकर भोसल्यांकडे असाच तह ठरविण्यास गेला होता. त्यावरून महादजी व अंडरसन या दोघांसही पुण्यास वाटाघाटीसाठीं बोलवावें असा नानाचा प्रथम विचार होता. हैदरकडून नानास वारंवार सूचना येत होती कीं, 'इंग्रजांशीं परभारें तह करूं नये; फ्रेंचांची मदत येत आहे. इंग्रजांचा कायमच पाडाव करूं.' हैदर निजाम वगैरे सर्वांस पुण्यास आणून त्यांच्या मार्फतीनें पक्का तह इंग्रजांशीं असा करावा, कीं पुनः कोणत्याही प्रश्नासंबंधानें भानगड राहूं नये, आणि त्या साठीं या सालींच पेशव्याचें लग्न ठरवून त्या निमित्तानें सर्व राजेरजवाडे एकत्र जमवावे, असा नानाचा विचार झाला. पण लग्नाचा बेत या उन्हाळ्यांत जमला नाहीं. हें लग्न पुढें एक वर्षानें १०-२-१७८३ रोजीं झालें. कॅ. बँक्स व मि. शॉ असे दोन इंग्रज स.१७७९च्या डिसेंबरांत पकडून ठेविलेले कैदेंत होते, त्यांस आतां सोडून देण्याचें नानानें

कबूल केलें, आणि इंग्रजांशीं निष्कृत्रिम स्नेह ठेवण्याची आपली इच्छा वॉद्स्टॅनला सांगून १२ मार्च १७८२ रोजीं त्यास पुण्याहून जाण्यास रजा दिली. जातांना वॉदस्टॅनच्या भलेपणाबद्दल शिफारसपत्रही नानानें गॉडर्डला पाठविलें. इतक्यांत महादजी व अंडर्सन पुण्यास येणार असा बेत होता, म्हणून वॉद्स्टॅननें पुण्यासच राहवें, असा हेस्टिंग्सनें हुकूम पाठविला. परंतु तो पोंचण्यापूर्वीच वॉदस्टॅन पुण्याहून निघून गेला होता.

ता. १६-४-१७८२ रोजीं नानानें महादजीस लिहिलें, 'उदष्टिन (Watherston) आला होता. त्यास इंद्रसेन आपल्याकडे आला आहे म्हणून सांगितलें आहे. त्यावरून त्याचे चित्तांतील आशय दिसला, कीं इंद्रसेन मुख्य हेष्टिनाकडून आला आहे, त्याचें करणें हेष्टिनास मान्य, त्याचे योग्यतेस गॉडर देखील पोंचत नाहीं. त्यास इंद्रसेनाची योग्यता आपण बोलतां त्या पक्षीं सरकारचे मुद्देमाफक हैदरखाना सुद्धां तह करून घ्यावा.' पुनः ता. ३-५ रोजीं नाना नारो शिवदेवास लिहितो. 'वसई, कोंकण, गुजरात वगैरे प्रांतींचा मुलूख देऊं, मात्र अमदाबादेविशीं फत्तेसिंगास आमचें वचन गेलें आहे तेवढें स्थळ त्यांजकडे ठेवावें, याप्रमाणें इंद्रसेन बोलतो; पण पाटीलबावा म्हणतात कीं ही गोष्ट घडावयाची नाहीं, म्हणोन लिहिलें, त्यास फत्तेसिंगाची वागणूक पाटीलबावांचे ध्यानांत आहेच. अंमदाबादेविशीं उत्तर केलें. सरकारचा सर्व मुलूख इंग्रजांपासून माघारा घ्यावा, अंमदाबादची ओढ त्यांनीं धरूं नये. परंतु हैदरखान सुद्धां तोड पडून तह ठरणें कठिण दिसतें. आपले मसलतीस हैदर सोबती झाला, तेव्हां त्यास सोडून सल्ला करणें ठीक नाहीं. पाटीलबावांकडून इंद्रसेनाशीं भवति न भवति होऊन कलमबंदीची याद आली, त्याचीं उत्तरें पाठविलीं आहेत. साष्टी खेरीज करून अप्टनाचे तहाप्रमाणें तह इंग्रज करणार, त्यास अप्टनाचे तहापेक्षां तळेगांवावरील तह चांगला. मुद्देमाफक हैदरखानासह पाटीलबावांनीं तह करून घ्यावा.'

**४. सालबाईच्या तहाचीं अव्वल अखेरचीं कलमें.**—वॉरन हेस्टिंग्सनें अंडर्सनला तहाच्या समजुती लिहून दिल्या त्यांत खालील मुद्दे होते.

१. मराठे व इंग्रज यांचा हैदराचे विरुद्ध बचावाचा व चढावाचा करार महादजीनें जुळवून द्यावा; असा करार शक्य नसल्यास निदान पुणें दर-

बाराशीं कायम दोस्ती व्हावी; त्यांत अहमदाबाद व गुजरातेंत फत्ते-सिंगास दिलेले मुलूख शिवाय करून बाकी सर्व जिंकलेले प्रदेश इंग्रजांनीं पेशव्यांस परत द्यावे.

१. रघुनाथरावास पुरेशी नेमणूक करून द्यावी.

१. निजाम, भोसले, फत्तेसिंग, गॉडर्ड वगैरे ज्यांच्यांशीं आमचे करार मदार झाले असतील त्यांस या तहानें बाध येऊं नये. मात्र गोहदचा राणा आमच्याशीं इमानानें वागत नाहीं, सबब त्यानें आपली व्यवस्था पाहिजे तशी लावून घ्यावी, आम्ही त्यास जबाबदार नाहीं.

१. साष्टी व दुसरीं लहान बेटें इंग्रजांकडे राहवीं. शक्यतों पावेतों वसई सुद्धां परत देऊं नये.

१. इंग्रजांशिवाय दुसऱ्या कोणत्याही युरोपियन राष्ट्रांस मराठ्यांनीं आश्रय देऊं नये.

१. विशेषतः सिंदे व होळकर यांचा स्नेहभाव शक्य तितका सांभाळावा.

हीं कलमें अंडर्सन घेऊन आल्यावर वाटाघाट सुरू झाली. फत्तेसिंग गायकवाडास अंमदाबाद देण्याचे मुद्यावर मोठीच अडचण उद्भवली. अंमदाबाद पेशव्यांची परत आली पाहिजे असा महादजीनें हट्ट धरिला. ता. ११-४-१७८२ रोजीं अंडरसननें हेस्टिंग्स यास कळविलें, कीं सिंदे अंतःकरणपूर्वक तह जुळविण्याची खटपट करीत असून आम्हीं नक्की केलेले मुद्दे पसंतीकरितां पुण्यास पाठवून ते परत आल्यावर मग कायम होतील. पेशव्यांकडील पहिल्या मागण्या ऐ. टि. २-४२ येथें नमूद आहेत.

ता. १८-१-१७८२ रोजीं आपाजीराम दाभोळकर सिंद्याचे लष्करांतून नानास लिहितो, 'इंग्रजांचा वकील इंद्रसेन सदाशिव मल्हार यांजबरोबर आला. हैदरखानाशिवाय आमचे इतर सर्व मुद्दे इंग्रज कबूल करीलसें दिसतें. काल पागे सरदार वगैरे मंडळीसहित पाटीलबावा इंग्रजांकडे मेजवानीस जाऊन वस्त्रें घेऊन आले. दुसरे दिवशीं इंद्रसेन बावांचे डेऱ्यास आला. कर्नल अप्टनच्या पुरंदरच्या तहाची नक्कल पाहिजे ती पुण्याहून लगोलग पाठवावी. साष्टी, वसई, कोंकणपट्टी, दरोबस्त गुजरात व अंतर्वेद दादासाहेब सुद्धां आमचे हवालीं करावे, हैदरखानास घेऊन तह करावा, व कै० रावसाहे-

बांच्या वेळीं चालत होतें तसें चालावें, अशा आमच्या अटी आम्ही इंद्रसेनास सांगितल्या. इंद्रसेन विचारतो, हैदरखानास घेऊन तह करावयाचा तर त्याचे मुद्दे काय ते तर सांगा. त्यावर पुण्यास पत्रें लिहून हैदरखानाचे मुद्दे मागवितों, असें सांगितलें. पाटीलबावांचे चित्तांत सरकार कामाची कळकळ दिसत नाहीं. बोलण्यांत गोष्टी बहुत, घडत एकही नाहीं. उभय पक्षीं ऐक्यतेचे भाव जांबगावच्या मुक्कामचे तेच अद्यापि आहेत. सरकारच्या नफानुकसानींत मन असावें ती गोष्ट दूरच आहे. यांच्या सोबतीस राहिल्यानें आम्हांकडे नाकर्तेपणा येईलसें दिसतें.' ता. १४-२-१७८२ रोजीं पाटीलबावानें कळविलें. 'येथें इंद्रसेन इष्टिनाकडून आला आहे, हा मातबर आहे. आमच्या बोलण्याची खातरजमा नसल्यास याजबराबर एखादा कारभारी देऊन पुण्यास रवानगी करून देऊं. हैदरखानाखेरीज सलुख केल्यास सरकारास धक्का आहे. हैदर सुद्धां तहाचें बोलणें न घडलें तर इंग्रजांस जरब दिल्याखेरीज मसलत होत नाहीं. जरबेचा प्रकार म्हणजे दोन मसलती, एक बंगाल व एक अंतर्वेद. अंतर्वेदींतील सूत्रें आलीं आहेत. हैदरखानाकडे नानांनीं बंगाल्याचे मसलतीस ऐवजाविशीं बोलणें लाविलें आहे. पंधरावीस लक्षांची सोय जाल्यास बंगालची मसलत होईल. इंद्रसेनाशीं बावांचें बोलणें आहे, कीं पगडीवाल्यांचा पक्ष इंग्रजांनीं करूं नये, व टोपीवाल्यांचा पक्ष श्रीमंतांच्या सरकारांतून होणार नाहीं, पण अंडर्सन म्हणतो, पगडीवाल्यांपैकीं निजाम, भोसले, हैदरखान यांचा पक्ष आम्ही करीत नाहीं, परंतु महंमदअली व असोफउद्दौला या दोघांचा पक्ष तुम्ही जरब दिल्यास आम्हांस करावा लागेल. अंतर्वेदचा जाबसाल इंद्रसेन बोलता कीं जसे नबाब, भोसले, हैदरखान हे तिघे तुमच्या पेट्यांत, तसे असोफउद्दौला व महंमदअली हे आमच्या पेट्यांत. तुम्हीं यांशीं बोलूं नये. आम्ही त्या त्रिवर्गाशीं बोलणार नाहीं. असे जाबसाल होऊं लागले तेव्हां मुद्दा मोघम ठेविला. पुढें मागें समजून घ्यावयास येईल.' अंतर्वेदींतील प्रदेश स. १७५१ पासून सिंदे होळकरांनीं जिंकिलेला, तो सोडून देणें महादजीस पटेना. पण तहांत तो मुलूख कायमचाच हातचा गेला.

आपाजीराम लिहितो, 'फक्त हैदरखानाविशीं गोष्ट अवघड पडली आहे. भोसल्यांनीं गुदस्तां बंगाल्याची मदत कबूल करून अंतीं पंनास लाख रुपये इंग्रजांनीं एक साली फौजेचा खर्च दिला, आणि पगडीबद्दल भाईचारा केला. इष्टिनाची मसलत

दक्षणीयांची तंबी करावी अशी होती, परंतु काशीच्या राजानें मध्यें गलबल केल्यामुळें इंग्रजांचे इभ्रतीस गोष्ट कमी पडली. तरी आतां भोसल्यांस श्रीमंतांचे नांवाचीं पत्रें पाठवावीं, कीं तुम्ही कोणी एक खासा दहा हजार फौजेनिशीं गोंडराचे पारिपत्यास रवाना करावा, म्हणजे भोसल्यांचा खरा खोटा भाव समजेल. हल्लीं पाटीलबावांचा सर्व इतबार अंबाजी इंगळयावर आहे. ते सांगतील ती गोष्ट प्रमाणांत पडते. बाकी विश्वास कोणावर नाहीं. इंगळयाचें आचरण पाहतां, पांच रुपये कमाविशीचे मिळाले तर तीन सरकारांत सांगावे, दोन आपण खावे. ग्वाल्हेरचा किल्ला गमाविल्यापासून अंबाजीची जरब बिलकूल नाहीं. पाटीलबावांचा प्रकार सर्व मतलबी, मनुष्यावर दृष्टि नाहीं. सर्व लोभानें या थरास आणिलें.' अशी अनेक प्रकारें चर्चा व वाटाघाट होऊन पेशवेसरकारचा व इंग्रजांचा तह सालबाईचे मुक्कामीं ता. १७ मे १७८२ रोजीं इंद्रसेन व महादजी यांच्या सह्या होऊन कायम झाला, तो असाः—

१ अप्टनचे तहानंतर जे प्रदेश, किल्ले, टाणीं इंग्रजांनीं घेतलीं असतील, किंवा दादानें आपण होऊन दिलीं असतील तीं सर्व वसई सुद्धां तह झाल्यापासून दोन महिन्यांचे आंत इंग्रजानीं नाना फडणीस सांगतील त्यांचे हवालीं करावीं.

२ साष्टी व जवळचीं तीन लहान बेटें आणि भडोच शहर इंग्रजांकडे राहवीं.

३ फत्तेसिंग व सयाजी गायकवाड यांनीं इंग्रजांस जो प्रदेश दिला असेल तो सर्व ज्याचा त्यास परत द्यावा.

४ रघुनाथरावानें तह पुरा झाल्यावर चार महिन्यांचे आंत आपलें राहण्याचें ठिकाण निश्चित करावें. त्यानंतर त्यास इंग्रजांनीं कोणत्याही प्रकारचा आश्रय किंवा मदत देऊं नये. त्यास खर्चास पंचवीस हजार रुपये दरमहा पुण्यांतून द्यावे. त्यास पेशव्यांनीं कोणताही अपाय करूं नये.

५ फत्तेसिंग गायकवाडाकडे पूर्वीं असलेला मुलूख राहील. इतउत्तर पूर्वींचे कराराप्रमाणें त्यानें पेशव्यांस खंडणी वगैरे देणें ती देऊन नोकरी करावी; पूर्वींच्या सालांबद्दल पेशव्यांनीं त्याजकडे खंडणीची मागणी करूं नये.

६ हैदरअली खानाचा व पेशव्यांचा तह ता.९-८-१७८० रोजीं झाला. त्या उपरांत त्यानें जे जे प्रांत इंग्रजांचे किंवा महंमदअलीचे घेतले असतील ते सर्व त्यांस परत द्यावे. हैदरखान इंग्रजांशीं युद्धप्रसंग सोडून देईल तर इंग्रजही त्याजबरोबर संग्राम चालवूं इच्छीत नाहींत.

७ इंग्रजांच्या दोस्तांस पेशव्यांनीं उपद्रव देऊं नये, किंवा पेशव्यांच्या दोस्तांस इंग्रजांनीं उपद्रव देऊं नये.

८ पेशव्यांनीं व इंग्रजांनीं आपापल्या हद्दींत उभयतांचे जहाजांस बंदरोबंदरीं पूर्ण संचार द्यावा; आणि त्यांनीं एकमेकांचे व्यापारास अडथळा करूं नये.

९ दुसऱ्या टोपीकरांस पेशव्यांनीं आश्रय देऊं नये. पेशव्यांच्या पगडीवाले दोस्तांस इंग्रजांनीं त्रास देऊं नये. कोणी कोणाच्या शत्रूंस मदत करूं नये.

१० इंग्रज, कंपनी व पेशवा पंडित प्रधान दोघांचाही माधवराव सिंदे बहादूर यांजवर मोठा इतबार असल्यामुळें, उभय पक्षीं हा तह बरोबर पाळला जाईल अशी जामीनगिरी ते पत्करीत आहेत. जो कोणी तह मोडील त्याचें पारिपत्य हे सिंदे दुसऱ्यास मिळून करतील.

मुळांत एकंदर कलमें १७, ता.१७ मे १७८२, मु. सालबाई, सिंदे यांची छावणी; अंडरसन व महादजी यांनीं कायम केला. दोन प्रती करून एक पुण्यास व एक कलकत्त्यास सहीसाठीं पाठविण्यांत आल्या. लेखक राघू भाऊ दिवाण. सही महादजी शिंदे व डेव्हिड अंडर्सन. साक्षी जेम्स अंडर्सन व ब्लेन. सह्या ६ जून १७८२ रोजीं वॉरन हेस्टिंग्स व एडवर्ड व्हेलर व जॉन मॅक्फर्सन. जे. पी. ओरिओल, सेक्रेटरी.

सही बाळाजी जनार्दन ता.२० डिसेंबर १७८२.

तहाचे अस्सल कागद ग्वाल्हेर नजीक महादजी सिंदे व डेव्हिड अंडर्सन यांनीं एकमेकांचे हवालीं केले, ता.२४ फेब्रुवारी स.१७८३.

सालबाईच्या तहाची वाटाघाट सारखी दीड वर्ष चालली होती, त्या संबंधानें नानातऱ्हेची चर्चा व भांडाभांडी झाली. ता.१७ मे सन १७८२ रोजीं तह कायम झाला, तरी हैदरास वगळून तह करण्याची नानाची इच्छा नसल्या-

मुळें, त्यानें त्याजवर लगोलग सही केली नाहीं. ता.७-१२-१७८२ रोजीं हैदर मरण पावला आणि पुढें लगेच ता.२० रोजीं नानानें तहावर सही केली. उपरांत कागद महादजीकडे जाऊन अस्सल एकमेकांस देण्यांत आले. तहासंबंधानें झालेली कुचंबणा खालील पत्रांत दिसते. हें पत्र आपाजीराम नानास लिहितो. 'इंद्रसेनास इष्टिनाचें पत्र आलें कीं तुम्ही आज वरीसभर पाटीलबावांशीं जाऊन बसलां आहां. अद्याप सलूखाचा जाबसाल कांहींच घडोन येत नाहीं. सलूख होत नसला तर तुम्हीं निरोप घेऊन उठोन येणें. निरोप न देतील तर कळेल त्या रीतीनें निघोन यावें. अतःपर तेथें राहूं नये. पुण्यांतून राजकारणें हैदरखानाशीं व फरासिसांशीं खेळतात. असें असतां तुम्ही लिहितां कीं महादजी सिंदे हेच श्रीमंतांच्या दौलतीचे मुखत्यार आहेत. हे करतील तेंच परिणामास येईल. तेंच पत्र बजिन्नस इंद्रसेनानें सदाशिव मल्हार यांजला दाखाविलें. त्यावरून त्याची जावयाची निकड फार आहे. इष्टिन कलकत्त्याहून काशीस यावयाकरितां निघोन खुष्कीच्या वाटेनें दोन कंपू घेऊन येत आहे.' तह ठरण्यास लागलेल्या विलंबामुळें हेस्टिंग्स किती घाईस आला होता हें जसें वरील पत्रावरून दिसतें, तसेंच तह बिघडला तर युद्ध चालू ठेवण्याच्या तयारींतही तो होता, गाफील मुळींच नव्हता, हेंही दिसून येतें.

**५. सालबाई तहांतील नफानुकसानीची विविध चर्चा.**—नाना व महादजी एकत्र भेटून तह बनला नाहीं, यामुळें मराठयांचें नुकसान होऊन पुढें अनेक अडचणीही उत्पन्न झाल्या, आणि त्या दोघांचीं मनें उत्तरोत्तर विटत जाऊं लागलीं. गोहदचा राणा, खेची, नरवर, चंदेरी वगैरे ठिकाणचे संस्थानिक माळव्यांत महादजीविरुद्ध उठून इंग्रजांस मिलाफी होते, त्यांस नरम करण्याचा महादजीचा उद्योग तहाचे वाटाघाटींचे वेळीं चालूच होता. त्या संस्थानिकांनीं पुण्यास आपल्या तक्रारी कळवून नानाकडे दाद मागितली. तेव्हां नानानें त्यांस साह्य दिलें म्हणून महादजी चिडून गेला. तुकोजी व अहल्याबाई यांचें वितुष्ट चालूच होतें. अशा रीतीनें उत्तरेकडील कारभार विसकळित होऊं लागला, तो स्वतः तिकडे जाऊन दुरुस्त करणें नानास जरूर होतें. तहासाठीं नानाच माळव्यांत गेला असता, तर इंग्रजांच्या पडत्या स्थितीचा फायदा घेऊन मराठ्यांचें एकंदर राजकारण त्यास महादजीच्या

साह्यानें नेटांत आणितां आलें असतें. ही गोष्ट घडली नाहीं तरी झाला हा प्रकार एकंदरींत मराठ्यांचे इभ्रतीस पोषकच झाला. महादजीनेंच तह करावा असें ठरवून त्याला नानानें मोठेपणा दिला, यांत महादजीचा गौरव व राज्याची प्रतिष्ठा दोनही गोष्टी साधल्या. नानानें सदाशिव दिनकरास लिहिलें, 'तुम्हीं पाटीलबावांस एकांतीं बोलावें कीं इंग्रजांचा तह आपले हातें होतो, ही गोष्ट लहान नाहीं. यांत कस्त करून सरकारचीं कलमें जितकीं अधिक साधतील तितकीं साधावीं. हा लौकिक मोठा आहे. पाटीलबावा दुरंदेशीही आहेत. याउपर त्यांचे थोरपणास व श्रीमंतांचे दौलतीस उचित तेंच करतील.' परंतु महादजीची परिस्थिति बिकट होती. तो म्हणतो, 'पुणेकर व होळकर निसूर (झोंपत) बसून आम्हांवर दगड टाकितात. आम्ही गुदस्तपासून इंग्रजांच्या मसलतीची मेहेनत कशी केली हें मनांत आणावें. सारे तमाशा मात्र पाहतात.' यावर नानानें लिहिलें, 'तमाशा पाहवा हे इच्छा येथील नाहीं. मोठमोठीं कामें बावांनीं करावीं, सरकारचे मातबर उपयोग तेच घडत असावे, सरकारच्या मातबर मसलती होऊन पाटीलबावांस यश असावें, भाऊपणांत अंतर पडूं नये, हाच आम्हांस मोठा संतोष आहे.'

मुख्य मुद्दा साष्टीचा होता. साष्टी परत घ्यावी म्हणून नानानें पुष्कळ ओढून धरलें, परंतु तें अखेर साधलें नाहीं. हैदरखानास घेऊन तह करण्यासंबंधानेंही पुष्कळ बांधा पडला. दादासाहेबांचा मुद्दाही असाच भिजत राहिला. नाना लिहितो, 'पाटीलबावांनीं त्यांस ताब्यांत घेऊन आपले विद्यमानें सरकारांत हवालीं करावें म्हणजे बंदोबस्त चांगला राहील. इंग्रजांच्या नुसत्या बोलण्यावर जाऊं नये. ते दगाबाज आहेत. दादासाहेबांस अगोदर हातीं घेऊन त्यांस कचेश्वरास पोहोंचवून द्यावें. हैदरखानानें सरकारशीं विरोध केला असतां, त्याजबरोबर परभारा इंग्रजांनीं सलूख करूं नये असा पक्का करार दस्तऐवजीं घ्यावा.' ता. ८-८-१७८२ चे पत्रांत नाना लिहितो, 'तहाच्या कलमबंदीची याद ठरवली त्याच्या नकला पारशी व हिंदी पाठविल्या त्या पाहिल्या. या तहनाम्यांत दिक्कती फार आहेत, त्यांचे विस्तार पूर्वींच कलमवार लिहून पाठविले आहेत. तह न ठरला तर सलूख तुटतांच बंगाल्यांत फौज पाठवून हंगामा करण्याची तर्तूद जाली पाहिजे म्हणोन पाटीलबावा

सांगतात. त्यास असा ताण पूर्वीच बसता म्हणजे इंग्रज जरबेंत येऊन म्हटलें ऐकता. परंतु ती गोष्ट घडली नाहीं. गॉडराकडून उदिष्टीन येथें येऊन बोलूं लागला त्याचेपेक्षां इंद्रसेनाकडून पाटीलबावांजवळ अधिक काम होईल हें जाणून त्यास निरोप दिला. परंतु आतां कलमबंदीच्या यादी आल्या त्यांत अप्टनच्या तहापेक्षां नुकसान दिसतें. (अशी एक याद ग्वा. ४-६२ व ३-३६ यांत छापलेली आहे.) याकरितां पुनरपि निदान पक्ष लिहून पुनः यादी पाठविल्या आहेत, त्याप्रमाणें घडावें. इंग्रज बोलतो, तो आपला नफा पाहून बोलतो, त्या अन्वयें कबूल केलें असतां, अप्टनच्या तहासही नुकसानी, मग तळेगांवचा तह कोणीकडे ! याकरितां निदान पक्ष लिहिल्याप्रमाणें होत असल्यास उत्तम. प्रस्तुत हैदरखान सुद्धां तह होत नाहीं व साष्टी व्हावी तेंही नाहीं. हैदरखान व फरासीस व नबाब निजामली एक होतील तर मसलत भारी पडेल. मौजे वेळास हा गांव आमचा वतनी इंग्रजांकडे बाणकोटाखालीं आहे, तो सोडवून घ्यावा असें मनांत होतें, परंतु सरकारची साष्टी सुटली नसतां, आपला गांव सोडून घ्यावा हें ठीक नाहीं.' निजाम व भोसले यांस तहाची वार्ता युक्तीनें कशी कळवावी, तेंही नानानें पाटीलबावांस लिहिलें. 'न कळवितां तह केल्यास दोघे उदास राहून वांकड्या चाली धरतील, किंबहुना हैदरखान व नबाब एक व्हावयास चुकणार नाहींत. परभारेंच सलूख केला असतां वाईट मानतील असें आहे. यास्तव तहनाम्यांत कलमें लिहावीं, कीं नबाबाचा मक्ता दरसाल इंग्रजांनीं त्यास देत जावा, आणि भोसल्यांची बंगाल्याची चौथही देत जावी. येणेंकरून, नबाबास व भोसल्यांस गोड वाटेल व इंग्रजांचें कांहीं जात नाहीं.' हें सर्व स.१७८२ च्या ऑगस्टांत लिहून नानानें महादजीकडे पाठविलें. का. सं. प. या. ले. २६४ यांत तहाच्या वाटाघाटीची संक्षिप्त हकीकत नानानें लिहिलेली पाहण्याजोगी आहे. तह झाल्यावर इंद्रसेनानें पुण्यास येऊन श्रीमंतांस भेटावें असें ठरलें होतें. ता.११-६-१७८२ रोजीं हेस्टिंग्सनें अंडर्सनला विचारिलें, 'शिंद्यांचा विचार जाण्याचा आहे कीं काय ! ते जात असतील व तुम्हांस बरोबर बोलावतील तर तुमचे जाण्यास माझी हरकत नाहीं.' 'तह झाला, आतां फ्रेंचांचे वकिलास निरोप देण्यास हरकत नाहीं असें समजून नाना त्यास निरोप देतील तर देऊं नये. नाद राखून ठेवावा,' असें महादजीनें नानास सुचविलें, तें नानानें मान्य केलें. एकंदरींत अंडरसनचा तह

नानास बिलकूल पसंत पडला नाहीं. तो नाकबूल करावा असाच जवळ जवळ नानाचा ग्रह झाला. 'उदिष्टीन आला त्याचे बोलण्यांत दादा व साष्टी द्यावयाचें होतें. परंतु पाटीलबावा इंद्रसेनाकडून जास्त करून घेतील असें आम्हीं जाणून व नबाब भोसलेही इंग्रजांचे तहाविषयीं बोलत होते तें न ऐकून, उदिष्टिनास निरोप दिला. हल्लीं दादा हवाली करून घेतल्याखेरीज तह केला. साष्टीचा मुद्दा होत नाहीं, अंतर्वेदींचें आणखी नुकसान. हैदरखान सोबती झाला त्यास तोडणें. सारांश तहाचा जाहिराणा होऊन लभ्यांश कांहींच नाहीं. बिनसल्यास फिरून मसलत उभी राहील. याकरितां दादांस इंग्रज कुटुंब सुद्धां हवालीं करीत असेल तर तह करावा, नाहीं तर करूं नये.' असें नानानें ता.२३-११-१७८२ रोजीं कळविलें. त्यावर महादजीनें उत्तर पाठविलें, कीं 'तह करणें असल्यास पूर्वी याद पाठविली आहे, त्याप्रमाणें शिक्यानिशीं परत यावी म्हणजे इंद्रसेनास दाखवून समाधान करूं. नाहीं तर इंद्रसेन रहात नाहीं, निघून जातो. इंद्रसेनाचें बोलणें कीं दादांस आम्ही तुमचे स्वाधीन करावें, यांत आमचा लौकिक चांगला दिसत नाहीं. तुमचा आमचा तह झाल्यावर तुम्हीं मातबर माणूस दादांकडे समजुतीस पाठवावा, आम्हीही त्यांस सांगून तुमचे हस्तगत होयसें करूं.' त्यावर नानानें कळविलें कीं 'दादासा० हातीं न येतां तह करूं लागले तर तो रद्द समजावा.' याशिवाय नानानें जे जे आक्षेप लिहून पाठविले ते महादजीनें इंद्रसेनाकडून कबूल करविले. पत्रव्यवहाराचे योगानें अनेक भानगडी उपस्थित झाल्या, निरनिराळ्या मुत्सद्यांत व भाषांत तफावत होती, बहुत पत्रें मुद्दाम तपशील, वार लिहिलेलीं होतीं. त्यांवरून उपयोगी जाबसाल चांगले रीतीनें बोलावे, नाहीं तर पुढें हें आम्हांस कळलें नव्हतें, अथवा आम्ही असें सांगितलें होतें- असें म्हणतील. यांत होतें तें त्यांत गेलें, असें होऊं नये. असें होतां होतां डिसेंबरांत तहनामा फारसी कायम होऊन नानानें हैदरखान मेल्यावर त्याजवर सही करून शिक्क्यानिशीं ता.२१-१२-१७८२ रोजीं पुण्याहून रवाना केला. 'तो कलकत्त्याहून सहीशिक्के होऊन यावयास विलंब लागेल. याकरितां पाटीलबावांनीं इंद्रसेनास घेऊन श्रीमंतांचे लग्नास जरूर यावें; म्हणजे बावांनीं इंग्रजांचा वकील श्रीमंतांजवळ जाणून तह केला असें होईल व लौकिकांत चांगलें दिसेल; तोंपावेतों तहनामा सही होऊन येईल व दादासाहेब स्वाधीन होण्याचें

समजेल. श्रीमंतांचे लग्नाचा मुहूर्त माघ शु० ९ चा म्हणजे १०-२-१७८३ चा आहे. लग्न समारंभास आल्यानें फार चांगलें होणार आहे. इंग्रजांचे तहाचें काम लहान नाहीं. बहुत जपून सांभाळून करावें.' असें नानानें कळविलें. हा तह पुण्यास कां झाला नाहीं, त्यांत महादजीनें उभय पक्षीं जामिनगिरी पत्करून स्वतःचें महत्त्व कसें वाढविलें, तसेंच मराठी राष्ट्रास त्यापासून नफा नुकसान काय झालें, वगैरे अनेक महत्त्वाचे प्रश्न या संबंधानें उद्भवतात, त्यांचा थोडा विचार करणें जरूर आहे.

पुणें दरबाराशीं बोलाचाली करण्यास हेस्टिंग्स कोणी तरी मध्यस्थ शोधीत होता. भोसल्यांनीं ती गोष्ट मनावर घेतली नाहीं. अर्काटचा महंमद अली आपण तह जुळवून देतों म्हणून आग्रह करीत होता, परंतु त्यास पुण्याचे दरबारांत वजन नव्हतें. अशा अडचणींत गॉडर्डास हेस्टिंग्सनें पुण्यांत जाऊन तह ठरविण्यास लिहिलें, इतक्यांत म्यूरनें महादजीशीं स्वतःपुरता स्वतंत्र तह केल्याची वर्दी हेस्टिंग्सला मिळाली. याच वेळीं चेतसिंग महादजीकडे पळून गेला, आणि ते दोघे वजिरास व बादशहास संगतीत घेऊन बंगाल्यावर उतरणार, अशी बातमी हेस्टिंग्सला पोंचून त्यानें कसेंही करून महादजीला खूष ठेवण्याचें मनांत आणून अँडरसनला त्याजकडे पाठविलें. खरें म्हटलें तर लष्करी जोराच्या पाठिंब्यांत महादजी जितका फायदेशीर तह पदरांत पाडण्यास समर्थ होता तितकें पुणें दरबार नव्हतें. 'इकडील मसलतीवर पाटीलबावा आहेत, अंतर्वेद खालीं पाहिली असतां, चाल करतील. याजकरितां इंद्रसेनास सलूखाचें बोलणें करण्यास हेस्टिंग्सनें पाठविला,' असें सदाशिव दिनकर लिहितो. गॉडर्डसारखा राज्याची हाव धरणारा गृहस्थ पुण्यास तह ठरविण्यास जाता तर इतकेंही पदरांत पडलें असतें कीं नाहीं याची शंकाच वाटते. हेस्टिंग्स घाबरलेला व फ्रॅन्सिसच्या खटपटींनीं जवळ जवळ कामावरून दूर होण्याच्या बेतांत आलेला असल्यामुळें, ग्वाल्हेर-बनारसच्या पेंचाच्या वातावरणांत घडलेला तह पुष्कळ फायदेशीर झाला असेंच म्हणावें लागतें. महादजीनें स्वतः होऊन तहाची जबाबदारी अंगावर घेतली नाहीं. अँडर्सन त्याजकडे आला, तेव्हां त्यास पुढें पुण्यासच पाठविण्याचा महादजीचा विचार होता. पण महादजीच्या मार्फत तह होण्यांतच राज्याचा फायदा आहे हें नानानें ओळखून महादजीला आपण होऊन त्यानें सर्व मुखत्यारी दिली. याला

पर्याय दोनच, एक महादजीनें अंडर्सनसह पुण्यास जाणें, किंवा नानानेंच महादजीच्या छावणींत पुण्याहून जाणें. पैकीं महादजीनें या वेळीं माळवा सोडणें अत्यंत धोक्याचें होतें. इंग्रजांच्या फौजा वजीर व बादशहा यांस कबजांत आणण्यासाठीं दुआबांत बसल्या होत्या. गोहदकर राणा, राजपूत राजे, बादशहा व वजीर हे सर्व मराठ्यांवर केव्हां उठतील याचा नेम नव्हता. वास्तविक हैदर मराठ्यांनीं इंग्रजांस पुरेपुरे केलें म्हणून त्यांच्या चढाईस थोडाबहुत तरी आळा बसला. नाहीं तर याच वेळीं दिल्ली पावेतों मजल मारून हिंदुस्थानचें सार्वभौमत्व स्वाधीन करून घेण्याचा हेस्टिंग्सचा डाव बराच सफल होण्याचे बेतांत होता. मॅक्फर्सन, कूट वगैरे थोर अधिकाऱ्यांनींच हेस्टिंग्सला गप्प बसविलें, म्हणून हा तह होऊन युद्ध संपलें. नाहीं तर पुरंदरच्या तहापासून नाना तऱ्हेच्या युक्त्या करून हेटिंग्स हॉर्नबीनीं आपले कावे कसे चालविले हें आपल्या दृष्टीसमोर आहेच. सारांश, हिंदुस्थान राखायचें, कीं नर्मदोत्तर भाग सोडून पुण्यापुरता राज्याचा संकोच करून घ्यावयाचा, असाच या वेळीं महादजीपुढें पेंच होता. पुढेंही आपलें वजन उत्तरेंत प्रस्थापित करण्यास महादजीस आणखी सात आठ वर्षें लागलीं, यावरून उत्तर हिंदुस्थानांत ठांसून बसण्यानेंच महादजीस मराठी राज्याची मोठी कामगिरी करितां आली असें म्हणावें लागतें. यासंबंधानें आणखी पुढें विचार करावा लागणारच आहे.$

महादजीनें नानास विचारिलें, आमचेकडून तहांत सरकारची नुकसानी काय झाली, त्यावर नानानें कळविलें, '१ महंमद अलीकडील चौथाई बुडाली; २ साष्टीचा वारसा ठेवला होता, तो तुटला; ३ गायकवाडाकडील मागील ऐवज बुडाला; ४ अंतर्वेद हातची गेली; ५ दुसरे टोपीकरांचा आधार संपला.' अशी अनेक प्रकारची वाटाघाट होऊन शेवटीं २४ फेब्रुवारीस तहाचें काम पूर्ण झालें. दादासाहेबांबद्दल मात्र पुष्कळ वाटाघाट पुढेंही चालू होती. महादजीचें म्हणणें असें होतें, कीं दिल्लीची मसलत साधण्यासाठीं इंग्रजांशीं मैत्री करणें प्राप्त, त्यांत थोडें तूर्त नुकसान झालें तरी हरकत नाहीं. एकदां पातशहा हातीं आल्यावर राजपुतांपासून कोट्यवधि खंडणी घेतां येईल, रोहिल्यांवर सूड उगवावयास सांपडेल, इंग्रज, निजाम, हैदर वगैरेंवर आपला वचक बसेल,

---

$ ग्वा. ३. २४-४३; ४-६२; का. सं. प. या. २८८.

म्हणजे पर्यायानें मराठ्यांची सार्वभौम सत्ता मजबूद करतां येईल. नाना म्हणे कीं, इंग्रजांनीं मराठी राज्यांत फूट आरंभिली आहे. जहागीरदार स्वतंत्र होऊं लागले कीं मराठ्यांच्या सत्तेस उतरती कळा लागली.

नानामहादजींचा लढा जितका राष्ट्रप्रेमाचा तितकाच तत्त्वाचाही होता. शाहू व बाळाजी विश्वनाथ यांनीं महाराष्ट्राला उत्तराभिमुख बनविलें आणि त्याची सांगता सिंदे होळकरांनीं केली. हिंदुस्थानच्या सार्वभौम सत्तेची हाव बाळगणारांनीं उत्तरेची किल्ली सांभाळली पाहिजे असें महादजीचें धोरण होतें. ही किल्ली पुण्यास नसून दिल्लीस होती. याच कारणासाठीं महादजीला उत्तरेचा एवढा ओढा वाटे. सालबाईच्या तहानें दिल्लीकडील बादशाही कारस्थान महादजीनें मोकळें केलें आणि इंग्रजांस त्यांत घुसूं दिलें नाहीं. शेवटीं सुद्धां मराठशाही बुडाली ती उत्तरेंत सेनापति लेकनें दिल्ली काबीज केल्यानें बुडाली, वेल्स्लीनें बाजीरावास पेशवाईवर बसविल्यानें बुडाली नाहीं. या वेळच्या घडामोडी नानाफडणिसानें एकदां सुद्धां उत्तरेंत जाऊन स्वतः अनुभवून पाहिल्या नाहींत, यामुळें मराठी राज्याचें अंतीं नुकसान झालें. दुरून लेखणी चालविणाऱ्या मुत्सद्यापेक्षां रणक्षेत्राच्या धडाक्यांत वावरणारा सेनापतिच राष्ट्राची कामगिरी जास्त करूं शकतो.

निजाम भोसले चौकडीच्या जुटींत होते, त्यांजबद्दल सदाशिव दिनकर लिहितो, 'शिंदे यांच्या विद्यमानें तह झाला, त्यांत आपला इतल्ला नाहीं. मतलब कांहीं सिद्ध नाहीं म्हणून भोसले व निजाम उभयतां समदुःखी आहेत. उभयतांचीं लिहिलीं परस्परें जाऊन येऊन, भोसल्यांनीं विश्वंभर कलकत्त्यास पाठविला. त्याचा भाऊ मृत्यु पावला म्हणून गेला. आतां आपण पुढें कोणती चाल धरावी याचा विचार करण्याकरितां निजामाचा वकील नागपुरास येणार होता. परंतु बावांनीं भोसले व निजाम या दोघांसही पत्रें लिहून त्यांचें समाधान केलें. विश्वंभर यांस रवानगीचीं वस्त्रें देतांना चार दिवसपर्यंत वाड्यांत बागेंत स्वस्थपणें प्रहर सहा घटका बसोन भोसल्यांनीं रवानगीचें भाषण केलें. आतां हे इंग्रजांकडे जाऊन काय घडवितात, कळत नाहीं.' खरें पाहतां चौघांचें जंगी कारस्थान होऊन, त्यांत निजाम भोसल्यांनीं कांहीं एक काम न करितां, परभारें कार्यभाग उरकून इंग्रज तहास सिद्ध झाले, त्यांत शेवटीं महादजीस यश येऊन, मराठ्यांचीं सार्वभौम सत्ता डळमळत होती,

ती दृढ झाली, आतां हे आपणास पाहिजे तसे मान वांकवावयास लावतील, हें मोठें वैषम्य त्या दोघांस वाटलें. 'आंतील अर्थ पाहतां इंग्रजांची मसलत आपण होऊन करविली, आणि आपलेकडून कांहींच झालें नाहीं, आपल्यावर शब्द आला या फिकिरींत ते आहेत. इंग्रजांचे मसलतीस कसेंही करून हैदरखानास मिळवून घ्यावें, असें नबाबानें पुण्यास लिहिलें तो दस्तैवज गुंतला, पुढें हैदरखानाचा व पुणेंकरांचा स्नेह झाला, तेव्हां ते आतां कांहीं तरी बहाणे लावून लिहितात. आंतून पाहतां शरमतात, ज्यास मसलत होत नाहीं तो बाहणे काढून लावितो. पोटांत इंग्रजांची जरब भारी आहे. हे दोघे निजाम भोसले कांहीं न करतां फशीं पाडतील, असें महादजी दोन वर्षे नानास सारखें बजावीत होता. या तहासंबंधानें कीन म्हणतो—

'सालबाईच्या तहाचें इंगित सहसा कोणाचे लक्षांत येत नाहीं तें हें कीं, इंग्रजी राज्यांत एका मैलाची सुद्धां भर न पडतां, त्यांची सार्वभौम सत्ता दक्षिण हिंदुस्थानांत नकळत सिद्ध झाली. कारण त्या भागांत म्हैसूरशिवाय करून बाकीचे सत्ताधीश इंग्रजांच्या मध्यस्थीची अपेक्षा बाळगूं लागले. मध्यस्थीची अपेक्षा म्हणजेच वर्चस्व नव्हे तर काय?' (महादजी चरित्र, पृ. ८२).

राजकारणांत भलभलतेच देखावे किंवा आविर्भाव दाखवून प्रतिस्पर्ध्यावर मात करण्याचे प्रसंग नाना फडणीस किंवा इतर मुत्सद्दी पाहिजे तसे उपस्थित करीत. म्हणजे एका दृष्टीनें हल्लींच्या युरोपियन राजकारणांतले आंतरराष्ट्रीय डाव त्या वेळीं सुद्धां कांहीं कमी होत नव्हते. साष्टी बेट इंग्रजांकडून हर उपायानें परत घ्यावयाचें असा नाना फडणिसाचा सारखा नेट चालू होता. त्यासाठीं सालबाईचे वाटाघाटींत नाना शक्य त्या रीतीनें हैदर व फ्रेंच यांच्याशीं संपूर्ण मिलाफ केल्याची बतावणी तो इंग्रजांकडे करी. उलट इकडे तो हैदरास असें सांगे कीं कृष्णेपलीकडचा आमचा मुलूख तुम्हीं घेतला आहे तो सोडून द्या, म्हणजे आम्ही इंग्रजांशीं सालबाईचा तह कायम करीत नाहीं. तुम्ही हा मुलूख सोडून देत नसाल तर इंग्रजांशीं सख्य करणें आम्हांस भाग पडेल. असे डावपेंच सर्वत्र सारखेच चालू होते. सालबाईचा तह घाटत असतां हैदराचा वकील पुण्यास आला, त्यास नानानें असें पढवून ठेविलें कीं, पुणें दरबारानें हैदर फ्रेंचांशीं कायम दोस्तीचा तह ठरविला आहे असें इंग्रजांस कळवा; आणि साष्टी परत देत असाल तर तुमचा तह कायम करून फ्रेंचांशीं आम्ही गुंतणार नाहीं. हा

वकील महादजीकडे जाऊन पुढील वाटाघाट करणार तोंच हैदर मरण पावला आणि तहाचे कामीं जास्त ओढून धरणें नानास इष्ट वाटलें नाहीं. म्हणून त्यानें लगेच तहावर सही केली. हैदराची चिकाटी टिपू दाखवील अशी त्या वेळीं नानास अटकळ नव्हती.

इंग्रजमराठ्यांच्या तहासंबंधानें शाहू छत्रपतींचें पेशवा माधवराव नारायण यास आलेलें पत्र उपलब्ध आहे तें असें, जिल्काद सन ११८४ (४-१०-१७८३). ‘इंग्रजांबरोबर महादजी सिंदे यांचे मार्फत तह होऊन, वसई, अहंमदाबाद वगैरे ठिकाणें परत आलीं, रघुनाथरावास कबजांत घेऊन बंदोबस्तानें ठेवलें, आणि ग्वाल्हेरचा किल्ला महादजींनीं हस्तगत करून घेतला वगैरे मजकुराचें आपलें पत्र आलें तें पावलें. ऐशियास, इंग्रजांनीं केवळ आपमतलबानें रघुनाथरावास आश्रय देऊन निष्कारण देशांत लढाई उपस्थित करून रयतेस उपद्रव दिला; त्यांनीं आपणच केलेला तह मोडून युद्धास सुरुवात केली; सबब त्यांचा नकशा उतरून आतां त्यांनीं तह केला, हें वर्तमान ऐकून संतोष झाला.

‘आमच्या दौलतींत सरदार व सरकारचे अधिकारी आहेत, त्यांपैकीं एखाद्यास रघुनाथरावाप्रमाणें आपल्याकडे वश करून इंग्रज पुनः बंडाळी करतील; आम्हांस त्यांचा भरंवसा येत नाहीं. सबब हा नवीन तह कायमपणें चालावा, या साठीं आमची अशी आज्ञा आहे कीं तुम्ही इंग्लंडचे राजास स्वतंत्र पत्र पाठवून हा तह तिकडून मंजूर करून घ्यावा. महादजी सिंद्यांनीं हा तह सिद्धीस नेला, सबब त्यांसच तुम्हीं असें स्पष्ट कळवून ठेवावें, कीं इंग्रज येथें आरंभीं केवळ व्यापाराचे निमित्तानें आले, आणि व्यापाराची परवानगी मिळवून राहिले असतां, आतां हावभरी होऊन येथील राजकारणांत शिरूं पाहतात, आणि दंगल माजवितात. हें सर्व लक्षांत ठेवूनच इतउत्तर महादजींनीं त्यांच्याशीं मोठ्या सावधगिरीनें व्यवहार करीत जावा. पुनरपि आमच्या राज्यांत अशी बंडाळी किंवा लढाई उपस्थित होऊन रयतेस कोणताही उपद्रव होऊं नये अशी आमची फार फार इच्छा आहे, ती तुम्ही सिद्धीस न्यावी. कळावें.’¶

---

¶ Papers of the Raja of Satara यांतील इंग्रजी भाषांतरावरून परत मराठी. का. सं. प. या. २२२, २५८, ३००, २०२, २०५, २०६, ३२७, २६४, २६५, २९२, २९०, १८७, १८८, १९१, १९०, १९२, २३४, १६४,

कॉमन्स सभेपुढें आपल्या कृत्यांचा जाब देतांना हेस्टिंग्सनें मराठ्यांच्या युद्धासंबंधानें असें प्रतिपादन केलें, कीं 'तुम्हां इंग्रजांचें जे राज्य आज हिंदुस्थानांत आहे, त्याला व्यवस्थित स्वरूप मीं आणून दिलें. माझ्या प्रयत्नानें त्या राज्याचें रक्षण झालें. शत्रूंच्या मुलुखांतून प्रचंड फौजा अत्यंत थोड्या खर्चांत मीं युद्धास पाठविल्या, म्हणूनच दूरदूरच्या प्रदेशांचें संरक्षण झालें. मुंबईकरांची साफ बदनामी झाली होती ती माझ्या प्रयत्नानें वांचली. मद्रासचा प्रदेश हैदराचे तावडींतून सोडविण्यास माझे प्रयत्न कारण झाले. युद्धें सुरू केलीं दुसऱ्यांनीं, पण तीं यशस्वी करून दाखवावीं लागलीं मला. मराठ्यांच्या एका बलिष्ठ सरदारास (महादजीस) मीं मोठ्या युक्तीनें वळवून घेतलें; दुसऱ्या एका बलवान सरदाराशीं (फत्तेसिंग गायकवाडाशीं) मीं गुप्त करार ठरविला; तिसऱ्या एकास (नागपुरकर भोसल्यास) मराठ्यांच्या गटांतून फोडून त्याजकडून पुढील तह घडवून आणण्याची सिद्धता केली. तुम्ही सर्व तह तह म्हणून ओरडत असतां व ही ओरड सर्व शत्रू ऐकत असतां, मीच तेवढा नेटानें तहाचे विरुद्ध आविर्भाव आणून, शेवटीं फायदेशीर तह पदरांत पाडून घेतला. एवढी सर्व जबाबदारी घेऊन जिवाची त्रेधा उडवून घेण्याची मला काय जरूर होती? तह करा म्हणून आलेले वरिष्ठांचे हुकूम मी अक्षरशः पाळतों तर त्यामुळें माझा स्वतःचा फायदाच होता; पण त्यांत इंग्रज राष्ट्राची मात्र अत्यंत हानि झाली असती. वडगांवावर इंग्रज सेनापतींनीं भित्रेपणानें आपल्या राष्ट्राच्या नांवास काळिमा लाविला, तो धुऊन काढण्याची मला कोणीं फरज पाडिली नव्हती. मद्रासचा प्रांत हैदरानें गडप केला, तो सोडविण्यास फौज पाठविण्याची मला काय जरूर होती? माझ्या योजनेस कौन्सिलचा विरोध होता, त्यास नुसतें हो म्हणून माझें काम भागलें असतें. भोसले चिमणाबापूनें बंगाल प्रांत गिळंकृत केला असता, तर माझें काय गेलें असतें? खासगी पैसा खर्च करून मीं हा परिणाम थांबविला, यांत स्वतःचा फायदा केला कीं राष्ट्राची सेवा केली! मुद्दाम काशीस जाऊन चेतसिंगाचें प्रकरण उकरून काढण्याची तरी मला काय जरूर होती!'

---

२१४, २४३, २७०, २२८; खरे ना. फ. चरित्र; Keene's Mahadjis ग्वा. ४.५१, ५२, ६२; ग्वा. ३. ३६.

राजकारणाचा एक मासला म्हणून हेस्टिंग्सचे हे उद्गार लक्षांत ठेवण्यासारखे आहेत, इतकेंच.$ बाकी हेस्टिंग्सच्या घमेंडीस उलट बाजू होती हेंही तितकेंच खरें आहे.

इंग्रजांनीं साष्टी परत दिली नाहीं, ही गोष्ट नानाचे अंतःकरणास सदैव झोंबत राहिली. साष्टी सुटली नाहीं म्हणून वेळास गांव इंग्रज देत होते तो त्यानें घेतला नाहीं. स.१७८७ त दुसरा कांहीं प्रदेश मोबदला देऊन साष्टी परत द्या, अशी मॅलेटच्या मार्फत नानानें मुंबईकरांकडे मागणी केली. मुंबईस लागणारें नेहमींच्या निर्वाहाचें धान्य वगैरे सामान साष्टींतूनच इंग्रजांस मिळत असल्यामुळें, साष्टी हातांतून गेल्यास मुंबईचा सहज कोंडमारा होईल या भीतीनें ते साष्टी परत देण्यास नाखूष होते. मुंबईकरांनीं हें प्रकरण कॉर्नवॉलिसकडे पाठविलें, त्यानें त्याबद्दल ता.१६-११-१७८७ रोजीं इंग्लंडास लिहिलें. या लखापडीमुळें नानास निकाली जबाब मिळेना, म्हणून त्यानें साष्टी परत घेण्याच्या खटपटीसाठीं मुद्दाम आपला वकील इंग्लंडास पाठविण्याचें ठरवून ती गोष्ट मॅलेटच्या मार्फत इंग्रज अधिकाऱ्यांस कळविली. याचवेळीं इंग्लंड फ्रान्सचें युद्ध जुंपण्याचा रंग आला होता; तसें झाल्यास, टिपूला फ्रेंचांची कुमक येऊन तो आपल्यावर चढाई करील, तर आपणास मराठ्यांचें साह्य अवश्य मिळविलें पाहिजे अशा समजुतीनें, साष्टी परत देत नाहीं असें सांगून पुणेंकरांस दुखविणें कॉर्नवॉलिस यास इष्ट वाटलें नाहीं. ता.१०-३-८८ रोजीं त्यानें मॅलेटच्या मार्फत इतकेंच कळविलें कीं 'इंग्लंडास मुद्दाम तुमचा वकील पाठविल्यापासून विशेष फलप्राप्ति होईल असें मला वाटत नाहीं. तथापि तुम्ही कोणी इसम पाठवीत असल्यास आम्ही त्याचें साहित्य सर्वतोपरी करूं. मात्र मनुष्य पाठवाल तो इभ्रतीचा व लायक पाठवा. एखादा लुंगासुंगा युरोपियन पाठवूं नका.' साष्टीचें हें प्रकरण नानानें कैक वर्षे चालूच ठेविलें होतें. ता.३-६-१७९० रोजीं इंग्लंडांतून कॉर्नवॉलिस यास लिहून आलें कीं, 'पुणें दरबारानें साष्टीची मागणी चालविलेली आमच्या लक्षांत आहे. परंतु त्याबद्दल आम्ही येथून साष्टीचें उत्तर कांहींच देऊं शकत नाहीं. आम्हांस तूर्त इतकेंच वाटतें, कीं दुसरा योग्य मोबदला मिळाला असतां साष्टीच आपणास

$ फॉरेस्ट–इंपीरियल सिलेक्शन्स–प्रस्तावना पृ. ८९-९२.

पाहिजे अशांतला भाग नाहीं. भडोच परगणा आणि सुरतेंतून गायकवाड व पुणें दरबार यांस मिळणारी चौथाईची रक्कम साष्टीच्या बदल्यांत आम्हांस देण्यास ते तयार आहेत कीं काय याचा तपास करून कळवावें.' शेवटीं साष्टी परत आली नाहीं ती नाहींच.

महादजीचे हातून राज्याची नुकसानी होते, असा तहाचे वाटाघाटींत त्याजवर नानानें आरोप केला, तेव्हां महादजीनें झणझणित जवाब लिहून पाठविला. ता.१३-२-१७८२ चें हें सुप्रसिद्ध पत्र ऐ. टि. २-२८ येथें छापलें असून त्याची ग्रँट डफनेंही वाखाणणी केली आहे. महादजी म्हणतो, 'श्रीमंतांचें अकल्याण आणि नानाचें वाईट आम्ही काय करितों, तें बारकाईनें शोध करून पाहवें. निजाम, हैदर, भोसले, इंग्रज, गायकवाड व दादा या सहा-जणांकडे आमचीं सूत्रें चालून वकील येतात, ते सर्व सरकार आज्ञेप्रमाणेंच येतात. यांत निखालसता कोठें कमती झाली ! सखारामपंत, मोरोबा वगैरें-कडे संधान राखून सरकारनुकसानी व नानाचें अकल्याण केलें न केलें हें त्यांस माहीतच आहे. प्रस्तुत होळकर, हरिपंत, परशुरामभाऊ व दुसरे सरदार मानकरी यांजकडे संधानें राखून सरकारनुकसानी व नानाचें अकल्याण केलें असेल तें सांगावें ! श्रीमंतांचे पाय व नानांचा भाऊपणा आमचा खंबीर आहे. एखादे मसलतीचा किंवा सरकारचे अंमलदारांचा मजकूर बरावाईट लिहावा लागला, तरी तो तितक्यापुरताच समजावा. मागाहून त्याचें प्रकरण चालवूं नये.' यासंबंधानें महादजीनें धारच्या पवाराचें व सागरकर बाळाजी गोविंदाचें, तसेंच अहल्याबाई व तुकोजी यांच्या भानगडींचें उदाहरण सांगितलें. सालबाईचा तह घाटत असतां महादजीनें आजूबाजूच्या गढ्या घेऊन जे बंडखोर इंग्रजांस मिळाले होते, त्यांचा उच्छेद चालविला, तेव्हां त्याबद्दल सरकारी अंमलदारांनीं पुण्यास तक्रारी केल्या त्यावरून नानानें महादजीस ठपका दिला. महादजी म्हणतो, 'अंबूजी इंगळयास फौज देऊन गढया घेण्यास पाठविलें, परंतु ठाणीं सरकारी अमलांतील आहेत हें समजतांच फौजा माघाऱ्या बोलावल्या. राजजी देशमुखांचें पारिपत्य केलें याहूनही अधिक पारिपत्य करावयाचें होतें, तर आम्हांस लिहावयाचें होतें. त्याचे घरीं चौक्या बसविल्या, तेव्हां आमचा लौकिक काय राहिला ! शिरोंजचे जमीनदारांनीं सिप्रीस येऊन इंग्रज आणिला आणि

भेलसें घेऊन देण्याचा घाट घातला. आम्ही जाऊन गोळ्या चालविल्या तेव्हां सरकारचे अमलांत बैल व बुणगे लुटले गेले. त्याचे पारिपत्याकरितां अंमलदारांचे बोभाट सरकारांत गेले. त्यावरून आम्हांस न विचारतां, परभारां कमावीसदारांबराबर ताकीदपत्रें आमचेकडे येऊं लागलीं. त्यावरून आमच्यावर अखत्यारी किती आहे हें समजून आलें,' अशा प्रकारचे वाद व प्रतिवाद प्रसिद्ध कागदांत भरपूर आहेत. गढ्या घेऊन बंदोबस्त करण्यासंबंधानें 'चंदेरी, दतिया, खेची वगैरे संस्थानांस उपद्रव होऊं नये असें सरकारांतून लिहून आलेलें राघोपंत गुरुजींनीं बावांस सांगितलें. 'त्यावरून मर्जी बहुत विक्षेपास पावली. आणि आम्ही संस्थानें घेऊंच लागल्यावर आम्हांस परवानगी कशाला पाहिजे!' अशी भवती न भवती प्रहरभर दरबारांत झाली. राणेखान भाईनींही सांगितलें कीं 'तूर्त इंगळ्यांचे नादीं आहेत. कोणीकडून चार रुपये मिळवावे ही बुद्धि जाल्यावर विचार कसचा पुसतां!' हें ऐकल्यावर नानानें लिहिलें. 'सरकार तालुक्यांतील गढ्यांस मोर्चे लावून रुपये घेणें, आणि रदबदल सरकारचे वकिलांनीं केलेली न ऐकतां, लोभावरच दृष्टी देणें, सरकारचा तालुका खराब होतो, दुर्लौकिक होतो, हें कसें चित्तांत येत नाहीं! असेंही करतां इंग्रजांस सरकारचे कामदारांनीं रसद पोंचवली असली तर सरकारचे कमावीसदारांकडून बंदोबस्त करवून गुन्हेगारीचे व नजरेचे रुपये ठरावून कमावीसदारांस सांगावें कीं, हे रुपये पुण्यास पावते करणें. असें करणें थोरपणास चांगलें. कांहीं मनांत येऊन उपद्रव मना जाहला तर बरें, नाहीं तर ईश्वरी इच्छा. मर्यादा सोडल्यावर ईश्वरास गोष्ट मानवत नाहीं.'†

अंडर्सन दीड वर्ष महादजीचे सांनिध्यांत नाना तऱ्हेचे मृदु कठोर मुद्दे विवेचित होता; त्यानें लिहून ठेवलेला महादजीसंबंधाचा अभिप्राय मार्मिक आहे, त्याचा मतलब असा. सालबाईचा तह ठरण्यास अतोनात विलंब लागला याबद्दल सिंद्यांस अत्यंत वाईट वाटलें. त्यानें पुनः पुनः बजावून सांगितलें कीं निजाम व मुधोजी यांस केव्हांही तहाचे मध्यस्थींत घेऊं नका. त्यांच्या कारवाईनेंच नाना तऱ्हेचे अडथळे उपस्थित झाले. अंडर्सननेंही महादजीची खात्री केली, कीं तुमच्याबद्दल इंग्रजांस मोठा आदर वाटत असून मराठ्यांच्या कोणत्याही भानगडीचा विचार तुमच्याशिवाय आम्ही करणार नाहीं. अंड-

† का. सं.प. या. २९६ २०७, २३३, २५१, २८८, २९३.

सन पुढें कलकत्त्यासच राहणार होता, याबदल महादजीस संतोष वाटून तो बोलला, तुम्ही कलकत्त्यास असल्यानें आम्हांस मोठा आधार आहे. तुमच्यासारखाच एखादा गृहस्थ कलकत्त्याचा पुण्यास राहील तर उभय सरकारांस मोठा उपयोग होईल. या सूचनेवरूनच पुढें मॅलेटला नेमण्याची कल्पना निघाली. अँडर्सन हेस्टिंग्स यास लिहितो, 'तह ठरत असतां कैक वेळां नानाप्रकारचे संशय निघाले, एकमेकांविशीं तर्ककुतर्क उत्पन्न झाले, भलभलत्या मागण्या उभय पक्षीं पुढें आल्या; एका मुद्याचा निकाल होतो, तों दुसरा बिकट मुद्दा उपस्थित होई. परंतु या सर्व प्रकरणांत शांत व न्यायी वृत्ति कायम ठेवून महादजीनें जी कामगिरी केली, तिच्याबदल माझे मनांत अत्यंत मोठा आदरभाव राहतो. पुण्याच्या बारभाईच्या शंकाकुशंकांचा निकाल महादजी होता म्हणूनच लागला. भडोच खुद त्यासच मिळावयाची होती, परंतु त्यासंबंधानें त्यानें यत्किंचित् आग्रह धरला नाहीं. माझ्या केवळ बोलण्यावर त्याचा पूर्ण विश्वास होता. अशा थोर पुरुषाचा स्नेह आपण कधीं मोडूं नये. हेस्टिंग्स व इंग्रज लोक यांबदल त्यास मोठा आदर वाटतो; आणि आमच्याशीं सदैव स्नेहभाव कायम ठेवण्याचीच त्याची इच्छा आहे. युद्धांत बाजू अंगावर आली तर त्याचा हुरूप व शांति कधीं भंग पावत नाहीं; तसेंच जय मिळाले असतां तो हर्षानें फुगून जात नाहीं. ( अँडर्सनची रोजनिशी १५-६-१७८३ ).

महादजी म्हणतो, 'इंग्रजांचा तह आमचे विद्यमानाचा म्हणून तो शेवटास जावा असें कोणाचेंही मानस नव्हतें. म्हणोन हिसके किती बसले ! अद्यापि तो शेवटास न जावयाचीं साधनें निरनिराळीं आरंभण्याचे क्रम चालूच आहेत. आम्हांस तोंडघशीं द्यावें हा इरादा धाकट्या मोठ्या सर्वांचा. म्हणून मुंबई, मद्रास व आणखीकडे राजकारणें आंतून लावून, आमचें राजकारण मागें टाकून परभारां दुसरीकडून शेवट करावयाचा उद्योग केला, तो सफल न जाला; आणि लांबण पडल्यामुळें टिपूच्या सलुकाचें परभारां ऐकोन आम्हांस शब्द लावून लिहिलें. तर आम्हीं बुद्धीनें चाललों असल्यास शब्द लागेल. निष्कपट, एकनिष्ठेनें वर्तलों असल्यास ईश्वर आम्हांस पार पाडील. राज्यभार मोठा, बहुतांच्या हातें चालावा तितक्यांचीं मतें स्वच्छ राहून साधनास लागतील तरीच चालेल. हें स्पष्ट समजलें असतां आम्हांस पुढें करून घाट घडविला. तहनामे

दिले घेतले येथवर करून, आतां मनांत हरएक विकल्प आणून आमचा कार्यभाग सिद्धीस न जावा याअर्थे, पृथक पृथक निरनिराळे साधनास लागून, परभारें संधानें टिपूकडे लाविलीं. टिपू व इंग्रज हे आपले मित्र कीं शत्रू? यांसीं परभारें निरनिराळीं राजकारणें लाविल्यानें, तीं सिद्धीस जाऊन आपला घोर तुटेल कीं वाढेल, याचा विवेक न करितां, द्वारांतरें साधनें चालविलीं. शत्रू संधिच पाहत असतात. बहुमत ( =दुफळी ) ध्यानास आल्यानें घरफुटींत शत्रूस शिरावयास जागा होतो. हींच द्वारें नाशाचीं. नाश आढळला, तेव्हां आम्हांस शब्द लावून लिहितात. तर निष्ठा, ज्याची त्यास कामास येईल. आरंभिलेला क्रम सोडूं म्हटल्यास मोठा नाश होतो. यास्तव उपेक्षा करणें ठीक नाहीं. हें एक शेवटास जावें म्हणजे सुटलों. पुढें कोणत्याही कर्मांत पुनः पडावयाचें नाहीं. श्रम सायास जीवाभ्य करावे, कर्जभरी व्हावें, त्याचें फळ शाबासी मिळावी, ते उफराटें उपमर्दाची चाल धरूं लागल्यास परिणाम कसा लागतो! यास्तव कशांतच पडूं नये तें बरें.' ( ग्वा. ३.४ ).

महादजीचें बळ वाढूं देऊं नये, त्याचा वेळींच बंदोबस्त करावा, असा हेका पुष्कळांनीं चालविलेला पाहून हेस्टिंग्सनें त्याजवर खडखडित जबाब लिहून पाठविला कीं ' महादजी कपटी व पाताळयंत्री आहे, तो इंग्रजांचा व अर्काट-कर नबाबाचा अत्यंत द्वेष करतो, असें पुष्कळ लोक मला सांगतात, पण मला हें बिलकूल खरें वाटत नाहीं. माझा त्याचा इतक्या वर्षांचा संबंध आहे, त्यांत लबाडीचें असें एकही उदाहरण त्याचें मला दाखवितां येणार नाहीं. गोहदच्या राण्याचें उदाहरण उठल्या सुटल्या पुढें करण्यांत येतें. पण राण्यानें आमच्याशीं इतकी लबाडी व कृतघ्नता केली आहे कीं, महादजी करतो तें यथायोग्य होय, असेंच मला वाटतें. उगाच अविश्वास दाखवून सिंद्यास आपण दुखवूं नये. नाहीं तर नसल्या जागीं भलताच धोका आपल्या सत्तेस उत्पन्न होईल.' सारांश, हेस्टिंग्स, कॉर्नवॉलिस व शोअर हे तिघे धूर्त इंग्रज सिंद्याचे वाटेस कधीं गेले नाहींत; आणि पुण्यास नाना व उत्तरेंत महादजी आहेत तोंपर्यंत मराठ्यांचे कारभारांत हात घालणें अत्यंत धोक्याचें होय, ही खूण-गांठ या युद्धापासून इंग्रजांनीं बांधून ठेविली. नाना व महादजी हे दोन पुरुष मराठी राज्याची प्रचंड शक्ति होते हें जाणून, त्यांच्या हयातींत राज्यांत हात घालण्याचा प्रयत्न इंग्रजांनीं केला नाहीं, हें लक्षांत ठेविलें पाहिजे.

प्रकरण बारावें

# हिंदी व पाश्चात्य राजकारणांचा लढा

## स. १७८१–८३



१. युद्धांतील नाना फडणिसाची अपूर्व कामगिरी.
२. इंग्रज आरमारावर धुळपाचा विजय ( ८-४-१७८३ ).
३. फ्रेंच नौकायोद्धा सफ्रां ( १७८२ फे.–१७८३ सेप्टें. )
४. इंग्रज फ्रेंचांच्या राजकारणांत नानामहादजींचा विरोध.

*  *  *  *

**१. युद्धांतील नाना फडणिसाची अपूर्व कामगिरी.**—नारायणराव पेशव्याच्या खुनानंतर राघोबा इंग्रजांस जाऊन मिळाला व त्यामुळें उपस्थित झालेल्या इंग्रज मराठ्यांच्या सप्तवार्षिक युद्धप्रसंगांत मराठयांच्या बाजूस भांडाभांडी, अव्यवस्था, ढिलाई वगैरे प्रकार कितीही झाले असले, तरी तशाच तोडीचे प्रकार इंग्रजांच्या बाजूसही कांहीं थोडे झाले नाहींत; व सात वर्षें अनेक शत्रूंशीं ही जी टक्कर मराठयांनीं मारिली, ती त्यांस एकंदरींत अत्यंत भूषणावह आहे. हॉर्नबी, हेस्टिंग्स, मॉस्टिन, गॉडर्ड यांच्यासारखे कारस्थानी पुरुष जसे इंग्रजांच्या बाजूस प्रकट झाले, तसेच नाना, बापू, महादजी, हरिपंत, परशुरामभाऊ, भोसले बंधू साबाजी व मुधोजी, तुकोजी होळकर, गणेशपंत बेहेरे, देवाजीपंत चोरघोडे, कृष्णराव काळे, बिनीवाले, पानसे, आठवले इत्यादि किती तरी मुत्सद्दी व शिपाई मराठयांचे बाजूस झळकले. रामचंद्र गणेश कानडे व इष्टुर फांकडे या दोघांनीं आपापल्या राष्ट्रांकरितां रणांगणावर प्राण अर्पण केले. सर्वांनीं कसून प्रयत्न केला म्हणूनच या प्राणघातक संकटांतून मराठी राज्याचा बचाव झाला. माधवरावासारखा थोर पेशवा दिवंगत झाल्यावर खुनी राघोबास राज्यपद विटाळण्याची संधि न देतां, नानाप्रकारच्या संकटांतून, नाना युक्त्यांनीं व कारस्थानांनीं नानाफडणिसानें राज्याचा बचाव केला आणि इभ्रत कायम राखिली, हीच त्याची सर्वांत मोठी कामगिरी असून, 'खूप शर्तीनें राज्य राखिलें'

या गीतानें अद्यापि ती महाराष्ट्रांत सर्वतोमुखीं वसत आहे. मराठ्यांच्या या वेळच्या थोर कर्तबगारीचें महत्त्व अनेक कारणांनीं लोपून गेलें आहे. नारायणरावाच्या वधानें मराठी राज्यावर केवढें अरिष्ट कोसळलें याची सहसा कोणास कल्पना नाहीं. प्रचारांतील पुस्तकांत इंग्रजांच्या लढायांचीं वर्णनें भरपूर असून त्यांत पानिपतानंतर मराठ्यांच्या कर्तबगारीचें नांव सुद्धां ऐकूं येत नाहीं.

पानिपतावर घडून आलेला मराठे दुराणींचा झगडा अत्यंत तीव्र व ऐतिहासिक दृष्ट्या अपूर्व समजला जातो. परंतु इंग्रज मराठ्यांच्या या युद्धाशीं त्या प्रसंगाची तुलना केली तर अनेक बाबतींत पानिपतचा प्रसंग अगदींच फिक्का पडेल. एका युद्धनीतीच्या पलीकडे पानिपतच्या प्रसंगांत दुसऱ्या डावपेंचांची गुंतागुंत नव्हती. पण इंग्रज मराठ्यांच्या युद्धांत नानाविध पक्ष, भिन्नभिन्न कावे, लहान मोठ्या सत्ताधीशांचे लष्करी व मुत्सद्देगिरीचे डावपेंच वगैरे गोष्टी लक्षांत आणिल्या तर इतिहासाभ्यासकांस हा विषय पानिपताहून अनेकपटींनीं महत्त्वाचा वाटेल. पानिपताचें रणक्षेत्र दिल्ली कुंजपुऱ्याच्या दरम्यान केवळ पाऊणशें मैलांच्या टापूंत मर्यादित होतें. परंतु इंग्रज मराठ्यांच्या या युद्धानें देशाच्या चारही दिशा हालवून सोडल्या होत्या. देशांतील कोणताही सत्ताधीश, इच्छा असली तरी, त्यापासून अलिप्त राहूं शकला नाहीं. इंग्रज, फ्रेंच, पोर्तुगीज, वलंदेज वगैरे पाश्चात्य राष्ट्रें सुद्धां त्यांत गोंवलीं गेलीं. सावकार व मुत्सद्दी, प्राच्य व पाश्चात्य सेनानी, अशा सर्व पेशांची मंडळी या युद्धांत अडकली गेली. देशांत फौजांच्या संचारानें व बंडखोरांच्या हालचालींनीं कैक वर्षें सर्वत्र अस्वस्थता व अशांतता पसरून राहिली. शस्त्रास्त्रांचे नवीन कारखाने निघाले. मराठ्यांच्या गनिमी पद्धतीची आणि पाश्चात्य कवाइतीची चढाओढ ठिकठिकाणीं प्रदर्शित झाली. पळापळीचे कावे किंवा तुंबळ रणसंग्राम शेंकडोंनीं मोजण्याइतके घडले; कित्येक प्रसिद्ध पुरुषांना रणांगणावर देह ठेवावे लागले; कित्येकांस आपल्या अंगची करामत दाखविण्यास संधि सांपडली. पॅरिस लंडन पावेतों हिंदी वकिलांनीं प्रयाण केलें. इंग्रज फ्रेंच बादशहांस इकडून अनेक खलिते प्रविष्ट झाले. शेवटच्या तहाच्या वाटाघाटी सुद्धां अलीकडील महायुद्धाच्या वाटाघाटी सारख्याच हुमरीतुमरीच्या पण अनिश्चित्त परिणामांच्या झाल्या. सारांश, हिंदुस्थानच्या इतिहासांत इंग्रज मराठ्यांचा हा दीर्घ कालीन झगडा अत्यंत महत्त्वाचा गणला जाण्यास पात्र असतां, सामान्यतः त्याजकडे अभ्यासकांचें लक्ष अद्यापि वेधलेलें नाहीं.

पानिपतासारखें अद्भुत कथानक या युद्धांत दिसत नसल्यामुळें, आणि आजपावेतों त्यासंबंधानें वाचकांची भिस्त बहुधा इंग्रज लेखकांवर असल्यामुळें, इंग्रजांच्या प्रत्येक कारवाईस मराठ्यांनीं जबाब कसा दिला, शहास शह व डावास डाव लढवून इंग्रजांस कसें टेंकीस आणिलें, याची यथायोग्य हकीकत पुराव्यानिशीं अद्यापि पुढें आलेली नाहीं. सामान्यतः या युद्धांत मराठेच हरले अशी भावना होते ती चुकीची आहे. पुढील राजकारणांत नानाच्या कितीही चुका आपणांस दाखवितां आल्या, किंवा मागाहून आपण त्यास कितीहि दोष दिले, तरी वरील सात वर्षांच्या या युद्धांत आंवळ्यांची मोट बांधून केवळ अकलेच्या जोरावर जी राष्ट्रसेवा नानानें केली, ती महाराष्ट्रास सदैव अभिमानास्पदच वाटेल. त्यानें शेंकडों, हजारों माणसांना या राष्ट्र-सेवेंत राबविलें. नाना वचनाचा सच्चा; लबाडीचें किंवा खोटें असें त्याचें एकही कृत्य दाखवितां येणें शक्य नाहीं. 'श्रीमंत नाना एकवचनी आहेत. पाहिले कोणाशीं दोस्ती करणार नाहींत, परंतु दोस्ती जाल्यावर अंतर देणार नाहींत. राजश्री हरिपंत तात्यासही दुसरें न वळखावें. शरीर दोन परंतु चित्त एक. यांत कांहीं दुसरा विचार नाहीं, व रावरास्ते वगैरे सरदारांस यांच्या मर्जीशिवाय दुसरें कांहीं एक बोलावयास सामर्थ्य नाहीं. ये गोष्टीविषयीं लाटसाहेबांनीं पुरती खातरजमा असों द्यावी.'* असा सेवकरामानें रोख जबाब कॉर्नवॉलिस यास दिला. हेस्टिंग्स, फ्रान्सिस, हॉर्नबी वगैरेंचे वितंडवाद, मद्रासच्या कारभारांतील पंधरा वर्षे चाललेली बाचाबाची व गव्हर्नरांस बंदींत टाकण्याचे किंवा बडतर्फ करण्याचे प्रयत्न, नंदकुमार, चेतसिंग, अयोध्येच्या बेगमा इत्यादिकांसंबंधानें इंग्रजांचीं किळसवाणीं प्रकरणें व इंग्रजी कारभाराचे लपंडाव, हे जोंपर्यंत केवळ बर्कच्या भाषणांतच नव्हे, तर हेस्टिंग्सच्या छापील पत्रव्यवहारांत किंवा फॉरेस्टनें छापलेल्या परराष्ट्रीय कागदांच्या तीन लठ्ठ ग्रंथांत कागदावर नमूद आहेत, तोंपर्यंत राजनीतीच्या क्षेत्रांत मराठे थोर कीं इंग्रज थोर या प्रश्नाचें उत्तर कागदच बोलतील. आणि तशा प्रकारचे उभय पक्षांकडचे बरेचसे मासले वर प्रसंगोपात्त येऊनही गेले आहेत. एकोणिसाव्या शतकांत आम्ही इंग्रजांचे अंकित झालों. या पुराव्या-

* प. द. म. व. पृ. १०७.

वरून अठराव्या शतकांतील घडामोडींचा निर्णय करणें बरोबर नाहीं. केवळ इंग्रज शिकवतील तेवढेंच ग्रहण करून तृप्तीचे ढेंकर देणें आपणांस शोभणार नाहीं. जे शेंकडों, हजारों कागद-इंग्रजी, मराठी व फारसी-उपलब्ध आहेत, त्यांचा पूर्णपणें व सहृदयत्वानें अभ्यास करून मग आपलें मत आपण बनविलें पाहिजे.

नानाच्या कर्तबगारीचा हा अभिप्राय हल्लीं नवीन बनविला जात आहे असें नाहीं. तो त्या वेळच्या कागदांत ठिकठिकाणीं व्यक्त. झालेला दिसतो लक्ष्मण संभाजी नांवाचा गृहस्थ ता. १९-८-१७८९ रोजीं जयपुराहून लिहितोः— 'नारायणराव साहेब गेल्यावर मागें घरचा आणि बाहेरचा बखेडा ऐसा पडला कीं, राज्य राहत नाहीं, ऐसेंच सर्वांस दिसोन आलें. परंतु समर्थ प्रतापी प्रसंगीं निघाले, त्यांनीं बिघडलें राज्य ठिकाणास आणिलें. श्रीमंत बाल्यावस्थेंत; रघुनाथराव स्वतः धनी, केलेले पुरुष, त्यांसी विरुद्ध करून त्यांची एकवाक्यता लावून घेणें व प्रजेचें पाळण उत्तम प्रकारें करणें, हीं कामें दुसरे कोणाचीं नाहींत, ऐशा समर्थास कोणतीही गोष्ट अगाध नाहीं. ऐसीं भाषणें जयपुर दरबारांत होत आहेत.' ( ऐ. टि. ४. ३२.) एकंदरींत या प्रचंड युद्धकालांत नानाच्या कारस्थानांची व्याप्ति सर्व देशभर होती. कोणाच्या दौलता हिंदुस्थानांत सुरक्षित नाहींत हा समज सार्वत्रिक व सर्वतोमुखीं होता. बालपेशव्याच्या लग्नप्रसंगानें निरनिराळे सत्ताधीश एकत्र जमवून इंग्रजांच्या संकटाचा कायम परिहार करण्याचा विचार नानास सुचलेला होता. एकवार इंग्रजांचा कसाबसा प्रतिकार झाला, पण फिरून त्यांनीं उपद्रव दिल्यास पुढें काय करावयाचें, याची उघड वाटाघाट नाना-महादजीसारख्यांनीं करणें त्यांचें कर्तव्य होतें. यासाठीं सर्व सत्ताधीशांनीं राष्ट्रसंरक्षक संघ स्थापणें जरूर होतें. या संघानें पुढील राजकारण ठरवून, तदनुसार आपली युद्धपद्धति सुधारणें व कामगिरी वांटून घेणें हीं कलमें मुख्य होतीं. पण असें केल्यानें प्रत्येकाच्या स्वेच्छाचारास आळा पडला असता, तें कोणासही नको होतें. सालबाईच्या तहाचे प्रसंगीं नाना उत्तरेंत गेला नाहीं, व महादजी दक्षिणेंत आला नाहीं; आणि त्यांनीं एकत्र भेटून एखादा उपक्रम केला असता तरी इतरांनीं तो मानला असता कीं नाहीं याचाही संशयच आहे. एकवार आलेल्या अनुभवाचा उपयोग पुढील कामांत करून घेण्याचा प्रचार आपल्याकडे

फारसा नाहीं. दादा दिवंगत झाल्यावर बाजीरावाचा चिडीस गेलेला दांडा शिल्लक राहिल्यानें, तो गोतास काळ होईल, असा कयास या युद्धाच्या अनुभवानें त्या वेळीं बांधणें नानासारख्या चाणाक्ष मुत्सद्यास अशक्य नव्हतें.

मराठ्यांचे निरनिराळे सरदार निरनिराळ्या ठिकाणीं आपापल्या तंत्रानें एकमेकांविरुद्ध वागत, यामुळें मराठी राज्याचें बळ नेहमींच कमी होई, असें सामान्यतः समजण्यांत येतें. जिंजीपासून अटकेपर्यंत सर्व देशभर मराठ्यांचा सारखा धुमाकूळ माजलेला, त्यास नियंत्रण म्हणून कांहीं नाहीं, अशा विस्कळित स्थितीनें जर एकंदर राज्याचें बळ कमी झालें असें म्हणावयाचें, तर कांहीं कांहीं प्रसंगीं अशा विस्कळित स्थितीमुळेंच त्यांचा बचावही झाला असें म्हणतां येतें. सुरतेंत गॉडर्ड गायकवाडास नरम करतो, तों कल्याणाजवळ पानसे बेहरे वगैरे सरदार मुंबईकरांस हटकतात; माळव्यांत महादजी एकास पायबंद देतो, तों भोसले कटकला शह लावतो, आणि होळकर खानदेशांत घुसतो. अशा रीतीनें निरनिराळ्या ठिकाणीं लढण्यांत इंग्रजांचा अगदीं दम निघून गेला. याच कारणास्तव पुढें पेशव्यांचें राज्य गेल्याबरोबर सर्वच मराठी राज्यें नाहींतशीं झालीं नाहींत. हेस्टिंग्ससारखा अत्यंत हिकमती व उपद्व्यापी पुरुष, पण तोही शेवटीं ठिकठिकाणच्या मराठ्यांस तोंड देण्याच्या कामांत अगदीं जेरीस येऊन ज्याच्या त्याच्याकडे तहाची याचना करूं लागला. मराठ्यांच्या अडचणींत इंग्रजांनीं ठाण्याचा किल्ला अचानक हस्तगत करून तो पचविण्यासाठीं जितके म्हणून उपाय केले तितके सर्व सपशेल फसले. प्रथम स. १७७५ च्या मार्चांत राघोबास घेऊन इंग्रज पुण्यावर येत होते, ती गोष्ट हरिपंतानें चालूं दिली नाहीं. नंतर अप्टननें केलेला तह मोडून त्यांनीं मोरोबाकडून कारस्थान करविलें तेंही सिद्धीस गेलें नाहीं. पुढें तळेगांवावर त्यांची पुरी फजिती उडाली पण तोही करार मोडून इंग्रज सेनापति गॉडर्ड छातीस हात लावून मराठ्यांच्या पाठीस लागला. त्यानें गुजरात जिंकिली व वसईचा किल्ला हस्तगत केला. तथापि त्यासही शेवटीं मराठ्यांपुढें नाक घांशींत तह करणें प्राप्त झालें. अशा अनेक प्रयत्नांचा एकसमयावच्छेदें विचार करणें बोधप्रद आहे.

इंग्रजांनीं मराठ्यांचा पाडाव करण्याकरितां मुद्दाम कळ काढून स. १७७५ त मराठ्यांशीं युद्ध सुरू केलें अशी वस्तुस्थिति असतां, त्या युद्धास लौकिकांत केवळ गृहकलहाचें स्वरूप इंग्रजांनीं मतलबानें दिलें. हेस्टिंग्स ही व्यक्ति

जितक्या प्रामुख्यानें या वेळच्या ऐतिहासिक रंगभूमीवर लोकांच्या नजरेपुढें पाहिजे, तितकी ती सामान्यतः येत नाहीं. या एकंदर प्रकरणांत दोन बिलंदर व्यक्ति एकमेकांवर कडी करून तीव्र स्पर्धेनें वर्तत होत्या, त्या महादजी व हेस्टिंग्स या होत. हे दोन पुरुष हिंदुस्थानचा भावी इतिहास बनवीत होते; जशास तशी युक्ति लढवून, मुत्सद्देगिरीनें किंवा लष्करी डावपेंचांनीं आपापला लाग सिद्धीस नेण्यांत या दोन व्यक्तींचे खेळ अत्यंत कौतुकास्पद व हल्लींच्या काळांत अस्सल कागदपत्रांवरून अभ्यसनीय आहेत. या खेळांत महादजीनें हेस्टिंग्सला साफ हरविलें, आणि महादजीशीं विरोध करण्यांत आपल्या राष्ट्राचें भारी नुकसान आहे असें हेस्टिंग्सनें आपल्या सर्व हस्तकांस वारंवार बजावून मग त्यानें सन १७८५ त स्वदेशीं प्रयाण केलें.

ज्याप्रमाणें संभाजी–राजारामांच्या वेळेस अनेकवार पराजय झाल्यावरही मराठ्यांनीं चिकाटी न सोडतां आपला उद्देश सिद्धीस नेला, तशाच तोडीचे प्रसंग या इंग्रजांबरोबरच्या युद्धांत पुनः पुनः आले असतां दरखेपेस नवीन युक्ति योजून नानानें मराठी राष्ट्राचें तेज समग्र हिंदुस्थानास दाखविलें. पानिपतावर पराभव झाल्यामुळें मराठ्यांस नवीन पाणी चढलें, त्याप्रमाणेंच वसई हातची गेल्यामुळें गॉडर्डाला नरम करण्यास त्यांस नवीन शक्ति प्राप्त झाली. वास्तविक अशा संकटकाळींच मराठ्यांचे पराक्रम जास्त उज्ज्वल दिसावयाचे, हा त्यांचा पूर्वक्रम याही युद्धांत वारंवार दिसून आला. अशा प्रकारें अखेरीस इंग्रजांवर मात करून सालबाईच्या तहांत राष्ट्राची पत राखली गेली याचें मुख्य श्रेय नानासच दिलें पाहिजे.

एकंदर सात वर्षांच्या या युद्धांत नानानें आपला वचक सर्वत्र यथायोग्य बसविला. त्यांतल्या त्यांत महादजीसारख्या कठिण पुरुषाकडून त्यानें राज्याची कामगिरी करून घेतली; रघुनाथरावासारख्या जहांबाज निगरगट्टास शरण येण्यास भाग पाडिलें; हेस्टिंग्स, हॉर्नबी, गॉडर्डसारख्यांस चीत केलें; मोरोबा, सखाराम बापूंस योग्य शासन केलें; रघूजी आंग्रे व रघूजी भोसले यांस मित्र बनविलें; खरगसिंग, महंमद इसफ, तुळ्या पवार, असल्या भयंकर गुन्हेगारांस देहांत शिक्षा ठोठावल्या; फत्तेसिंग व गोविंदराव गायकवाड यांचा आणि तुकोजी व अहल्याबाई यांचा शक्य तितका उपयोग करून होळकरशाहीचा

बचाव केला; हरिपंत फडके, कृष्णराव काळे, महादाजीपंत गुरुजी, रामशास्त्री, असल्या धवलयश सहाय्यकांचें नैतिक बळ राज्यास लाभविलें; परशुरामभाऊ, रामचंद्र गणेश, विसाजी कृष्ण, गणेश विश्वनाथ, भीमराव पानसे वगैरेंसारख्या रणशूर व कल्पक योद्ध्यांकडून स्वराज्याच्या लढाया लढविल्या; नारो शिवदेव सदाशिव दिनकर, बाबूराव वैद्य, आपाजीराम, बाबूराव आपटे, सेवकराम, कृष्णाजी नारायण जोशी यांच्यासारखे किती तरी राष्ट्रहितास जपणारे शेंकडों हस्तक ठिकठिकाणीं पेरून ठेविले; भोसल्यांची व गायकवाडांची दौलत तारिली; आणि मुख्यतः माधवरावाचा मृत्यु व नारायणरावाचा वध या दोन भयंकर आपत्तींच्या तडाख्यांतून मराठशाहीचा बचाव केला. या गोष्टी नानाच्या कर्तबगारीची साक्ष निरंतर पटवितील. हा सर्व भाग नानाच्या पूर्व कारभाराचा आहे; आणि तो निःसंशय उज्ज्वल आहे. त्याच्या उत्तर कारभारास सुरुवात झाल्यावर मराठमंडळाची भक्कम घटना त्याच्या हातून घडावी अशी अपेक्षा वाटूं लागते. राज्यांत स्वस्थता झाल्यावर छत्रपतींस बाहेर काढून त्यांच्या छत्राखालीं मराठमंडळाची नवीन रचना त्यानें केली नाहीं, पाश्चात्य युद्धपद्धति सर्रहा राज्यांत निर्माण केली नाहीं, पिढीजाद सरदार–जहागिरदार व इतर नोकर रुष्ट कां व त्यांचें मनोधारण कसें करतां येईल याचे उपाय योजले नाहींत, सर्व कारभार स्वतःच्या हातीं एकवटून एकंदर राज्याची इमारत एकखांबी केली, आणि इंग्रजांस दूर टेवण्याचे कायम इलाज स्वीकारले नाहींत, असे कित्येक आक्षेपही त्याच्या कारभारावर निःसंशय निघतात. परंतु सर्वगुणसंपन्न असा मानव कोण आहे ! अर्थात् जितकें या राष्ट्रपुरुषांनीं केलें, तितकेंच उपकारपूर्वक स्मरून भावी कर्तव्य आपण बजावलें पाहिजे.

अल्पावकाशांत नानानें आपला वचक सर्वत्र बसविला. सखारामबापू गेल्यावर कारभारांत त्याला नियंत्रण राहिलें नाहीं. 'गॉडर्डास घाट कसा चढूं दिलात ?' असा प्रश्न हरिपंतास व होळकरास विचारून त्यांजकडून नानानें चूक कबूल करविली. शिंद्यांच्या मदतीची दक्षिणेंत अपेक्षा न ठेवितां, सर्व मोहीम स्वतः चालवून इंग्रजांस नरम आणिलें, आणि पेशवाईची घडी माधवरावाच्या वेळेप्रमाणें बसवून दिली. हैदर, भोसले, गायकवाड, निजाम सर्व शरण येऊन पेशव्यांचें वर्चस्व कबूल करूं लागले, हें काम कांहीं थोडें नव्हे. त्यावर आक्षेप इतकाच निघतो कीं राज्याच्या भावी संरक्षणाची योग्य घटना

त्यास करितां आली नाहीं. तथापि टापटीप, कामाचा उरक, नियमितपणा, वचक व वचनावर विश्वास, हे नानाचे गुण शत्रुमित्रांस इतके मौलवान वाटत कीं सर्व राज्य नानापुढें चळचळां कांपत असे. स्वतः रणशूर नसतां त्यानें एवढें काम केलें. महादजीसारख्याला सुद्धां नानाचा वचक बाळगावा लागला, त्याला काढून टाकणें महादजीस शक्य किंवा युक्त वाटलें नाहीं. उलट नानानेंच महादजीस मर्यादेंत ठेवून राज्याचा मुख्य आधार बनविला, हा प्रभाव लहान नव्हे. 'हें शिवशाही राज्य आहे, केवळ यवनाक्रांत होतें असें नाहीं,' (ख. २५९३) अशी भावना ज्यानें उत्पन्न केली, त्याचें कर्तृत्व केवढें असेल!

नाना-महादजींचा पत्रव्यवहार उभयतांच्या स्वभावांतील खांचाखोंचा उत्कृष्ट दाखवितो. ज्या कांहीं गोष्टी प्रत्यक्ष महादजीस लिहिल्यापासून त्यास वाईट वाटेल, त्या तो नारो शिवदेव किंवा दुसरे कोणास लिही. ते सुद्धां महादजीची लहर पाहून तीं पत्रें योग्य वाटल्यास महादजीस दाखवीत. ता.१७-५-१७८१रोजीं नाना पाटीलबावास लिहितो. 'मसलतीचे कित्येक विचार नारो शिवदेव यांस लिहिले आहेत. सर्व समजोन पुर्तेपणें मनन करून पोक्त विचारें उत्तरें यावीं. दौलतीचें सर्व ओझें आपल्यावर आहे. मसलती तर तिडणीच्या दिसतात. तजवीज करून उलगडल्या पाहिजेत.' (का. सं. प. या. २१६.) त्याच सुमारास ता. ५-५-१७८१ चें नानाचें पत्र पांडुरंगपंतास गेलें तें असें:—'येथून पत्रें पाठवीत असतों त्यांत पाटीलबावांचे चित्तास वाईट वाटतें. त्यास पेशजी नारोपंतास लिहिलें होतें कीं पाटीलबावाचे चित्तास वाईट वाटावयाजोगें तर कांहीं लिहीत नाहीं, तथापि त्यांच्या समजेस एखादें वाईट वाटतें. त्यास पेशजी नारोपंतास लिहिलें होतें कीं पाटीलबावांचे चित्तास वाईट वाटावयाजोगें असेल ती पुरवणी दाखवूं नये, मजकूरच तोंडानें बोलत जावा. असें असतां एखादे वेळेस पत्रें दाखविल्यावर वाईट वाटोन उदासीनतेचे भाव तुमच्या लिहिण्यांत कां येतात? त्यांस संतोष वाटे असा मजकूरच तोंडानें बोलत जावा.' 'इकडील पत्रांचीं उत्तरें मागितलीं, त्याचें उत्तर पाटीलबावांनीं केलें कीं सांप्रत आम्ही कांहीं लिहीत नाहीं. लयावयाजोगा दिवस आणील ते दिवशीं लिहूं.' त्यावर पांडुरंगपंतांनीं बावांस सांगितलें, कीं 'आपले घरीं पत्र लिहिण्यास संकोच असूं नये. जें बरें वाईट होईल तें इकडून आम्ही लिहीत असतों, तिकडून त्यांनींही लिहावें. येविशीं दुसरा अर्थ चित्तास

आणूंच नये.' (का. सं. प. या. २७४.) "शुक्रवारीं दोन प्रहरां पाटीलबावांजवळ बसलों होतों. समय निद्रेचा, तेव्हां लोकांस बाहेर घालवून बोलूं लागले कीं नानाशीं भाऊपणा झाला, यामुळें बरें वाईट तें दोघांचें म्हणून बोलावें लागतें. त्यामुळें नानाचे चित्तांत काय कल्पना येईल कळेना. इतकें बोलून उगेच राहिले. त्यावर मी (सदाशिव दिनकर) विनंति केली, कीं काय आज्ञा करणें ती करावी. ज्यापक्षीं भाऊपणामुळें बरें वाईट तें दोघांचें, असें अंतःकरणीं दृढ आहे, त्यापक्षीं ऐकलें वर्तमान कां बोलूं नये? त्यावरून हास्यवदन करून उगीच राहिले. पुढें सायंकाळीं आबा चिटणीसांनीं चिठ्ठी काढून मला दाखविली. कोणी भिक्षुकानें बालबोध अक्षरानें बावांस सांज्ञिक सूचना लिहिली होती जे, आपण सिरोंजवर इंग्रजांचें पारिपत्य केल्याचीं वर्तमानें आलीं त्याचा संतोष हकारपूर्वक व माहिमाजीस (हरिपंतास व नानास) नाहीं. बाह्यात्कारें संतोष मानीत असतात, परंतु आंतून उभयतांचा विचार होतो जे, इकडील पलटणांचें पारिपत्य करून त्रिंबकशेटीस (?) शिशुसंन्निध (बाल पेशव्याजवळ) ठेवून दुकानाचा कारभार आपण करावा. सोबती येऊन पोंचण्यापूर्वींच गुंता उरकून टाकावा. ऐशास ये समयीं कोणेही प्रकारें आपलें (पाटीलबावांचें) येणें देशीं व्हावें हें उत्तम." याप्रमाणें चिठ्ठींत मजकूर लिहिला होता. (ग्वा. ४.३३.) अशा प्रकारें नानाप्रकारचे खटपटी लोक दोनही बाजूंकडे सदैव असून नाना महादजींत वितुष्ट पाडीत असत, हें लक्षांत ठेविलें पाहिजे.

वाईट माणसांच्या संगतीनें गायकवाड किंवा तुकोजी होळकर फसले असें म्हणतात, पण त्यांना चांगलीं माणसें कां सापडूं नयेत? कर्तबगारीचें लक्षण हेंच कीं चांगल्याचा उत्कर्ष व्हावा व वाइटास अपकर्षच प्राप्त व्हावा. या दृष्टीनें पहातां नाना व महादजी यांची योग्यता एकमेकांस पूरक होती. इभ्रत, धिमेपणा, युद्धकला या गोष्टी महादजीजवळ होत्या; तर हिशेबाची व आयव्ययाची चोख व्यवस्था, कामाचा उरक, नियमितपणा व टापटीप हे जे गुण नानाचे अंगीं होते, ते महादजींत नव्हते. या दोघांचा समुच्चय कारभारांत होऊन एकमेकांचे गुणावगुण भरून निघतील अशी योजना कारभारांत झाली असती तर मराठी राज्याचा नाश इतक्या लवकर झाला नसता, असें या इतर प्रकरणांवरून वाटल्याशिवाय राहत नाहीं. बाजीरावाच्या राजवटींत सुद्धां माणसें कमी नव्हतीं, पण त्यांचा उपयोग करून घेणारा धनी

कोणी नव्हता. शिवाजी, शाहू, माधवराव, नाना फडणीस यांच्याच वेळेस तेवढीं चांगलीं माणसें होतीं, असें म्हणतां येत नाहीं. माणसांचा उपयोग करून घेण्याची कला त्यांस होती, एवढाच फरक. या दृष्टीनें मराठशाहींत दर पंचवीस वर्षांत कोणकोण नवीन व्यक्ती पुढें आल्या, त्याचा आढावा काढणें अत्यंत बोधप्रद होईल.

कामाचा उरक असलेला कोणताही थोर पुरुष घेतला तरी स्वतःच्या भरंवशाचे अनेक साहाय्यक त्याला बनवावे लागतात; आणि असे लोक एक एक व्यवहार इभ्रतीनें व स्वतःच्या जबाबदारीवर उरकणारे ज्या राज्यांत असतात, तेंच राज्य चांगलें चालतें. हल्लीं जसे इंग्रजांचे अंमलदार जगभर पसरलेले आहेत, तशाच तऱ्हेचे अनेक लायक इसम नाना व महादजी या दोघांच्याही जवळ तयार झाले. अशा साह्यकर्त्यांचें पाठबळ त्यांस होतें, म्हणूनच त्यांच्या हातून राज्याचीं इतकीं कामें झालीं. कृष्णराव काळे व हरिपंत फडके हे दोन साह्यकर्ते पुरुष मोठ्या इभ्रतीचे, निःस्वार्थानें पेशवाईची सेवा करणारे व मुख्यतः गोड स्वभावानें आणि युक्तीच्या तडजोडीनें सर्वांस सांभाळून घेणारे असे नानास लाभले; व त्यानेंही त्यांस सांभाळिलें, म्हणूनच त्याचा कारभार इतका यशस्वी झाला. त्यांतल्या त्यांत परराष्ट्रीय मुत्सद्देगिरीची बाजू कृष्णराव बल्लाळानें व लष्करी बाजू हरिपंतानें राखिली. माधवरावाचे वेळेस जसे गोविंदपंत लिमये व नारो आपाजी, तसेच पुढें हे गृहस्थ होते. महादाजी बल्लाळ गुरुजीही अडचणीच्या प्रसंगीं नानाचा केवळ उजवा हात होता. महादजीसारख्यांस वळविण्याचें कठिण काम गुरुजीनेंच करावें. सदाशिव दिनकर, नारो शिवदेव वगैरे नानाचे वकील पुढें तसेच इभ्रतीचे निपजले. या सर्वांच्या भरपूर हकीकती मिळाल्यास इतिहासांतील अनेक खिंडारें भरून येतील.

**२. इंग्रज आरमारावर धुळपाचा विजय,** (८-४-१७८३).—सालबाईचा तह पुरा होतो न होतो, इतक्यांत पश्चिम किनाऱ्यावर रत्नागिरीजवळ इंग्रजांच्या रेंजर नामक लढाऊ जहाजावर आनंदराव धुळपानें अकस्मात् झडप घालून, पुष्कळांस ठार मारून तें जहाज पकडून विजयदुर्गास नेलें, या प्रसंगांत त्यानें जी मर्दुमकी केली ती मराठ्यांच्या इतिहासांत चिरस्मरणीय झाली पाहिजे. या कृत्यानें तह बिघडतो कीं काय अशी सुद्धां कांहीं वेळ खळबळ उत्पन्न झाली होती. जिंकिलेला मुलूख इंग्रजांनीं दोन महिन्यांत परत सोंपून द्यावा असें तहांत

कलम असून, ते दोन महिने २४ एप्रिल रोजीं पुरे व्हावयाचे, त्यापूर्वीच हा अद्भुत बनाव बनून आला. दर्यावरील युद्धांत इंग्रजांचें नैपुण्य तर प्रख्यातच आहे, पण या प्रसंगांत मराठ्यांचें शौर्य पाहून इंग्रजांनीं सुद्धां तोंडांत बोटें घातलीं. हें इंग्रज अंमलदारानें लिहून पाठविलेल्या वर्णनांतच सिद्ध आहे. या युद्धाची हकीकत त्या वेळच्या पत्रांत आहे ती अशीः—'राजश्री आनंदराव धुळप गोसावी यांस स्ने० माधवराव नारायणराव प्रधान आशीर्वाद. सु॥ सलास संमानीन मया व अलफ. तुम्ही छ ७ जमादिलावलचें विनंतिपत्र पाठविलें तें प्रविष्ट जाहलें. आम्ही आरमाराची तयारी करून गोव्यापासून रत्नागिरीचे सुमारें बाहेर फिरत असतां छ ५ जमादिलावलीं ( ८ एप्रिल ) इंग्रजी लढवई मुधोशी बोट ( रेंजर ) व बतेला एक व शिबाड तीन ऐसे पांच दागिने जंगी सरंजाम व दारूगोळा व गाडद भरून जनराल मॅक्लोड व आणखी सात कप्तान पालखीवाले कर्नाटकांत हैदरखानाकडील प्रांत सोडविला त्याच्या बंदोबस्तास मुंबईहून कालिकोटास जात होते, त्यांची गांठ रत्नागिरिनजीक पडोन प्रातःकालचे प्रहर दिवसापासून त्यांची आमची लढाई सुरू होऊन परस्पर तोफांची मारगीर जाहली. संध्याकाळच्या प्रहर दिवसापर्यंत लढाई होत असतां आयास नये. त्यांचा लढावयाचा जोम भारी, मारगिरीनें तरांडे पाडाव होत नाहींत असें जाणून, सर्व लोकांचा एक जथ करून धण्याचे पायांचें स्मरण करून तरांड्यांस अडावणी केली. ते समयीं रेसगिरी व बरकंदाजीच्या मारगिरीची सीमाच केली. सरकारचे बरे बरे माणूस आठ असामी ठार जाले. तरांड्यांवर पाय न लगे, तेव्हां वरकड लोकांस इरे पडोन ते तरांडयांवर चढले. त्या गर्दीत पाऊणशें माणूस जखमी जालें. हत्यारांस हत्यारें मिळाल्यावर त्यांजकडील एक कप्तान व पंचवीस असामी ठार जाले. तरांडे पाडाव केले असतां बतेल्यावरील लोक कौल न घेतां बतेला लढविला. त्याजवर मारागिरी करून अडावणीस धरून पाडाव केला. मातबर लढाई होऊन पांचही दागिने पाडाव करून बंदरांत आलों. खासा जनरलास तीन जखमा आहेत. वरकडही लोक जखमी आहेत. तीस पसतीस गोरे व इतर व चारशें पर्यंत माणूस होईल. आरमारी लोक जखमी आहेत, त्यांत भारी जखमा आहेत, ते वांचतां कठीण आहे. सारांश, लोकांनीं प्राणांची आस्था न धरितां, टोपीकरांचे लढवई तरांड्यांची अडावणी केली. सर्फराजी करणार धनी आहेत, म्हणोन विस्तारें

लिहिलें तें विदित जालें. ऐशास तुम्ही टोपीकरांचा दारूचा मार भारी तितका सोसून जनराल व कपितान सुद्धां तरांडे पाडाव करून आणिले. शाबास तुमची व लोकांची. इंग्रजही आपणांस शिपाई म्हणवितो, त्यापेक्षां सरकारचे लोकांनीं मर्दुमी फार चांगली केली. टोपीकरांवर तुम्ही आपली सलाबत बसविली, फार संतोष जाला. सरकारचे आठ असामी सरदार ठार जाले आणि लोक सरकारकामास आले, त्यांचे मुलांचें चालविलें जाईल. जखमी लोकांची बरदास्त चांगली ठेवून जखमांस खर्च लागेल तो चौकशीनें लावून निगादास्त चांगली करणें. इंग्रजांकडील जखमी असतील त्यांस कार्याकारण खर्च लागेल तो लावणें. तुम्हांस बहुमान, खासगीचा पोषाख व कंठी पाठविली आहे. लोकांनीं मर्दुमी केली त्यांची याद तुमचे विचारें नांवनिशीवार आकारून पाठविणें, समजोन बक्षीस देविलें जाईल. त्यांचा कागद मुंबईस जाऊं द्यावयाचा नाहीं. छ २२ जमादिलावल.' ( २५ एप्रिल स. १७८३ ).

रेंजर जहाजावर बारा तोफा असून त्याचा मुख्य ले० प्रुएन हा कंपनीचा नोकर असून, जनरल मॅक्लोड इंग्रज राजाचा सेनापति आपल्या मंडळींसह त्या जहाजांत कालिकोटास जात होता. कंपनीचे अंमलदारांस राजाचे अंमलदार सदैव चुरसीनें हिणवीत असत. अशा चुरसीचीं बोलणीं प्रुएन व मॅक्लोड यांचीं चालत असतांच त्यांची गांठ धुळपाशीं पडली; तेव्हां निमूटपणें स्वाधीन होण्याऐवजीं, कंपनीचे लोक कसे लढतात हें मॅक्लोडला दाखविण्यासाठींच प्रुएननें धुळपाशीं उगाच जिवावरचा सामना केला. लढाई दोन प्रहर पावेतों मोठया शर्तीची झाली. मराठयांकडून इंग्रजांवर गोळ्यांचा वर्षाव चालू राहून शेकडों मराठे त्यांच्या अंगावर हातघाईनें तुटून पडले. इंग्रजांच्या जहाजावर प्रेतांचे ढीग व रक्ताचे सडे पसरले. शेवटीं जे कांहीं जिवंत होते त्यांचा प्राण वांचविण्याच्या बुद्धीनें प्रुएन बावटा उतरून धुळपाचे स्वाधीन झाला. तेव्हां इंग्रज जहाजांची माळ दोरीनें आपल्या जहाजांस बांधून धुळप रात्रीं नऊ वाजतां विजयदुर्गचे बंदरांत दाखल झाला. धुळपांच्या जहाजांची नांवानिशी छापलेली पहाण्यालायक आहे. वरील युद्धांत नारायणपाल, माधवपाल व रामप्रसाद या तीन जहाजांचा भाग होता. इंग्रजांचे पांच अंमलदार ठार व २३ जखमी झाले. मराठ्यांचे १६ इसम मेले व ४८ जखमी झाले. अशी हकीगत प्रुएनच्या पत्रांत आहे.

उभय पक्षीं तह झाला असतां धुळपांनीं इंग्रजांवर चढाई केली याबद्दल पुढें इंग्रजांच्या तक्रारी बरेच दिवस चालू राहिल्या आणि तह फिसकटतो कीं काय अशी सुद्धां कांहीं काळ भीति पडली. 'धुळपांनीं तरांड्यांवरील सरदार व कांहीं लोक दस्त केले ते तहनामा जाला त्या पक्षीं सोडून द्यावयाचे. त्यांत मुंबईकरांचेंही पत्र आलें. त्याजवरून तेव्हांच धुळपास लिहून तरांडीं व लोक सोडून दिले. येविशीं पाटीलबावांस पत्र लिहिलें आहे,' असें नाना फडणीस कळवितो. धुळपास ता. ९-५-१७८३ ची पेशव्यांची आज्ञा गेली, कीं 'इंग्रजी बोट एक व बतेले व शिबर्डी मिळोन पांच दागिने सामान सुद्धां मुंबईहून जात असतां तुम्हीं पाडाव करून आणिलीं आहेत, त्यास ते पांच दागिने सामान लोक सुद्धां सोडून द्यावयाची आज्ञा केली आहे त्याप्रमाणें सोडून देणें.' म्हणजे एक महिन्याचे आंत इंग्रजी जहाजें परत देण्यांत आलीं. धुळपानें हस्तगत केलेलें सर्व परत करून नानानें इंग्रजांची समजूत काढिली, तेव्हां इंग्रजांनींही ठाणें म्हणजे साष्टी खेरीज करून वसई अंमदाबाद वगैरे सर्व मराठ्यांचीं ठाणीं परत त्यांच्या हवालीं केलीं. सरकारांत मुंबईकरांचें पत्र आलें, कीं सरकारची आमची दोस्ती त्यापक्षीं तरांडीं वरील सरदार व लोक सुद्धां सोडून द्यावीं, त्यावरून धुळपास लिहून सोडून देवविलीं. तरांड्यांवरील इंग्रजांनीं लढाई मातबर दिली. धुळपांनींही चांगलीच लढाई देऊन दस्त केलें. मुंबईकरांनीं इंद्रसेनास वर्तमान लिहून पाठविलें. त्यानें पाटीलबावांस सांगितलें, त्यावरून पाटीलबावांनीं पुण्यास लिहिलें. धुळपांस तह जाल्याचें वर्तमान समुद्रांत कळलें नव्हतें म्हणून हा प्रकार बनला. मुंबईस लोक पावले म्हणून मुंबईकरांचें सरकारांत पत्र आलें. ( १६-६-१७८३ .)

इंग्रजांशीं आरमारी युद्ध करण्याची तयारी मराठ्यांची कशी होती हें वरील हकीकतींत दिसून येतें. आनंदराव धुळप स. १७९५ त मरण पावला. त्याचा एक सुंदर पोवाडा ऐतिहासिक पोवाड्यांत छापलेला असून त्यांत वरील रेंजरच्या युद्धाचें वर्णन आहे. $

---

$ Forrest Mar. S. Vol. I Intr XXIII; वा. इ. वृ. १८३३ पृ. १२०; खरे २६७९; ऐ. जु. गो. २-२८; का. सं. प. या. २१०–२११ व १६५; दळवी म. कु. इ. ३, पृ. ७८, ७९; ग्वा. ३-४७; स. मा. रो. ५१५.

इंग्रजांशीं घाईनें तह करूं नये, एकवार त्यांची संपूर्ण खोड मोडावी, असें पुणेंकरांस वाटण्यास आणखी एक महत्त्वाचें कारण या वेळीं घडलें, त्याची हकीकत सांगितल्याशिवाय नाना-महादजींचा विरोध नीट लक्षांत येणार नाहीं. तें कारण म्हणजे फ्रेंच आरमाराचें इकडे आगमन होय. इंग्रज-फ्रेंचांचें युद्ध युरोपांत या वेळीं निकरावर येऊन हिंदुस्थानांतील इंग्रजांचें वजन नाहींसें केल्याशिवाय त्यांचा युरोपांत पाडाव होणें शक्य नाहीं अशी फ्रेंच सरकाराची खात्री होऊन, त्यांनीं आपला उत्कृष्ट नौकायोद्धा सफ्रां यास हिंदुस्थानांत रवाना केलें. त्याचे पराक्रम सामान्यतः इकडील इतिहासांत नमूद नाहींत, म्हणून इतिहासपूर्तिस्तव ते थोडे तपशीलवार देणें जरूर आहे.

**३. फ्रेंच नौकायोद्धा सफ्रां**§ ( स. १७८२ फेब्रुवारी–स. १७८३ सेप्टेंबर ).—सफ्रांचा जन्म ता.१३-७-१७२६ रोजीं होऊन सतराव्या वर्षी त्यानें फ्रेंच आरमारांत नोकरी धरिली. सप्तवार्षिक युद्धांत त्यानें अनेक नामांकित कृत्यें केल्यावरून त्याची बढती झाली आणि युरोपांत त्याचें नांव गाजूं लागलें. इंग्रजांच्या वसाहतींनीं अमेरिकेंत मायभूमीशीं युद्ध चालविलें, तेव्हां वसाहतींच्या साह्यास फ्रेंच सरकारानें सफ्रां यास तिकडे पाठविलें. तिकडेही युक्ति व साहस या नौकायुद्धाच्या दोन गुणांत त्याची प्रतिष्ठा एवढी वाढली कीं, अमेरिकेंतून परत येतांच त्याची नेमणूक हिंदुस्थानच्या कामगिरीवर झाली. आरमाराची सिद्धता करून ता.२२-३-१७८१ रोजीं तो फ्रेंच किनारा सोडून निघाला. त्या आरमाराचे रखवालीखालीं बरीचशी फ्रेंच फौज सुद्धां त्याजबरोबर इकडे येण्यास निघाली. या फौजेचें आधिपत्य बुसीकडे होतें. मात्र बुसी स्वतः मागाहून बऱ्याच काळानें इकडे दाखल झाला. फ्रेंच आरमार निघाल्याची वार्ता इंग्लंडांत कळून इंग्रजांनींही आपलीं लढाऊ जहाजें कमोडोर जॉन्स्टनचे हाताखालीं देऊन लगबगीनें इकडे पाठविलीं. रस्त्यांत स.१७८१ चे एप्रिल महिन्यांत या दोन आरमारांची केपव्हर्ड बेटांजवळ थोडीशी चकमक उडाली.

त्या वेळीं फ्रान्सचे ताब्यांत हिंदुस्थानच्या किनाऱ्यावर सोयीचें मजबूद ठिकाण नव्हतें, यामुळेंच सफ्रांची विशेष कुचंबणा झाली हें पुढें दिसून येईल. पूर्व पश्चिम किनारे इंग्रजांनीं व्यापले असल्यामुळें सामानसुमान घेण्यास किंवा डागडुजी करण्यास फक्त मारिशस बेट एवढेंच फ्रेंचांचे ताब्यांत होतें. त्यास त्या वेळीं

§ Malleson's Final French Strugges P. II–76.

आइल ऑफ फ्रान्स अशी संज्ञा होती. हें बेट पुढें स. १८१० सालीं इंग्रजांनीं जिंकून घेतलें. ऑक्टोबरांत सफ्रां या बेटांतील सेंट लुई बंदरास येऊन दाखल झाला. तेथें सर्व सिद्धता करून डिसेंबरांत सफ्रां पुढें निघाला, तो स. १७८२ च्या फेब्रुवारींत थेट मद्रासेवर चालून आला. पांदिचरीहून त्यानें आपण आल्याची खबर हैदर अलीस कळविली. हैदर त्या वेळीं इंग्रजांचा सर्व टापू हस्तगत करून नाकीं पकडून बसला होता.

हिंदुस्थानांत इंग्रज नौकायोद्धा सर एडवर्ड ह्युइज म्हणून होता. तो सफ्रांचे सामन्यास आला. ता. १२-४-१७८२ रोजीं या दोन अरमारांची मद्रास किनाऱ्यावर पहिली निकराची लढाई होऊन दोघांचेंही पुष्कळ नुकसान झालें; आणि ह्युइज हा बचावासाठीं सिलोनच्या पूर्व किनाऱ्यावर ट्रिंकोमाली-च्या बंदरांत गेला. त्याचा पाठलाग करण्याचें सफ्रांचे मनांत फार होतें. पण हाताखालच्या अंमलदारांनीं त्याचे हुकूम बिलकूल मानले नाहींत. फ्रेंच लोक वरिष्ठांचे हुकूम पाळण्यांत कुचराई करीत, हें दुसरें मोठें वैगुण्य पूर्वी काउंट लालीच्या वेळेप्रमाणेंच या वेळींही सफ्रांस नडलें. अशी कुचराई हाताखालील लोकांनीं केली नसती तर हैदरअलीच्या साह्यानें सफ्रांनें इंग्रजांचा या वेळीं साफ उठाव दक्षिण हिंदुस्थानांतून केला असता, असा मॅलेसनचा अभिप्राय आहे. सफ्रांचें धाडस व कौशल्य पाहून हैदरानें सुद्धां असे उद्गार काढिले कीं, 'अखेरीस या इंग्रजांस नरम करणारा वस्ताद भेटला. याच्या मदतीनें मी आतां इंग्रजांचा नायनाट करून दाखवितों. दोनच वर्षांचा अवधि पाहिजे, म्हणजे मी या हिंदभूमीवर इंग्रजांचें चिटपाखरूं देखील राहूं देत नाहीं.' पुढें सफ्रांस भेटून युद्धाची व्यवस्था ठरविण्यासाठीं हैदर मुद्दाम किनाऱ्यावर गुडलूर येथें गेला. सफ्रांनें जहाजांतून बंदरावर उतरून ता. २६-७-१७८२ रोजीं हैदराची भेट घेतली. हैदरानें या प्रसंगीं या सफ्रांचा जो बहुमान केला, तसा पूर्वी त्यानें कधीं कोणाचा केला नव्हता.

पहिल्याच दिवशीं दोघांचें तीन तास गुप्त खलबत झालें. पुढें आणखी दोन दिवस एकत्र राहून त्यांनीं पुढील बेत नक्की ठरविले. हें खलबत चालू असतां फ्रेंच फौज बुसीचे हाताखालीं निघाली होती, ती येऊन पोंचल्याचें वर्तमान त्यांस येऊन, त्यांचा आनंद द्विगुणित झाला. प्रथम त्रिंकोमाली बंदर हस्तगत करण्याचें ठरवून सफ्रांनें लगोलग आरमार नेऊन ता. ३१-८-१७८२ रोजीं तें

बंदर हस्तगत केलें. तें परत घेण्याच्या इराद्यानें इंग्रज नौकापति ह्युइज सफ्रांवर चालून गेला. पुनरपि उभय आरमारांची निकराची लढाई ता.१३-९-१७८२ रोजीं होऊन इंग्रजांस माघार घेऊन मद्रासेस परत यावें लागलें.

बुसीनें ता.२७-६-१७८२ रोजीं नानास लिहिलें, 'आम्ही ७ हजार फौजेसह गुडलुरास आलों. इकडिल इंग्रजांस तमाम गारत करून मुंबईकडे खुष्कीचे मार्गानें व मुसा सफ्राँन दर्याचे मार्गानें येत असों. इंग्रज आपले जागा घाबरा होऊन खुष्कीचे सरदारांशीं फोडाफोडी करून आपणाकडे आणावे या तजविजींत आहेत. परंतु आपले आमचे उद्योगानें नेस्तनाबूद होतील.' $

हें आरमारी युद्ध चालू असतांच स.१७८२ च्या मे महिन्यांत महादजीनें घाई करून सालबाईचा तह पुरा केला हें येथें ध्यानांत ठेविलें पाहिजे. म्हणजे सफ्रां आरमार घेऊन इकडे आला, त्याच सुमारास इंग्रजमराठ्यांचा सल्ला होऊन इंग्रजांच्या पाठीमागचा एक शह निघाला. ही गोष्ट पाहून हैदराला मराठ्यांचा केवढा संताप आला असेल याची कल्पनाच करावी. उत्तरेकडचा शह मिटल्यानें बंगालची इंग्रज फौज हैदरावर येऊं शकली. पुढील डिसेंबरांत हैदरही मृत्यु पावला. त्यामुळें तदुत्तर सर्वच राजकारण बदललें. त्रिंकोमालीच्या युद्धांत फ्रेंच जहाजांची वाताहात झाली होती, ती दुरुस्त करण्यासाठीं सफ्रां सुमात्रा बेटांत आचिन येथें गेला आणि तेथें सर्व सिद्धता करून स.१७८३ च्या फेब्रुवारींत तो परत त्रिंकोमालीस आला. बुसी तर दुखण्यानें व वार्धक्यानें जर्जर होता. जमवाजमव करून तो लढाईस उभा राहीपर्यंत स.१७८३ चा मार्च आला. त्याची फौज २३०० होती ती सफ्रांनें पोर्टोनोव्होच्या बंदरांत उतरून दिली. नंतर जून महिन्यांत त्रिंकोमालीहून येऊन सफ्रांनें गुडलूर बंदर हस्तगत केलें. त्यानंतर १८ जून रोजीं इंग्रज आरमारची व त्याची पुनरपि निकराची लढाई होऊन, इंग्रज पराभव पावून मद्रासेस परत गेले. असेंच आणखी युद्ध चालतें तर इंग्रजांचा पाडाव झाला असता. पण युरोपांत इंग्रजफ्रेंचांचा तह ‡ होऊन युद्ध थांबल्याची बातमी याच वेळीं इकडे आल्यानें पुढील कारभार आपोआप थांबला. तथापि अल्पा-

$ रा. खं. १०. २५७. या पत्राची छापलेली मिति चुकली आहे.

‡ हा तह मराठींत 'तह व करारमदार' पुस्तकांत जुलई १७८३ चा पृ. २१७ वर दिलेला पाहवा.

वकाशांत सफ्रांनें जी कामगिरी केली, ती दृष्टीसमोर असल्याशिवाय त्या वेळच्या राजकारणाचे धागे व निरनिराळ्या पक्षांचे व व्यक्तींचे वर्तनोद्देश स्पष्ट होणार नाहींत. सफ्रानें अंगास अंग भिडवून प्रचंड आरमारी लढाया मारल्या, त्यांची यौद्धिक ख्याति युरोपांत एवढी मोठी झाली, कीं तीच पद्धत पुढें नेल्सननें सुद्धां स्वीकारली. सफ्रां स.१७८४ त परत स्वदेशीं पोंचला आणि पुढें चार वर्षांनीं द्वंद्वयुद्ध खेळतांना मरण पावला. उत्तरेंत महादजीला फ्रेंचांच्या या हालचाली माहीत असत्या, तर त्यानें सालबाईवर तहाची घाई केली नसती. नानाचें चित्त द्विधा झालेलें असून युद्धसामर्थ्य महादजीचे हातीं असल्यामुळें त्यास स्वतःचे हिंमतीवर पुढील निश्चय करितां येईना, अशी स्थिति होती.

**४. इंग्रजफ्रेंचांच्या राजकारणांत नानामहादजींचा विरोध.**— सालबाईच्या तहाचें प्रकरण अत्यंत गुंतागुंतीचें आहे; अर्थात् तहासंबंधीचें वाङ्मयही तितकेंच विस्तृत असून त्याच्या आधारानें या भानगडीच्या प्रकरणांतील निरनिराळ्या व्यक्तींचे वर्तनोद्देश निश्चित करणें इतिहासदृष्ट्या उपयोगाचें असल्यामुळें तसा प्रयत्न आतां करूं.

सन १७८१ च्या उन्हाळ्यांत लॉर्ड मॅकार्टने व जॉन् मॅक्फर्सन हे दोन जबाबदार अधिकारी नवीन नेमणुका होऊन इंग्लंडांतून मद्रासेस दाखल झाले. पहिला मद्रासचा गव्हर्नर व दुसरा बंगाल कौन्सिलचा सभासद. पैकीं मॅकार्टने सन १७६४ ते ६७ पावेतों रशियांत इंग्रजांचा वकील म्हणून होता. दोघांसही युरोपीय राजकारणाची व इंग्रज-फ्रेंचांच्या चाललेल्या युद्धाची ताजी माहिती होती, तशी ती येथें हेस्टिंग्सला नव्हती. येथील दुसरे दोन अधिकारी सेनापति कूट व मुख्य नाविक ह्युइज हेही त्या वेळीं मद्रासेस होते. अर्थात् ह्या चौघांना जी परिस्थितीची ओळख येथें पटली तितकी दुसऱ्या कोणास नव्हती. हॉर्नबी व हेस्टिंग्स दोघेही हिंदुस्थानांतील सर्व सत्ताधीशांशीं विरोध करून युद्धाच्या फेरेस पडले होते. तेव्हां त्या दोघांसही बाजूस ठेवून वरील चौघांनीं पूर्ण विचारांतीं असें ठरविलें, कीं मराठ्यांचें युद्ध वाटेल त्या तऱ्हेनें मिटवावें आणि हैदरास नरम करावा; कारण राघोबास आश्रय देऊन मराठ्यांची पहिली आगळीक इंग्रजांनीं केलेली होती. तेव्हां मद्रासेस या चौघांनीं खलबत करून गॉडर्डास तहाची कामगिरी सांगितली आणि नाना

व महादजी यांस परभारें पत्रें लिहून त्यांच्या मनांत समेटाची भावना उत्पन्न केली. हेस्टिंग्स व हॉर्नबी यांस वरील चौकडीचा हा अव्यापारेषु व्यापार न आवडून त्यांना त्यांचा भारी संताप आला. निदान आपणांस भेटून आपल्यामार्फत तरी हा उपक्रम त्यांनीं केला पाहिजे होता, युद्ध व तह करण्याचा अधिकार गव्हर्नर जनरलचा, तो हिसकावून घेणारे हे चौघे कोण? असें त्यांचें म्हणणें होतें. उलट पक्षीं या चौघांनीं आपल्या जबाबदारीवर मुद्दामच पत्रें लिहून तहाचा उपक्रम केला. न जाणों, हेस्टिंग्सची गांठ पडल्यावर तो आपल्या जहांबाजीनें तहाचे मार्गांत नवीनच विघ्नें उपस्थित करील. हे सर्व तपशील ध्यानांत घेतल्यानें या कारस्थानावर नवीन प्रकाश पडतो. या कामीं डॉड्वेलनें छापलेला हेस्टिंग्सचा पत्रव्यवहार उपयोगी आहे.‡

सालबाईच्या तहांत व तदनंतरच्या राजकारणांत जॉन् मॅक्फर्सनचें कर्तृत्व दिसूं लागतें. वॉरन् हेस्टिंग्सनंतर फेब्रुवारी १७८५ पासून सप्टेंबर १७८६ पावेतों त्यानें गव्हर्नर जनरलचें काम केलें. याचा जन्म १७४५ त होऊन १७६८ त तो प्रथम हिंदुस्थानांत आला, तेव्हांपासून त्याचा संबंध मद्रासेकडे अर्काटच्या नबाबाशीं येऊन त्या नबाबाची खासगी नोकरीही त्यानें कांहीं वर्षे केली. त्याची व हेस्टिंग्सची चांगली दोस्ती असून मध्यंतरीं इंग्लंडांत गेल्यावर सन १७८१ त तो वरिष्ठ कौन्सिलचा सभासद होऊन परत मद्रासेस उतरला; आणि तेथें मराठ्यांशीं तह करण्याची योजना ठरवून तो सप्टेंबरांत कलकत्त्यास जाऊन कौन्सिलच्या कामावर दाखल झाला. मराठ्यांचें युद्ध कसें आवरावें या विवंचनेंत असतांच दुसरें आणखी हैदराशीं युद्ध सुरू झालेलें त्यास इकडे आल्यावर आढळलें. मद्रासचा गव्हर्नर मॅकार्टने हाही नुकताच म्हणजे ता. २२ ६-१७८१ रोजीं कामावर दाखल झाला होता. नाविक योद्धा ह्यूइज, सेना-

‡ मॅक्फर्सनसंबंधानें लॉर्ड कॉर्नवॉलिसचा खालील अभिप्राय ध्यानांत ठेवण्याजोगा आहे. 'मॅक्फर्सनच्या एकाही शब्दावर मला विश्वास ठेवतां येत नाहीं, किंवा त्यानें सुचविलेला एकही व्यवहार मला पसंत नाहीं. अत्यंत पैसेखावूपणापलीकडे त्याच्या एकंदर कारभारांत मुख्यत्वें दुसरें कांहीं सुद्धां नजरेस येत नाहीं. स्वतः भित्रा व लबाड असून गव्हर्नरच्या कारभारावर आलेला याच्याइतका नीच व तिरस्करणीय इसम दुसरा कोणी सांपडणार नाहीं.' ( कॉर्नवालीस प. व्य. )

पति कूट व गव्हर्नर मॅकार्टने इत्यादींनीं मॅक्फर्सनला कळविलें, कीं आज दीड वर्ष हैदर ह्या भागांत आमच्या छातीवर येऊन बसला आहे. मराठ्यांशीं तह झाल्याशिवाय त्याला येथून उखडून देणें शक्य नाहीं. अशी परिस्थिति पाहून सर्वांनीं मिळून हेस्टिंग्सला न पुसतां परस्पर खटपट करून पुणेकरांशीं तह घडवून आणण्याची व्यवस्था केली. वरील चौघे चार तऱ्हेचे गृहस्थ होते. ह्यूजिसला तर आपल्या मुत्सद्देगिरीची मोठी घमेंड असून दुसऱ्याचे कामांत ढवळाढवळ करण्याची विलक्षण खोड असे. बातम्या काढून आणण्यासाठीं खुद्द पुण्यांत त्यानें पगारदार हेर ठेवले होते. त्यानें स्वदस्तुरचीं पत्रें नाना फडणिसास पाठविलीं आणि इंग्रजांशीं तह करण्यांत मराठ्यांचा केवढा फायदा आहे हें त्यास लिहून कळविलें. नानानें त्याचे हेर पकडून कैदेंत टाकले. हा बेत फसल्यावर ह्युइजनें दरमहा २०० रुपये देऊन आपला एक ब्राह्मण पुण्यास ठेवून दिला. यावरून इंग्रजांचा घरभेद्या स्वभाव व्यक्त होतो. इंग्रज लोकांस मराठ्यांच्या पराक्रमाची केवढी धास्ती पडली होती, ही गोष्ट मात्र वरील लुडबुडीनें नानाचे प्रत्ययास आली, आणि तहाचे बाबतींत जास्तच ओढून धरण्याकडे त्याची प्रवृत्ति झाली. महादजीनें घाई केली नसती तर बहुधा नानानें जास्त फायदेशीर तह पदरांत पाडला असता. मात्र महादजीचें व त्याचें संगनमत पाहिजे होतें. हे चौघे दुढ्ढाचार्य परभारें मद्रासेहून तहाच्या गोष्टी शत्रुपक्षाशीं बोलूं लागल्याचें पाहून, हेस्टिंग्सच्या पायाची आग मस्तकास गेली. त्यांनीं पुण्यास असें लिहून पाठविलें कीं 'खुद्द राजानें आम्हांस तहाचा संपूर्ण अधिकार दिला आहे.' ह्युजिसनें एक वेळ फाजीलपणा केला असला तरी परराष्ट्रकारणांत वागलेल्या मॅकार्टने व मॅक्फर्सन ह्यांनीं हा भलताच अव्यापारेषु व्यापार करून हेस्टिंग्सची बाजू लंगडी केली. ह्या हकीकती समजल्यावर हेस्टिंग्सनें मॅक्फर्सन यास ता. १-११-१७८१ रोजीं बनारसहून कलकत्त्यास लिहिलेलें पत्र मार्मिक असून चुकलेला डाव त्यानें कसा सुधारला हें त्यांत दिसून येतें. ता. ३०-९-१७८१ रोजीं हेस्टिंग्स मॅक्फर्सनला कलकत्त्यास लिहितोः

'महादजी सिंद्यांशीं तहाची वाटाघाट चालू असून जमल्यास मींच जाऊन त्याची गांठ घ्यावी असें फार फार माझ्या मनांत आहे. कारण समक्ष गांठ पडल्याशिवाय तह कायम झाला असें माझें मन घेत नाहीं. [illegible] म्यूरला

मीं तसें लिहिलें आहे. फरुखाबादपावेतों सिंदे येतील तर मी तेथें अवश्य जाऊन त्यांस भेटेन. तह ठरल्यावर महादजीला आपण आपला पाठिंबा जरा चांगलाच दिला पाहिजे. नाहीं तर पुणें दरबारावर त्याचें वजन बसणार नाहीं. निदान या भानगडी मला जशा समक्ष मिटवितां येतील तशा दुसऱ्यास सांगून कधीं भागणार नाहींत. समक्ष बोलावण्यांत अनेक फायदे करून घेतां येतात. खरें म्हणाल तर मी इतक्या लांब इकडे येऊन बसलों, याचें कारण या तहाचा घोर. एकदां महादजी स्वतंत्र तह करून गुंतला कीं पुढच्या गोष्टी त्याच धोरणावर संपाविणें त्यास भाग आहे; आणि एकवार मराठ्यांचा तह पदरांत पडला म्हणजे मग हैदराचें प्रकरणही मिटविण्यास आपणांस सुलभ जाईल. हैदरास कसेंही करून मद्रासजवळून उखडून दिला पाहिजे. बनारस येथील चेतसिंगाच्या भानगडीमुळें मात्र मराठ्यांचा तह फिसकट-ण्याचा पुष्कळसा संभव आहे; आणि तसें झाल्यास दुसरी कांहीं शक्कल काढणें भाग आहे. बादशहाचा कारभारी नजफखान याचा वकील येथें मजकडे आला असून त्यास मीं मुद्दाम ठेवून घेतला आहे. सिंद्याशीं नच जमलें तर दिल्लीस पाचर लावणें प्राप्त होईल, कीं जेणेंकरून सिंद्यास आमच्याशीं नमतें घेणें भाग पडेल. म्हणून या बाजूस राहून धाकानें किंवा लोभानें सिंद्यास वश करणें माझें पहिलें काम आहे. कारण महादजीच्या एकट्या आधारावर मराठ्यांचें राज्य आज चाललें आहे. त्यास वश केला कीं दुसऱ्या कोणाची आमच्या विरुद्ध जाण्याची छाती नाहीं. माझा अंदाज आहे कीं, माझ्याशीं महादजीचें संगनमत होऊं शकेल. त्यास जरा मोठेपणा दिला म्हणजे तो पुण्याच्या मध्यस्थीचें काम अंगावर घेईल. मराठ्यांचें राज्य आंतून अगदीं पोकळ झालें आहे; त्यांची आदा बहुतेक संपली आहे; कारभाऱ्यांस वेडे-चार आठवले आहेत. अशा स्थितींत महादजीस फोडला कीं आपलें काम झालें. मग पुणेंकर नाक घांशीत तह करतील. महादजीच्या विरुद्ध वागून आपला निभाव लागेल असें नानास वाटत नाहीं, असा माझा अंदाज आहे. थोडक्यांत सांगायचें म्हणजे युद्धाची दहशत सारखी मराठ्यांच्या छातीवर असल्याशिवाय तह करण्याकडे त्यांची प्रवृत्ति होणार नाहीं. पुरंदरचा तह आम्ही होऊन मोडला अशी माझी समजूत नाहीं; आणि तशी समजूत असली तरी ती बोलून दाखविण्यांत शहाणपणा नाहीं. तसें बोलून दाखविणें

म्हणजे क्षमेचीच याचना करणें होय. आम्ही इंग्रज म्हणजे केवळ लोभाविष्ट भुतें, आम्हांस नाहीं शब्दाची किंमत, नाहीं नीतीची चाड, असें आमचे शत्रू आम्हांस निंदितात, ती गोष्ट आम्हीं होऊन कबूल केली तर मग मला जगापुढें तोंड तरी दाखविण्याची सोय राहील काय! मराठ्यांशीं हें युद्ध मी ओढून आणिलें नाहीं; मला माहीत नसतां व माझी संमति नसतां तें सुरू झालें. पण एकदां सुरू झाल्यावर मी त्यांत शक्य तें साह्य केलें; आणि हें युद्ध निकरानें लढण्यांत सुद्धां माझा हेतु तें युद्ध संपविण्याचाच आहे. शत्रूंस शरण जाऊन तहाची याचना करण्यानें हा माझा हेतु कधीं सफळ झाला नसता, अशी माझी खात्री आहे. महादजीशीं चाललेला आमचा संग्रामच याचें उत्कृष्ट उदाहरण होय. फ्रॅन्सिसनें कसून विरोध केला व कॅमकनें भलभलत्या चुका केल्या तरी मी त्यांस न जुमानतां पुढें युद्ध निकरानें चालविलें, म्हणूनच गॉडर्डनें वसई जिंकली आणि गुजरातचा द्रव्यौघ मुंबईंत आणून सोडला. नाहीं तर हल्लींच्या तहाचा योग कधीं तरी आला असता काय? ह्या एकंदर व्यवहारांत माझ्या काळजाला किती घरे पडले आहेत, आणि अद्यापि ते यत्किंचित् निमित्तानें किती झोंबतात, याची तुम्हांस कल्पना होईल तर मी इतकें अट्टाहासानें कां लिहितों हें तुम्हांस सहज समजून येईल. मलाही तह पाहिजे, पण तो मी माझ्या पसंतीच्या साधनांनीं व मला पसंत असलेल्या पद्धतींनींच घडवून आणणार. जे आपलीं हत्यारें टाकून मजपुढें येतील, त्यांस मी बिनहत्यारी जाऊन भेटेन; जे म्यानांतून तलवार न काढतां येतील, त्यांस नुसती तलवार लटकावून भेटेन; पण ज्यांना आमचा नाश करण्याचीच खुमखुम असेल, त्यांचा मी नाशच करून दाखवीन. माझे सर्व वरिष्ठ आणि सगळे इंग्लंडचे लोक जरी ही माझी पद्धति त्याज्य समजूं लागले, आणि नुसता तह तह म्हणून टाहो फोडूं लागले, तरी मी माझी आंखलेली ही वर्तनरेषा कधीं सोडणार नाहीं. मग असें करितांना मला नोकरीस मुकावें लागलें तरी मी त्याची पर्वा करणार नाहीं. अशा स्थितींत मला नोकरी सोडूनच जावें लागलें तर येथील इंग्रजांचे हाल कुत्रा खाणार नाहीं अशी माझी खात्री आहे. उद्यां (२-११-१७८१) अंडरसन येथून निघून महादजीच्या भेटीस जाणार. मागाहून एक महिन्यानें मीही जाईन म्हणतों.'*

* डॉडवेल, ले. ११ व १७, पान ८६.

मद्रासच्या चौकडीनें उतावळी करून मराठ्यांकडे तहाची याचना केली, त्या संबंधानें हेस्टिंग्सचा हा मॅक्फर्सनला जबाब आहे. यत्किंचित् उलट वारा वाहूं लागतांच जे आपली पाठ फिरवितात त्यांजवर वॉरन हेस्टिंग्सनें आपल्या अनेक पत्रांत खरमरीत टीका केली आहे.

सन १७८३ च्या फेब्रुवारींत इंग्रज मराठ्यांचा तह सालबाई येथें कायम होऊन, मराठे युद्धांतून निवृत्त झाल्यावर हैदर टिपूंचें युद्ध इंग्रजांशीं चालूच होतें. आपणास वगळून मराठ्यांनीं इंग्रजांशीं तह केला यामुळें टिपूस जास्त चीड आली. त्यानें फ्रेंचांची मदत आणवून इंग्रजांशीं निकरानें सामना चालविला. हा सामना चालू असतांच युरोपांत इंग्रज-फ्रेंचांचें युद्ध बंद झाल्यानें जुलई सन १७८३ पासून टिपूस मिळणारा फ्रेंचांचा आधार बंद झाला, तरी त्यानें आपली शिकस्त करून इंग्रजांशीं आणखी पुढें सामना केला, आणि मराठ्यांच्या मदतीची आशा समूळ नाहींशी झाल्यामुळें, ता.११-३-१७८४ रोजीं टिपूनें मंगळूर येथें इंग्रजांशीं तह करून युद्ध थांबविलें. म्हणजे सालबाईच्या तहापासून मंगळूरच्या तहापर्यंत ज्या नानाविध भानगडी उपस्थित झाल्या, त्यांचें वर्णन मराठी कागदांत असून तें समजण्यासाठीं त्या दोन वर्षांतील चोहोंकडची परिस्थिति नजरेसमोर पाहिजे. एका बाजूस इंग्रज महादजीशीं लाडीगोडी लावीत होते, तर दुसऱ्या बाजूस नानानें फ्रेंचांकडे आपलें संधान मजबूद चालविलें होतें. तो प्रकार असा.

सन १७८० त नाना फडणिसानें समस्त हिंदुस्थान इंग्रजांविरुद्ध उठविलें. त्यांत हैदर व फ्रेंच हेच इंग्रजांस जाचक होते. कारण त्या वेळीं युरोपांत फ्रेंच युद्ध चालू असून त्यांत फ्रेंचांचा पाठिंबा मिळवून हैदर इंग्रजांस छळीत होता. हैदरास बाजूस ठेवून केवळ महादजीच्या द्वारा इंग्रजांनीं मोठ्या युक्तीनें सालबाईवर मराठ्यांशीं तह करून आपला एक प्रतिस्पर्धी कमी केला, यामुळें हैदरास जास्तच त्वेष आला; आणि तो जरी सन १७८२ त मरण पावला तरी त्याचे पश्चात् टिपूनें तितक्याच निकरानें इंग्रजांशीं युद्ध चालविलें. ह्या प्रसंगांत फ्रान्सांतून नौकायोद्धा सफ्रॉं व सेनापति बुसी हे आरमार व फौज घेऊन पूर्वकिनाऱ्यावर दाखल झाले. त्यांचीं कारस्थानें मराठ्यांकडेही चालू झाल्यानें सालबाईचा तह सिद्धीस जाण्यास आणखी हरकती उत्पन्न झाल्या,

त्यांचा उल्लेख मराठी कागदांत इतका येतो कीं, इंग्रज-फ्रेंच-टिपूंचे व्यवहार ध्यानांत आल्याशिवाय ते कागद समजत नाहींत. हैदरानें पुष्कळसें व नानानें थोडेंसें संधान फ्रेंचांकडे चालूच ठेविलें होतें. युरोपांत या वेळीं इंग्रजांविरुद्ध फ्रान्सबरोबर स्पेन, हॉलंड हे सुद्धां युद्धांत सामील होते, त्या सर्वांचा विचार हिंदुस्थानांतून इंग्रजांना काढून लावण्याचा असून, शक्य तितक्या जंगी तयारीनें फ्रेंच आरमार सन १७८२ च्या आरंभीं पूर्व किनाऱ्यावर उतरलें; आणि मागाहून कांहीं काळानें फ्रेंच फौज आली. आरमाराचा मुक्काम रस्त्यांत डागडुजीसाठीं बुर्बो बेटांत बरेच दिवस झाल्यानें त्यास येऊन पोंचण्यास विलंब लागला. एक वर्ष अगोदर तें येतें तर हिंदी राजकारणास निराळाच रंग चढला असता.

ता.२२-३-१७८२ च्या बैठकींत मद्रास कौन्सिलनें असें ठरविलें कीं, 'मराठ्यांशीं तह करून युद्ध थांबविणें अत्यंत जरूर आहे; युद्ध न थांबेल तर मद्रास-किनाऱ्यावरील इंग्रज सत्तेचा सर्वथैव नाश झाल्याशिवाय राहणार नाहीं, अशी आमची सर्व बाजूंनीं पूर्ण विचार करितां खात्री झाली आहे.' फ्रेंच आरमाराचा मुख्य सफ्रॉं हा फ्रान्सांत अत्यंत नांवाजलेला नाविक असून त्याच्या मानानें इंग्रजांचा मुख्य ह्युजिस पुष्कळच कमी दर्जाचा होता. परंतु इंग्रजांस किनाऱ्यावरचीं अनेक बंदरें मोकळीं होतीं तशीं फ्रेंचांस नव्हतीं, त्यामुळें फ्रेंच आरमाराची कुचंबणा झाली. शिवाय ह्युजिसला हाताखालच्या लोकांचें साह्य होतें तसें सफ्रॉंला नव्हतें. सीलोनांत त्रिंकोमाली बंदर डचांचें होतें तेंही सफ्रॉं येण्यापूर्वी एकच महिना इंग्रजांनीं हस्तगत केलें, त्यामुळें फ्रेंच आरमाराला सामानसुमान घेण्यास किंवा दुरुस्ती करण्यास इकडे स्थळच राहिलें नाहीं. शिवाय आयरकूटनें पोर्टोनोव्होच्या लढाईंत ता.१-७-१७८१ रोजीं हैदरास इतकें कमकुवत केलें कीं, त्याजकडून सफ्रॉंला कांहींच पाठबळ मिळेना. तरी त्यानें ह्युजिसबरोबर पूर्व किनाऱ्यावर पांच निकराच्या लढाया मारिल्या आणि इंग्रजांचें वर्चस्व पुष्कळसें कमी केलें. या झगड्यांत दोनही आरमारें इतकीं निकामी झालीं कीं, डागडुजीसाठीं ह्युजिस मुंबईला व सफ्रॉं बुर्बोला निघून गेले. इंग्रज सेनापति सर आयर कूट सुद्धां यानंतर लवकरच सन १७८३ त मरण पावला. त्यापूर्वी थोडेच दिवस म्हणजे सन १७८३ तच बुसी आपल्या फौजेसह पांदिचरीस दाखल झाला,

पण त्याच्या अंगीं पूर्वीची करामत कांहींच राहिली नव्हती. संधिवातानें जर्जर झाल्यामुळें त्याची तोंडाची बडबड मात्र कायम होती. तरी त्यानें टिपूच्या साह्यानें कडलोर येथें एप्रिल महिन्यांत इंग्रजांस जेर केलें. त्यावर इंग्रज सेनापति स्टुअर्ट जूनमध्यें चालून गेला. त्या महिन्याच्या १३ तारखेस लढाई होऊन बुसीचा पराभव झाला. इतक्यांत नौकायोद्धा सफ्राँ बुर्बोहून आरमार दुरुस्त करून पुनः परत आला. त्यास लगेच ह्युजिसनें तोंड दिलें, तथापि सफ्राँनें बुसीच्या मदतीकरितां २३०० फ्रेंच शिपाई पोर्टोनोव्हो येथें उतरून दिले. त्यांनीं जून २५ रोजीं स्टुअर्टवर चढाई केली, पण त्यांत बुसीचाच पराभव झाला; आणि फ्रेंच सेनापति बर्नेडोट इंग्रजांच्या हातांत सांपडला. हाच बर्नेडोट पुढें नेपोलियनकडून स्वीडनचा राजा झाला. स्टुअर्ट-चीही पुढें पंचाईत आली होती, पण जुलईचे आरंभीं बातमी आली कीं, इंग्लंड व फ्रान्स ह्यांजमध्यें व्हर्सेल येथें तह होऊन युद्ध बंद झालें. त्याबरो-बर हिंदुस्थानांतलेंही युद्ध थांबलें; सफ्राँ परत स्वदेशीं गेला आणि बुसी अनेक खटपटी करीत पांदिचरीस मुख्य फ्रेंच कामगार म्हणून राहिला; आणि तेथेंच तो सन १७८५ च्या जानेवारींत मरण पावला. भा. व. पु. २ मधील अखबार दिनचर्या यांत ले. ८ च्या ३०-७-१७८४ चे पत्रांत बुसी जिवंत आहे, पण त्यापुढील ले. ९च्या १६-७-१७८५ च्या पत्रांत त्याचे जागीं दुसरा फ्रेंच अधिकारी असल्यानें त्या दरम्यान बुसी मरण पावला हें निश्चित आहे. तसेंच सन १७७८ त फ्रेंच वकील सेंट ल्यूबीन पुण्याहून निघून गेल्यावर मुसा मूतीन नांवाचा दुसरा वकील पुण्यास कांहीं वर्षें येऊन राहिला होता. वरील अखबारी पत्रांत (ले. ११) सन १७८८ पावेतों मूतीन पुण्यास असल्याचें दिसतें. याच कारणामुळें सालबाईचा तह झाल्यावरही इंग्रज-मराठ्यांच्या मनांतलें शल्य बरेच दिवस कायम होतें. सन १७८६ त इंग्रज वकील मॅलेट पुण्यास दाखल झाल्यावर तें हळूहळू नाहींसें होत गेलें. युरोपांत या वेळीं किंवा पुढें नेपोलियनच्या वेळेस फ्रेंचांचें वर्चस्व इंग्रजांवर झालें असतें तर त्याचा परिणाम हिंदी राजकारणावर आजच्याहून किती विपरीत झाला असता हें विचार करण्यासारखें आहे. नानानें तर फ्रेंच युद्धकलेंतील विशिष्ट मुद्दे टिपून घेतले होते. त्यावरून सिंद्याचे उपक्रमाप्रमाणें दक्षिणेंतही फ्रेंच

युद्धकला सुरू करण्याचा त्याचा विचार असावा.* ता. २५-४-१७८३ त नाना फडणीस महादजीस विचारतो कीं, 'टिपूशीं बोलणें करायचें तें मित्रत्वाचें बोलावें कीं शत्रुत्वाचें बोलावें? लौकिकांत इंग्रजांचा व आमचा सलूख पूर्ण जाहीर झाला. आम्हीं मात्र टिपूस लिहिलें नाहीं. पुढें स्पष्ट बोलावें, कीं नाद ठेवण्याची तजवीज करावी, तें लिहून पाठवावें. समेट करावयाच्या युक्तीनें बोलावें तर फराशिसांचे टिपूचे दारमदार झाले. मुसा भूसी भारी सरंजामानिशीं आला. बेदनूर टिपूनें घेतल्यादाखल, आणि चेनापट्टण ( मद्रास ) कदाचित् त्यांनीं घेतला तर मनसबा कसा पडेल कळत नाहीं. इंग्रजांचा व आपला तह झाला, आतां फराशिसांचा वकील, येथें कशास राहील! मुसा मूतीन निरोप मागत आहे.' इतक्यांत बुसीचें पत्र नानास आलें कीं, "तुमचें उत्तर वाचून बहुत खुशाल झालों. आम्हांस आमचे खावंदांनीं बहुत फौज व मजबूद सरंजाम देऊन या प्रांतीं पाठविलें. इंग्रजांस तंबी करून मारून काढावा, हिंदुस्थानांतील सरदारांचे मुलूख त्यांनीं घेतले असतील ते ज्यांचे त्यांस द्यावे, असा आमचे खावंदांचा आम्हांस हुकूम आहे. मोसम येतांच आम्ही मजबुदीनें तिकडे येतों. तुम्ही आम्ही मिळोन इंग्रजांस रस्त करून टाकूं. श्रीमंत कै. बाळाजीरावांची म्हणजे नानासाहेबांची व आमची बहुत दोस्ती होती. तुम्हांपाशीं मुसा मूतीन आहेत ते पातशहाचे इतबारी, तसेच वाजिरांचे व आमचेही इतबारी आहेत. ते तुम्हांस सर्व सांगतील." हें ता. ३०-३-१७८३ चें पत्र नानास आल्यावर इंग्रजांशीं सख्य ठेवणें आपल्या फायद्याचें कीं फ्रेंचांशीं, यासंबंधानें नानाची चलबिचल सुरू झाली. महादजीस हेस्टिंग्जनें पूर्णपणें भारून आपल्या बाजूस वळविलें होतें, आणि त्यास फ्रेंचांच्या हालचाली माहीत नव्हत्या. त्यामुळें मराठशाहींत एक प्रकारची फूटच उत्पन्न झाली. कारभारी नाना व सेनापति महादजी विरोधी बनले.$

नानानें आपल्या अडचणी वरील २५ एप्रिल १७८३ चे पत्रांत महादजीस

* पांडिचरीचे दक्षिणेस जवळच किनाऱ्यावर पोर्टोनोव्हो व त्याचे दक्षिणेस गुडलूर ऊर्फ कडलोर हीं बंदरें आहेत. ऐ. स्फु. ले. ३-१८; मॅलेसन; लायल पृ. १२१, १९९, २००; डॉड्वेल पृ. ११७.

$ का. सं. प. या. २३५, २३७, २६७, २६९, ३०९, २९७, २७१.

स्पष्ट कळविल्या. त्यावर महादजीनें नानास लिहिलें, कीं 'इंग्रजांशीं तह झाला असतां तुमची फौज टिपूचे कुमकेस जाते हें ठीक नाहीं. ही बातमी इंग्रजांचे घरीं गेली. सबब तुम्ही इंग्रजांस लिहावें कीं फौज रवाना केली ती टिपूशीं लढण्यास केली, त्याचे मदतीस नव्हे. असा दोहोंकडे नाद राखून छावणी तुंगभद्रेवर करावी. चातुर्मास्यांत चोहोंकडील विचार ध्यानांत आणून पुढें रंग दिसेल तसें करावें.' त्यावर नानानें कळविलें, 'टिपू पाऊसकाळ न म्हणतां लढाईस मजबूद. श्रीमंतांचा इंग्रजांशीं सलूख झाला हें त्यास समजलें आहे. तेव्हां फुरसत न देतां चेनापट्टणावर जातात. टिपूनें चेनापट्टण घेतल्यावर आम्हांस भारी पेंच पडेल. टिपू फरांसीस दोघे मिळून जबरदस्त. श्रीमंतांच्या दौलतीचें ओझें पाटीलबावांवर असल्यानें पुरतेपणीं मनन करून आम्हीं पुढें काय आकार करावा तें लिहावें.' तिकडे हेस्टिंग्सचा हस्तक इंद्रसेन महादजीजवळ होता, त्यानें महादजीस विचारिलें कीं, 'आमच्याशीं दोस्ती झाली असतां पुण्याची फौज टिपूचे मदतीस गेली हें काय? तुम्ही तहाची हमी घेतली असल्यानें मराठ्यांनीं इंग्रजांचीच कुमक केली पाहिजे.' महादजीच्या सालबाईच्या तहानें असा हा चहूंकडे घोटाळा उत्पन्न झाला. सुदैवानें इंग्लंड फ्रान्सचा तह † जुलईंत झाल्याचें वर्तमान आल्यानें फ्रेंचांचा पेंच मिटला. नाहीं तर नाना महादजींचा तीव्र विरोध उत्पन्न होण्याची वेळ आली होती. धुळपानें पश्चिम किन्याऱ्यावर ता. ८-४-१७८३ रोजीं इंग्रजांचें लढाऊ जहाज—'रेंजर'—पाडाव करून घेतलें, त्यामुळें सुद्धां वरील प्रकरण जास्तच पेटण्यास कारण झालें.

सन १७८१ च्या पावसाळ्यांत महादजीची व इंग्रजांची तहाची वाटाघाट सुरू झाली, ती बातमी हैदरास लगोलग कळली. सगळ्या हिंदुस्थानभर प्रत्येकाचे बातमीदार पसरलेले असत. तेव्हां खऱ्या खोट्या बातम्या हल्लींच्या वर्तमानपत्रांप्रमाणेंच त्या वेळींही उठत. महादजीनें तह केला, आतां पुणेंकरही करतील असें पाहून, हैदरानें नानास निकडीचीं पत्रें पुण्यास लिहून करार मोडल्याबद्दल तक्रार केली. त्यासाठीं हैदरानें नानाचा वकील कृष्णाजी नारायण यास पुण्याहून पुनः त्वरित आपल्याकडे बोलावून घेतलें. सन १७८१ च्या पावसाळ्यांत तो पुण्याहून शिवकांची येथें हैदराकडे गेला.‡ पुढें नानानेंही

† पहा तह व करारमादार पृ. २१७. ‡ खं. १९-१८८ व १९५.

कृष्णरावामार्फत हैदराकडून पैसे मागितले. ' बंगाल्याकडे फौजेच्या रवानगीची सिद्धताच आहे. ऐवजाची रवानगीच करावी, रवानगी करतों म्हणून सांगूं नये, छत्तिसांची तर्तूद न होय तर निदान तिसांचा जाबसाल उरकून पाठवावा.' असें नानाचें लिहून गेल्यावर कृष्णराव जबाब कळवितो, ' सांप्रत मुंबईहून इंग्रज वकील (उदिष्टिन) पुण्यास आल्यामुळें हैदर नायकांचे चित्तांत विकल्पाचे वृक्षच वाढले आहेत. ते म्हणतात, मुंबईकर वकील माघारा लावून द्यावा, निजामलीखां मसलतीस निघत नसतील तर कृष्णराव बल्लाळांनीं त्यांशीं रुष्ट व तुटक भाषण करून उठोन यावें. पुण्याकडील बातमीच्या पत्रांनीं विकल्पयुक्त होऊन बेमर्जी होते. नाइकांचा शोध फार सूक्ष्म, यांचा निश्चयच आहे कीं, आपल्याकडून अंतर पडेलसा शब्द लावूनच घेऊं नये. पुण्याकडूनच न घडावयाची गोष्ट घडल्यास मग कळेल त्या रीतीनें आपला मतलब साधावा.'† यानंतर एक महिन्यानें इंग्रजांशीं तहाची वाटाघाट चाललेली हैदरास कळून, त्याचें चित्त अंदेशांत पडलें. मसलतीविषयीं उदासीनता आली. इंग्रजांची व फरासीसांची लढाई सुरू झाली म्हणोन वदंता येऊन, नाइकास वाटलें, इंग्रजांच्या तंबीचा हाच समय आहे. असा समय पुनः येणार नाहीं. आम्ही, नाना व फरासीस तिघे मिळून इंग्रजांची बेबुनियाद करूं.' असें हैदराचें बोलणें पुण्यास कळल्यावर नाना मोठ्या बुचकळ्यांत पडला. उत्तरेंत महादजीचा आग्रह तह जुळवून आणण्याचा, दक्षिणेंत हैदराचा आग्रह युद्ध जोरांत चालविण्याचा. या पेंचांतून नानास त्वरित सुटका करून घेतां येईना. म्हणून तिकडे महादजीनें तह कायम केला, तरी नानानें त्यास रुकार दिला नाहीं. युद्धाच्या बाबतींत नानाला स्वतंत्र विचार करण्यासही अडचण पडली. महादजी म्हणतो, ' पुढें मागें आम्हांस तहाचा शब्द ठेवतील तरी आम्हांकडे दोष किमपि नाहीं. सर्व गोष्टी पेशजी आम्ही चार पांच वेळ लिहिल्या असतां, तेव्हांच आम्हांस स्पष्ट उत्तर लिहिलें असतें, कीं इंग्रजांशीं सलूख करावयाचाच नाहीं, तरी या गोष्टीचा आमचा आग्रह किमपि नव्हता. आतां मात्र लौकिकांत गोष्ट वाईट दिसते कीं, पाटीलबावांचे विद्यमानें इंग्रजांचा सलूखा होऊन सरकारचीं कामें बिलहेस लागलीं; आणि इंग्रजांकडील जाबसाल कांहींच घडूं नये. आमच्या वचनांत हिंदुस्थानांत बेइमानी नव्हती, ती या कारभारांत

† ता.१०-२-१७८२; खं. १०. २७०-२७२.

यावयास करिते. तेव्हां आम्ही खोटे पडल्यावर सरकारचे उपयोगाचे काय!' ( २३-१०-१७८३ ). यावरून तह करण्याची जबाबदारी महादजी आपल्यावर घेत नाहीं, नानावर लोटतो. दोघे एकत्र भेटते तर हिंदी राजकारणांतील दृष्टिकोनांचा मिलाफ होऊं शकला असता. युद्ध पुढें नेटानें चालविण्याची जबाबदारी नानानें सुद्धां पत्करिली नाहीं.

त्या वेळचा इतिहास आपण पुढें घडलेल्या परिणामांवरून पाहतों हें बरोबर नाहीं. इ. स. १७८९ त फ्रान्सांत भयंकर राज्यक्रान्ति झाली; त्यानंतरच्या पंचवीस वर्षांत नेपोलियननें युरोपांत धुमाकूळ उडवून दिला; आणि नेपोलियनच्या पाडावानंतर युरोपीय राजकारणास निराळें वळण लागलें. हे प्रकार सामान्यतः आपल्या दृष्टीसमोर असतात; आणि सप्तवार्षिक युद्धाच्या अखेर म्हणजे इ. सन १७६३ त इंग्लंडचें सामुद्रिक वर्चस्व सुरू झालें तें अद्यापपावेतों अविच्छिन्न चाललें आहे, अशी मनाची समजूत झाल्यानें सालबाईच्या तहाच्या प्रसंगाची खरी परिस्थिति आपण विसरून जातों. पण नाना फडणीस व महादजी सिंदे, एक आपल्या बुद्धिसामर्थ्यानें, व दुसरा, लष्करी डावपेंचानें इंग्रजांस सडकीत असतां, आतां पुढील पांच दहा वर्षांत फ्रान्सांत राज्यक्रान्ति होऊन तें राष्ट्र रसातळाला जाईल व इंग्रजांचाच वरचष्मा भूतलावर होईल, असें स्वप्न कोणास तरी पडलें होतें काय? उलट इंग्लंडच्या वसाहती गेल्या, अमेरिकेंत व युरोपांत इंग्लंडास मार खावा लागला, हिंदुस्थानांत हैदरानें व मराठ्यांनीं इंग्रजांचें नाक चांगलेंच ठेंचलें, इत्यादि प्रकार धडधडीत डोळ्यांसमोर असतां नानानें फ्रेंचांकडे मनाचा ओढा दाखविला आणि सेंट ल्यूबीन व मुसा मूतीन वगैरे फ्रेंच वकील पुण्यास ठेविले, याबद्दल त्यास दोष देण्याचें तरी आपणांस काय प्रयोजन आहे? महादजीनें इंग्रजांकडे मनाचा ओढा दाखविला, याचें कारण चार दोन वेळां इंग्रजांशीं सामना करून पाश्चात्य युद्धपद्धतीपुढें आपलें कांहीं चालणार नाहीं अशी त्याची खात्री झाली होती. परंतु फ्रेंचांच्या राजकारणाची व युद्धपद्धतीची महादजीस बिलकूल ओळख नव्हती. तशी ओळख होण्याचा प्रसंगच आला नव्हता. एकदां सन १७७८ त सेंट ल्यूबिन व महादजी पुण्यांत एकत्र होते; त्या वेळीं इंग्रजांना बुजगावणें म्हणून आणल्याचें वर्तमान महादजीस कळलें; परंतु त्या वेळींही महादजीनें नानाचा निषेध करून सेंट ल्यूबिनास घालवून देण्यास सुचविलें. तरी पुढें नानाचा

पांदिचरीस वकील होता, त्याजकडून फ्रेंच कारस्थानाच्या सर्व बातम्या त्यास पुण्यास कळत होत्या. चौकडीचें कारस्थान निर्माण झालें, तेव्हां फ्रेंचांच्या मदतीनेंच इंग्रजांस उखडून द्यावयाचें, असा नाना व हैदर यांचा अंतस्थ बेत ठरला; आणि त्याप्रमाणें सन १७८०–८१ त हैदरानें जेव्हां दोन वर्षें-पावेतों मद्रासेजवळ येऊन तळ दिला, तेव्हां इंग्रज अत्यंत घाबरून गेले. फ्रेंच नाविक जर एक वर्ष अगोदर येता, तर सर्व पारडें फिरून येथील राज-कारणास निराळें वळण लागलें असतें. परंतु त्याच संधीस हैदर मृत्यु पावला; आणि मद्रासच्या चार राजांनीं परभारें नानाशीं तहाचा उपक्रम चालविलेला पाहून, हेस्टिंग्स कलकत्त्याहून काशीस जाऊन महादजीस आपल्या बाजूस वळविण्याच्या खटपटीस लागला. कर्नल म्यूर व महादजी पावसाळ्यांत सिप्रीनजीक जवळ जवळ छावणी करून राहिले असतां म्यूरच्या मार्फत खडा टाकून महादजीचा ठाव हेस्टिंग्सनें पाहिला. थोड्याशा लालुचीस वश होऊन महादजी तह करील कीं नाहीं हें त्यानें अजमावलें. शिवाय दिल्ली अंतर्वेदीकडील बादशाही प्रदेश महादजीच्या क्षेत्रांतला असून तिकडे हेस्टिंग्सनें कारस्थानी करून थोडासा शह महादजीच्या विरुद्ध बादशहाकडे दाखविला; तेव्हां दिल्लीचा आपल्या हातांतला डाव इंग्रज हिसकावून घेतील तर त्यांत आपणास नानाकडून मदत होणें शक्य नाहीं असें वाटून, महादजीनें इंग्रजांशीं स्वतंत्र तह करण्याची म्यूरची सूचना स्वीकारिली. त्याची अट एकच कीं, दिल्लीच्या कारस्थानांत इंग्रजांनीं बिलकूल लक्ष घालूं नये, ती हेस्टिंग्सनें कबूल केली. महादजी जिवंत असे पर्यंत व पुढें सुद्धां कैक वर्षें इंग्रजांनीं सन १८०३ त प्रत्यक्ष सिंद्यांशीं युद्ध सुरू होईपर्यंत, दिल्लीच्या कारस्थानांत लक्ष घातलें नाहीं, त्याचें एक कारण हें आहे. बुडतां बुडतां महादजीनें आपणांस तारलें असें हेस्टिंग्स यास नेहमीं वाटे. इंग्रजांशीं तीन चार वर्षें लढून महादजीस अगदीं वैताग आला होता. फौजेचें देणें वाढून देणेकरी त्यास चैन पडूं देत नव्हते; आणि नानाशीं थोडाबहुत हेवादावा त्याच्या मनांत वसत असल्यामुळें त्यानें हेस्टिंग्सचा गळ गिळला, तें पाहून नानास अत्यंत दुःख झालें. ऐन रंगांत बाजू आली असतां आणि इतक्या वर्षें झग-डल्याचें श्रेय पदरांत पडण्याची संधि आली असतां, महादजीनें अवसानघात केला, असें त्यास वाटलें. परंतु होऊन गेलेल्या गोष्टीस उपाय नाहीं असें

पाहून त्यांतल्या त्यांत शक्य तितका तहाचा फायदा नानानें पदरांत पाडून घेतला. बाकी सफ्रां व बुसी आल्यावर सुद्धां यापेक्षां जास्त फायदा इंग्रजांशीं लढण्यांत मराठ्यांचा झाला असता कीं काय याची शंकाच वाटते.

---

प्रकरण तेरावें

# दादाची इतिश्री



१. दादाचें देहान्त प्रायश्चित्त ( ११-१२-१७८३ ).
२. आनंदीबाईची अखेर (२७-३-१७९४). ३. चिंतो विठ्ठल रायरीकर.
४. बाजीराव गोविंद बर्वे. ५. सदाशिव रामचंद्र.
६. मानाजी फाकडे.

* * * *

**१. दादाचें देहान्त प्रायश्चित्त,** ( ११-१२-१७८३ ).—हिंदुस्थानांतील इंग्रज अधिकाऱ्यांनीं मराठ्यांशीं तह केला, तरी दादानें तो मान्य न करितां अगदीं शेवटचा इलाज म्हणून त्यानें आणखी एक पत्र ता. १८-१-१७८३ रोजीं इंग्रज बादशहास पाठविलें.§ त्या पत्राचें मराठी रूपान्तर खालीं देतों. दादास तर याचा उपयोग झाला नाहींच, परंतु मराठ्यांस जिंकण्याच्या त्यानें दाखविलेल्या युक्त्यांचा हिंदुस्थानांतील इंग्रज अधिकाऱ्यांनीं पुढें चांगलाच उपयोग करून घेतला, हें त्या पत्रावरून समजून येईल.

'आपल्या ताब्यांतील मुलुखांपैकीं या भागांत सुरक्षितपणें राहतां येईल असें जाणून, सात वर्षांपूर्वीं मी सुरतेस येऊन आपल्या बादशाही छत्राचा आश्रय घेतला. इंग्रजांची फौज लढाई देण्यास लायक आहे हें मला कबूल आहे. पण

§ यापूर्वींच त्याचे वकील युरोपांतून परत आले होते. दादाच्या या पत्राची नक्कल कै. पारसनीस यांनीं हि० रे० कमिशनच्या स. १९२३ सालच्या बैठकींत वाचली. पहा रिपोर्ट १९२३ पृ. ९४.

मराठ्यांच्या सैन्याची व शत्रूला नामोहरम करण्याच्या मराठ्यांच्या युक्त्यांची इंग्रजी फौजेला माहिती नसल्यानें, इंग्रजी फौजेंत तितका कमीपणा आहे. जरूर त्या युद्धविषयक सूचना मी इंग्रजी फौजेस दिल्या होत्या. पण इंग्रजी सेनापतींनीं माझ्या सूचनांकडेस अगदींच दुर्लक्ष केलें. इंग्रज सेनापतीचें हें उद्दाम वर्तन विचारांत न घेतां बादशहांनीं माझ्या मदतीसाठीं भरपूर दारू-गोळ्यासह तोफखाना आणि दहा हजार पायदळ माझ्या हुकमतींत द्यावें आणि सेनापतीनें माझ्या सल्ल्यानें चालावें अशी त्यास ताकीद द्यावी. याशिवाय जो खर्च होईल त्याची व्यवस्था पाहण्यास दोन चार विश्वासू माणसेंही पाठवावींत. या माणसांचा खर्चही मी देईन. नंतर मी आपलें घोडदळ सिद्ध करून ताबडतोब थोडक्या खर्चांत लढाईची तयारी करीन बादशहाच्या फौजेचा आजपर्यंतचा आणि यापुढीलही होईल तो खर्च मी देईन. मात्र रकमेसाठीं विशेष तगादा न लावितां जरूर तो अवधि आणि फुरसत मला मिळावी. प्रथम सहा महिन्यांचा अवधि मिळाला पाहिजे. नंतर इंग्रज पायदळ आणि माझें घोडदळ यांचा संयुक्त मोर्चा हैदरावर वळवून त्याच्या बंडखोर फौजेसह त्याचीं पाळेंमुळें उपटून काढूं. स्वारीचे हे माझे विचार निःसंशय तडीस जाणारे असल्यानें ते मी बादशहांपुढें पसंतीसाठीं आणि अंमलांत आणण्यासाठीं व अवश्यक ते हुकूम मिळण्यासाठीं सादर करीत आहें. तूर्त हे विचार बाजूस ठेवून दुसरी एक महत्त्वाची बाबत मी बादशहांचे नजरेस आणीत आहें. ती ही कीं, मला हल्लीं दरमहा फक्त दहा हजार रुपयेच खर्चासाठीं मिळत आहेत. परंतु ही रक्कम कसोशीनें खर्च करूनही अनुभवाअंतीं मला अगदींच कमी पडत आहे. म्हणून माझ्या परिस्थितीकडेस लक्ष देऊन ही रकम कंपनी सर-कारानें थोडी तरी वाढवावी, असा हुकूम पाठविण्याची मेहेरबानी व्हावी. याप्रमाणें झाल्यावर महाराजांच्या इच्छेप्रमाणें मी सर्व खर्च त्या रकमेंतच भागवीन. माझे शत्रू मला पुष्कळ प्रकारांनीं अनेक गोष्टी सुचवीत आहेत, आणि शेंकडों प्रलोभनें दाखवीत आहेत. परंतु ज्याअर्थीं मी अंतःकरणपूर्वक बादशहाच्या कृपाछत्राचा आश्रय घेतला आहे, त्याअर्थीं माझा कितीही फायदा होत असला, तरी माझ्या इभ्रतीस काळिमा लागेल असें अश्लाघ्य वर्तन माझ्या हातून कदापि होणार नाहीं. येथें चालू असलेल्या (Third Maratha War) हल्लींच्या युद्धाची हकीगत लॉर्ड सेलबोर्न यांचे पत्रावरून हुजूरच्या ध्यानीं

येईल. सर एडमंड बर्क यांचे पत्रावरूनही यासंबंधीं बारीकसारीक माहिती हुजुरांस कळून येईल. हुजूरकडून मला मदत व आश्रय मिळेल अशी आशा आहे. या पत्रांत माझ्या खाजगी लेखकांच्या अज्ञानामुळें ज्या कांहीं चुका झाल्या असतील त्याबद्दल मी हुजुरांची माफी मागतों. मु सुरत, जानेवारी ता. १८ सन १७८३ ( मुद्रा. )' या पत्राचा उपयोग कांहींच झाला नाहीं.

इकडे तह पुरा होतांच इंग्रजांनीं दादास सुरतेहून निघून जाण्यास सांगितलें, आणि नाना महादजींनीं त्याची पुढील व्यवस्था लाविली. दादा हस्तगत होण्यापूर्वीं तह कायम झाल्यास, फिरून तो काय खूळ उठवील याचा नेम नव्हता. शिवाय महादजीचे ताब्यांत दादा गेल्यास ते दोघे पुनः शिरजोर होऊन पुणेकरांस नमवितील, सबब प्रथम दादास इंग्रजांकडून आपल्या कबजांत घ्यावें या संबंधानें नानानें महादजीस अट्टाहासपूर्वक लिहिलें. परंतु शेवटीं दादानें आपण होऊनच हरिपंताचे स्वाधीन होण्याचें ठरविलें, तेव्हां स. १७८३ च्या जून महिन्यांत नानाची एक भीति मिटली.

'दादासाहेबांस आपल्याजवळ आणावें, त्यास सुरतवाल्यांनीं अटकाव करूं नये, म्हणून पाटीलबावांनीं इष्टिनास पत्रें लिहिलीं होतीं, त्यास इष्टिनानें सुरतवाल्यांस हुकूम पाठविला कीं दादासाहेबांस पाटीलबावांकडे सुखरूप येऊं देणें. तीं पत्रें व पाटीलबावांनीं आपला कारकून केसो अनंत यास दादासाहेबांकडे पाठविलें. शिवाय पूर्वीं अंतस्थ बोलणें चाललें होतें, कीं वसुली दहा लक्ष रुपयांचा सरंजाम अगर नक्त घेऊन दादांनीं स्नानसंध्या करून गंगातीरीं बसावें, बाजीरावांस पुण्यास श्रीमंत माधवरावांजवळ पाठवावें. पाटीलबावांनीं आज्ञा केली, कीं दादासाहेब देशीं जात असल्यास उत्तम आहे. लवकर जाणें होय तें करावें, नाहीं तर राजकारणें लागलीं आहेत. रामजी पाटलाचेंही बोलणें कीं दादा देशीं आल्यास पाटीलबावांस संतोष आहे. यास्तव हरिपंत, होळकर, रास्ते व पांडुरंगराव यांस पाठवावयाचें केलें. ( ता. १६-६-१७८३ ). दादाची स्थिति किती निकृष्ट झाली होती त्याचें वर्णन मागें प्र. ९ क. ५ मध्यें दिलें आहे. तदनुसार त्यानें पुढील पत्रें ता. २७-१२-१७८२ रोजीं महादजीस लिहिलीं. 'आशीर्वाद उपरी. हल्लीं तुमचा मुक्काम कोठें आहे व तुम्हांकडील वर्तमान काय तें लिहून संतोषवीत असावें. सांप्रत इंग्रजांचा तुम्ही तह ठरवीत आहां, व आमचाही जाबसाल लागला आहे म्हणून ऐकतों.

त्यास सांप्रत आम्हांस थोरले दौलतीचा लोभ राहिला नाहीं. तथापि बारभाईचा आम्हांस इतबार येत नाहीं, त्याअर्थी आम्ही इकडेच राहूं. तरी ज्यांत आमची सोय तें तुम्हीं करावें हें उचित असे. मागील गतवार्ता चित्तांत न ठेवाव्या. आम्ही सांप्रत कोणाचे बऱ्या वाइटांत नाहीं. दौलतीचा अर्थ तरी पूर्वी ईश्वरकृपेंकरून मोठीच केली आहे. आतां वृद्धापकाळीं कांहीं ईश्वराची सेवा करून तापीतीरीं राहवें अशी इच्छा आहे. ह्यास्तव येथेंच आमची सोय घडून येईल तो अर्थ करावा. तिकडे तुम्ही जो मुलूख द्याल, त्यापेक्षां इकडे आम्हांस कांहीं कमी दिला तरी आम्ही राजी आहों. परंतु कोणाचे पेचांत राहणें होणार नाहीं. सर्व तुम्ही जाणतच आहां.' सहींत 'रघुनाथ बाजीराव' याचेपुढें 'प्रधान' हा शब्द नाहीं, हें आतां लक्षांत ठेवण्याजोगें आहे. त्यानंतर ता.१२-६-१७८३ च्या पत्रांत दादा महादजीस लिहितो, 'तुम्ही इंग्रजांशीं सलूख केला, तेव्हां इंग्रजांनीं आम्हांस खर्चास द्यावयाचें बंद केलें. आम्हांस तरी खर्चाची बहुत तंगचाई, तुम्हांकडून केसो अनंत येथें आले, परंतु आजपर्यंत आपलेकडून खर्चास पावलें नाहीं, व यादीवर करारमदारही करून पाठविले नाहींत; आम्हांस खर्चाचा ओढा बहुत, सबब पुणेकरांपासून आम्हीं खर्चास घेऊन व मातुश्रीबाईसाहेब यांचें बहुत दिवस दर्शन नाहीं हेंही समजलें, त्याजला गोदातीरीं खासा स्वारी गेली. तुम्हांपाशीं असल्यास व गोदातीरीं असल्यास भेद नाहीं, परंतु पुणेकर कारभारी यांविशीं खस्ता बहुत होता. तो त्यांनीं शपथ देऊन व मध्यस्थ मातबर देऊन दूर केला. सबब नाशिकच्या सुमारें कूच केलें. रेवातीरीं राहवयाचा बेत बहुत होता, पण चार महिने कर्जदार जाहलों, कर्जही सुरतेमध्यें मिळेना, सुरतेजवळ फुलपाड्यास राहवें तरी चार महिन्यांत निदानीं एक लक्ष पाहिजेत, व हल्लीं कर्ज साठ सत्तरपर्यंत आहे. पुण्याहून पैसा मिळेना, व केसो अनंत याजकडील तरी अंमल बसवून रसद घेऊन देणार, तेव्हां ऐवजास ठिकाण नाहीं. चहूंकडून खर्चाचा ताण मोठा पडला. तूर्त पुण्याकडून हुंड्या आल्या; व फत्तेसिंगाकडूनही कर्ज वारावयाबद्दल ऐवज देवविला, याजमुळें थोडीशी सोय पडली. तूर्त गोदातीरीं जातों. वरकड सविस्तर बोलणें केसो अनंतापाशीं जाहलें, ते लिहीत असतील. अतःपर लौकरच मातुश्रींचे दर्शनास जातों. $

$ नातू—म. सिंदे च. पृ. २९२—२९४; ऐ. टि. १.८; म. द. बा. १.१६१; खरे २६३८.

स.१७८३ च्या फेब्रुवारींत सालबाईचा तह पुरा झाल्यावर ‘ दादासाहेबां-कडून शिष्ये पुण्यास येऊन करारांत आलें कीं हरिपंत, तुकोजी होळकर, रास्ते व पांडुरंगराव पटवर्धन यांस कोंडाई बारीस पाठवून द्यावे, म्हणजे आपण येऊन दाखल होतों. हें वर्तमान वाचून पाटीलबावा संतोषी जाले. परंतु अंतर्यामीं काय दुःख जालें असेल ईश्वर जाणे.’ तह झाल्यापासून चार महिन्यांचे आंत दादानें आपला राहण्याचा निश्चय करावा असें ठरलें होतें, त्याप्रमाणें स.१७८३ च्या मार्च अखेरीस ‘ इंग्रज खर्चास देत होते, ते आतां देत नाहींत. त्यामुळें दादासाहेबांचीं राजकारणें चोहोंकडे चालूं लागलीं. टिपू, नबाब, भोसले वगैरेंकडे कारकून रवाना केले. इंग्रजांनीं स्वाधीन करावें असें करारांतच आहे. पाटीलबावांचे स्वाधीन झाल्यास ते सरकारांत देतील, परंतु मध्येंच कोठें निघून गेले तर ठीक नाहीं, याचा बंदोबस्त नानांनीं करावा. आतां त्यांस इंग्रजांची अटक नाहीं. पांच सात कोस जातात येतात असें आहे. मध्येंच निघोन गेले तर इंग्रज म्हणतील आम्हीं काय करावें; आणि तह तर जाला, मुद्दा हातचा गेला असें होईल.’ असें सुरतेचें पत्र नानास २५-४-८३ चें आलें. दादासंबंधानें नानामहादजींचा पत्रव्यवहार तीव्र झाला, पण त्यास आतां त्राण राहिलें नव्हतें, आणि बरीच उपरतिही झाली. ‘अखंड नाना व हरिपंत यांचे गुण वर्णन करितात. आमचे दौलतींत असले कारभारी होते, म्हणून त्यांनीं राज्य रक्षिलें. उभयतांचें नांव निघालें कीं त्यांस बरेंच म्हणतात. सखारामपंत, आबाजी महादेव व चिंतो विठ्ठल यांस दोष ठेवतात. ते अप्रामाणिक, पण या दोघांचे सद्गुण घेतात.’

सालबाईचा तह पुरा झाल्यावर सुरतेस दादासाहेबांना इंग्रजांनीं खर्चास देण्याचें नाकारलें, आणि पुणें दरबाराशीं कसा तरी समेट करून आपले राज्यांत जाऊन राहण्याचा सल्ला दिला, तेव्हां निरुपायानें इंग्रजांस सोडून जाणें दादास भाग पडलें. महादजी सिंदे त्यास बोलावीत होता, परंतु एकदां तिकडे गेल्यावर मुलांबाळांचा सुद्धां पुण्याकडील पेशवाईचा संदर्भ तुटेल, अशा अनेक कारणांस्तव गोदातीरीं राहण्याचें त्यानें ठरविलें. नानानेंही त्यास तशीं पत्रें लिहून आश्वासन दिलें. त्यावरच विसंबून न राहतां हरिपंत, तुकोजी होळकर व परशराम भाऊ यांपासून पृथक् पृथक् इमानपत्रें व बेलभंडार घेऊन, दादा सुरत सोडून निघाला. त्यास घ्यावयास हरिपंत व तुकोजी होळकर गेले, त्यांच्या गांठी

चांदवडापलीकडे तीन कोसांवर १६-७-१७८३ रोजीं पडल्या. दुसऱ्या दिवशीं मुक्काम धरणगांवावर § गंगातीरीं झाला. हरिपंताची मुलगी बाजीरावास देऊन त्याचें लग्न करावें असा विचार घाटत होता. ¶

'दादांकडील दोघे शिष्य स्वदस्तुरचें पत्र हरिपंतांस घेऊन आले कीं, या उपर तुम्ही याद करार करून पाठवाल त्यास आम्ही मान्य. दरम्यान निभावणीस होळकर व परशरामभाऊ. त्याजवरून इकडूनही याद व पत्रें गेलीं. समर्पक उत्तरें येतों अशीं येतांच हरिपंत व होळकर आणावयास गेले.' परशुरामपंतांचें पत्र १६ जूनचें दादास गेलें तें असें. 'आपण मातुश्रीबाईसाहेबांचे दर्शनास व गोदातीरीं राहवयाचा निश्चय करून खातरजमेविशीं हरिपंतास पत्रें पाठविलीं, त्यावरून सविस्तर कळलें. ऐशास स्वामी स्वच्छ चित्तें गोदातीरीं स्नानसंध्या करून राहणार, त्यापक्षीं फिरोन संशयास कारण व लौकिकास विरुद्ध गोष्ट होऊं नये. कराराच्या यादीप्रमाणें घडावें. श्रीमंतांस व दौलतीस कल्याण ती गोष्ट आपणांकडून घडावी, म्हणजे कोणेविशीं संशयाचें कारण नाहीं. खातरजमेविशीं बेलभंडार पाठविला आहे. येविशीं श्रीगणपतीची शपथ असे. त्यावर 'निश्चयें येतों, कोणेविशीं लढा नाहीं.' म्हणोन पत्रें आलीं. त्यावरून ता.१९-६-१७८३ रोजीं हरिपंत व होळकर निघाले. कोंडाईबारीस यांनीं जावें व श्रीमंतांनीं सुरतेकडून यावें. तेथून गंगातीरास कचेश्वर कोपरगांवाजवळ वाडा बांधला आहे तेथें राहवें. श्रीमंतांचा कारभार, विश्वास धरावयाचा नाहीं. परंतु रावसाहेबांचें पुण्य विचित्र आहे. नेमल्या स्थलास बहुतकरून घेऊन येतील. परशुरामभाऊला हरिपंत तात्या चला म्हणत होते, पण सर्वांनींच पुण्यांतून जाणें चांगलें नाहीं म्हणून राहिले. नानांनीं परशुरामभाऊस आग्रह केला, कीं हरिपंत येत तोंपावेतों आम्हांजवळ राहणें. कोणे समयीं कसें प्रयोजन पडतें कळत नाहीं.' 'दादांच्या व हरिपंत होळकरांच्या भेटी घोडपेनजीक आषाढ शु. १२ ता. ११-७-१७८३ रोजीं जाहल्या. बोलण्यांत व करण्यांत सरळता फार चांगली आहे. कचेश्वरास किंवा आनंदवल्लीस राहवयाचा निश्चय करून ठरेल तें लिहून पाठवूं.' ता.१९-७-१७८३ रोजीं खालील पत्र दादानें नानास पाठविलें. 'आजतागाईत मागील कित्येक गोष्टींविषयीं आमचे चित्तांत विरुद्ध होतें. परंतु आजपासून निखालसता झाली.

§ कोपरगांवाजवळ, नगर जिल्हा. ¶ म. द. बा. १-९४.

तुम्हांविशीं मनांत आल्या होत्या, त्या सोडल्या. पुढें तुम्हीं आम्हांशीं सरलतेनें चालावें. कपट धरूं नये. आम्हीही तुम्हांवर निःकपटें करून कृपा करूं. येविशीं श्रीसांबाची शपथ असे.' सुरतेहून निघण्यापूर्वी दादाबरोबर झालेले दोन करार उपलब्ध आहेत. एक दादांच्या मागणीवर ता.२१-५-१७८३ चे कारभाऱ्यांचे जबाबाचा, व दुसरा कारभाऱ्यांचे मागणीवर दादांचे जबाबाचा. दोनही करार समग्र देण्याचें प्रयोजन नाहीं 'स्नानसंध्या करून स्वस्थ बसूं. राजकारण करणार नाहीं. दौलतीस विरुद्ध आचरण करणार नाहीं. जवळ मातबर सरदार ठेवून घेऊं. यात्रेस जाण्यास सवड असावी,' वगैरे मजकूर आहे.

याप्रमाणें ठरून दादा कोपरगांवास येऊन राहिल्यावर त्यास गोपिकाबाईस भेटण्याची इच्छा झाली. तसेंच मातुश्रीचे पायांवर हात ठेवून दादानें शपथ घ्यावी, कीं पुनः विरुद्ध आचरण करणार नाहीं, कराराप्रमाणें वागेन. म्हणजे तितकाच कांहीं आळा त्यास बसेल, अशा बुद्धीनें भेटीची योजना करण्याकरितां हरिपंत दादापासून गंगापुरास गोपिकाबाईकडे गेला. तेथून ता. ३०-७-१७८३ चीं पत्रें त्यानें पुण्यास पाठविलीं, त्यांत दादाच्या व गोपिकाबाईच्या भेटीचा वाद हरिपंतानें लिहिलेला वाचण्यालायक असून, त्यांवरून बाईची कडकडीत तपश्चर्या व जाज्वल्य वृत्ति चांगली पटते. दादांचें पत्र स्वदस्तुरचें भेटीविशीं बाईस आलें, तेव्हां मातुश्री म्हणाली, 'यास अनुताप झाला नाहीं, मी दर्शन घेत नाहीं. आहे त्याप्रमाणें प्रायश्चित्त घेऊन एकटा येईल तर दर्शन होईल. त्यानें आनंदवल्लीस राहूं नये.' यावर हरिपंत नानास लिहितो, 'बाईसाहेबांचा प्रायश्चित्त-संकल्प व दादांचा दर्शनाविषयीं संकल्प यांचें परम संकट होतें, तें निवारण होऊन घडेल असें वाटतें. सिद्धांत झाला म्हणजे कुंभारीहून कोपरगांवाजवळ गंगातीरानें नासिकचे रोखें जाऊं. सांप्रत दादा बोलण्यांत कांहीं गुप्त ठेवीत नाहींत. मोहरा क्रूरतेचा नाहीं. मुखावर ग्लान असते. केवळ गरिबीनें भाषण होत असतें. पश्चात्ताप पुरता झालासा वाटतो. गुह्य दोष आपले मुखें उच्चारून मातुश्री सांगतील तसें प्रायश्चित्त करूं म्हणतात. आनंदीबाईही सांगतात कीं मातुश्री सांगतील तशी खातरजमा करणें.' याप्रमाणें प्रायश्चित्त श्रावण शुद्ध ६ सोमवारीं (४-८-१७८३) 'गोदादारणांचे संगमीं सांगवी येथें थोर ब्राह्मण समुदाय मिळवून स्वमुखें स्पष्ट उच्चार करून केलें. क्षौर करून होम केले.' नंतर दादानें मातुश्रीची भेट

घेतली. या भेटीचें वर्णन मात्र कोठें कागदावर आढळत नाहीं. एवंच रामशास्त्री याच्या तपस्वी वाणीनें दादास सांगितलेली देहान्त प्रायश्चित्ताची शिक्षा, तत्त्वार्थानें खरी झाली. त्याचा देहान्तही लगोलग झाला, पुण्याचें किंवा राज्याचें पुनर्दर्शन त्यास घडलें नाहीं.*

स.१७८३ च्या आगस्टांत दादा कोपरगांवच्या समोर गोदावरी कांठीं कचेश्वर येथें स्थायिक झाल्यावर लगोलग अखेर पल्ल्यास पोंचला. इहलोकीं कांहीं कर्तव्य न राहिल्यानें त्याचें जिणें संपलें. ता.११-१२-१७८३ रोजीं त्याचें देहावसान कचेश्वर गांवीं झालें. या गांवाजवळ नदीकांठीं बेटांत शुक्रेश्वर व विष्णु अशीं दोन मंदिरें असून त्यालगतच दादाचा भव्य वाडा होता. त्याच वाड्यांत त्याचें देहावसान झालें. जवळच हिंगणी गांवीं दुसरा एक वाडा बांधण्याचें काम दादानें चालू केलें तें पुरें झालें नाहीं. या नवीन वाड्याजवळ त्याचें दहन झालें. आपली राख तरी या वाड्यांत पडावी असा त्याचा हेतु होता. याशिवाय खुद्द कोपरगांवास एक लहान वाडा त्याचा होता त्यांत हल्लीं मामलेदार कचेरी आहे. मृत्यूचें वर्तमान नानानें तुकोजी होळकरास लिहिलें तें असें.

'श्री. दादासाहेबांचे शरीरीं समाधान नव्हतें. मध्यें चांगलें आरोग्यही झालें होतें. फिरून ज्वर होऊन मार्गशीर्ष व॥३ गुरुवारीं सहा घटका रात्रीस कैलासवास झाला. धिसाजी आपाजीची रवानगी बाई व बाजीराव यांचे समाधानार्थ केली.' मरणसमयीं वय ४९ वर्षे होतें. यांस स्त्रिया तीन, जानकीबाई बव्यांकडील, आनंदीबाई ओक व मथुराबाई पेंडसे. मथुराबाई सुरतेस देवी येऊन जून १७८० त वारली. दादाचे मरणसमयीं आनंदीबाई गरोदर होती, ती पुढें ३०-३-१७८४ रोजीं प्रसूत होऊन मुलगा झाला, त्याचें नांव चिमाजी आपा. हा काशी येथें नेमणूक घेऊन राहत असतां ९-६-१८३० रोजीं वारला.

* आधार—का. सं. प. या. २०३–२०५, १९८, १९६–२०१, ४९६ (पृ. ५४३ ); खरे २६७७–७९, २६८५, २६९९; म. द. बा. १–८६, ९१, १०३ व २-२७; ग्वा. ३-३८; ऐ. स्फु. ले. २-५; ऐ. चर्चा ले.५; भा. व. २. प. या. १; पे. श. पृ. ३४; ऐ. टि. १-२०, २-४०, ३-३७. स. मा. रो. १३०, १३९, १४१, १४३, १४८, १५६, १५७, १६० व १६१; पे. द. १४४-१४७; इ. वृ. १८३७-५५.

सुरतेस इंग्रजांचा आश्रय केल्यावर दादास त्यांनीं दरमहा दहा हजार रुपये खर्चास ठरवून दिले होते. दादांच्या आवांतर गोष्टी व उपद्व्याप ठिकठिकाणीं वर्णिलेले आहेत. मुंबईच्या वाडयाचा व नाटकशाळांचा उल्लेख, खर्चाची व्यवस्था वगैरेंचे तपशील भरपूर आहेत ते जिज्ञासूंनीं पाहवे. महेश्वर येथें दादानें नर्मदेस घांट पूर्वीच बांधला होता; आणि देऊळ बांधावयास चौथरा घातला होता, त्यावर अहल्याबाईंनीं देऊळ बांधण्याचें काम लावलें ( २-३-१७८३ ).

'दादासाहेब मयत होतांच आनंदीबाईचे अंगावरील जवाहीर घेऊन येणें म्हणोन नानाफडणीस यांनीं अन्याबा मेहेंदळे यासि पाठविलें. जवाहीर देणें म्हणोन मशार निल्हे बोलले. बाईंनीं उत्तर केलें, कीं अंगावर आहेत ते काढोन घेणें. हें उत्तर मशारनिल्हेनीं नानास लिहिलें. त्यांनीं उत्तर पाठविलें कीं निघोन येणें, म्हणोन माघारे आले.' बाजीराव, चिमाजी आपा व अमृतराव यांसह आनंदीबाई कोपरगांवास कचेश्वरीं राहत होती. बंदोबस्तास गोविंदराव गोडबोले व आपाजीराम सहस्त्रबुद्धे पागा सुद्धां होते.

रघुनाथरावाच्या अखेर पेशव्यांच्या घरांतील पुरुषांच्या जुन्या पिढीचा शेवट झाला. ता. १६-८-१७८३ रोजीं सदाशिवराव भाऊची बायको पार्वतीबाई, १३-११-१७८३ रोजीं जनार्दन बाबाची बायको सगुणाबाई, व रघुनाथरावाचे मागोमाग ३०-१२-१७८३ रोजीं बाळाजी विश्वनाथाची कन्या अनुबाई घोरपडे ह्या सर्व दिवंगत झाल्या. गोपिकाबाईनें मात्र आणखी पांच वर्षें जगून ता. ३-८-१७८८ रोजीं गंगापुरास देह ठेविला. राहतां राहिली आनंदीबाई, ती स. १७९४ मध्यें गेली. मिळून रघुनाथरावाबरोबरच मागील पिढी संपली असें म्हणण्यास हरकत नाहीं. हरभट पटवर्धनाचे कुटुंबाप्रमाणें बाळाजी विश्वनाथ भटाचें अगर महादेवभट भानूचें घराणें विस्तार पावलें नाहीं. अडचणी, कष्ट, साहस वगैरे बाबतींत तीनही घराणीं अग्रगण्य व पराक्रमक्षेत्र विपुल असतां, कांहींचा विस्तार व कांहींचा संकोच कां झाला असा प्रश्न राहून राहून मनांत येतो. वरील बायकांत अनुबाई घोरपडे फारच चतुर व बाळाजी विश्वनाथाच्या इतर वंशजांप्रमाणें पराक्रमी झाली; तिनें म्हणूनच अपरंपार संकटांतून इचलकरंजी संस्थानाचा बचाव केला. पार्वतीबाईच्या अंगीं कर्तृत्व असें कांहीं नव्हतेंच. थोडीशी भाबडी व श्रद्धाळु असल्या-

मुळें नवऱ्याचे बाबतींत भट भिक्षुक मांत्रिक जे कोणी तिला कांहीं सांगत त्यांजवर तिचा विश्वास बसे. नारायणरावाचे वधप्रसंगांत व पुढें सवाईमाधव-रावाचे बाळपणांत स्वतःची अक्कल अशी तिनें एकाही प्रसंगांत दाखविलेली दिसत नाहीं. मात्र सांगकाम्या प्रमाणें ती कारभाऱ्यांचे हुकूम मानी. आनंदीबाईचें पाणी तर तिच्यांत बिलकूल नव्हतें. मोरोबा दादाचे फितुरांत तिनें शिक्केकटार वगैरे सहज त्याच्या स्वाधीन केली. तोतया आपला नवराच असावा असें जरी तिला वाटलें, तरी तेवढ्यावरून तिच्या नीतीला बिलकूल वैगुण्य येत नाहीं. खरें म्हटलें तर पेशव्यांच्या सर्व स्त्रिया, किंबहुना त्या वेळच्या उच्च कुळांतल्या सर्व हिंदु स्त्रिया पातिव्रत्यांत अत्यंत खंबीर दिसतात. तसा लोकापवाद आलेलें मराठा स्त्रीचें उदाहरण इतिहासांत सहसा आढळत नाहीं, हें महाराष्ट्रास एका दृष्टीनें अत्यंत भूषणावह आहे. पार्वतीबाईसंबंधानें महादजी लिहितो, 'बाईनीं कैलासवास केला, त्यास ईश्वर-इच्छेस उपाय नाहीं. मातुश्री होती तों पावेतों श्री रावसाहेबांविशीं व घरांतील बंदोबस्ताविशीं खातरजमा होती. आतां तसें घरांत कोणी दिसत नाहीं. अष्टौ प्रहर जे बाळपेशव्यांजवळ असतात, त्यांचे हातून प्रातःकाळपासून दुसरे प्रातःकाळपर्यंत सर्व क्रियाकर्मं, स्नानपान, भोजन, शयन, इत्यादि संपादन होत असतात. तीं कर्में विश्वासुकाचे साक्षीनें घडावीं हें मोठें संरक्षण आहे. नाना पाहतच आहेत. जुन्यांपैकीं पार्वतीबाई गेली व नवा समागम आज प्राप्त झाला. (म्ह० पेशव्याचें लग्न नुकतेंच झालें). दोनही विलगच झालीं. यास्तव बंदोबस्त पक्का करावा.' घरांत वृद्ध सोबतीची राखण या पत्नीं-कडे या पत्रांत महादजीनें बाईस जास्त गौरव दिलेला नाहीं. तिनें आपलें सौभाग्य-चिन्ह मात्र अखेरपर्यंत टिकविलें. म्हणून तिच्या अंत्यविधींत नवऱ्याची सुद्धां क्रिया पलाशविधीनें करण्यांत आली.

**२. आनंदीबाईची अखेर** (२७-३-१७९४).—आनंदीबाईच्या योग्यते-संबंधानें पूर्वी जागजागीं विवेचन येऊन गेलेंच आहे. तिच्या इतक्या हुशार व बाणेदार स्त्रीचे नशिबीं अशी बिकट स्थिति आल्याचीं उदाहरणें क्वचित्च सांपड-तील. खुद्द दादास, त्याच्या साथीदारांस व इकडे कारभाऱ्यांस तिनें पाठविलेलीं पत्रें मोठ्या शहाण्यास शोभतील अशीं अप्रतिम आहेत. स. १७७८ ता. १ जाने-वारी रोजीं तिनें धारेहून सुरतेस बाजीरावाकडून लिहविलेलें पुढील पत्र किती

खुबीदार आहे पहा. राघोबा सारख्या पराक्रमी पुरुषानें इंग्रजांचे घरीं तुकडे मोडीत बसणें तिला बिलकूल पसंत नव्हतें.

"अखंडित ल० आलंकृत राजमान्य राजश्री लक्ष्मण आपाजी गोसावी यांसी, सेवक बाजीराव रघुनाथ नमस्कार. सूरसन समान सबैन मय्या व अल्लफ. तुम्ही तीर्थरूप सौभाग्यवती मातुश्री ताईसाहेबांस पत्रें पाठवितां आणि आम्हांस पाठवीत नाहीं हे गोष्ट तुम्हासीं रुसावयाची आहे कीं नाहीं? तुम्हांस रविशंकरमणाचे तीळ कर्शरा ( शर्करा ) पाठविले आहेत हे घेणें. तुम्ही सांगून पाठविलें कीं 'एक दोन लहान साह्या जाहाल्यास त्याच्यानें काय कार्य होणार आहे! मोठ्यांच्यानें कांहीं जाहालें नाहीं.' त्यास ही गोष्ट खरीच आहे. परंतु सुतें बहुत मिळालीं म्हणजे चऱ्हाट होतें; त्याणें मस्त हत्ती बांधला जातो. त्याप्रमाणें बाराभाईनीं एक मत करून धन्यासही थारा नाहींसा केला. याप्रमाणें युक्त केल्यास काय न होये? चवघे जे गोष्टीनें आपल्या मनांत येतील त्या तऱ्हेचीं सूत्रें राखावीं व आपले दौलतेंत कोणी मोठें माणूस असेल त्यांणीं कराराचा शब्द मागितला तर त्यास देऊन कार्य होये ते गोष्ट करावी. नाहीं तर सल्ला तरी कालाबर नदर देऊन करावा. ह्या गोष्टींतून कांहींच नजरेस येत नाहीं; आणि उगेच इंग्रजांचे घरीं पोटास मात्र खाऊन कितीक दिवस पडोन राहावें! यांत पूर्वीपासून तेज मिळविलें आहे. या प्रांतांत पराक्रमाच्या गोष्टी तीर्थरूपांच्या फार ऐकतों, त्या अशा कीं ज्या तऱ्हेनें पुराणांतील गोष्टी ऐकाव्या त्या तऱ्हेच्या. असें असोन हें तेथें राहणें आणि उद्योग न करणें, हें काय समजून वडिलांचे मर्जीस येत असेल? वरकड जातीनें तों बहुत मानी आहेत. परंतु कालापुढें इलाज नाहीं. आम्ही लेकरें, विशेष लिहिलें तर तीर्थरूप म्हणतील कीं, 'बाईको सारा वेळ आम्हांस गांजीत असते. तिला लेक झाला तोही तसाच खोटा निघाला!' यास्तव तुम्ही मर्जी पाहून पत्र वाचून दाखविणें आणि आज्ञा जे होईल ते लिहिणें. आम्ही वडिलांस तीळ शर्करा पाठविले आहे ते प्रविष्ट करून उत्तर पाठवावयाची विनंति करणें. जाणिजे, छ १ जिल्हेज. ( १-१-१७७८, पारसनीस संग्रह )."

दादाचे पश्चात् आनंदी बाईचा मुक्काम पुढें दहा वर्षें कोपरगांवासच झाला. तिच्या बंदोबस्तास गोविंदपंत गोडबोले, आपाजीराम सहस्रबुद्धे व केसोपंत हे फौज पागा सुद्धां असून, फंदफितुरासंबंधानें बंदोबस्त फार कठोर होता.

स. १७९२ च्या आश्विनांत बाई आपल्या परिवारासह आनंदवल्लीस येऊन राहिली, तेथेंच ती महादजी सिंद्याचे मागोमाग ता.२७-३-१७९४ रोजीं मरण पावली. नवऱ्याचे पश्चात्‌ही तिला स्वास्थ्य किंवा सौख्य मिळालें नाहीं. कारण हरहंमेश कांहीं ना कांहीं प्रकार घडून तिच्याबद्दल कारभाऱ्यांस संशय येई, त्यामुळें तपास वगैरे होऊन त्याचा जाच तिला सहन करावा लागे. ता. ८-२-१७८४ च्या एका पत्रांत अशा भानगडींचा एक मासला आहे. नवऱ्याच्या पक्षांतील मंडळींचा परामर्ष ती घेऊं लागे, तेव्हांच तिला असा त्रास होई. नाटकशाळां-'ची व त्यांच्या मुलाबाळांची तिनें अखेरपर्यंत आबाळ होऊं दिली नाहीं. प्रथमच कोपरगांवाहून कृष्णातीरीं तिला ठेवण्याचा विचार चालू असतां, गरोदरपणामुळें ती तेथून हालली नाहीं. 'चित्त प्रशस्त नाहीं. त्यांचे मनांत येथेंच राहवें. त्यांचें म्हणणें राजकारण कांहीं कर्तव्य नाहीं. निर्मळ चित्त जालें असें असतां विठ्ठल गोपाळ याणें लटकीच दिक्कत आणिली. ज्यापक्षीं बंदीदाखल आहों, त्यापक्षीं जेथें ठेवतील तेथें राहणें प्राप्त आहे. पूर्वीं इंग्रजांकडे होतों तेव्हां बरें होतें, आपले स्वाधीन होतों. आतां स्वराज्यांत आलों असतां हे अवस्था. तस्मात् दैवयोग! अशा गोष्टी क्लेशयुक्त्या, विस्ताराच्या, कुजक्या, उभयतां अमृतराव व मातुश्री बोलतात, 'किती लिहाव्या!' आनंदवल्लीस बंदोबस्त राहणार नाहीं असें कारकुनानें नानास कळविलें, तें पत्र ऐ. स्फु.ले.३ पृ. ८९ वर आहे. आनंदीबाईच्या अंतसमयाचें वर्णन खालील पत्रांतआहे, (२९-३-१७९४). 'ता.२६ मार्च रोजीं सायंकाळीं घाबरी झाली. नेत्रांस तटस्थता झाली म्हणोन दर्भास्तरणावर आली. नंतर गंगोदक मुखांत घातलें. घटकेनें किंचित् सावध झाली. हेमगर्भ मात्रा घातली, तेणेंकरून स्थिर झाली. रात्रभर बाजीराव, चिमाजीआपा व अमृतराव जवळ बसले होते. उत्क्रांत धेनु सायंकाळींच दिली. प्रातःकाळीं सूर्योदयाचे संधीस प्राणोत्क्रमण झालें. अखेरपर्यंत सावध होती. डोळे पुसणें, अंग खाजवणें, पदर नीट करणें, पाणी सांगणें, सर्व आपले हातें करीत. गळ्यांत कफ होऊन शक्तिहीन झाल्यानें बोलणें राहिलें. पहिला देवपूजन व जप याचा अभ्यास फार होता, तोच अखेरपर्यंत नमस्कार, न्यास करावे, असा छंद लागला होता. प्रातःकाळपासून साहित्य होऊन अग्निहोत्र झालेलें ते उपचार झाले. अग्निमंथन करून विधि सर्व झाला. गंगेवर जाण्यास दिवस बारा घटका आला. बाजीराव क्रिया

करितात.' दादानें स्मार्त विधिपूर्वक अग्निहोत्र घेतलें होतें, सबब आनंदीबाईचा अंत्यविधि वरप्रमाणें करावा लागला.

दादाचा कारभारी लक्ष्मण आपाजी आंबेकर याचीं पत्रें मुंबईहून दादास सुरतेस लिहिलेलीं खं. १२ त छापलेलीं आहेत. या अंबेकराचा उल्लेख खरे १४७६त आहे. ता.२८-७-१७६४ पासून त्याचा संदर्भ दादाकडे होता असें स. मा. रो. ३९७ वरून कळतें. याची पुढची हकीकत कळत नाहीं. विठ्ठलराव रामचंद्र व कृष्णराव रामचंद्र आंबेकर यांचा उल्लेख भा. व. श. पृ. ८१ वर आहे ते बहुधा लक्ष्मण आपाजीचेच आप्त असावे. दादाकडे आंबेकराचा प्रवेश चिंतो विठ्ठलाचे मार्फत झाला असें दिसतें. हे देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण; मौजे साकुरें ता० पारनेर, जिल्हा नगर, हा गांव यांस पेशव्यांकडून इनाम होता, तेथें त्यांचे वंशज आहेत.

रघुनाथपुरा म्हणून सुरतेंत एक भाग आहे तो दादानें वसविला अशी प्रसिद्धि आहे ती खोटी होय. तो भाग दुसऱ्याच कोणी रघुनाथानें वसविलेला आहे. सुरतेच्या बाहेर दादाचा वाडा मात्र होता, तो हल्लीं मोडकळीत आहे. दादामुळें सरकारास जो सात वर्षें जबरदस्त खर्च आला तो भरून काढण्याकरितां एक स्वतंत्र पट्टी किंवा कर त्याचे नांवानें सर्व सरदारांवर बसविण्यांत आला होता.

राजापुरचा वासुदेवभट गाडगीळ व कऱ्हाडचा नृसिंहाचार्य असे दोन पुराणिक आनंदीबाईजवळ आश्रित असल्याचा उल्लेख सांपडतो. $

**३. चिंतो विठ्ठल रायरीकर** (मृ.१७८३).—सखारामबापूच्या पाठोपाठ कैदेंत मरण पावलेला दुसरा प्रसिद्ध पुरुष म्हणजे दादाचा कारभारी चिंतो विठ्ठल हा होय. बापू, चिंतो विठ्ठल व नागपुरचा दिवाकरपंत हे जवळ जवळ सारख्याच योग्यतेचे एका शाळेंतले समकालीन लोक होत. चिंतो विठ्ठल कैद झाल्यावर नानानें त्यास आपल्या ताब्यांत मागितलें असतां, महादजीनें कांहीं राजकीय मतलबासाठीं आपल्या बरोबर गुजरातच्या स्वारींत नेलें. 'तेथें फितूर करून इंग्रजाकडे चालले. राउतांनीं धरून आणून राणेखानभाईचे हवालीं केले. आज

$ ऐ. टि, ६-३८; भा. व. २. अ. दि. पृ. १७; इ. वृ. १८३५, ४५, व १८३७, ५८.

पालखींत घालून उज्जनीस रवानगी केली. तेथें सहकुटुंब चौकींत राहवें म्हणोन सांगितलें आहे. ( ता. ११-४-१७८० ). इंग्रज गायकवाडांपासून दो कोसावर सिंद्यांचा मुक्काम. सोबती अस्तनींत, त्यांनीं अंगसूत्रें अनुसंधानें खेळविलीं. चिंतो विठ्ठल, सदाशिव रामचंद्र, महादजी गोगटे, नारो गोपाळ, त्रिंबकजी भालेराव यांणीं कोणेविशीं कसूर केला नाहीं. बातम्या मनस्वी पाठवून छापे आणिले. दगे केले, पण इंग्रज गायकवाडच फजीत पावत गेले. इंग्रज तोफा मारीत मारीत तळावर आले. इतक्यामध्यें चिंतो विठ्ठल तयार होऊन साऱ्या लोकांच्या पुढें जाऊं लागले. तोंपर्यंत कोणास समजलें नाहीं. गाड्यांच्या गोळया अंगावर येत त्यांच्या माऱ्यांत मशारनिल्हे निःसंग चालले. तेव्हां आपले लोकांनीं धरून आणिले. कैद करून उज्जनीस रवाना केले. तिकडे ते किल्ले मंदोसर येथें अटकेस होते. पुढें त्यांची रवानगी पुण्यास करावयासाठीं आश्विन शु० २ स (३०-९-१७८०) उज्जनीस आणिलें, तों मशारनिल्हेनीं, पुण्यास न पाठवावें म्हणोन पांच सात उपोषणें केलीं. पुढें आश्विन शु० १३ स भोमवारीं रात्रौ (१०सप्टेंबर) पहारेकऱ्यांस फितवून अब्दुलपुऱ्यांत एका जतीचे घरीं पळोन गेले. चौकशी-करितां तिसरे दिवशीं सांपडले. धरून आणून पायांत बेडी घालून ठेविलें. अन्न खात नाहींत. पळोन गेले त्याचे दुसरे दिवशीं त्यांचे स्त्रीनें व कन्येनें विषप्रयोग करून निधन पावलीं. दोघे कारकुनांस मार दिला तेही मेले. लबाड, क्रियानष्ट, यांचा परिणाम लागतो. पुढें यांस जाहिराणा चांगला दिसेल अशा प्रकारें शोभेनें पुण्यास आणलें ( आक्टोबर १७८० ), तेव्हां त्यांनीं संन्यास घेतला. तरी कारभाऱ्यांनीं त्यांस सातारा किल्ल्यावर कैदेंत ठेविलें. तेथेंच संन्यासी मेले.' 'मृत्यु स. १७८३ च्या जून महिन्यांत झाला असें १२-३०२ वरून दिसतें. पुढें वाड्याची मोजदाद, दत्तक वगैरे झाले, त्याच्याही हकीकती सदर ले. ३०३-३२३ पर्यंत आहेत. बाजीरावानें स. १७९९ त त्याच्या कुटुंबास पांच गांव इनाम करून दिले. $

**४. सदाशिव रामचंद्र.**—याचा शेवटही असाच हृदयद्रावक झाला. दादा मुंबईस आल्यावर स. १७७७ त तो इतरांबरोबर कर्नाटकांत हैदराचे आश्रयास गेला. सावशीच्या लढाईंत पटवर्धनांची वाताहत झालेली ऐकून त्यानें परशु-

$ का. सं. प. या. २२१, २२३; म. द. बा. १-२०, २१; ग्वा. ३-१०, ११, १५; ४. १६, १७; भा. व. श.; खं. १९-११६, १२५.

राम भाऊस ता.५-२-१७७७ रोजीं लिहिलें, कीं 'आपणाकडील वर्तमान कळतांच स्वार होऊन आपणापाशीं येऊन पोंचावें हेंच उचित, परंतु काय करावें! आम्हांपाशीं साहित्य फौज नाहीं. आमची अवस्था केवळ पराधीन, त्याजमुळें संकटांत पडलों आहों. हा कालवर आम्हांकडील जाबसालाचा प्रथम दिवस. आमचे श्रम आपल्यास लिहावे, त्यास आपणही घोरांत पडलां यास्तव वाईट वाटतें. पत्रीं काय लिहावें!' यावरून दादाचे पक्षास मिळाल्याबद्दल या गृहस्थास पश्चात्ताप होत होता असें वाटतें. परशुरामभाऊच्या व हरिपंताच्या मध्यस्थीनें तो पुढें बारभाईकडे आला; पण पुनः स.१७७८ त मोरोबाचे फितव्यांत सांपडून कैद झाला. 'सदाशिव् रामचंद्रास चौकी दिली,' असा उल्लेख ता.१५-७-१७७८ चा आहे. त्यानंतर तळेगांवावर दादा स्वाधीन झाल्यावर त्याचे साथीदार सदाशिव रामचंद्र, चिंतो विठ्ठल, वगैरे महादजी सिंद्यापाशीं नजर कैदेंत राहिले. स.१७८० च्या आरंभीं महादजी गुजरातेंत पावागड जवळ इंग्रजांशीं लढत असतां, 'सदाशिव रामचंद्र वगैरे दादासाहेबांचे शागीर्द पाटीलबावांपाशीं होते, त्यांनीं फितुर केला, त्याचे कागद पाटीलबावांस सांपडले, त्यांवरून सर्वांस कैद करून बेड्या घालून पावागडास रवाना केलें. सदाशिव रामचंद्रास उज्जनीस पाठविलें. त्या वेळीं चिंतोपंत जवळ नव्हते. दोचौं रोजांनीं चिंतोपंत तयार होऊन इंग्रजांकडे जाण्याच्या मनसब्यानें निघाले; वाटेंत सांपडले, त्यांणीं धरून आणिले. त्यांसही उज्जनीस रवाना केलें. तेथें मुलेंमाणसें आहेत तेथें जाऊन राहणें म्हणोन आज्ञा जाहली. शेवटीं होण्याचें तें जालें. फजीत पडले. तसेच पुण्यांतील फितुरी झाडून पकडून किल्ल्यावर घातले. कांहीं द्रव्य हरण करून आपापले घरीं पुण्यांतच चौकींत ठेविले. एकूण पक्का बंदोबस्त केला. हें सर्व वर्तमान नबाबबहाद्दरांस सांगावें,' असें नाना फडणीस निजामाकडील आपल्या वकिलास ता.१५-५-१७८० रोजीं लिहितो. सदाशिव रामचंद्राचीं मुलें माणसें तोरणा किल्ल्यावर ठेवण्यांत यावीं असा विचार स.१७८३ त चालला होता. पुढें त्याचा अंत कोठें कसा झाला हें आढळत नाहीं. पुण्यांत व उज्जनींत त्याचे मोठे वाडे होते. गांडापुर परगण्यांत स.१७६७ त सदाशिव रामचंद्रानें मोठी धामधूम केली होती असें शेंदुर्णी दप्तरांतील कागदांवरून कळतें.

नानानें या गृहस्थाचा बराच छळ केला असावा असें अनुमान होतें.

स. १७८६ च्या ऑगस्टांत मथुरेहून सदाशिव दिनकराचें पत्र पुण्यास आलें त्यांत मजकूर आहे कीं, 'सदाशिव रामचंद्राचे चिरंजीव राजेश्वरराव येथें पाटीलबावां-समागमें आहेत, त्यांस दीड हजार रुपये दरमहा द्यावा लागतो. पाटीलबावा म्हणतात, हे सरकारच्या पदरचे; यांस पत्र पाठवून घेऊन जावें व यांचें चाल-वावें म्हणून किती वेळां लिहिलें. परंतु जाबच येत नाहीं. सदाशिव राम-चंद्राचा संदेह होता, ते गेले. तो विचार आतां चिरंजिवाकडे राहिला नाहीं. यास्तव गांव, खेडीं, बाग, मळे, कुरणें, कदीम यांचीं यांस देऊन चालवावें, पुढें सेवा करतील तेव्हां कृपा होईल. या संबंधीं किती पत्रें नानास पाठविलीं, पण जाबच येत नाहीं.' यावरून सदाशिव रामचंद्र नुकताच वारला असून सखाराम हरीप्रमाणें त्याच्याही कुटुंबाचे हाल चालले असतां महादजीनें नानाकडे रदबदली केली हें सिद्ध आहे.‡ रामचंद्रबाबाचा हा वंश हल्लीं कोठें आहे?

५. **बाजीराव गोविंद बर्वे.**—हा आणखी एक दादाचा कट्टा अभिमानी होता. दादा मुंबईस गेल्यावर स. १७७७ त तो, सदाशिव रामचंद्र व तुळ्या पवार हैदराकडे जाऊन राहिले. हैदरानें त्या सालच्या जानेवारींत सावशी येथें पटवर्धनाचा पराभव करून कोन्हेररावास ठार मारून पांडुरंगराव व दुसरी कित्येक मंडळी यांस कैद केलें, त्यांचा थोडा बहुत परामर्ष बाजीरावानें घेतला, आणि परशरामभाऊस पत्रें लिहून बारभाईंशीं तडजोड चालविली, तिचा उपयोग कांहीं एक झाला नाहीं. पुढें नानानें हैदराशीं तह केला, तेव्हां बाजीरावास हैदरानें स. १७८०च्या मे महिन्यांत आपल्याजवळून काढून लाविलें, तेव्हां तो पुनरपि दादाजवळ सुरतेस गेला. तेथून स. १७८१ चे आरंभीं दादानें त्यास महेश्वर येथें अहल्याबाईचे आश्रयास पाठविलें. 'येते समयीं दादानें त्यास बाजीराव रघुनाथाची दिवाणगिरी करार करून शिरपाव दिला. महेश्वरीं आल्यावर बाईनें त्यास कांहीं दिवस सन्मानानें वागविलें. परंतु तेथें त्याचीं घोडीं, जवाहीर वगैरे जळून वाताहत झाली. त्या मुळें फौज बाळगण्याची सोय राहिली नाहीं. बर्वे महेश्वरास आल्याचें नानास समजतांच त्यानें बाईकडे माणसें पाठवून बर्व्यास पुण्यास पाठविण्याबद्दल तगादा लाविला. तेव्हां बर्व्यानें बाईस विनंति केली कीं, 'आम्हांस पुण्यास

‡ खरे २०१४, २४०१; खंड १९-११६, १२५; भा. व. २ प. या. १४०, ता. ३१-१२-१७८३; ग्वा. ५-१२०.

पाठवूं नका. एक वर्षभर आमची निष्ठा पाहून मग आपल्या विद्यमानें पक्का बंदोबस्त पुणेंकरांशीं करून बिदा करावें.' प्रथम बाईनें त्यास बरेंच ताणलें, पण मागाहून तो गयांवयां करूं लागल्यावर एक दोन वर्षे तिनें त्यास आपणांजवळ बंदोबस्तानें ठेविलें. एक वेळ बाईनें त्यास पुण्यास जाण्याची निकड केली, परंतु 'बर्वे ऐकेनात, आपण जिवंत जाणार नाहीं, प्रेत रेवेपार कराल, असें उत्तर केलें. वक्तृत्व, सव्यअपसव्य फार केलें, परंतु पुण्यास जाण्याची अनुकूलता पडेना. दोन तीन दिवस दुखणें झालें. औषध घेतांना स्नानें न करितां उपोषणें केलीं. सगळ्यांनीं चार दिवस गळ घातली तेव्हां प्रहर रात्रीं स्नान करून फराळ घातला. प्राणत्यागच केला तर नाहक दुर्निमित्य येईल, यास्तव बाई मोमदील जाली, आणि सरकारांत रदबदलीचीं पत्रें लिहिलीं. त्याचीं घोडीं धर्मपुरीस होतीं. जवळ गवताच्या गंजी व बाण होते. ता. १७ एप्रिल स. १७८२ रोजीं पागेस आग लागून घोडीं सर्व मेलीं, कापड व जवाहीर होतें तेंही जळालें.' बर्वे पुनः पळून गेल्यास तुम्हांस जबाबदार धरूं, असें नानानें बाईस दरडावून लिहून पाठविल्यावर, त्याजवर पाहरा बसविला, म्हणून बर्वे उपोषणें करूं लागला. पुढें सालबाईचा तह पुरा होऊन दादाची उमेद सर्व संपली, तेव्हां बर्वेही उघडा पडला. फंदफितूर करण्याची त्यास ताकद राहिली नाहीं. अहल्याबाईनें नानाकडे मध्यस्थी करून तीनचार हजार रुपयांचा गांव द्यावयाचा करार ठरवून त्यास आदरानें निरोप देऊन पुण्यास पाठविलें. दादा कोपरगांवास आला. त्यानंतर बर्वे सेप्टेंबर १७८३ त बाईचा निरोप घेऊन पुण्यास गेला. सालबाईचा तह झाल्यावरही पाटीलबावाशीं स्नेह करून, दादास झाशीस आणून, पुढें आणखी खटपटी किंवा दंगे करण्याची बर्व्यांची उमेद होती. 'दादा, पाटीलबावा व आम्ही एकत्र जालियावर जी मसलत करणें ती करूं,' असा त्याचा डाव होता, पण तो सिद्धीस गेला नाहीं. मुख्य दादाच आतां हैराण होऊन मृत्युपंथास लागल्यामुळें सर्व कारभार आटोपला. महेश्वर दरबारच्या बातमीपत्रांतील भाग २ चे अं. २७-३५ वगैरे कित्येक लेख बाजीराव बर्व्यांचा स्वभाव दाखविण्याजोगे आहेत. पुढें बाजीरावास पेशवाई झाल्यावर त्यानें बर्व्यांचा परामर्ष घेतला.†

† खरे १७९८, २००५, २००६, २०२३, २०२४, २०३८, २६९७; खंड १९. ११७, १२०; म. द. बा. १-४३-५०, ९४, ९८, १०१, १०९, १११; २-२०-५०.

६. **मानाजी फाकडे.**—महादजीच्याच घराण्यांतला एक पुरुष हा मानाजी असून, त्यास पुढें राष्ट्रानें 'फाकडे' म्हणून जें सार्थ नांव दिलें, त्यांतच त्याचें कर्तृत्व चांगलें व्यक्त होतें. याच्या जन्मकालाचा किंवा पूर्वचरित्राचा थांग लागत नाहीं. परंतु पानिपत पूर्वीपासून पुढें त्याचें नांव कागदोपत्रीं आढळूं लागतें. म्हणजे बहुधा वयानें सुद्धां तो महादजीचाच समकालीन असून महादजीचे पश्चात् सहा वर्षे मानाजीचें कर्तृत्व चालू होतें. म्हणजे ठोकळ मानानें मोठेपणीं अर्धे शतक वर्षे तो राष्ट्रांत वावरत असून सन १७६४–६८ पर्यंत चार वर्षे त्यानें प्रत्यक्ष सिंद्यांचे गादीचाही उपभोग घेतलेला आहे. अर्थात् मरणसमयीं त्याची उमर सुमारें सत्तराचे आंतबाहेर असावी. $

महादजीचा ओढा माधवरावाकडे आहे हें पाहून, राघोबानें मानाजीस सिंद्यांचे जहागिरीवर कायम करून तारीख २५-१०-१७६४ रोजीं त्यास पोषाख देऊन उत्तरेंतील कामगिरीवर रवाना केलें. तेणेंकरून महादजी अर्थात् रुष्ट झाला. पुढें माधवरावाचा जम बसल्यावर त्यानें तारीख १८-१-१७६८ रोजीं महादजीस सिंद्यांची जहागीर देऊन, मानाजीस लष्करांत नोकरी दिली, त्यामुळें तो चिडून वेळीं अवेळीं माधवरावास त्रास देऊं लागला आणि रघुनाथरावाचा कट्टा अभिमानी बनला. परंतु माधवरावाचे हयातींत त्याच्या उच्छृंखल स्वभावास करामत दाखविण्यास अवकाश मिळाला नाहीं. माधवरावाचे पश्चात् नारायणरावाचा खून झाल्यावर जी दंगल माजली, तींत मानाजीस आपल्या अंगचें शौर्य, साहस, दुराग्रह, स्वार्थ, कारस्थान वगैरे गुणावगुण दाखविण्यास हवी तशी संधि मिळाली, तेव्हांचें वर्णन मागें ठिकठिकाणीं आलेंच आहे.

---

$ **आधार.** इ. सं.—ऐ. चरि. २. १३; किंकेड भा. २ पृष्ठ १२५; का. सं. प. या. ३१६; पेशवाईची अखेर पृष्ठ १२, १३, २२; खरे–ऐ. ले. सं.–ले. १७६६, १८३१, १९३४, १९४७, १९५६, १९९६, १९९८, २०३६, २२२३–२८, २२३१–३५, २३५९, २३८३, २३८५–८६, २५४१, २५४३, २५५१, २६२१, २६३५ व पृष्ठ २४६०–६२, ३०६६, ३४७२ व ३४७७; स्वकृत म. रि. म. वि. ४ पृष्ठ १८७.

**वंशावळ, मानाजी फाकडे**

साबाजी सिंदे
|
नरसिंगराव
|
मानाजी सिंदे फाकडे
|
आनंदराव (बडोद्यास)

रघुनाथराव मृत्यु पावल्यावर मानाजीचे अपराध माफ करून त्यास पुनरपि नानानें नोकरींत घेतलें. मात्र ही त्याची पुढील नोकरी विक्षेपकारक नसल्यामुळें तिच्या-संबंधानें विशेष तपशील उपलब्ध नाहीं. तेव्हांपासून मानाजीचें वास्तव्य पुण्यास पुष्कळ दिवस होतें. घाशीरामाचा कोतवाली कारभार पुण्यांतील लोकांस दुःसह झाला, आणि त्यानें ३४ तेलंगी ब्राह्मणांस रात्रीं बाहेर भटकत राहिल्याच्या गुन्ह्याबद्दल चावडीचे जागेंत अटकेंत ठेविलें. सकाळीं पाहतात तों २१ मेलेले व बाकीचे प्रेतवत् आढळले. तरी त्यांस सोडवून आणण्याची कोणास छाती होईना. कोणी तरी साहसी पुरुष मदतीस असल्याशिवाय हें काम तडीस जाणें शक्य नव्हतें. ब्राह्मणांनीं हा प्रकार मानाजीस जाऊन सांगितला. तो लगोलग कांहीं शिपाई बरोबर घेऊन कोतवालचावडीवर गेला; आणि दरवाजे फोडून जिवंत ब्राह्मणांस बाहेर आणिलें. पुढें त्या ब्राह्मणांनीं घाशीरामास पकडून त्याचे गळयास दोरी बांधून रस्त्यांतून फरफटत ओढून ठार मारिलें. हा प्रकार ता.३१ आगष्ट सन १७९१ रोजीं घडला. यांत मानाजीचें साहस दिसून येतें. पुणें दरबारांत व तमाम राज्यांत मानाजीचा दरारा विलक्षण होता. कित्येक इंग्रज अधिकाऱ्यांच्याही तो चांगला परिचयाचा होता. मेजर प्राइस सन १७९१ त पुण्यास आला होता, त्यानें प्रत्यक्ष पाहिलेल्या हकीकती लिहिल्या आहेत, त्यांत मानाजीचाही उल्लेख खालीलप्रमाणें आहे. ‘मी पेशव्यांचा दरबार पाहिला, त्यांत मानाजी फाकडे नांवाचा गृहस्थ होता. त्याजकडे कोणाचेंही चित्त वेधण्याजोगें होतें. त्याच्या अप्रतिम धाडसाचा अनुभव इंग्रज फौजेस आलेलाच आहे. त्याचें तें ओबडधोबड व अवाढव्य शरीर आणि अस्सल मराठी ठेवण लगोलग डोळ्यांत भरणारी होती. कमरेच्या वर सर्व शरीर उघडें, फक्त खांद्यावरून खालीं मोकळा सोडलेला एक दुपट्टा होता. छाती, तोंड व हात त्यांजवर पिंवळया व शुभ्र गंधाचे भले मोठे पट्टे ओढलेले होते. ढालीवर टेकलेलें शरीर व त्याची राकट मुद्रा पाहून थरकांप सुटावा, मग अंतर्याम त्याचें कसेंही असो. तळेगांवावर ज्या आम्हीं इंग्रजांनीं त्यास आपल्या पाठी दाखविल्या, यांचाच आतां पेशव्यांचे दरबारांत चाललेला एवढा सत्कार त्यास दुःसह वाटत असावा.’

महादजीशीं असलेला मानाजीचा पहिला द्वेषभाव पुढें नाहींसा झाला असावा. निदान महादजीचे पश्चात् त्याचें दौलतरावास साह्य होतें. अंतर्याम रघुनाथरावास वाहिलेलें असल्यामुळें त्याचा पुत्र बाजीराव यास पेशवाई मिळवून देण्यांत त्यानें पुष्कळ खटपट केली. सवाईमाधवरावाचे मृत्यूनंतर पेशवाईसंबंधीं ज्या खटपटी सुरू झाल्या त्यांत आरंभींच मानाजी फाकडे, बाजीराव बर्वे वगैरे दादासाहेबांचे परिवारांतील पूर्वींची सुमारें दोनशें मंडळी लगोलग बाजीरावाचे भोंवतीं जमा झाली, आणि त्यांनीं पुनरपि पूर्वींचाच डाव चालू केला. त्यांत मानाजीची किंमत इतकी वाढली कीं, नाना फडणीस सुद्धां त्याचीं आर्जवें करूं लागला, 'रहिमतपुराविशीं मानाजी सिंदे यांस नानांनीं रूबरू सांगितलें जे, सोडचिठ्ठी देणें. त्याजवरून आज चार दिवस आज देतों, सकाळ देतों म्हणतात.' यावरून मानाजीच्या स्वभावाची परीक्षा होते. राज्याचें कांहीं कां होईना, आपला मतलब साधला म्हणजे झालें, अशा प्रकारची मानाजीची व इतरांची वृत्तिच शेवटीं राज्य बुडण्यास कारण झाली. मानाजीच्या या खटपटींचें वर्णन खरे भा. ९ यांत भरपूर आहे. तो एप्रिल स. १८०० त मरण पावला. §

मानाजीचा मुलगा आनंदराव यानें ता. २६-७-१८०९ रोजीं, राजपुतान्यांत निमाडा‡ येथें दौलतरावाचा मुक्काम असतां, सर्जेराव घाटग्यास ठार मारिलें, त्याची चित्तवेधक हकीकत ब्राउटननें दिली आहे.* सर्जेरावाच्या क्रूर वर्तनास लोक इतके कंटाळले होते कीं त्याच्या मृत्यूनें समाधानी उत्पन्न झाली. पुढें सिंद्याचे पदरीं राहणें आनंदरावास धोक्याचें वाटून तो बडोद्यास आनंदराव गायकवाडाचे पदरीं जाऊन राहिला. तेथें 'फाकडे' या नांवानें त्याचें घराणें हल्लीं विद्यमान आहे.

इतिहास म्हणजे राष्ट्रपुरुषांचें स्वभाव-चित्र. तें मनोहर वठण्यासाठीं वरील तपशील येथें व ठिकठिकाणीं मुद्दाम सांपडले तितके दिले आहेत. एखाद्या राष्ट्राच्या स्वभावांतील ठळक खांचाखोंचा समजण्यास त्यांतील प्रसिद्ध व्यक्तींचीं चरित्रें तपासावीं लागतात. बाबरापासून औरंगजेबापर्यंतच्या मोगल बादशहांचे स्वभावविशेष कसकसे बनत गेले हें तपासणें जितकें बोधप्रद आहे

§ खरे ले. ५४३३. ‡ अजमीरच्या द० ६० मैल. * पृ. १६८.

तितकेंच शहाजी–शिवाजीपासून प्रतापसिंह महाराजांपर्यंत जे छत्रपति झाले त्यांचे स्वभावविशेषही अनेक दृष्टींनीं मोठे हृदयंगम वाटतात. राज्याची परिस्थिति बदलते, तदनुसार राष्ट्रपुरुषांचे स्वभावही बदलत जातात. शिवाजी व त्याच्या कक्षेंतील पुरुष कान्होजी व बाजी जेधे, तानाजी मालुसरे, प्रतापराव गुजर, हंबीरराव मोहिते इत्यादींचा संच मनांत आणावा; तसाच पुढें शाहू छत्रपति सिंहासनावर असतां खंडेराव व त्रिंबकराव दाभाडे, कान्होजी व सखोजी आंगरे, कान्होजी व रघूजी भोसले, इत्यादींचा मेळा कांहीं निराळेच स्वभावविशेष दाखवील. उत्तर मराठशाहींत पेशव्यांच्या ब्राह्मणी स्वभावाची झांक राष्ट्र-पुरुषांचे ठिकाणीं झळकूं लागते. बाजीराव व त्याचे साथीदार राणोजी शिंदे, मल्हारराव होळकर, उदाजी पवार वगैरेंचा खाका शाहूच्या मंडळाहून अगदीं वेगळा पडतो. नानासाहेब व सदाशिवराव भाऊ आणि त्यांच्या आवारांतील पुरंदरे, पेठे, पटवर्धन, दमाजी गायकवाड, दत्ताजी व जनकोजी सिंदे, यशवंतराव पवार व समशेर बहाद्दर या मंडळींची खुमारी आणखी कांहीं निराळीच. पानिपतोत्तर कालांत तर माधवराव, रघुनाथराव व त्यांचे कक्षेंतील ब्राह्मणव्यक्ती, तसेंच महादजी सिंदे, तुकोजी होळकर, जानोजी व साबाजी भोसले, सखाराम हरि गुप्ते व मानाजी फाकडे इत्यादींचा पंथ तर मागच्या सर्वांहून अगदींच स्वतंत्र दिसतो. अशा सर्व व्यक्तींच्या चरित्रांचे तपशील डोळ्यांपुढें असले म्हणजे एकंदर राष्ट्राचा उद्योग व त्याचा स्वभाव हे परिस्थित्यनुसार कसकसे पालटत जातात, त्याची उमज पडून इतिहासाचा उपयोग मनांत उभा राहतो; आणि ज्याप्रमाणें शाकुंतल किंवा हॅम्लेट नाटकांतील पात्रांचे स्वभाव कवीनें उत्तरोत्तर कसे सजविले आहेत हें रंगभूमीवर पाहत असतां मनास एक प्रकारचें कौतुक वाटतें, त्याचप्रमाणें ऐतिहासिक व्यक्तींचें कर्तृत्व आणि स्वभाव एकदम मनांत आणिले असतां, इतिहास म्हणजे सुद्धां एक प्रकारचें प्रचंड मानवी नाटकच आपल्या डोळ्यांपुढें चाललें आहे, अशी भावना होते; आणि भिन्नभिन्न व्यक्तींचे स्वभाव एकाच्याच ठिकाणीं एकवटलेले पाहिले म्हणजे विधात्याच्या चातुर्याची हद्द वाटून, तशा चरित्रांचे तपशील खोलांत शिरून समजून घ्यावेसे वाटतात. या दृष्टीनें मानाजी सिंदे वगैरे अनेक पुरुषांची हकीकत या पुस्तकांत ठिकठिकाणीं दिलेली अभ्यासूंनीं तपासून पाहवी.

## प्रकरण चौदावें

# प्रतिनिधि, हैदर व करवीरकर



*      *      *      *

इंग्रजांच्या युद्धाचें मुख्य अनुसंधान ठेवण्यांत इतर विषय बरेच राहून गेले आहेत. राज्याचा पसारा देशभर चालूच होता. त्याचें वर्णन विशिष्ट कालखंड पाडून बरोबर साच्यांत बसविणें केव्हां केव्हां अशक्य होतें. अशा कित्येक अवांतर विषयांची बोळवण या प्रकरणांत करावयाची आहे. पैकीं उत्तर हिंदुस्थानांतले विषय तूर्त बाजूस ठेवून, दक्षिणेकडील घडामोडी तेवढ्या येथें घेतों.

**१. दोन जाज्वल्य प्रतिनिधि, भवानराव व भगवंतराव.**—या दोन प्रतिनिधींच्या झगड्याची व प्रतिनिधींच्या घराण्याची हालहवाल पूर्वी मध्य विभाग ४ पृ.१२६ वर दिली आहे, तिचीच पूर्तता येथें करावयाची आहे. शिवकालीन अष्टप्रधानांपैकीं पेशव्यांशीं संबंध येणारे प्रतिनिधि व सचिव हीं दोनच प्रमुख कुटुंबें या वेळीं प्रसिद्ध असून दोघांचेही नाना फडणिसांशीं जे व्यवहार घडले ते भिन्न दृष्टींनीं इतिहासांत स्मरणीय झाले आहेत. पैकीं सचिवाची व बाजी मोरेश्वराची हकीकत पुढें येईल. प्रतिनिधींचे घरांत

नारायणरावाचे वधप्रसंगीं भवानराव प्रमुख असून त्याचा जो झगडा भगवंतरावाशीं चालू होता, त्यामुळें बारभाईंच्या अडचणींत भर पडली. भवानरावाबद्दल नानाफडणिसाचा आदर असून त्यानेंच प्रथम धिटाईनें दादाचे विरुद्ध उघड बंडखोरी पुकारून त्याजबरोबर कर्नाटकचे स्वारींत जो निर्वाणीचा प्रसंग बनविला, त्याचा उल्लेख पूर्वीं आलाच आहे. नानाफडणीस भवानरावाच्या राष्ट्रीय कामगिरीचा उल्लेख गौरवानें करून म्हणतो, 'प्रतिनिधींची फौज आज सतत चार वर्षें कामगिरीवर छावणीस आहे. लोक चांगले बाळगितात. भगवंतरावाचे पेंचामुळें कर्जाच्या जरबेंत फार आले, तथापि चाकरीस गुंता पडूं दिला नाहीं.' त्रिंबकराव मामाचे साह्यास भवानराव धावून आल्याचे उल्लेख अनेक आहेत. त्याचें व भगवंतरावाचें युद्ध चालू असतांच स.१७७५-७६ सालांत पेशवे व करवीरकर छत्रपति यांचेंही युद्ध त्याच टापूंत सुरू झाल्यामुळें, भवानरावानें बारभाईंचा पक्ष घेतांच, भगवंतराव कांहींसा छत्रपतीचे बाजूस गेला. कांहींसा म्हणण्याचें कारण, त्याची दृष्टि स्वतःपुरतीच असून, वास्तविक छत्रपतींची सरशी होणें भगवंतरावासही इष्ट नव्हतेंच. परंतु मलकापुरकर प्रतिनिधि कोल्हापुरचे अंकित व मलकापुरकरांचा पाठिंबा भगवंतरावास, अशी त्या वेळची परिस्थिति होती हें लक्षांत ठेविलें पाहिजे.

ता.३-८-१७६४ रोजीं नाना फडणिसानें प्रतिनिधिपदाचा संपूर्ण अंमल भवानरावास करार करून त्याचा पूर्वींचा रुसवा नाहींसा केला, आणि भगवंतरावास विटें येथें लहान जहागीर स्वतंत्र तोडून देऊन त्याला बाजती सरंजाम दीड लाखांचा ता.४-९-१७७५ रोजीं दिला. विटें गांव कऱ्हाडच्या पूर्वेस सुमारें वीस मैल असून तेथें भगवंतरावाचा बाप त्रिंबकराव मूळपासून राहत असून त्यानें तेथें वाडे व तटबंदी केलेली अद्यापि मोडक्या स्थितींत दिसते. †

भवानराव व भगवंतराव दोघेही पुरुष शूर, द्वाड व हेकेखोर होते. त्यांत भगवंतरावाची कडी वरचढ होती. विट्यानजीक पारें म्हणून गांव आहे, तेथचा ग्रामजोशी **हणमंतराव गुळवणी** हा एक विद्वान व कारस्थानी पुरुष भगवंत-

† ऐ. टि. ३-५, ६-४२; खंड १०-११९, १२०, १२१, १२३; स. मा. रो. १७२, १७४-७५, १७८-८०; खरे १४४०-२०२७.

रावाचा साह्यकर्ता होता. भोसल्यांचे पदरीं जसा शिवभट साठे, तसाच प्रतिनिधींच्या पदरीं हा हणमंतभट राजकारणांत प्रसिद्धीस आला. सखारामबापूशीं आप्तसंबंध असल्यामुळें दरबारचा पाठिंबा त्यास चांगला मिळाला. लहानपणापासून भगवंतराव व हणमंतराव एकत्र वाढले. असें सांगतात कीं सदाशिवराव भाऊ व भगवंतराव हे एकदां बोथाटी खेळत असतां भगवंतरावानें सदाशिवरावास हरविलें. तेव्हांपासून त्याजवर सदाशिवरावाची मर्जी बसली. त्यास त्यानें आपल्याबरोबर कर्नाटकच्या स्वारींत घेतलें. तेथें पुष्कळ मुलूख हस्तगत करून भगवंतरावानें पेशव्यांस दिला. पुढें जेव्हां भवानरावाचें व माधवराव पेशव्याचें वांकडें आलें, तेव्हां भगवंतरावास त्यानें प्रतिनिधिपद दिलें. तेव्हांपासून या प्रतिनिधि बंधूंचा तंटा जुंपला. एकाची हांव आपलें पद परत मिळविण्याची तर दुसऱ्याची तें टिकविण्याची. या झगड्यांत भगवंतरावाचा मुख्य कारभारी व सल्लागार हणमंतभट होता.

सन १७७४ अखेर भवानराव बारभाईचे फौजेबरोबर दादाचे पाठलागांत होता. दादा गुजरातेंत उतरल्यावर स.१७७५ च्या फेब्रुवारींत भवानराव कारभाऱ्यांचा निरोप घेऊन किन्हईस गेला. तिकडे त्याचें व भगवंतरावाचें युद्ध जुंपलें असतां, कोन्हेरराव पटवर्धन व रामचंद्र गणेश हे दोघे पेशव्यांचे सरदार करवीरकरांवर चालून गेले, तेव्हां भवानरावास पेशव्यांचे फौजेस सामील होण्याची आज्ञा झाली. प्रतिनिधींचा कलह न व्हावा, भगवंतरावानें आपलें इनाम संभाळून विटें येथें राहवें आणि भवानरावानें पुढें पटवर्धनांबरोबर कर्नाटकचे स्वारींत जावें, असें कारभाऱ्यांनीं ठरवून, त्याप्रमाणें स.१७७५ च्या नोव्हेंबरांत त्यांनीं उभयतांकडे कारकून पाठविले. परंतु यानें प्रतिनिधिबंधूंच्या कलहाचें निवारण जाहलें नाहीं. भगवंतरावाचा वेध भवानरावाला चालूच होता. त्याचा मुतालिक वासुदेव अनंत यास कांगोरीच्या किल्ल्यावर कैद झाली होती, तेथून पळून तो बाणकोटास इंग्रजांकडे गेला, सबब त्याच्या गांवाची बारभाईनीं जप्ती केली. भगवंतराव मोठा शूर व कडवा होता. डिसेंबरांत त्यानें दहा हजार फौज जमा करून रास्त्यांच्या वाईवर अचानक हल्ला केला, तेव्हां रास्ते मंडळी आपली वस्तभाव घेऊन पांडवगडावर गेली. इकडे भवानरावही भगवंतरावाचे पाठीस लागत पंढरपुरावरून सांगोल्याकडे आला. तेव्हां भगवंतरावानें साताऱ्यास जाऊन छत्रपतींकडून प्रतिनिधिपदाचीं वस्त्रें

घेण्याचा घाट घातला, परंतु तेथें नानाफडणिसाचा बंदोबस्त असल्यामुळें भगवंतरावाचें काम साधलें नाहीं. तेव्हां भगवंतराव सातारा, वाई येथून जबरदस्तीनें खंडण्या येऊन खटावावर आला. पटवर्धनांचा मंगळवेढें प्रांत बेचिराख करण्याचा त्याचा रोंख होता. ( जानेवारी १७७६ ). भवानरावही भगवंतरावाचे मागोमाग सुरकुब्या खेळूं लागला. यांच्या दंग्यामुळें सातारा प्रांत उजाड झाला. भगवंतरावास सरकारचीं पत्रें सारखीं जात होतीं, परंतु त्यानें तीं जुमानलीं नाहींत. त्यानें कोल्हापुर छत्रपतीकडे सूत्र बांधिलें. उभयतांचे खुळानें देशाची धूळदाण होऊं लागली. भवानराव भगवंतरावाचा पाठलाग करीत होता. त्यानें निजामाकडूनही आपल्या मदतीस फौज मागविली. मुधोळकर मालोजी घोरपडे भवानरावास मिळाला; पण त्याचाच भाऊ शंकराजी घोरपडे भगवंतरावास सामील झाला. याच संधीस पेशव्यांची फौज कोल्हापुरावर चालून गेली, तेव्हां भगवंतराव उघड त्या पक्षास मिळाला. 'भगवंतरावाकडे सूत्रें बहुतांचीं आहेत, पण त्यास चार रुपये देण्याचा प्रकार कोणाचा व नाहीं. उत्कर्ष झाल्यास, 'आम्ही बोललोंच होतों;' फजित पावल्यास, 'तेच पावले,' असा सर्वांचा प्रकार. या वेळीं भगवंतरावाची तब्यतही यातायातीनें अतिशय बिघडली. तोंडास सूज येऊन जलोदराचा विकार झाला. पोटास डाग दिले, उठून सुद्धां बसवत नाहीं, परस्वाधीन आयुष्याचे दिवस घालवितात.' इतकें झालें तरी त्यानें हिंमत सोडली नाहीं. वडगांवास १-३-१७७६ रोजीं पटवर्धन व करवीरकर यांची मोठी लढाई झाली, तींत दोघे प्रतिनिधी दोन विरुद्ध पक्षांत लढले. तेव्हां पराभव पावून भगवंतराव मलकापुरास गेला. मलकापुरचा प्रतिनिधि यमाजी ऊर्फ आबाजी हा भगवंतरावाचा मुलगा तिकडे दत्तक दिलेला होता. अर्थात् त्यानें बापास आपल्याजवळ आसन्न स्थितींत आणिलें. त्याचा साह्यकर्ता हणमंतभट दीड हजार फौजेनिशीं करवीरकरांस सामील झाला. परंतु इतका आजारी असतांही भगवंतरावानें हिंमत सोडली नाहीं. हणमंतभटास बरोबर घेऊन तो लगोलग भवानरावाचे कऱ्हाड प्रांतांत दंगा करूं लागला, त्याबरोबर भवानराव फिरून आपला अंमल बसवीत कऱ्हाडकडेच गेला. भगवंतरावाचें दुखणें विकोपास जाऊन अवस्था कठिण दिसूं लागली, तेव्हां त्यास मसलत भारी पडली. हणमंतभटाचे लोक पैशासाठीं गवगवा करून उठून गेले. अशा विपन्न स्थितींत त्यास हणमंतभटानें त्याचें

मुख्य ठिकाण विटें येथें पोंचविलें, तेथें 'चैत्र वद्य १ गुरुवारीं दोन प्रहर रात्रीं ( ता.५-४-१७७६ ) निधन पावले. धाकटी स्त्री समागमें गेली. या बनावामुळें दुही तुटली.'

इकडे भवानरावाचें व कोन्हेररावाचेंही पटलें नाहीं. वडगांवचे लढाईनंतर वारणेवर मुक्काम असतां, आम्ही कूच करीत नाहीं म्हणून भवानराव अडून बसला. तो म्हणाला, 'पांडुरंगराव पटवर्धनानें येऊन आपली तोड काढावी.' त्यानंतर तो कोल्हापुरावर चालून गेला असतां कोन्हेररावानें श्रीशंकराचार्यांचा मठ लुटला, तें भवानरावास पसंत पडलें नाहीं. तो पटवर्धनास सोडून कागलास व तेथून परत वाळव्यास गेला. 'भवानरावांनीं हिसका दिला कीं खर्चास दिल्याशिवाय पुढें पाऊल टाकीत नाहीं. दहा अकरा रोज रुसव्याखालीं गेले. पंत दैवहीन, फलत्यागी, क्रियेस न जागतां व आमचें न ऐकतां मसलतीस धक्का देऊन गेले; चित्तांतील भाव कळत नाहीं. आंत कांहीं तरी मसलत अगर सूत्र असेल. स्वामींनीं बातमींत असावें, असें पांडुरंगराव ११-४-१७७६ रोजीं नाना फडणिसास लिहितो. याउपरही भवानरावास स्वास्थ्य मिळालेलें दिसत नाहीं. स.१७७६ च्या डिसेंबरांत भवानरावाचा हस्तक काळोपंत व कोल्हापुरकर येसाजी सिंदे यांची लढाई होऊन काळेपंताचा मोड झाला, त्याचा वचपा म्हणून लगोलग भवानरावानें सिंद्यावर छापा घातला, त्यांत सिंद्याचा मोड होऊन त्याची फार नासाडी झाली. एक सरदार ठार व कांहीं जखमी झाले. पुढें स.१७७७ त भवानरावास पटवर्धनांबरोबर कर्नाटकांत जाण्याची पेशव्यांची सूचना झाली, पण तो तिकडे गेल्याचें दिसत नाहीं. तसेंच कोल्हापुरकरांवरही तो रामचंद्र गणेशाबरोबर गेला नाहीं; पांचसातशें रावतांनिशीं खानापुरास मुक्काम करून राहिला. याचें कारण त्याची तब्यत पुढें फारच बिघडली असें खरे ले.२१६५ वरून दिसतें. तो ता.३०-८-१७७७ रोजीं मरण पावला. त्यानंतर दोन महिन्यांनीं बापूजी नाईक बारामतीकर वारला, म्हणजे हे दोन जुने ऐतिहासिक पुरुष समकालींच दिवंगत झाले. भवानरावाचें मूळ नांव श्रीनिवास गंगाधर. त्याच्या स्त्रीचें नांव यमुनाबाई. भवानराव वारला त्याच दिवशीं त्याची स्त्री प्रसूत होऊन मुलगा झाला त्याचें नांव पुढें 'परशुराम' ठेवण्यांत आलें. हाच परशुरामपंत पुढें थोटेपंत म्हणून बाजीरावाचे वेळीं प्रसिद्धीस आला. बापाच्या मृत्यूचे

चौदाव्या दिवशीं त्यास पदार्चीं वस्त्रें मिळालीं. सवाई माधवरावानें आपल्या लग्नप्रसंगीं त्यास स्वतः आमंत्रण करून पुण्यास समारंभास बोलाविलें होतें.

भगवंतराव मरण पावल्यावर हणमंतभटानें भवानरावाशीं सख्य केलें त्याची हकीकत हरिवंशाचे बखरींत लिहिलेली वाचण्यालायक आहे. (पृ. ७८.) सोबतच्या वंशावळीवरून भिक्षुक घराणीं राजकारणांत पडल्यावर कशीं बदलत गेलीं तें कळून येईल. हणमंतभटाचा नातू हणमंतराव सदाशिव यानें भगवंतरावाची बायको राजसबाई व सून सकवारबाई यांचा कारभार केला. हल्लीं या कुटुंबाकडे प्रतिनिधीकडून इनामें व उत्पन्नें चालू आहेत. याच गुळवणी घराण्याची एक शाखा पन्हाळा किल्ल्याचे खालीं नांदत असून त्यांनीं अन्नछत्र चालविलेलें सुप्रसिद्ध होतें.

**वंशावळ, हणमंतभट गुळवणी**

सदाशिवपंत

हणमंतराव

विष्णुपंत

रामकृष्ण ऊ० पिलोबा

**२. हैदरखानाची चढाई. (१) स. १७७४-७५ सालांतील आक्रमण.**—हैदरअलीची हकीकत आणि त्याचे मराठ्यांशीं झालेले व्यवहार हा हिंदुस्थानच्या इतिहासाचा अठराव्या शतकांतील एक महत्त्वाचा भाग आहे; आणि त्याचें विवेचन खऱ्यांचे खंडांत इतकें विस्तृत व भरपूर आलें आहे कीं त्याचाच संक्षिप्त अनुवाद करण्यापलीकडे येथें आणखी कांहीं लिहिण्याची गरज नाहीं. परंतु खऱ्यांच्या चार पुस्तकांचा संक्षेप सुद्धां येथें देणें शक्य नाहीं. मुख्य सूत्रें लक्षांत येण्यापुरतेंच येथें विवेचन करावयाचें आहे.

माधवरावाचे अकालिक मृत्यूमुळें हैदरास पुनः डोकें वर काढण्यास फावलें. नारायणरावाचा वध झाल्यावर त्यास ज्यास्तच जोर आला. फेब्रुवारी १७७४ च्या कल्याणदुर्गच्या तहानें त्यानें दादाच पेशवाईचा मालक असें ठरवून, तेव्हांपासून जवळ जवळ सहा वर्षें त्यानें दादासच साह्य करण्याचें वचन निकरानें पाळून, कृष्णा नदीच्या दक्षिणेकडील मराठ्यांचा अंमल बहुतेक उडवून दिला. स. १७८० च्या आरंभीं नाना फडणिसानें चौघांची जूट जमवून त्यांत इंग्रजांविरुद्ध हैदरास सामील करून घेतलें. तेथपर्यंत हैद-

राचा उद्योग कसकसा चालला हें आपणास पाहवयाचें आहे. कृष्णेच्या दक्षिणे-कडे जेवढे म्हणून मराठे सरदार होते तेवढ्यांचें हैदरानें नुकसान केलें. त्यांत मुख्यतः गुत्तीचा मुरारराव घोरपडे तर साफ जिवानिशीं बुडाला. रास्ते, पट-वर्धन वगैरे सरदार अत्यंत पेंचांत आले; आणि करवीरकर छत्रपतींनीं उघड-पणें हैदराशीं मिलाफ केला. रामदुर्गकर व सावनूरच्या नबाबासारखे जेवढे म्हणून पेशव्यांचे अंकित त्या भागांत होते ते सर्व हैदराच्या सपाट्यांत सांपडून अत्यंत नुकसान पावले. ह्या गोष्टी घडत असतां जे अनेक शौर्याचे व आणीबाणीचे रणसंग्राम घडले, ते मराठ्यांच्या इतिहासांत उज्ज्वलपणें झळकण्याजोगे आहेत; आणि प्रत्यक्ष नफानुकसानीपेक्षां आज या इतिहासास वरील स्मरणीय प्रसंगांचेंच महत्त्व फार आहे. या दृष्टीनें ते प्रसंग व त्यांतील व्यक्ती यांचा वृत्तान्त खऱ्यांच्या प्रचंड पत्रसंग्रहांतून वेंचून उठावदार रीतीनें अभ्यासकांचे समोर मांडला पाहिजे. हें प्रकरण समजण्यास दक्षिण हिंदुस्थानचा नकाशा सदैव दृष्टीसमोर ठेवावा.

स.१७७४ च्या एप्रिलांत दादा उत्तरेकडे पळत असतां शिऱ्यास टिपूनें वेढा घातला. तेथील पेशव्यांचा किल्लेदार टिपूशीं झुंजला. शिरें म्हणजे हैद-राच्या छातीवरील पेशव्यांचा अगदीं दक्षिणचा शहू. या वेळीं मुरारराव घोरपडे जोरांत होता, आणि दादाचा बंदोबस्त लौकर होऊन पेशव्यांच्य फौजा आपला मुलूख सांभाळण्यास लगोलग येतील अशी त्याची व पटवर्ध नांची अपेक्षा होती. ता.१२-६-१७७४ रोजीं मुरारराव लिहितो, 'हैदराचा विचार तुम्हांस न कळेसा काय आहे. शिऱ्यांच्या किल्ल्यांत त्यानें ठाणें घातलें. बाळापुर मदगिरिही घेतली; आणि किल्लेदार बापूजी सिंदे यास कैदेंत ठेविलें. वरकड ठाण्यांस उपसर्ग द्यावयास कमी नाहीं. आमचा मुक्काम तुंग-भद्रातीरीं होता. सांप्रत रायदुर्ग गुत्तीकडे आलों. लौकरच तिकडील फौजा आल्यावर बंदोबस्त होईल. अगाध नाहीं.' मुराररावानें सुद्धां या संधीचा फायदा घेऊन पटवर्धनांचे मुलखास उपद्रव देण्यास कमी केलें नाहीं. सारांश, स.१७७४ साल अखेर तुंगभद्रेच्या दक्षिणेकडील सर्व मुलूख हैदरानें हस्तगत केला. त्याची नजर पेशव्यांच्या उत्तरेकडील राजकारणावर होती.

स.१७७५ सालांत पेशव्यांची मोहीम गुजरातेंत चालू झालेली पाहून इकडे करवीरकर, कित्तूरकर व हैदरअली एक झाले. त्यांजवर कोन्हेरराव

पटवर्धन व रामचंद्र गणेश वगैरेंस कारभाऱ्यांनीं पाठविलें. त्यांची करवीर व कित्तूरकडे मोहीम झाली, त्याचा उल्लेख कोल्हापुर प्रकरणांत आला आहे. त्या वेळीं कित्तूरकराचा नकशा साफ व कायमचा उतरला, याचें श्रेय कोन्हेर-रावास आहे. कोन्हेरराव हा पटवर्धनांचे घरांत गोपाळरावासारखाच शूर परंतु तितका रुबाबदार नव्हता. तथापि त्याच्या स्वारीमुळें हैदरावर बराच दाब पडला! पावसाळ्यानंतर हरिहरचें ठाणें घेऊन पुढें हैदरानें सावनूरवर रोंख धरला. नोव्हेंबरांत त्यानें हल्याळचें ठाणें घेतलें. करवीरच्या त्रासामुळें कोन्हेररावास कित्तूरच्या पुढें जातां आलें नाहीं. उलट त्यास परत यावें लागल्यानें पलीकडे हैदराचा मार्ग निष्कंटक झाला. ता. १-१०-१७७५ रोजीं पटवर्धनांतील कर्ता पुरुष वामनराव हा दादावरील स्वारींतच मरण पावला, तरी सर्व पटवर्धन मंडळीनें न डगमगतां आपापलीं कामें व स्वाऱ्या यथायोग्य पार पाडल्या हें विशेष आहे. हैदरानें प्रथम पूर्वेकडे वळून बल्लारी अदवानी वगैरे प्रांत घेऊन मुराररावावर रोंख धरिला.*

**(२) गुत्तीचा पाडाव, मुराररावाचा कपालदुर्गावर हृदय-द्रावक अंत** (स. १७७६ मार्च–१७७७).—स. १७७६च्या आरंभीं तुंगभद्रेच्या दक्षिणेस फक्त मुरारराव घोरपड्याचें गुत्ती संस्थान तेवढें हैदराचे कबजांत गेलें नव्हतें. मुराररावास आतां पुण्याकडून मदत येणें शक्य नाहीं असा अंदाज बांधून हैदर गुत्तीवर चालून गेला. ह्या प्रसंगीं मुराररावानें बाणेदार वर्तन करून शत्रूपुढें शूर पुरुषास शोभण्यासारखा आपला शेवट करून घेतला, तो कितीही हृदयद्रावक असला तरी मराठी राष्ट्राच्या कीर्तीस सदैव उज्ज्वलता आणणारा आहे. यापूर्वीं अनेकवार मुराररावावर हैदरानें चढाई केली होती आणि तितक्यांदां हिंमतीनें त्यानें हैदराशीं टक्कर देऊन त्यास दूर ठेविलें. मुरारराव म्हणजे कर्नाटकांतील मराठशाहीचा मूर्तिमंत इतिहास होय. त्याचा जन्म इ. स. १७०४ च्या सुमाराचा असून हल्लीं तो अत्यंत वृद्धावस्थेस पोंचलेला होता. या पूर्वीचा त्याचा कार्यक्रम कर्नाटक प्रकरणांत वारंवार येऊन गेला आहे. हैदराच्या या स्वारीची थोडक्यांत हकीकत अशी आहे.

मुराररावास साह्य करण्यास जवळ मराठ्यांच्या दुसऱ्या फौजा नाहींत असें पाहून हैदरानें गुत्तीचे जवळ येऊन त्यास सांगून पाठविलें कीं, 'तूं

---

* खरे १३६२, १३८९, १४२०, १५२६.

शरण येऊन खंडणी देण्याचें कबूल कर व आमचे लष्करांत फौजेसहित हजर होऊन ताबेदार हो. असें न केल्यास तुझें संस्थान सर्व काबीज करितों.' त्यावर मुराररावानें उत्तर पाठविलें, कीं 'तूं कालचा पांच प्याद्यांवरचा नाईक; आणि आज मी कमी दिसलों तरी मराठी साम्राज्याचा सेनापति आहें. तुज-पुढें मी मान वांकविणार नाहीं. तुझ्याशीं दोन हात करण्यास मी तयार आहें.' असें उत्तर येतांच हैदरानें गुत्तीवर स्वारी केली. तेव्हां मुराररावानें कांहीं फौज व कुटुंबाचीं माणसें चुलत पुतण्या शिवराव घोरपडे याजबरोबर मडकशिऱ्यावर पाठवून आपण स्वतः तीन चार हजार निवडक लोकांसह किल्ला लढविण्याच्या इराद्यानें ठांसून बसला. चार सहा महिने पावेतों त्यानें हैदरास दाद दिली नसती, आणि महिना पंधरा दिवसांत पेशव्यांची व पट-वर्धनाची मदत येईल अशी त्याची अटकळ होती. परंतु याच वेळीं बारभाई-ची इंग्रज वकिलाशीं पुरंदरावर तहाची वाटाघाट चालून हरिपंत व पटवर्धन गुजरातेंत दादाच्या शहावर होते. याच संधीस तोतया मोकळा झाला, कर-वीरकर छत्रपति पटवर्धनांवर उठले, अशा अनेक अकल्पित कारणांनीं मुरार-रावाचे मदतीस पुण्याकडून कोणीच जाऊं शकलें नाहीं. मुराररावानें तीन महिने पराकाष्ठा करून किल्ला झुंजविला; पुढें नाइलाज होऊन त्यानें हैदराशीं सल्ला करण्याचा घाट घातला, तो साधला नाहीं. एवढ्यांत गुत्तीच्या किल्ल्यांत पाण्याची टंचाई झाल्यामुळें मुराररावास शत्रूच्या स्वाधीन व्हावें लागलें. हैदरानेंही कमालीचा नीचपणा करून सत्तर वर्षांच्या या वृद्ध व शूर पुरुषास कपालदुर्गाच्या तुरुंगांत रुपेरी बेडी ठोकून व हाल करून मुलांमाणसांसह ठार मारिलें. याबद्दल सर्व महाराष्ट्र देश हळहळला. मुराररावाचें बाणेदार वर्तन अद्यापि या देशांत ताजें आहे. अशा या हृदयद्रावक प्रसंगांतील वर्ण-नाचे कांहीं ठळक उतारे आतां द्यावयाचे आहेत.

कोन्हेरराव स.१७७५ चे अखेरीस कित्तूरकराचें पारिपत्य करीत होता. कित्तूरचा गुंता उरकून कोपळच्या रोखें राव सेनापति कळवितील तिकडे जावें, असा विचार ता.९-१-१७७६ चा होता. 'सेनापतीचा कृतनिश्चय कीं दौलत गेली तरी जाऊ, श्रीमंतांच्या लक्षांत तिळभर न्यून करूं नये. त्यांनीं हिंमत धरल्यासारखी फौज इकडून जाती तर फार उत्तम होतें. तो प्रकार घडतां दिसत नाहीं.' ता.१७-१-१७७६चें वर्तमान. 'हैदरानें गुत्तीस वेढा घालून बेचीस

रोज झाले. लष्कर गुत्ती सोडून तीन कोस अंतरावर उतरलें आहे. किल्ल्यांत दहा हजारपर्यंत पठाण वगैरे नामी लोक आहेत. सेनापतींनीं बहुत हिंमत धरिली आहे. हैदरखानानें चार पांच वेळ पेठेवर हल्ला केली, पण किल्ल्यांतील मारापुढें माघारे फिरले.' ता. ९ जानेवारीस हैदरानें गुत्तीची पेठ घेतली. 'मुराररावावर येऊन बेतली आहे. ते मर्द, केलेले, हिंमतीचे लढवाई. एकाएकीं जुंमस खाणार नाहींत. परंतु बाहेरच्या कुमकेशिवाय वेढा कसा उठणार!' ता. २४ फेब्रुवारीचें वर्तमान. 'गुत्तीस वेढा बसून दोन महिने झाले. सेनापति हिंमतीनें लढत आहेत. सल्ल्याची बोली दोन तीन वेळां लागली होती. प्रस्तुत हैदराचे वकील किल्ल्यावर जाऊन बारा लक्ष बोलीचा ठराव करून आले. निम्या ऐवजाच्या भरण्याकरितां दोन लाख होनांचें जवाहीर दिलें, त्याची किंमत खानांनीं साठ हजार ठरविली. उभय पक्षीं गोळागोळी होत आहे.' पुढें फेब्रुवारींत लढण्याची उत्तरोत्तर शिकस्त झाली. तहाची बोली व उत्तरें प्रत्युत्तरें चालूच होतीं. इतक्यांत कोन्हेररावं व निजाम मदतीस येतात अशी खबर मुराररावास येऊन धीर आला, तेव्हां सल्ला करून कसें तरी निघावें हा आतूर हैदरासी लागला. सेनापतीचे चित्तीं आणखी महिना पंधरा दिवस टाळावें. त्यांनीं झुंजण्याची शर्थ केली. किल्ल्यावरून गोलंदाज ऐसें मारतो कीं दर गोळ्यास दोघे चौघे ठार, एक गोळा खालीं न जाय, कोणती म्हणून तारीफ लिहावी! श्रीमंतांशीं एकनिष्ठ अशी शपथ त्यांनीं राखून या प्रसंगें सर्वस्व गमावून लढाई चांगली केली, आतां त्यांची अब्रू गजाननानें राखावी! मीर रेजा हैदराकडून बोलीस किल्ल्यावर गेला, त्याज-बरोबर दोन लक्ष रुपये ऐवजाचे पेटारे किल्लीकुलूप लावून पाठविले. मागाहून दोन रोजांत आमचे वकील येऊन कुलूप काढून ऐवजाचा भरणा करतील म्हणून सांगून पाठविलें. दोन दिवस वकील आले नाहींत, तेव्हां हैदरानें पेटारे कुलपें काढून पाहिले, तों चार पेटारे गारगोट्या, चार पेटारे खापऱ्या व बाकी चार पेटारे कलावंतिणीच्या पादरक्षा. हें पाहोन हैदरास संताप आला आणि दुतर्फा तोफा लाविल्या. दोन दिवस दोन रात्र गोलंदाज शिणोन गेले. तिसरे दिवशीं हल्ला केला त्यांत हजारबाराशें माणूस ठार व दोन अडीच हजार जखमी होऊन लष्कर कच खाऊन माघारें फिरलें. हैदर दांत ओंठ खातो, उपाय चालत नाहीं. 'सेनापतींचे पराक्रमास जोडाच नाहीं.' परशु-

रामभाऊ दादावरील स्वारींत हरिपंताबरोबर होता, त्यानेंही कारभाऱ्यास जीव तोडून लिहिलें, कीं कसेंही करून गुत्तीचे मदतीस फौज पाठवा. आपणही सेनापतीचे बंधुच. पण मदतीची तजवीज होऊं शकली नाहीं. मुरारजी चार महिने लढले. बाहेरून कुमक नाहीं. हैदराचा मार भारी. किल्ल्यावर पाणी नाहींसें झालें. तेव्हां सल्ल्याचें संधान लाविलें, परंतु हैदरानें ऐकिलें नाहीं. निकड केली. तेव्हां किल्लेदार मुसलमान होता त्यानें सेनापतीस खालीं उतरून हैदराकडे आणिलें. कबिले व कारभारी पेठेंत आले. टिपूनें किल्ल्यावर जाऊन बंदोबस्त केली. याप्रमाणें श्रीमंतांचे राज्यांतील हा मातबर सरदार हैदरानें बुडविला. गुत्तीवर पाणी व लांकडें नसतां निर्जळें करूनही चार दिवस सेनापतींनीं युद्ध केलें. दोन दिवस चिखल व हिरवे तांदूळ खाऊन राहिले. पाणी सरलें म्हणून संधान लाविलें. हैदरानें सांगोन पाठविलें कीं येऊन भेटावें, तरीच विवेक. यांनीं आपले जागीं अंदेशा पाहिला. चार उपोषणें झालीं. हाहाःकार उडाला, तेव्हां किल्ल्यावर व्यर्थ मरण्यापेक्षां भेटीस जाऊन कज्जा करून हैदरखाना सुद्धां समाप्त व्हावें. याप्रमाणें आपले जागीं निश्चय करून समागमें पांचजण घेऊन खालीं उतरले. हैदरानें लगेच सभोंवार चौकी दिली. कुमकेचा मार्ग पाहिला, समयास आली नाहीं. हें वर्तमान १५ मार्चचे सुमारास घडलें. हैदरानें गुत्ती घेतल्यावर मडकशिऱ्यावर हल्ला केला. तेथें शिवराव घोरपडे होता तो लुटला गेला, पण लढतां लढतां जिवानिशीं सुटून पळाला. पैका कोठें आहे तो दाखवा म्हणून हैदर सेनापतीस तगादा करतो. लष्करांत कांहीं दिवस त्यांस पाहऱ्यांत ठेवून १ एप्रिल रोजीं सेनापति व त्यांचीं बायकामुलें यांस बेड्या घालून श्रीरंगपट्टणास रवाना केलें; व खंडोजी घोरपडे यास गुत्तीवरच ठेविलें. सेनापतीचे मुलगे व्यंकटराव व नरसिंगराव यांसही बेड्या घालून ठेविलें.' हे मुलगे वयानें लहान असावे व पुढें मारले गेले असें दिसतें. खरे ले. १८३८त पटवर्धनांचा एक कारकून अदवानीहून १६ एप्रिल रोजीं लिहितो, 'खंडोजी घोरपड्यास बेडी घालून गुत्तींतच ठेविलें आहे, पट्टणास नेलें नाहीं. सेनापतीस रुप्याची बेडी घालणें निमित्य करून पाठविली. त्यांनीं उत्तर दिलें जे, तूं केवळ भाऊबंद म्हणून तुजपाशीं आलों. ऐसें असतां बेडी काय निमित्त घालतां? त्यावरून बेडी,

घालणें तहकूब केलें. उपरांतिक त्यांसी पांच सहा कोस लष्कराचे पलीकडे घेऊन गेले. तेथें उतरोन व्यंकटराव व नरसिंगराव यांसी बेडी घालणेस आले. त्यांनीं डोळयांस पाणी आणोन बापाकडे पाहूं लागले. त्यांनीं सांगितलें जे, त्यांस कशास घालणें: ऐसें म्हणतांच सेनापतीस बेडी घातली. उपरांतिक त्या दोघां पुत्रांसही बेडी घालून घेऊन गेले. सर्व मुलेंबाळें देखील बरोबर होतीं. पंधरा पालख्या, छकडे, व गाडे बरोबर होते, व महंमद अलींनीं व फिरंग्यांनीं मार्गीं घेऊन गेले, तेव्हां अधिकोत्तर कांहीं होते त्यांसी पावगडांत ठेविले; आणि खुद्द मुरारजी सडेनिशीं मजल दर मजल निघोन गेले. त्याचें वर्तमान ऐकून रात्रींच कूच करून हैदरखान ताडमरी नजीक तीन कोसांवरून कूच करून रात्रींच गेला.'†

मुराररावासारख्या सुप्रसिद्ध राष्ट्रपुरुषाची अंतकाळची व मुलांबाळांची तपशीलवार हकीकत मिळूं नये ही मोठी शोचनीय गोष्ट होय. त्याचा अंत कधीं झाला हें सुद्धां निश्चित नाहीं. स. १७७७ च्या पावसाळयांत चित्रदुर्गचा कारभारी पुरुषोत्तमपंत हरिपंतास तुंगभद्रेवर भेटला त्यानें कळविलें, 'सेनापतींची अवस्था होत आहे. ये समयीं कसेंही करून जीवदान द्यावें, खर्चही देऊं.' परंतु हरिपंताचे हातून कांहीं एक उपाय होऊं शकला नाहीं. या संधीस हरिपंताशीं हैदराची सल्ल्याची बोली चालू असतां उभयतांची हद्द तुंगभद्रेची करून कैदी सर्व सोडावे अशी मागणी हरिपंतानें केली; त्यावर पटवर्धनांस सोडूं, परंतु सेनापतीस सोडणार नाहीं, त्यांचा आमचा शींव शेजार आहे, असें हैदरानें कळविलें. त्यापुढें सप्टेंबरांत परशुरामभाऊनें सावशीहून मिरजेस गंगाधररावास कळविलें कीं, 'सेनापतींचा व आमचा स्नेह, त्याजवर दृष्टि देऊन त्यांची स्त्री सौ. राणूबाई व शिवराव बाबाची स्त्री सुबाबाई यांचा परामर्ष हर एकविशीं तुम्हीं करीत जावा.' यावरून या दोघी स्त्रियांस इंग्रजांच्या मदतीनें महंमदअली अर्काटकर नबाब यानें रस्त्यांत छापा घालून सोडविलें असावें. मात्र यांशिवाय आणखी कोणी स्त्रिया मुराररावाबाहेर कपालदुर्गावर$

† खरे १७६३, १७७१, ८९, ९०, ९५, १८००, २३, २९, ३३, ३८, २१५२, ५६, ७०, ८५. $ **कपालदुर्ग** हा एक लहानसा किल्ला श्रीरंगपट्टणजवळ उंच खडकावर आहे. त्याचा उपयोग कैदी ठेवण्याकडे करीत. इंग्रजींत कबालदुग लिहितात.

होत्या कीं काय याचा पत्ता लागत नाहीं. त्यापुढील नोव्हेंबरांत अशी एक बातमी उठली, कीं 'मुरारराव कपालदुर्गावर कैदेंत होते ते किल्ल्याचे लोकांस फितावून पळोन गेले, असें वर्तमान आलें आहे त्यांत तथ्य दिसत नाहीं.' यावरून एवढें सिद्ध होतें कीं मुराररावानें कांहीं तरी प्रयत्न सुटकेचे केले, ते सिद्धीस न जातां त्याची कैद फार कडक झाली आणि त्याच हाल अपेष्टेंत तो स.१७७७ नंतर केव्हां तरी कपालदुर्गावर मरण पावला. त्या बाजूस तपास केला असतां अद्यापि कांहीं तपशील मिळण्याचा संभव आहे. गजेंद्रगड सोंडूर वगैरे ठिकाणीं सुद्धां कांहीं पत्ता लागेल.

मुराररावाचें सर्वस्वी नुकसान झालेलें पाहून कारभाऱ्यांनीं त्याच्या भावास म्हणजे दौलतरावास ता.१५-८-१७७६ रोजीं नवीन सरंजाम गोकाकजवळ दिला; आणि त्याचे बायकोस ता.२-५-१७७७ रोजीं स्वतंत्र गांव पंधरा हजार रुपयांचे दिले. यावरून मुराररावाची बायको मागाहून कैदेंतून सुटून आली ही गोष्ट खरी असावी.

मुराररावाच्या पुढील वंशजांचाही तपास झाला पाहिजे. गुत्तीच्या बाजूचा चांगला माहीतगार पटवर्धनांचा हस्तक ख. ले. १८३८ त मुराररावाच्या दोन मुलांचीं नांवें व्यंकटराव व नरसिंगराव अशीं देऊन पिता व पुत्र असे शब्द स्पष्ट वापरितो. हे मुलगे डोळ्यांत पाणी आणून बिड्या घालतांना बापाकडे पाहूं लागले यावरून ते अल्पवयीच असावे; आणि कपालदुर्गचे किल्ल्यावर हैदरानें मुराररावास मुलांबाळांसह ठार मारिलें असे जे सामान्य उल्लेख ठिकठिकाणीं आहेत, त्यांवरून हे अल्पवयी मुलगे त्याच वेळीं मारले गेले. त्याचा भाऊ दौलतराव व पुतण्या शिवराम हे पुढें हैदराशीं लढतच होते. पैकीं शिवराम पुढें सावशीचे लढाईत ९-१-१७७७ रोजीं जखमी होऊन हैदराकडे पाडाव झाला, मात्र दंड भरून सुटला, आणि कालांतरानें मुराररावाचा दत्तक होऊन सोंडूरचा मालक झाला. मुरार-रावाचा भाऊ दौलतराव यास गजेन्द्रगडची नवीन जहागीर पेशव्यांनीं देऊन स्थानापन्न केलें.†

घोरपड्यांचें घराणें विस्तृत असून निरनिराळया लेखांत अनेक नांवें वारं-वार येतात, त्यांचा स्पष्ट निर्देश व्हावा म्हणून ठिकठिकाणचे उल्लेख एकत्र

† ख. ले.१८९३, २३२८, २४३०; स. मा. रो. ३०७–३०८; मा.रो.२०८.

जमवून वरील संगति जुळविली आहे, आणि त्यास अनुसरून घोरपड्यांची वंशावळ स्वतंत्र दिली आहे, ती पाहिल्यास, गुत्ती, सोंडूर, गजेंद्रगड वगैरे शाखांची उत्पत्ति ध्यानांत येईल. त्या वंशावळींतील नांवाशिवाय मुधोळचें घराणें व त्यांतील प्रस्तुत काळचे दोन मुख्य पुरुष मालोजी व त्याचा भाऊ शंकराजी यांचीं नांवें वारंवार येतात, ते मुधोळकर होत. त्यांचा वरील इतर कुटुंबांशीं कांहीं संबंध नाहीं. मुधोळचा पूर्वज बाजी घोरपडे यास शिवाजीनें छापा घालून मारल्यापासून तें घराणें मराठशाहीच्या शत्रुवर्गांत मुसलमानांचे नोकरींत राहिलें. त्यांस माधवराव पेशव्यानें राक्षसभुवनाचे प्रसंगीं मराठशाहींत आणिलें. त्याची सनद ता.२३-५-१७६८ ची दाखल आहे. सारांश, शंकराजी हा मुधोळकर व शिवराव हा सोंडूरकर, हा भेद वाचकांनीं ध्यानांत ठेवावा. बाकी सर्वच घोरपडे मूळचे भोसले होत.||

घोरपड्यांची एक शाखा हैदराचे नोकरींत होती, तिजपैकीं शिवराम घोरपडे यांचें नांव येतें. यास कुंदगोळकर असें म्हटलेलें आहे. त्यांच्याचपैकीं भिकाजीराव व त्यांचे चिरंजीव सुबराव घोरपडे सावशीचे लढाईंत जखमी झाले म्हणून उल्लेख आहे. या शाखेचा इतरांशीं संबंध काय तें कळून येत नाहीं.

स. १७७६च्या उन्हाळ्याची हैदरच्या गुत्ती येथील विजयाची ही वेळ म्हणजे भाईंना किती आणीबाणीची होती हें त्या संधींतल्या ठिकठिकाणच्या घडामोडी एकदम ध्यानांत ठेविल्याशिवाय समजणार नाहीं. पुरंदरचा तह १ मार्चेला कायम झाला, म्हणूनच बारभाई निभावले. तह अगदीं मोडलाच होता, पण सर्व ठिकाणचीं अरिष्टें लक्षांत घेऊन नाना फडणिसानें पडतें घेऊन एकदांचा तह पदरांत पाडून घेतला, तेणेंकरून तूर्त तरी इंग्रज जाग्यावर बसल्यानें गळयास लागलेला फांस सैल होऊन परिस्थितीशीं झगडण्यास त्यास अवकाश मिळाला. मुरारराव घोरपड्याचा संहार झाला, पण हैदरास पुढें पायबंद बसला. त्याजवर निजामाची फौज चालून आल्यानें त्यास मागें पाय काढावा लागला. तेव्हां पूर्वेकडील तोंड कमी करून पश्चिम बाजूनें तुंगभद्रा उतरून हैदरानें मे महिन्यांत बंकापुरचें ठाणें हस्तगत केलें; आणि तेथें त्यानें आपला सरदार श्रीपतराव सिमोघे यास ठेवून दिलें. पुढें पावसाळ्यांतच

|| पहा म. वि. ४ पृ. ३०४ मुधोळची वंशावळ. खरे १९३६,-३८,-५०,-५६,-५८,-६८,-८३ व पृ. २७७१.

फौजेची सिद्धता करून त्यानें ऑगस्टांत हुबळी हस्तगत करून धारवाडवर रोख धरला. या वेळीं पुण्याकडे तोतयाचा बंडावा उद्भवल्यामुळें हैदराचा प्रतिकार वेळींच होऊं शकला नाहीं. स.१७७६ नंतर निराळे बनाव बनत गेले.

( ३ ) **सावशीची लढाई, पटवर्धनांचा चकाचूर** (९-१-१७७७).— मार्चांत पुरंदरचा तह कायम झाल्यावर कारभाऱ्यांनीं हरिपंतास लगेच हैदरावर जाण्याचा हुकूम केला परंतु फौजेच्या देण्यामुळें व तोतयाच्या उच्छेदामुळें जवळजवळ एक वर्ष हरिपंताचा पाय बाहेर निघाला नाहीं. त्यापूर्वीं पावसाळा संपतांच पांडुरंगराव व कोन्हेरराव पटवर्धन धारवाडकडे कूच करून निघाले. शिवराव व दौलतराव घोरपडे, नीलकंठराव सिंदे मनोळीकर, नरगुंदकर भावे वगैरेंस सामील करून पांडुरंगरावानें हुबळी, कुंदगोल, हुबळीजवळचें मिश्रीकोट वगैरे ठाणीं हस्तगत केलीं. धारवाडपासून द० तुंगभद्रेवर हरिहर सुमारें १०० मैल, त्या दरम्यान हीं स्थळें हल्लींच्या आगगाडीचे लगत्यास आहेत.

इतकें केल्यावर कोन्हेररावानें स्वपरबलाबल न पाहतां एकदम पुढें बंकापुरावर जाऊन हैदराचा तेथें जम बसला होता तो हिंमतीनें उडवून द्यावा असा विचार ठरविला. शिवराम घोरपडे तसाच शूर असून मुराररावाच्या मृत्यूचा सूड घेण्यासाठीं जळत होता. कोन्हेरराव तर काळाच्या जबड्यांत उडी घेणारा मर्द शिपाई; विचारापेक्षां धाडसाच्या जोरावर वागणारा. पांडुरंगराव व्यवस्थेच्या कामांत ठीक होता, पण त्यास लढाईचा अनुभव नव्हता. उलट पक्षीं हैदराचा सरदार महंमदअली कुमदान थोडी कसलेली फौज व सहा चांगल्या तोफा घेऊन बंकापुरावर मजबुदीनें राहिला होता. प्रथम स.१७७६ च्या अखेरीस तो धारवाडपावेतों ठाणीं बसवीत पुढें आला होता, पण पटवर्धनांच्या फौजा पांच पन्नास मैलांच्या टप्यांत येऊन एकमेकांच्या हालचाली टेहळीत जानेवारी १७७८ च्या आरंभीं युद्धाच्या पावित्र्यानें ठाकून राहिल्या. या वेळीं परशुरामभाऊ कोल्हापुरकरांशीं लढत बेळगांवपर्यंत आला होता.

कुमदान ८ जानेवारी १७७७ रोजीं बंकापुराहून निघून पटवर्धनांवर एकदम छापा घालण्याच्या उद्देशानें सायंकाळीं सावशीस येऊन राहिला. हें ठिकाण शिरहट्टीकर देसायाचें असून तो देसाई हैदरास कसून साह्य करीत

होता. पटवर्धन मंडळी त्याच दिवशीं बाहेर पडून सावशीपासून दोन कोसांवर येऊन राहिली. ही बातमी कुमदान यास कळल्यामुळें तोही रात्रीं बाहेर पडला नाहीं. उजाडल्यावर पटवर्धनांनीं कुमदानवर हल्ला करण्याचें ठरविलें. परंतु कुमदाननें जवळच्या शेतांत तोफखाना छपवून ठेविला होता तो त्यांस माहीत नव्हता. मराठी फौज माराच्या तावडींत येतांच तिजवर कुमदानच्या तोफांनीं शेतांतून व सावशीच्या किल्ल्यांतून एकदम असा मारा केला कीं लोक पटापट मरूं लागले. कोन्हेरराव सांवरासावर करीत असतां ठार झाला, व पांडुरंगराव आणखी तिघे पटवर्धन, निळकंठराव सिंदे, शिवराम व बहीरजीं घोरपडे वगैरे मंडळी जखमी होऊन पकडली गेली. अशी वाताहत झाल्यावर शत्रूनें मराठ्यांची भयंकर कत्तल केली. मराठयांचें पुष्कळ सामान व जनावरें त्यानें घेतलीं, तीं व कैदी मंडळी त्यानें बंकापुरास पाठविली. पटवर्धनांच्या घराण्यांत हा हृदयद्रावक प्रसंग अद्यापि ताजा असून, त्याचा पुष्कळ तपशील छापी कागदांत आहे. रघुनाथरावाचा साह्यकर्ता बाजीराव बर्वे या वेळीं बंकापुरास हैदराकडे होता, त्यानें जखमी मंडळीची थोडीबहुत शुश्रूषा ठेविली. सावशीच्या या लढाईचा वाका पटवर्धनांनीं लिहिलेला छापलेला आहे तो पाहवा. पांडुरंगराव पुढें दहा महिन्यांनीं श्रीरंगपट्टण येथें हैदराचे कैदेंतच जखमांनीं मरण पावला. शिवराम घोरपडे यास हैदरानें कपालदुर्ग किल्ल्यावर कैदेंत ठेविलें. तेथेंच मुराररराव घोरपडेही होता. यापुढें लवकरच मुरारराव कैदेंत मरण पावला; परंतु शिवराम दंड भरून सुटला असें दिसतें, आणि तोच पुढें मुराररावाचें नांव चालविणारा झाला. §

सावशीचे लढाईत पाडाव गेलेली मंडळी साडेचार वर्षें कैदेंत होती. हैदराची व पेशव्यांची गोडी झाल्यावर दंड भरून त्यांची सुटका झाली. या एकंदर प्रसंगाचीं पत्रें राष्ट्रीय पराक्रमाच्या दृष्टीनें व भाषेचे उत्कृष्ट मासले म्हणून अत्यंत सुंदर आहेत.* नानाफडणिसानें परशुरामभाऊस पत्र लिहून धीर दिला. खालील पत्र भाषेचा मासला म्हणूनही सुंदर असून तें परशुरामभाऊस आलेलें आहे. 'श्रीमंत कोन्हेरराव कीर्ति संपादून धारातीर्थीं

§ ऐ. स्फु. ले. वर्ष ८ ले. १०; खरे १९६८. * पहा. ख. ले. १९७०, १९८०, १९८१, १९८३, १९८५, १९८८, १९८९, २०२२, २४७८. इ०

गेले, व पांडुरंगराव तात्या पाडाव गेले, म्हणोन लिहिलें त्यास मागें सर्वांस त्यांनीं दुःखार्णवीं घातलें. काय करावें! दुष्टाचे हातीं सांपडले. त्याचा परिहार श्रीमंतांचे दैवेंकरून होईल तो सुदिवस. मागें युद्धें बहुत झालीं, परंतु असा क्षोभ कोठें जाला नाहीं. जन्मांतर उपाय नाहीं. स्वामींच्या श्रमास पारावार नाहीं. स्वामी धैर्यवंत आहेत. आतां सारी भिस्त स्वामींवर आहे. धैर्य धरून होईल तें प्रमाण. स्वामींची तर्तूदही बरीच आहे. फौज येईल तों सबुरीनेंच असावें. भाऊसाहेब! आपण तरी उतावळी न करावी. पक्का मनसबा करून मसलत करावी. रात्रंदिवस आमचा निदिध्यास स्वामींकडे आहे. आज्ञेप्रमाणें सावध आहों. शत्रु शेर जाले आहेत. यांत लज्जारक्षक श्रीगजानन आहे. स्वामीही जवळच मनोळीस आहेत. पटवर्धनांचे घरांत कोन्हेररावासारखा हर्त्ता माणूस नव्हता.' श्रीपतराव पटवर्धन हैदराचे कैदेंत असतां त्याचा दंड भरण्यास पैसा नसल्यानें कोण यातना पडल्या हें त्यानें खालील पत्र मिरजेस चुलत्यास लिहिलें त्यावरून कळतें. पत्र अत्यंत हृदयद्रावक आहे. सावकाराची जामीनगिरी देऊन त्यानें आपली सुटका अर्धवट करून घेतली असतांचें हें पत्र ता. १५-२-१७७९ चें आहे. 'दोन महिने वायदा होऊन झाले. अद्यापि वृत्त कांहींच कळलें नाहीं, म्हणून अहर्निश चिंता लागली आहे. आमची वाट काय म्हणून वारंवार पुसतों. मी तर वडिलांच्या भरंवशेवर कबूल केलें. आतां वडिलीं अव्हेर केला तर अब्रू जाऊन मीही जिवानिशीं जातों. याचा विस्तार कोठवर लिहूं. काकासाहेब! तेथून भरणा होत नसेल तर तसें उत्तर गुप्त मार्गें पाठवावें, म्हणजे आम्हीच प्राण देऊं. परंतु अब्रू गमावून देणें माझ्या हातून होत नाहीं. हें पत्र अंतींचें समजावें. जीवदान द्यावयाचें असेल तर द्यावें, नाहीं तर तसेंच लिहावें. काय तें सत्वर लिहावें. अंत पाहूं नये. तीन वर्षें वडिलांच्या भरंवशेवर दृष्टि ठेवून आक्रमिलीं. आम्ही हतभाग्य म्हणून असा प्रकार घडला. याउपर सुटकेच्या पत्राची वाट पाहतों. दोहोंतून एक होतें कीं नाहीं तें पत्र पाठवावें. मातुश्रींचा समाचार घेणेंविशीं मी काय लिहिणें आहे! सर्व घरदार आपलें आहे. नाहीं असें पत्र आलेवर उत्तर देणें कठिण, यास्तव शेवटचें पत्र असें समजून लिहिलें आहे. बहुत काय लिहिणें, हे विज्ञापना.'

**(४) परशुरामभाऊ व हरिपंत यांची लंगडी मोहीम** (१७७७-७९).—सावशीचें वर्तमान ऐकून परशुरामभाऊनें लगोलग शत्रूवर जाण्याचा प्रयत्न केला, परंतु पैशाची अडचण, शत्रूची दहशत वगैरे अनेक कारणांनीं मनोळीच्या वारींतच कैक दिवस त्यास अडकून पडावें लागलें. इतकेंच नव्हे, तर मनोळीच्या वारींत परशुरामभाऊवर सावशीसारखाच प्रसंग आला होता, तो त्यानें सावधगिरीनें निभावला. सावशीच्या लढाईनें जोर येऊन कुमदानानें लगोलग पुढें चाल करून धारवाडास वेढा घातला; व आपण हुबळीवर बंदोबस्तानें राहिला. परशुरामभाऊ व समस्त पटवर्धनांनीं पुण्यास कारभाऱ्यांकडे फौजेची याचना अत्यंत जिकिरीनें चालविली, परंतु फौजेचा पगार आज तीन वर्षे थकलेला असल्यामुळें, त्यांची समजूत काढण्यास वर्ष सहा महिने लागले. या प्रसंगाच्या कारभाऱ्यांच्या अडचणी व हरिपंत फडक्याची दैन्यावस्था ह्या गोष्टी त्या वेळच्या भरपूर अस्सल कागदांत वाचल्या पाहिजेत. या ठिकाणीं वास्तविक त्यांचा निर्देश करण्यासही अवकाश नाहीं. सारांश, परशुरामभाऊवर कठिण प्रसंग गुदरला तेंव्हां पुण्याहून त्यास वेळेवर मदत बिलकूल झाली नाहीं. मोठ्या मिनतवारीनें हरिपंत स. १७७७ च्या मार्चांत बाहेर पडला. मनोळीच्या वारींत परशुरामभाऊ ठांसून बसल्यामुळें शत्रूवर बरीच दहशत बसली. तथापि एकदां तशाही स्थितींत कुमदाननें त्याजवर ता. १३-२-१७७७ रोजीं अचानक छापा आणिला होता. भाऊ गाफील नसल्यामुळें त्याचा निभाव लागला. ‘सरकारचा दाब उणा पडला याकरितां चाकरीचें लक्ष कोणी धरीत नाहीं. हरिपंत तात्यांच्या लष्करांत रोजमुरा नाहीं. पुण्याच्या आसपासचे तमाम गांव वेरणीबरोबर लुटले जातात. मुलूखगिरींत गांव लुटतात त्याप्रमाणें पुणें प्रांतीं जाहलें आहे. कांहीं बाकी राहिली नाहीं. पुणें प्रांतीं काडीस हात लागत नव्हता, त्याची अवस्था या प्रकारची जाली आहे.’ असें त्या वेळच्या स्थितीचें वर्णन लेखांत आहे. या वेळीं नाना फडणिसानें महादजी सिंद्याच्या सर्व मागण्या कबूल करून त्यास वश करून घेतलें, म्हणूनच त्याचा निभाव लागला. नाहीं तर दादाच्या द्वारें इंग्रज पुण्यास येऊन याच वेळीं मराठशाही बुडण्याचा प्रसंग येऊन ठेपला होता.

समस्त घोरपडे मंडळी व अक्कलकोटकर भोसले हैदराच्या या चढाईंत

सारखेच चिरडले जाऊन पटवर्धनांशीं अंतःकरणपूर्वक प्रेमानें वागत होते. मुराररावाचा बंधु गजेन्द्रगडकर दौलतराव घोरपडे परशुरामभाऊस लिहितो. 'आम्हीं सुचविलेली मसलत आपण केली तेणेंकरून अमित्रास धाशत बहुत. तजविजेंत पडून त्यानें पत्रें श्रीरंगपट्टणास पाठविलीं आहेत. उत्तरेकडून फौजा न आल्या आश्चर्य. आपण कोणतेंही जलदीनें न करावें. धीर थोर गोष्ट. रात्रीच्या समयांत फार जागरूक असावें. डेरेभोंवतीं चौकी मावळे लोकांची असों द्यावी. आम्ही वृद्ध. आमचें लिहिणें मानीत जावें, येणेंकरून श्रेय आहे, आणि कार्यासही येईल. मनसब्याचा भार आपणावर. सर्वांवर ममता करून सेवा घ्यावी. कार्यें साधणें ज्यास, त्यांणीं सर्वत्रांवर एकरूप ममता करीत जावें. सुज्ञाप्रती विशद लिहिणें न लगे.' या वेळच्या परशुरामभाऊच्या अडचणी त्याच्या पत्रांत लिहिलेल्या ध्यानांत ठेवण्याजोग्या आहेत. दुसरा एक लेखक म्हणतो, 'सावशीच्या लढाईस दोन महिने जाले असतां पांच राऊतसुद्धां तिकडे गेले नाहींत येणेंकरून नाना फार लज्जित आहेत. कारभारी यांणीं दौलतीची अनास्था केली, त्यांस लिहून फळ काय !'*

पुरंदरचा तह झाल्यानें बारभाईस स्वस्थता मिळाली असेल अशी कोणाची समजूत असल्यास ती किती चुकीची होती हें ह्या एकंदर हकीगतींवरून लक्षांत येईल. दादानें सर्व देशभर कहर उसळून दिला. करवीरकर व हैदर एकरूप झाले. आबाजी महादेव, बाजीराव बर्वे, तुळ्या पवार, सदाशिव रामचंद्र मानाजी फाकडे, या दादाच्या हस्तकांनीं दक्षिण महाराष्ट्रांत सर्वत्र प्रळय माजविला. सर्वत्र फितुर उपस्थित झाले. लवकरच मोरोबा दादा इंग्रजांस मिळाला. थोडी बहुत सखारामबापूची फूस या कृत्यांस असे. अशा आणीबाणीच्या प्रसंगीं नाना फडणिसानें जाग्यावर बसून सर्व अरिष्टांचें निरसन केलें, हीच त्याच्या कर्तबगारीची सर्वांत मोठी खूण होय. सन १७७७ च्या मार्चांत हरिपंत पुण्याहून त्वरेनें निघाला; त्याच्या व परशुरामभाऊच्या गांठी गजेंद्रगडाजवळ$ ५ मे रोजीं पडल्या. निजामाचा सरदार इब्राहीम धौशाही त्यांचे मदतीस आला. पूर्व कर्नाटकावर निजाम व हैदर या दोघांचाही सारखाच डोळा असल्यामुळें त्यांचें वैर बंद पडणें कधींच शक्य नव्हतें. पुढें हरिपंत पूर्वेच्या

* खरे २०३७–४९,–५४,–६०. खरे पृ. २८१५–२८२०. $ बेळगांवच्या आग्नेयीस ७० मैल.

बाजूस धोंशास मिळण्याकरितां गेला आणि परशुरामभाऊ धारवाडजवळचीं टाणीं हस्तगत करूं लागला. धारवाडच्या पूर्वेस ५० मैलांवर डंबळचें ठाणें हस्तगत करतांना लढाई होऊन कृष्णराव पानशे गोळी लागून पडला, व मनोबा सुभेदार पटवर्धन जखमी झाला. ता.५-६-१७७७ रोजीं भाऊनें डंबळचें ठाणें हस्तगत केलें.

हरिपंतास तरी या वेळीं बिलकूल स्वस्थता नव्हती. त्यानें २० जून रोजीं परशुरामभाऊस लिहिलेलें स्वदस्तुरचें पत्र चांगलें बोधप्रद आहे. 'तुंगभद्रे-पलीकडे राहणें जाहलें नाहीं, गोष्ट कमी पडली. धोंशाचे आग्रहास्तव अली-कडे माघारे फिरलों. जागा चांगली पाहून छावणीस राहवें, त्यास पोटास नाहीं याजमुळें लोकांनीं ताळ सोडला. रोज दंगा. सर्वांचा मनोदय कीं पुण्यास जावें मग जें होणें तें होऊ. असें करूं नका म्हणावें तर पोटास द्यावयास पैका नाहीं. हें वर्तमान सांडणी स्वाराबरोबर लिहून पाठविलें आहे. आपणाकडे यावें, मग जें होणें तें होऊ, असा प्रकार; त्यास आपणाकडे जाऊं देऊं नये, पुण्यास घेऊन जावें, हेच मसलत सर्वांची आहे. आमच्या मतें महिना पंधरा दिवस दम धरून राहवें, पुण्याचीं उत्तरें काय येतात, त्याप्रमाणें करावें. परंतु फौज ऐकत नाहीं. आपली भेट व्हावी हें तरी घडावें. परंतु लोक कसें करतील कळत नाहीं, लोकांस सांगितलें कीं भाऊपर्यंत चला. तेथें जातांच रोजमुरा देतों; तथापि ऐकत नाहींत. निकड करून आपणापर्यंत यावें हें मानस ईश्वरें घडविलें तर येऊं. भाऊसाहेब, अशी कधीं गुदरली नव्हती. कोणाचे डोळ्यांत मर्यादा राहिली नाहीं. कोणती गोष्ट करावी! मजला येथें मोठें संकट पडलें आहे. आपली भेट होती तर कांहीं तरी पर्याय निघता. आम्ही चांगलें नसावें ही गोष्ट सर्वांचे चित्तांत होती ती घडली. माझी मला काळजी नाहीं. परंतु शत्रूवर कांहीं दाब राहवा म्हणून लोकांचे गळां पडतों. पण एकच आरोळी आहे. भाऊसाहेब, याचा विचार कसा करावा! अशी अमर्यादा व बोलणें कधीं ऐकिलें नाहीं. ग्रहदशाच अशी यास काय करावें! देशास गेल्यानें अगदीं वाईट, याजकरितां कसें करावें! परिणाम कसा लागेल! पेंच नसता तर असेच हांकून पुण्यास नेतों. परंतु विजातीय समय प्राप्त झाला आहे. मनांत इतकें आहे कीं एकवार आपली भेट व्हावी. आम्ही गजेंद्रगड उजवा टाकून येतों. याउपर विचार करावया दिवस राहिले नाहींत.

आम्ही लोकांस सांगावें अशी शक्ति मजपाशीं राहिली नाहीं. बेकैदी झाली आहे. मनस्वी भाषणें आहेत. दोन लक्ष रुपये रोजमुरा वाटला तरी पुण्यापावेतों जिवंत जाऊं देतील. नाहीं तर परिणाम शुद्ध नाहीं. सर्वांनीं दया सोडिली. या समयीं संभाळाल तर मोठी गोष्ट आहे. माझेपेक्षां मसलतीची काळजी आपणास अधिक आहे, तेथें लिहावेंसें नाहीं.' परशुरामभाऊनें लगोलग चार लक्ष रुपये कर्ज काढून हरिपंताकडे पाठविले तेव्हां निभाव लागला.

छावणी त्याच बाजूस करून पावसाळ्यांत परशुरामभाऊ व हरिपंत यांनीं लहान लहान पाळेगारांस नरम केलें. ता.३१-८-१७७७ रोजीं शिरहट्टीचें ठाणें वेढा घालून त्यांनीं काबीज केलें व तेथील लोकांस जबर शासनें केलीं. पावसाळ्यांतच तुंगभद्रेच्या दक्षिणेस हैदरानें पेशव्यांचे ताब्यांतलें चित्रदुर्ग संस्थान होतें त्यास वेढा घातला; आणि बोलणें लाविलें कीं तुंगभद्रा नदी ही आपल्या राज्यांची हद्द ठरवा. परंतु मुरारराव घोरपड्यास हैदर कैदेंतून सोडीना, म्हणून तह जुळला नाहीं. पावसाळ्यांत अतिवृष्टीनें परशुरामभाऊच्या फौजेचे अतोनात हाल झाले. याच वेळीं दादाचे हस्तक आबाजी महादेव व तुळ्या पवार हैदराचे फौजेंत बंकापुरास याहून नाना तऱ्हेचे उपद्व्याप करीत होते. त्या शिकवणीनें मानाजी फाकडे हरिपंताचे फौजेंत होता, त्यानें लोकांस पैसे भरून फितूर करून कसा प्रलय उडवून दिला, तें त्याचे चरित्रांत दिलें आहे. त्याशिवाय हरिपंतांच्या फौजेंत त्यांनीं अनेक वार फितूर केला. पावसाळा संपतांच चित्रदुर्गच्या मदतीस मराठी फौजा तुंगभद्रा उतरून पलीकडे जाऊं लागल्या. रस्त्यानें त्यांनीं कनकगिरि व कंपली हीं ठाणीं घेतलीं. ह्या प्रसंगीं निजामाचा सरदार धौंशा मदतीस आलेला असून तो मनापासून काम करीत नसल्यामुळें मराठी फौजांचे हातून म्हणण्यासारखी कामगिरी होऊं शकली नाहीं. त्या फौजा पूर्वेच्या बाजूस गुंतल्या असतां, पश्चिमेकडून टिपूनें धारवाडपर्यंत धाड मारून लूट मिळवून परत प्रयाण केलें. निजामाचा सरदार धौंशा यास तर हैदरअलीनें लांच चारून आपला मिंधा केलें होतें. फौजेंत फितूर चालू असल्यामुळेंही हरिपंताच्या नाड्या आंखडून गेल्या. गुत्ती संस्थान जिंकून परत घेण्याचें काम त्याच्या हातून झालें नाहीं. स.१७७८ मार्च अखेर ते पूर्व बाजूनें तुंगभद्रेपार झाले, तोंच पुण्यास मोरोबाचा फितूर झाल्याची बातमी आल्यानें हरि-

पंतास कर्नाटकची मोहीम तशीच सोडून लगोलग पुण्यास परत यावें लागलें. परशुरामभाऊही मागून हळू हळू परत आला. फितुरांच्या योगानें हरिपंतावर इतका प्रसंग आला होता कीं, त्याचा प्राण वांचणें हेंच ईश्वराधीन आहे, अशी सबंध वर्षभर भावना होती. एवंच हैदरावर दीड वर्ष मोहीम चालून कांहीं एक लभ्यांश झाला नाहीं. या पुढें पुण्यांत मोरोबाचें कारस्थान व नंतर तळेगांवची मोहीम उपस्थित झाल्यामुळें, हैदराचें चांगलें फावलें. मे महिन्यांत 'गजेंद्रगड गेला व टिपूची फौज बदामी नरगुंदकडे येणार. शत्रूची फौज यादवाड मुधोळपावेतों आली. तेरदाळचें ठाणें घेतलें. जून महिन्यांत धारवाडास मोर्चे बसले. पुढें एक महिन्यानें धारवाड हैदराचे हातीं पडलें.'

स.१७७८ च्या अखेरीस दक्षिणेकडील प्रांतावर नजर ठेवण्याकरितां परशुरामभाऊ पंढरपुराजवळ तळ देऊन राहिला होता. सुरापुरकर उपद्रव देऊं लागला, तेव्हां भाऊनें स.१७७९ च्या आरंभींच तिकडे चाल केली. बरोबर अक्कलकोटकरांची फौज होती. पुढें इंग्रजांचा तळेगांवावर पराभव झाल्यामुळें बालपेशव्याचे ग्रह फार थोर आहेत अशी सर्वत्र भावना होऊन शत्रु मित्रांवर एकदम दाब पडला. चित्रदुर्गचा संस्थानिक चांगला वर्षभर हैदराशीं झगडत होता. अखेरीस ता.५-२-१७७९ रोजीं हैदरानें तें ठाणें हस्तगत केलें. एप्रिल महिन्यांत सुरापुरकर शरण येऊन त्यानें परशुरामभाऊस खंडणी भरली. सुरापुराशेजारींच वाघिनगिऱ्याची मजबूद गढी असून, औरंगजेबानें त्याजवर स्वतः स्वारी केल्याची हकीकत सुप्रसिद्ध आहे. इतिहासांत वाकिनखेडें म्हणून आहे, तेंच हें स्थळ होय. त्याजवर भाऊनें तोफांचा हल्ला केला व सडकून दाब बसवून पैका घेतला. पुढें स.१७७९ च्या पावसाळ्यांत करवीरकरांनीं महादजीशीं केलेला तह मोडून पुनः धामधूम सुरू केल्यामुळें त्या प्रांतांत भाऊस जावें लागलें. स.१७७९ च्या पावसाळ्यानंतर नानानें चौकडीचें कारस्थान उभें करून तुंगभद्रा व मलप्रभा यांजमधील प्रदेश हैदराचे हवालीं करून त्याचें साह्य जोडलें, आणि दोघांनीं मिळून पुढील दोन वर्षांत इंग्रजांस झोडून काढलें तो भाग स्वतंत्रतेनें अन्यत्र दिला आहे. मिळून हैदर जिवंत असेपर्यंत त्यास जिंकणें नानाफडणिसास शक्य झालें नाहीं. पुढें स.१७८२ त हैदर मरण पावल्यावर स.१७८६ त नानानें टिपूवर स्वारी

केली, तींत लभ्यांश न झाल्यानें, शेवटीं इंग्रजांच्या घातकी मदतीनें स.१७९२ त नानानें टिपूचा कांटा मोडून काढिला, त्यांत रोगापेक्षां उपायच मराठ्यांच्या बोकांडीस बसला. ( खरे २१३४,-८८,-९१, २४८०, २४९९ ).

**३. करवीर छत्रपतींचा बारभाईशीं विरोध.**—मुख्य विषयाच्या अनुसंधानांत ठिकठिकाणचे अनेक गौण विषय राहून गेले, त्यांची पूर्तता आतां केली. विशेषतः दक्षिणेकडील हैदरअलीची चढाई व पुण्याच्या मध्यवर्ती सत्तेच्या चढ उताराबरोबर, उतार चढावाचे हेलकावे खाणारा कोल्हापुरकर छत्रपतींचा विरोध, या गोष्टींची सांगता आतां करावयाची आहे. हैदर व कोल्हापुरकर हे दोघेही पुण्याच्या कारभाराकडे डोळ्यांत तेल घालून लक्ष ठेवीत असून, तदनुसार शक्य तितका स्वतःचा लाग साधून घेत होते. हें मुख्य सूत्र वाचकांनीं ध्यानांत ठेवावें.

मराठशाहीस कायमचीं बाधक अशीं जीं कित्येक प्रकरणें खडीं होतीं, त्यांतील मुख्य कोल्हापुरच्या छत्रपतींचें प्रकरण होय, ही गोष्ट पूर्वीच्या भागांतील माधवराव पेशव्याचे अंमदानींत स्पष्ट करण्यांत आली आहे. फरक इतकाच कीं माधवरावाचे अंमदानींत कोल्हापुरकरांस दरारा होता, तो पुढें नाहींसा होऊन पेशव्यांचे घरांतील भांडणाचा व तज्जन्य परिस्थितीचा शक्य तितका फायदा करून घेण्यास कोल्हापुरकर चुकले नाहींत. तशांत इचलकरंजीकर व पटवर्धन मंडळ यांना पेशव्यांचा पाठिंबा असल्यामुळें त्यांच्याशीं तर कोल्हापुरकरांचा नेहमींचा वैरभाव. अगदीं निकरावर प्रकरण आल्याशिवाय पुण्याचें कारभारी मंडळ कोल्हापुरकरांच्या व्यवहारांत पडण्यास नाखूष असे. त्यांच्या स्वतः-च्याच भानगडी इतक्या असत कीं नसत्या उठाठेवींस त्यांस फुरसत नसे. म्हणून पटवर्धनांस किंवा इतर सरदारांस पुणेकर कारभाऱ्यांची नेहमींची सांगणी असे कीं शक्य तितकें मिटतें घ्या, उगाच इरेस चढून प्रकरण वाढवूं नका. पण याच भावनेचा फायदा कोल्हापुरकर घेत. एक तर कोल्हापुरकर व सातारकर म्हणजे एकच घर; दोन बंधु विभक्त होऊन एका घरांत वावरूं लागले म्हणजे नोकरचाकरांपासून सर्व संबंधांत जशी धुसपूस उत्पन्न होते, तसाच प्रकार या छत्रपतींचा होता. पुण्यांत सर्वांचे बातमीदार असत, ते पुण्यांतील कारभाराच्या लहानमोठ्या हालचाली किंवा वादविवाद लगोलग आपापल्या यजमानांस कळवीत, त्यामुळें अस्तनींतल्या निखाऱ्याप्रमाणें पुणें-

करांस हें छत्रपति प्रकरण जाचक झालें. त्यांतून आपण उभय छत्रपतींचे आज्ञाधारक सेवक हा बहाणा पुणेंकरांस नेहमींच दाखवावा लागे. सारांश, खऱ्यांच्या ऐतिहासिक लेखसंग्रहापैकीं बहुतेक निम्मा भाग या घरगुती तपशिलांनीं भरलेला आहे. ते सर्व तपशील मराठशाहीच्या सामान्य इतिहासांत देणें शक्य नाहीं. येथें फक्त मुख्य राजकारण समजण्यापुरताच त्यांचा निर्देश करावयाचा आहे. ज्यास्त विशिष्ट तपशील पाहिजे असेल, त्यांनीं तो मुख्यत: खऱ्यांचे खंडांत पाहवा.

कोल्हापुरचा छत्रपति संभाजी मृत्यु पावल्यावर त्याची राणी जिजाबाई इनें स.१७६२ त दत्तक घेऊन कोल्हापुरचे गादीवर बसविलेला शिवाजी केवळ पांच वर्षांचा होता. ता.१७-२-१७७३ रोजीं जिजाबाई वारली तोंपर्यंत तेथील कारभार तीच करीत होती. जिजाबाई वारल्या वेळीं जरी शिवाजी १५ वर्षांचा झाला होता तरी राज्याचें काम पालक नात्यानें जिजाबाईची सवत दुर्गाबाईच पाहूं लागली होती, व तिच्या हुकमतीखालीं कच्चा कारभार येसाजी कुसाजी सिंदे जिजाबाईच्या माहेरचा लेकवळा पूर्वीपासून कारभारावर होता तोच करीत राहिला. नारायणरावाचे वधानंतर पेशवे व कोल्हापुरकर यांचे जे व्यवहार घडले त्यांत या येसाजीचाच भाग आहे. त्यास 'सेनासाहेब सुभेदार' असा हुद्दा होता. हा ता.१ मे १७८३ रोजीं वारल्यावर पुढें रत्नाकरपंत आपा यास 'राजाज्ञा' पद मिळून तो सर्व कारभार पाहूं लागला, तो शिवाजी महाराज २४-४-१८१२ रोजीं वारला, तोंपर्यंत कारभारावर होता. अनेक अडचणींतून कोल्हापुर राज्याचा निभाव लावल्याबद्दल रत्नाकरपंताची वाहवा झाली आहे. तो निरिच्छ व स्वामिहितदक्ष असून यजमान इनाम देत होते तें सुद्धां त्यानें घेतलें नाहीं. याबद्दल रामशास्त्र्याप्रमाणें त्याचा लौकिक कोल्हापुरांत गाजतो असले बाणेदार पुरुषच कोणत्याही राष्ट्राचे आधारस्तंभ होत. याची वंशावली दुसरीकडे दिली आहे ती पाहवी. रत्नाकरपंत शिवाजी महाराजांचे पदरीं उदयास आला. तो शिवाजी सुद्धां आपल्या कामांत दक्ष होता. निजाम, हैदर, पेशवे, पटवर्धन, इचलकरंजीकर, सावंतवाडीकर इत्यादिकांच्या कैचींत कोल्हापुरकरांनीं आपला निभाव एक शतकपावेतों केला, याचें श्रेय जितकें त्यांच्या छत्रपतित्वास द्यावेंसें वाटेल, तितकें त्यांच्या कर्तबगारीसही दिलें पाहिजे. यांत खेदाची एक बाब अशी आहे कीं, पेशव्यांच्या

हातीं मुख्य चालकत्व असल्यामुळें त्यांचे पराक्रम किंवा राष्ट्रसेवा जशी इतिहासांत नमूद आहे किंवा संशोधनाचे साह्यानें नवीन बाहेर येत आहे, तसा प्रकार या छत्रपतींचा झालेला नाहीं. त्यांच्या अडचणी किंवा त्यांची परिस्थिति सहसा कोणाचे लक्षांत येत नाहींत. तसेंच संभाजी व शिवाजी महाराज, जिजाबाई व दुर्गाबाई आणि त्यांचे कारभारी यशवंतराव सिंदे, रत्नाकरपंत राजाज्ञा, किंवा सटवोजीराव भोसले वगैरे अनेक ज्ञात व अज्ञात व्यक्तींचे उद्योग बाहेर येणें जरूर आहे. कोल्हापुरकडील अभ्यासूंना या विषयांत संशोधनाचें काम करण्यास पुष्कळ क्षेत्र आहे. पेशव्यांच्या बडेजावामुळें कोल्हापुरकर बाजूस पडले असें वाटतें.

(१.) **पहिली अपुरी मोहीम** $ (स. १७७५–७६).—बारभाईचें कारस्थान उभारत असतां नानाफडणिसानें करवीरकरांशीं सख्य करून त्यांचे वकील जिवाजी भोसले, महादेव शास्त्री फोंडेकर वगैरे पुण्यास आणून त्यांच्या भानगडी मिटवून दिल्या. या संबंधांत दुर्गाबाईनें आपलें मनोगत जिवाजी भोसल्यास कळवून पेशव्यासंबंधानें जे विचार प्रगट केले आहेत ते मोठे मार्मिक आहेत. पुढें स.१७७४ त रघुनाथराव कर्नाटकांतून पुण्याकडे येऊं लागला, तेव्हां कोल्हापुरकरांनीं त्यास बिलकूल पाठबळ दिलें नाहीं. तथापि इचलकरंजीकरांस नरम करण्याची ही संधि छत्रपतींनीं वायां घालविली नाहीं. त्यांनीं इचलकरंजीवर फौज पाठविली. इचलकरंजीच्या अनुबाईनीं पुण्याकडे धांव घेतली. सखारामबापूनें छत्रपतीस सणसणीत पत्र लिहिलें, पण त्यास छत्रपतींनीं भीक घातली नाहीं. या वेळीं बेळगांवच्या दक्षिणेस कित्तूर येथें देसाई इनामदार बहामनी राज्यापासून होता, तोही बंडखोरी करून पेशव्यांच्या मुलुखास उपद्रव देऊं लागला. धारवाडपासून गोकाकपर्यंतच्या प्रदेशांत त्यानें धुमाकूळ उडवून, हैदर, करवीरकर

$ आधार सर्व कलमाचे—को० इ० मोडक कृत ले. १९ व पृ. १८५–वरील पत्र व ले. २१-२८; इ०१०९–१३०, व १६५; खरे १४६३,–६८ १५०८–१५१७; १७९७, १८१५–२२८७, २३११; त. क. म. पृ. ७८ व ७७; स. मा रो. ३२२–३२५; इचलकरंजी इ. व पटवर्धनी दप्तर यांतील संबद्धकालीन पत्रें चांगलीं खुलासेवार आहेत.

इत्यादिकांशीं सूत्र बांधिलें. त्यावरून बारभाईंनीं स. १७७५ त कोन्हेर त्रिंबक पटवर्धनास इचलकरंजीचे बंदोबस्तास पाठवून मागाहून रामचंद्र गणेश कानडे व कृष्णराव पानसे यांचीही रवानगी केली. करवीरकरांशीं लढा न वाढवितां कित्तूरकरांची पुरी खोड मोडावी, अशी कोन्हेररावास कारभाऱ्यांची ताकीद होती. एप्रिल १७७५ त कोन्हेररावाच्या व कोल्हापुरकरांच्या लढाया होऊन कोल्हापुरी फौजेचा पराभव झाला, तेंव्हां छत्रपतींनीं आपली तक्रार अनुबाई-कडे लिहून पाठविलेली वाचण्यालायक आहे. जूनचे आरंभीं पांडुरंग गोविंद-ही मिरजेहून करवीरचे मुलुखांत चालून गेला. थोडासा नेट दिसल्याबरोबर करवीरकर नरम आले. सतरा कलमांची याद पुण्याहून ठरून आली, त्याप्रमाणें कोल्हापुरकरांनीं इचलकरंजीचे मुद्दे तूर्तातूर्त भागवून दिले. (१३-६-१७७५). तथापि लढा कायमचा मिटला नाहीं. कोन्हेररावानें कित्तूरकरावर चाल करून आगस्टांत मालधुनी $ येथें त्याचा पराभव केला आणि त्याच्यापासून थोडासा दंड घेऊन प्रकरण मिटवून तो धारवाड प्रांतीं हैदरावर चालून जाणार, तोंच कोल्हापुरकरांनीं फिरून उचल केली. वादाचा मुद्दा असा होता कीं इचलकरंजीकरांनीं कोल्हापुरचा ताबा कबूल करून कापशीकर सेनापती-प्रमाणें छत्रपतींची नोकरी करावी. इचलकरंजीकरांचें म्हणणें कीं आपलें संस्थान शाहू महाराजांनीं स्वतंत्र तोडून दिलें असल्यामुळें, आपण सातारकरांचे म्हणजे पेशव्यांचे अंकित, कोल्हापुरशीं आपला संबंध नाहीं. पेशव्यांच्या आप्त संबंधामुळें व अनुबाईच्या आग्रहास्तव इचलकरंजीचा हा डाव चालला; परंतु आपल्या शेजारीं छातीवर कट्यार ठेवल्याप्रमाणें इचलकरंजीचें संस्थान करवीरकरांस अर्थात् दुःसह वाटत होतें. एखादें प्रकरण शेंकडों वर्षें शल्यासारखें टोंचत राहिल्याचीं जीं कांहीं उदाहरणें इतिहासांत नमूद आहेत, त्यांतलेंच हें एक प्रकरण अद्याप पावेतों मराठ्यांच्या इतिहासांत बोंचत आहे. याची चर्चा कै० खऱ्यांनीं केलेली मार्मिक आहे. (पृ. २२५५ भा. ५). पुरंदराहून तह ठरून आला तो अनुबाईस आवडला नाहीं, व करवीरकर तर तो मोडण्याचीच संधि पाहत होते. पटवर्धनांना इचल-करंजीची व्यवस्था लावून देण्याची कामगिरी आल्यानें त्यांचा मात्र मधल्या-

---

$ मालधनी गोकाकजवळ आहे.

मध्यें करवीरकरांशीं कायमचाच वैरभाव जडला. कित्तूरकरांस व हैदरअलीस करवीरचा अंतस्थ पाठिंबा असल्यामुळें हा वैरभाव वाढत गेला.

याच वेळीं म्हणजे स.१७७५चे अखेरीस भवानराव व भगवंतराव प्रतिनिधि यांचा तंटा विकोपास जाऊन, त्यांत भगवंतरावाचे तर्फे करवीरकर सामील झाले. करवीरकरांनीं आपली फौज कमी करावी असें ठरलें असतां उलट ती वाढविली, आणि चिकोडी वगैरे ठाणीं घेतलीं, तेव्हां पुण्याहून रामचंद्र गणेश व रामचंद्र नाईक परांजपे यांची रवानगी पटवर्धनांचे मदतीस झाली. कोन्हेरराव लगोलग कित्तूरकडून परत येत असतां बागेवाडीनजीक ३१-१-१७७६ रोजीं कोल्हापुरच्या फौजेनें त्याजवर चाल करून त्याचा पराभव केला, तेव्हां प्रकरण निकरावर येऊन कोल्हापुर प्रांतांत चाळीस हजार फौजांचा जथ पडला. ता.१ मार्च रोजीं वडगांव जवळ उभय फौजांचें तुंबळ युद्ध होऊन करवीरकरांचा पुरा मोड झाला. महाराज व येसाजी सिंदे पळून पन्हाळयावर गेले. वडगांवचें ठाणें हस्तगत होऊन करवीरकरांचें अवसान खता झालें. भगवंतराव प्रतिनिधि पळून मलकापुरास गेला. लगोलग पेशव्यांच्या फौजा करवीरावर चालून आल्या. दोन दिवस तोफांचा मारा शहरावर फार झाला. गोळयांनीं ब्राह्मण बायका व गुरें मरूं लागलीं. तिसरे दिवशीं हल्ला केला. आदितवार पेठ जाळून दरवाजापर्यंत गेले. शंकराचार्य स्वामींच्या मठाकडून हल्ला जाली, तेव्हां शहरांतील लोकांची धांदल उडाली कीं कोन्हेरराव सर्वांस लुटणार; पण मठ लुटणार नाहींत अशा समजुतीनें लोकांनीं आपली चीजवस्त मठांत नेऊन ठेविली. ही बातमी कोन्हेररावास लागतांच त्यानें मठावर गर्दी केली, त्याजवर मठांतून गोळया चालू झाल्या, तेव्हां कोन्हेररावानें मठ लुटून जाळून टाकिला, (९-३-१७७६.) पटवर्धन ब्राह्मण असून त्यांनीं मठाची अमर्यादा केली, या रागानें नृसिंहभारती स्वामी उपोषणें करून शिरगांवास गेले व तेथेंच समाधिस्थ झाले. सात दिवस शहरास वेढा होता. आंत चार दोन हजार फौज असल्यामुळें शहर काबीज करणें कठिण होतें. आंतील ब्राह्मणांनीं भेटीस येऊन श्री महालक्ष्मीचा बचाव करण्याविषयीं प्रार्थना केली. तेव्हां कोन्हेरराव, रामचंद्र गणेश व भवानराव वेढा उठवून कागलावर गेले. इतक्यांत भगवंतराव तिकडे निघून गेला आणि रामचंद्र गणेश पानशे वगैरेंची

फौज चिकोडीजवळ राहिली. यशवंतराव सिंद्याचें पारिपत्य झालें, परंतु गुंज मोडली नाहीं. त्यानें उलट जास्तच चिडून हैदराशीं स्नेह ठरवून राघोबादादास पेशवाईवर आणण्याचा घाट रचिला; इतक्यांत तिकडे मुरारराव घोरपड्यास पकडून हैदरानें गुत्ती हस्तगत केल्याचें वर्तमान येऊन पेशव्यास दोन ठिकाणीं लक्ष देणें जरूर पडलें. पटवर्धनांचे सरदारांत या वेळीं आपसांत कलह उद्भवून परशुरामभाऊ व रामचंद्र गणेश यांस कोल्हापुरचे मोहिमेवर ठेवून पांडुरंगराव, कोन्हेरराव व कृष्णराव पानशे यांची नेमणूक धारवाडकडे हैदरावर झाली. तिकडे हैदरानें त्यांचा खरपूस समाचार घेतला हें कर्नाटक प्रकरणीं आलें आहे. येसाजी सिंद्यानें मागील अपमानाचा सूड उगविण्यासाठीं पेशव्यांचे फौजेशीं सारखा उच्छेद चालविला होता. त्यानें स.१७७६ च्या डिसेंबरांत भवानराव प्रतिनिधीचा कारभारी काळोपंत याचा त्यानें पराभव केला. त्यानंतर लवकरच बाजीपंत अण्णा जोशी वसईकर पेशव्यांचा सरदार रामचंद्र गणेशास मिळण्यासाठीं चिकोडीकडे येत असतां त्याजवर येसाजी सिंद्यानें छापा घातला. लढाई होऊन सिंद्याची नासाडी बहुत झाली. तीन घाटगे सरदार घायाळ झाले. सिंदे माघारे करवीरास गेला. तिकडे त्यानें कागल पुनरपि हस्तगत केलें. नंतर परशुरामभाऊनें चांगली तयारी करून करवीरावर जाण्याची सिद्धता केली, इतक्यांत हैदराशीं लढतांना सावशीच्या लढाईंत कोन्हेरराव मारला गेला व पांडुरंगराव जखमी होऊन हैदराकडे कैद झाला, अशी बातमी आल्यानें परशुरामभाऊस कोल्हापुरची मोहीम सोडून कर्नाटकाकडे जावें लागलें. या संकटांत पटवर्धनांचें घरगुती भांडण मिटून गेलें. परशुरामभाऊ निघून गेल्यानें येसाजी सिंद्याचें चांगलेंच फावलें. त्यानें पटवर्धनी प्रदेशांत धुमाकूळ उडवून दिला. या वेळीं हैदरअलीनें करवीरकरांस पैशाची मदत पाठवून खूप चिथवून दिलें होतें. रामचंद्र गणेश कसाबसा येसाजीस शह देऊन निभाव करीत महादजी सिंदे येईपर्यंत तिकडेच होता.

(२.) **महादजीची कोल्हापुरावर मोहीम व तह** (स. १७७८ एप्रिल).—करवीरकरांची उचल व हैदराचा जोर या दोन कारणांनीं पुण्याचे कारभारी चपापून गेले; आणि त्यांनीं कोल्हापुरची मोहीम स्वीकारण्याबद्दल स.१७७७चे आरंभीं महादजी सिंद्याची विनवणी चालविली. त्यानें अनेक अटी घातल्या, त्या कबूल करून त्याचे गळ्यांत कारभाऱ्यांनीं मोहीम बांधिली. या

वेळेपासून मराठमंडळास एक करण्याचे प्रयत्न नानाफडणिसानें सडकून चालविले. नागपुरकर रघूजी भोसल्यास पुण्यास आणून त्यास मिळवून घेतलें. कारभाऱ्यांची सर्वांत मोठी अडचण पैशाची होती.

या वेळीं दादाचे सरदार आबाजी महादेव व बाजीराव बर्वे हैदराजवळ राहून पुण्यांतील कारभाऱ्यांचे डाव आपल्या कसबानें व अंतस्थ माहीतगारीनें हाणून पाडीत होते. त्यांचें हें कारस्थान मोठें प्रचंड होतें. हैदर, करवीरकर छत्रपति व खुद्द पुण्यांत मोरोबा दादा असे ह्या कारस्थानाचे तीन भयंकर भाग सबंध मराठशाहीची वाट लावण्यासाठीं उभारण्यांत आले होते. कृष्णपलीकडील पेशव्यांचा अंमल तर बहुतेक उठल्याचसारखा झाला. येसाजी सिंदे हा जबरदस्त कारस्थानी पुरुष होता. त्यानें सटवोजी भोसले,घोरपडे, घाटगे, थोरात हे चार मराठे सरदार अनुकूल करून घेतले. हैदरअलीचा सरदार कुमदान हाही तसाच कल्पक व शूर सर्वांचा पाठ पुरावा करीत होता. या समयीं परशुरामभाऊनें मनोळीच्या बारीशीं जागृत राहून शत्रूंचीं कारस्थानें निष्फळ केलीं. तसेंच सटवोजी भोसल्याखेरीज बाकीचे मराठे सरदार रामचंद्र गणेशानें करवीरच्या कटांतून फोडिले. नंतर ता.१९ मे स.१७७७ रोजीं रामचंद्र गणेशाचें व येसाजी सिंद्याचें युद्ध हिंगणगांव § नजीक झालें. करवीरकरांचा मोड झाला. चार तोफा, घोडीं, हत्यारें वगैरे लूट सांपडली. येसाजी व सटवोजी पळून पन्हाळ्यास गेले. मानाजी घाटगे लढाईंत पडला.

यापूर्वीच महादजी सिंदे कोल्हापुरावर येण्यासाठीं पुण्याहून निघाला. परंतु लगोलग चालून न जातां त्यानें स.१७७७ च्या बरसातींत आपली छावणी रहिमतपुरावर केली; आणि तेथून महादाजीपंत गुरुजीचे मार्फत त्याचे कारभाऱ्यांशीं करार वगैरे होऊन दिपवाळीनंतर त्यानें पुढें हालचाल केली. फौज गोळा करीत मसूर कऱ्हाडवरून महादजी वारणेवर आला. तेथून पन्हाळ्यावर चालून जाण्याची हूल उठवून तो वडगांवावर¶ आला. बरोबर जंगी तोफखाना असल्यामुळें त्यानें आजूबाजूचीं ठाणीं सपाटेबंद घेतलीं. येसाजी सिंद्यानें त्याजशीं सामना असा केलाच नाहीं. फक्त पन्हाळा व कोल्हापुर यांची मजबुदी केली आणि

§ वारणाकृष्णांचे संगमाजवळ, मिरजेच्या पश्चिमेस. ¶ कोल्हापुरचे उत्तरेस २३ मैल.

आंतून समेटाचें बोलणें सारखें चालविलें. महाराणी दुर्गाआई कोल्हा रांत राहून महादजीशीं टक्कर देण्याची कसून मेहनत करीत होती. तिनें व येसाजी सिंद्यानें हैदराच्या विनवण्या करून त्याजकडे मदतीची याचना केली. 'आज मुष्किल वख्त महाराजांच्या राज्यावर गुदरला आहे. टिपूमिया व बाजीराव बर्वे यांस दोन दिवसांत रवाना करतों म्हणोन लिहून आलें असतां ते अद्यापि दाखल नाहींत. इतउत्तर बिलकूल हयगय करूं नये.' ह्या मोहिमेंत इचल-करंजीकर व्यंकटराव घोरपडे आपलें पथक घेऊन महादजीस सामील झाला होता. त्याचीं दोन गांवें लाट व रांगोळी कोल्हापुरांकडून सुटून त्यांस मिळालीं. पुढें महादजीनें पंचवीस हजार फौज करवीरावर आणिली. स.१७७८ च्या फेब्रुवारीपासून एप्रिल पावेतों निकराचें युद्ध चाललें. एवढ्या फौजेशीं करवीर-करांनीं जो हिंमतीचा सामना केला, त्याबद्दल इतिहासांत त्यांची वाहवा झाली पाहिजे.

शहरांतून बाहेर वारंवार हल्ले करून त्यांनीं महादजीचे घोडें व माणूस पुष्कळ मारिलें. पण अशा नुकसानीस न जुमानतां महादजीनें सर्वांस पिटून शहरांत घातलें आणि मार्च महिन्यांत सभोंवार दाट चौक्या बसवून रसद बंद केली. लढाई निकरावर येऊं लागली, तेव्हां दुर्गाआईनें शिवाजी महारा-जास पन्हाळ्यावर पोंचाविलें. तिजजवळ शिबंदी भरपूर असून सर्वांची हिंमत चांगली होती. दारूगोळा व धान्य यांचा पुरवठाही मुबलक होता. तहाची बोली तर सारखी चालूच होती. शेवटीं महादजी अगदीं निकरावर आला. त्यानें मुद्दाम महांकाळी तोफ पुण्याहून मागविली, आणि करवीरकराचे नोक-रींत लोक होते, त्यांचीं घरेंदारें जप्त करून सर्वथा उच्छेद करून सोडिला. पटवर्धनांचीं पथकें सुद्धां त्यानें जबरदस्तीनें संग्रामास आणविलीं.

याच संधीस पुण्यांत मोरोबा दादाचा फितूर झाल्यानें महादजीस नाना फडणिसाचें बोलावणें आलें. तेव्हां वीस लक्ष रुपये दंड घेऊन महादजीनें कोल्हापुरचा वेढा उठविला. 'तह करूं नका म्हणून मोरोबाचीं पत्रें करवीर-करांस आलीं, परंतु आंत पाणी बंद जाहलें, घोडीं माणसें जायां झालीं,' तेव्हां येसाजी सिंद्यानें तहाचा मार्ग पत्करिला. ता.२३-४-१७७८ रोजीं तह कायम झाला. पेशव्यांशीं विरोध करणार नाहीं असें छत्रपतींनीं लिहून दिलें. तसेंच प्रतिनिधि, अमात्य, कापशीकर घोरपडे, इचलकरंजीकर इत्यादि सर्वांच्या

व्यवस्थेची कलमें असून तीं सिंद्याचा कारभारी बाळाराव गोविंद व राणेखान यांनीं ठरविलीं. हा तह झाल्यानंतर हैदरअली कोल्हापुरास छत्रपतीचे भेटीस येऊन गेल्याचें वृत्त मोडककृत इतिहासांत नमूद आहे.

(३.) **छत्रपतींची फेरपलटाई** (१७७८–८२).—मोरोबाच्या प्रकरणामुळें करवीरचा कार्यभाग संपूर्णपणें उलगडण्यापूर्वींच महादजीस पुण्याकडे यावें लागलें; आणि त्यानंतर पुण्यास ज्या घालमेली चालू झाल्या, त्यांचा फायदा घेऊन करवीरकरांनीं तहाची बजावणी न करितां पुनरपि पेशवे व पटवर्धन यांजवर चढाई सुरू केली. त्याच संधींत हैदरखानानें कोल्हापुरास येऊन करवीरकरास पैशाची मदत केली आणि ता.२९-६-१७७८ रोजीं त्यांच्याशीं दोस्तीचा तह केला. इतक्यांत ता.१८-७-१७७८ रोजीं राणी दुर्गाबाई मरण पावली. तिचा कारभार यशवंतराव सिंद्याचे तंत्रानें चालला होता. महादजी निघून गेल्यावर यशवंतरावाचा खून करण्याचा एक प्रयत्न उघडकीस आला, त्याचे तपासांत अनेक अत्याचार झाले. अमात्य व विशाळगडकर प्रतिनिधि यांस आणि आपाजी शामराव नेरलीकर* वगैरे दुसऱ्या कित्येक प्रतिष्ठित लोकांस खलबतासाठीं बोलावून त्यांस येसाजीनें तीन दिवस उपाशीं कोंडून ठेविलें. चवथ्या दिवशीं अमात्य व प्रतिनिधि यांजपासून पांच लक्षांची पावती जबरीनें लिहून घेऊन सोडून दिलें; कारण महादजी सिंद्यांच्या तहांत अकरा लक्षांच्या रकमेस या दोघांची जामीनगिरी होती. अशा रीतीनें लोकांस कैद करून त्यांजपासून पैसे उकळण्याचा क्रम चालला. हैदराचें पाठबळ मिळतांच मनोळी व चिकोडी हे तालुके पटवर्धनांकडून परत मिळविण्याचें ठरवून छत्रपतींनीं सटवोजी भोसल्याची रवानगी केली; आणि येसाजी सिंदे कागल हस्तगत करण्यास चालून आला. या वेळीं परशुरामभाऊ सुरापुरच्या मोहिमेवर होता व पेशव्यांच्या फौजा तळेगांवावर होत्या. सुदैवानें तळेगांवावर इंग्रजांचा मोड होतांच करवीरकरांस दहशत उत्पन्न झाली. परशुरामभाऊनें स.१७७९ च्या उन्हाळ्यांत करवीर प्रांतांत जाऊन थोडा बहुत बंदोबस्त केला. त्या साल-

* आपाजी श्यामजी नेरलीकर हा मराठा इनामदार त्या वेळच्या कामकाजांत प्रमुख होता. त. क. म. पृ. ७४ वरील ले. १२ च्या तहांत त्याची नांवनिशी आहे. नेर्लीगांव कोल्हापुरचे पू. १० मैल आहे. यशवंतराव सिंद्यानें त्याचे डोळे काढिले. मोडककृत इ. पहा पृ. ७४.

च्या पावसाळ्यानंतर चौकडीचें कारस्थान सिद्ध होऊन हैदर व पेशवे स्नेही झाल्यानें करवीरकर उघडे पडले. मानाजी फाकडे या वेळीं त्यांस येऊन मिळाला होता. स. १७८० च्या उन्हाळ्यांत शिरोळचें ठाणें घेऊन परशुराम-भाऊनें दुसऱ्या अनेक संग्रामांत करवीरकरांची खोड मोडली. त्याचा मुलगा रामचंद्रपंत यानें वाघापुरचे$ मुक्कामीं येसाजी सिंदे, मानाजी फाकडे व सट-वोजी भोसले या त्रिवर्गांचा सडकून पराभव केला, तेव्हां तूर्तातूर्त युद्ध थांबलें; आणि इकडे सालबाईचा तह ठरत असतां पुणेकर व करवीरकर यांचाही तह तारीख २२-३-१७८२ रोजीं परशुरामभाऊच्या विद्यमानें झाला, तेव्हांपासून सुमारें पंधरा वर्षें या दोन पक्षांत संपूर्ण सौरस्य नसलें तरी विशेष वितुष्ट उद्भवलें नाहीं.

राणी दुर्गाबाई मरण पावली तेव्हां शिवाजीमहाराजाचें वय २१ वर्षांचें असून, पुढें त्यानेंच सर्व कारभार आपल्या हातीं घेतला. हा महाराज बराच कर्तृत्ववान निपजला. या कोल्हापुर प्रकरणासंबंधीं स. मा. रो. ३१५–३२८ चे कागद नजरेखालीं घालण्याजोगे आहेत.

---

प्रकरण पंधरावें

# सवाई माधवरावाचें जीवन-चरित्र

१७७४–१७९५

१. जन्मयोग. २. बालपण. ३. दिनचर्या व शिक्षण.
४. लग्नसमारंभ. ५. गोपीका आजीबाईचें लक्ष.
६. मर्दानी खेळांची व जनावरांची हौस. ७. रागरंग.

* * * *

येथवर मराठशाहीच्या राजकीय इतिहासाचें वर्णन झालें. परंतु या अल्पायुषी पेशव्याच्या हयातींत इतकीं प्रकरणें, व इतक्या भानगडी झाल्या कीं

$ कोल्हापुरचे द० ३५ मैल, भुधरगड तालुका.

त्यांचें व तदनुरोधानें इतस्ततः विखुरलेल्या नानाविध माहितीचें एकत्र निरूपण केल्याशिवाय त्या काळाचें स्वरूप आपणांस स्पष्ट कळणार नाहीं. हा पेशवा म्हणजे सर्व महाराष्ट्राचा केवळ आत्मा होता. अशा दृष्टीनें त्याच्या प्रथमायुष्यांतील निरनिराळया बनावांचे तपशील संकलित करून ते या प्रकरणांत गोंवले आहेत. हे सर्व तपशील आपुलकीच्या भावनेमुळें हृदयंगम वाटतील यांत संशय नाहीं. माधवराव पंधरा सोळा वर्षांचा होऊन वयांत येऊं लागल्यावर हळू हळू तो आपला अधिकार प्रसंगानुरोधानें गाजवूं लागला, तशा स्वरूपाचीं प्रकरणें त्याच्या उत्तरायुर्भागांत शेवटीं देण्यांत येतील.

१. **जन्मयोग.**—सवाई माधवरावासंबंधानें महाराष्ट्रीय जनतेची केवढी तरी आत्मिक व आस्थेवाईक भावना अद्यापि दिसून येते. नारायणराव पेशव्याचे वधप्रसंगीं हा भावी पेशवा आपल्या आईच्या उदरांत एक महिन्याचे गर्भावस्थेंत असल्यापासून, सर्व राष्ट्राचें लक्ष त्याजकडे लागलें. दोन तीन महिने पावेतों गर्भारपणाची निश्चितिच नसल्यामुळें, रघुनाथरावाचे विरोधकांस उलट कारस्थान रचण्याची सोय नव्हती. कारण रघुनाथरावच काय तो एकटा पुरुष पेशव्यांचे घरांत हयात होता, आणि त्यासच जर काढून टाकला, तर पेशवाई आजच बुडाली, असें झालें असतें. खुनानंतर तीन चार महिन्यांनीं गंगाबाई गर्भार आहे अशी खात्री झाली, तेव्हांच बारभाईंना थोडासा धीर येऊन त्यांनीं रघुनाथरावाचे विरुद्ध खटपट चालू केली. पण त्याबरोबरच गंगाबाईस मारून टाकावी, निदान तिचे गर्भाचा तरी नाश करावा, असे प्रयत्न रघुनाथरावाचे पक्षाकडून चालू झाले, तेव्हां शनिवारवाड्यांत गंगाबाईची कांहीं काळ केविलवाणी स्थिति झाली. या क्षणीं जिवंत आहों, पण पुढील क्षणीं आपली अवस्था काय होणार, माणसांनीं गजबजलेल्या एवढ्या दुनियेंत आपलें रक्षण करणारा एक सुद्धां कोणी नाहीं काय, असे विचार मनांत येऊन राणीपदाचें ऐश्वर्य भोगलेल्या त्या असहाय बाईस काय वाटत असेल याची केवळ कल्पनाच केली पाहिजे. तशा कष्टमय स्थितींतून तिला वांचविण्याचें धाडस प्रथम सखारामबापूनें केलें; आणि त्यानें कंबर बांधून पुढाकार घेतांच मग इतर लहान मोठे लोक त्यास मिळाले. नारायणरावाचा वध इ. स. १७७३ च्या ३० ऑगस्ट रोजीं झाला; आणि पुढील जानेवारी १८ तारखेस वसंतपंचमीच्या दिवशीं बारभाईंनीं गंगाबाईस शनिवारवाड्यांतून

काढून पुरंदरावर सुरक्षित पोंचविलें. त्या वेळीं रघुनाथरावाचा मुक्काम कर्नाटकांत गुत्तीच्या पलीकडे होता. ही संधि साधून बापूनानांनीं पुरंदरावरून गंगाबाईच्या नांवानें पेशवाईचा कारभार चालू केला. तेथेंही तिजवर अनेक संकटें आलीं. नानातऱ्हेचे फितूर हरहंमेश उघडकीस येत होते. त्यांतून रघुनाथराव घाईघाईनें पुण्याकडे चालून येत असतां बारभाईंचा सेनापति त्रिंबकराव पेठे त्याजवर चालून गेला. पंढरपुराजवळ कासेगांवच्या मैदानांत उभयतांची लढाई ता.२६ मार्च रोजीं चालून त्रिंबकराव जखमी होऊन रघुनाथरावाचे हातीं सांपडला आणि पुढें थोड्याच दिवसांत तो मरण पावला. तेणेंकरून बारभाईंच्या उद्योगांत हा प्रथमग्रासे मक्षिकापातच झाला. हा धावपळीचा युद्धप्रसंग पुढें सारखा नऊ वर्षे चालल्यावर रघुनाथराव गोदातीरीं येऊन ता.११ डिसेंबर १७८३ रोजीं मरण पावला, तेव्हां कोठें बारभाईंच्या पक्षाची स्थिरता झाली. अशा बिकट परिस्थितींत पुरंदर किल्ल्यावर ता.१८ एप्रिल सन १७७४ रोजीं गंगाबाईची प्रसूति होऊन पुत्र झाला तो हा सवाईमाधवराव होय. कोणाच्या जन्मानें शत्रुमित्रांच्या ठिकाणीं जर अत्यंत विपरीत भावना कधीं उत्पन्न झाल्या असतील, तर त्या या मुलाच्या जन्माइतक्या इतरत्र फारच क्वचित् सांपडतील. या मुलाचें जन्मवृत्त ऐकतांच अखिल महाराष्ट्रास झालेला आनंद त्रिभुवनांत माईना! त्याचे उलट स्थिति रघुनाथरावाची होऊन, त्यास कायमचा वनवास प्राप्त झाला. स.१७७३ च्या दसऱ्यास रघुनाथराव पुण्यांतून बाहेर पडला, त्यानंतर त्यास त्या नगरीचें दर्शन पुनः कधीं झालें नाहीं.

माधवरावाचे जन्मप्रसंगीं तत्कालीन लेखकांचे किती तरी धन्योद्गार त्या वेळीं निघाले. असा हा अत्यंत भाग्यशाली पेशवा एकवीस वर्षे वय होऊन तितक्याच हृदयद्रावक रीतीनें ता.२५ ऑक्टोबर १७९५ रोजीं दिवंगत झाला. नानाफडणिसानें बुद्धिसर्वस्व खर्च करून ज्याचें संगोपन केलें, ज्याचें शिक्षण परिपूर्ण करण्यांत कोणत्याही प्रकारची न्यूनता ठेवण्यांत आली नाहीं, ज्याचे व्रतबंधविवाहादि संस्कार अत्यंत आस्थेनें, अप्रतिम उल्हासानें आणि परिपूर्ण तजविजीनें करण्यांत आले, ज्याच्यावर सर्व महाराष्ट्राची व सर्व मराठी राज्याची भिस्त, आणि ज्याच्या भावी पराक्रमाकडे शत्रुमित्रादि

समस्त हिंदवासीयांचें लक्ष वेधून राहिलें होतें, असा हा महाराष्ट्राच्या जिव्हाळयाचा राष्ट्रपुरुष दीर्घायुषी झाला असता, तर तो कशा प्रकारचा निपजला असता, थोरल्या माधवरावाची कर्तबगारी त्याच्या ठिकाणीं उत्पन्न झाली असती कीं नाहीं, आणि आयुष्य असतें तर त्यानें मराठ्यांचा पुढील इतिहास कांहीं अंशीं तरी बदलला असता कीं नाहीं, अशा प्रकारचे प्रश्न मनांत आल्याशिवाय राहत नाहींत; आणि केवळ मौजेखातर तरी त्यांचा थोडा बहुत उहापोह केल्यास कांहीं तरी तर्क बांधतां येईल, निदान या संबंधानें वाटणारी जिज्ञासा थोडीशी तृप्त करितां येईल, असें वाटतें. म्हणूनच या पेशव्याच्या आयुष्यांतील निरनिराळया प्रसंगांचे जे कांहीं तत्कालीन उल्लेख उपलब्ध आहेत, त्यांवरून काय अंदाज निघूं शकतो, हें येथें दाखवावयाचें आहे. अशा तऱ्हेनें सर्व माहिती एकत्र करून या पेशव्याचें खासगी चरित्र अद्यापि कोणी बनविलेलें नाहीं. इंग्रजांशीं चाललेलें निकराचें युद्ध, टोलेजंग विवाह-समारंभ, टिपूवरील मोहिमा, महादजी शिंद्यांनीं बादशहाकडून मिळविलेले मानमरातब, तरुण पेशव्याचें मन कबजांत घेण्यास नाना व महादजी यांच्यांत लागलेली चुरस, सन १७९३ च्या गुढी पाढव्यास पुण्यांत झालेला अपूर्व रंग, आणि या सर्वांवर खर्ड्याच्या लढाईनें चढविलेला कळस, एवढ्याच दहापांच राजकीय गोष्टी सवाई माधवरावाच्या संबंधानें सामान्यतः मशहूर आहेत. ऐन आशेच्या उच्च भरारींत सर्व महाराष्ट्राच्या आशा क्षणांत नाहींशा करून टाकणारा, आकाशांतील कुऱ्हाड कोसळते त्याप्रमाणें, सज्जांतून खालीं कारंजावर पडून झालेला त्याचा हृदयद्रावक अंत पाहिला म्हणजे, त्याचें एकंदर चरित्र एखाद्या अत्यंत शोकपर्यवसायी नाटकाप्रमाणें मनास कायमचा चटका लावतें, आणि असेंही वाटूं लागतें, कीं असल्या या अलौकिक व्यक्तीला जन्मकालीं ग्रह तरी कसे पडले होते, कीं गर्भवासापासून त्यांनीं आरंभीं त्याला परमोच्च भाग्यास चढवावें, आणि तें भाग्य ऐन रंगांत येण्याच्या संधीस त्याचा आयुष्यतंतुच खुडून टाकावा. यावरून ज्योतिष दृष्टीनेंही सवाई माधवरावाचें आयुष्य पुष्कळांस विचारणीय वाटेल, आणि त्यासाठींच त्याची जन्मकुंडली पुढें दिली आहे.

दुसरे एका दृष्टीनेंही या व्यक्तीचा आयुःक्रम ध्यानांत घेण्याजोगा आहे. कित्येक मुलें लहानपणीं गोजिरवाणीं व चलाख दिसतात; लहानपणचा त्यांचा

प्रत्येक शब्द व प्रत्येक कृत्य मोठें स्पृहणीय व हृदयस्पर्शी भासतें. तिसऱ्या चौथ्या वर्षांत जर याची ही एवढी अलोट बुद्धि, तर पुढें चांगलें शिक्षण मिळवून हा केवढा बृहस्पति होईल, याची कल्पना करण्यांत समस्त आप्तवर्ग दंग असतात. परंतु पुष्कळदां परिणाम मात्र अगदीं उलट होतो. लहानपणाची ती बुद्धीची तीव्रता अल्प कालांत नाहींशी होते; त्याच्या बुद्धीस मांद्य येऊन तो कोणतेंही सत्‌शिक्षण न संपादितां उलट तो व्रात्य, किंबहुना, दुर्व्यसनी निपजतो; आणि असला हा बाब्या जन्मास नसता आला तर बरा, असें त्याच्या इष्टमित्रांस होऊन जातें. अशा प्रकारचीं उदाहरणेंही केवळ दुर्मिळ आहेत असें नाहीं. शिक्षण देण्यांत आईबाप आपली शिकस्त करून सोडतात. पुष्कळांना असें वाटतें कीं वाटेल तितका पैसा व श्रम खर्च करून आपण आपल्या मुलांस आपल्या मर्जीप्रमाणें उत्कृष्ट तरबेज करूं. या कामीं पाहिजे ती झीज सोसण्यास ते मुळींच मागेंपुढें पाहत नाहींत.

सवाई माधवरावाच्या आयुष्यांत या गोष्टीचाही बराचसा उलगडा होऊं शकतो. मराठशाहींतील घडामोडींच्या अनेक आख्यायिका समाजांत प्रचलित आहेत, त्यांपैकीं पुष्कळशा केवळ या सवाई माधवरावाच्या असाव्यात, असें मला वाटतें. त्या वेळच्या बऱ्या वाईट गप्पाच ऐकण्याची ज्यांची इच्छा असेल त्यांनीं हरिवंशाची बखर वाचावी. पुरुषोत्तमराव दाजी पटवर्धन सवाईमाधवरावाचें लहानपणीं संगोपन करण्यास पुरंदरावर होता, त्याचीच बहुतेक हकीकत या बखरींत आहे. पण अशा आख्यायिकांवर भिस्त ठेवून मी पुढील चरित्र लिहीत नाहीं. प्रत्यक्ष घडलेल्या हकीकती ज्या ठिकठिकाणीं नमूद आहेत तेवढ्याच मी जमेस धरणार आहें. प्रथमतः पुढील संदर्भासाठीं कालक्रमानुसार या पेशव्याच्या हयातींतले मुख्य प्रसंग देतों:—

ता. १८-४-१७७४ जन्म पुरंदर किल्ल्यावर.

ता. २८-५-१७७४ पेशवाईचीं वस्त्रें चाळिसावे दिवशीं.

ता. १२-७-१७७७ शनिवार, मातुश्री गंगाबाईचा पुरंदरावर नवज्वरानें मृत्यु.

ता. २७-८-१७७८ नारायणरावाचे वधानंतर शनिवारवाड्यांत पहिला मोठा गणपति उत्सव.

ता. २१-४-१७७९ नवस केल्याप्रमाणें मुंज पर्वतीवर होऊन नंतर

ता. २६-४ रोजीं मध्यरात्रीं शनिवारवाड्यांत सुमुहूर्तें प्रवेश.

ता. १०-२-१७८२ लग्न-रमाबाईशीं, केशव नाईक थत्ते यांची कन्या, शनिवारवाड्यांत. गर्भाधान-ता. २१-१०-१७८९ रोजीं झालें. नोव्हेंबर १७९० त चार महिन्यांची गरोदर असल्याचा उल्लेख खरे ले. ३२४१त आहे. पुढें प्रसूतीचा उल्लेख नाहीं. मृत्यु ३१-१-१७९३.

नोव्हेंबर १७८४ व मार्च १७८८ त गंगापुर येथें गोपिकाबाईची भेट.

ता. ३-८-१७८८ गोपिकाबाईचा मृत्यु पंचवटीस.

ता. ६-३-१७९३ दुसरें लग्न यशोदाबाई,—गणेशपंत गोखले याची कन्या—इला ऋतुप्राप्ति होण्यापूर्वीच पेशवा मरण पावला.

ता. १३-३-१७९३ चैत्र शुद्ध १-पुण्यांत रंगाचा मोठा समारंभ, वाड्यांतून वानवडीपर्यंत रंग खेळत गेले. रात्रीं परत आले.

ता. १२-३-१७९५ खर्ड्यांच्या लढाईंत मराठ्यांचा अपूर्व विजय.

ता. २७-१०-१७९५ शनिवारवाड्यांत मृत्यु, माडीवरून खालीं पडून.

वरील यादींत राजकीय महत्त्वाच्या बाबती वगळल्या आहेत. महादजी सिंदे, हरिपंत फडके, रामशास्त्री, अहल्याबाई वगैरे कित्येक प्रसिद्ध व्यक्तींचे मृत्यु सुद्धां राजकीय स्वरूपाचे म्हणतां येतील. वास्तविक सवाई माधवरावाचे कारकीर्दीचें राजकीय महत्त्व त्याचे स्वतःचे वांट्यास येतच नाहीं. त्याचा सर्व कारभार नानाफडणीस, महादजी सिंदे वगैरे मंडळींनीं केला. तो स्वतः व्यवहार पाहूं लागणार इतक्यांत मरून गेला. तेव्हां त्याचें बालपण, त्याचें शिक्षण, त्याचे शोक व व्यवसाय, त्याचा स्वभाव व वर्तन, इतक्यापुरताच आपणास विचार करावयाचा असला तरी खालील मृत्युतिथि तत्कालीन परिस्थिति समजण्यास उपयोगी पडतील:—

| | |
|---|---|
| २-८-१७८१ सखाराम बापू. | २२-१०-१७८९ रामशास्त्री न्यायाधीश. |
| ७-१२-१७८२ हैदरअली. | ३०-८-१७९१ घासीराम कोतवाल. |
| ११-१२-१७८३ रघुनाथराव दादा. | २७-३-१७९३ रघूजी आंगरे. |
| १७८६ तुळाजी आंगरे. | १२-२-१७९४ महादजी सिंदे. |
| १९-५-१७८८ मुधोजी भोसले. | १२-३-१७९४ आनंदीबाई पेशवे. |
| १-६-१७८८ पातशहाजादा जवानबख्त. | २०-६-१७९४ हरिपंत फडके. |
| १७८९ फत्तेसिंग गायकवाड. | १३-८-१७९५ अहल्याबाई. |

जन्मकुंडलीयम्




पुरंदर किल्ला. शके १६९६

जयनाम संवत्सरे

उत्तरायणे वसंततौ अधिक वैशाख शुद्ध ७ इंदुवासरे २६।४२ अदितिभे ३२।२० धृतौ योगे ५५।५८ वणिज करणे तत्र मेषार्क गतांशाः ७ भोग्यांशाः २३ तत्र श्रीसूर्योदयादिष्टकालः १७।३० तत्र समये कुलीरलग्नोदये श्रीमंतां प्रभुवर्याणाम् जन्म ॥ ता. १८ एप्रिल सन १७७४.‡

गंगाबाईस पुत्र व्हावा म्हणून शेंकडों ठिकाणच्या देवतांस नवस करण्यांत आले होते. अशा कांहीं नवसांची यादी इ. सं. त छापलेली असून, त्यांतील रकम एकंदर रु. १३४००० होते. यांपैकीं जेजुरीचे खंडोबास एक लक्ष रोख द्यावयाचे होते. शिवाय पुरंदर, पुणें, मोरेश्वर, गणपति पुळें, गिरीचा त्र्यंकोबा, लोहगड, भिमाशंकर, बारामतीचा विठोबा, सोमेश्वर, आडिवरें, त्र्यंबकेश्वर, परशुराम, थेऊर, आंवढा नागनाथ, इत्यादि ठिकाणच्या प्रसिद्ध देवतांस नवस केलेले मागाहून फेडण्यांत आले. यावरून त्या वेळची लोकभावना व चिंता स्पष्टपणें कळून येते.

माधवराव हा गंगाबाईचा खरा मूल नव्हे, असा प्रवाद आहे तो सर्वथैव निराधार होय. पुण्यांत नानाप्रकारच्या बाजार बातम्या चालत, त्याच इंग्रजांचा वकील मॉस्टिन मुंबईस व कलकत्त्यास वगैरे लिहून पाठवी. नारायणरावाचे खुनाचे दुसऱ्याच दिवशीं तो दादास शनिवारवाड्यांत भेटला. त्याच्या गप्पिष्ट स्वभावाचा ग्रँट डफनें चरचरीत निषेध केला आहे. मॉस्टिनच्या या गप्पांचा उपयोग दादानें मात्र कांहीं काळ आपल्या मतलबासाठीं करून घेतला. दादाचा वकील लक्ष्मण आप्पाजी अंबेकर मुंबईहून ता.७-९-१७७५रोजीं दादास सुरतेस लिहितो; 'मेस्तर मॉस्टिन व फ्लेचर उभयतांनीं आमचे बिऱ्हाडास बुधवारीं सायंकाळीं येऊन सांगितलें, आम्ही गंगाबाईच्या प्रसूतिसमयीं पुण्यांत होतों. प्रसूत जाली तें अर्भक निवर्तलें. उपरांत दुसरें घेतलें. निवर्तल्याची खबर आम्हीं ऐकिली; पांचजणी बायका गरोदर जवळ होत्या. याप्रमाणें सांगितलें.'

‡ खंड १०. १३७; ऐ. टि. ५. १८; खंड १२. ९८ (७. ९. १७७५) व १७९.

प्रसूति १८-४-१७७४रोजीं पुरंदरास झाली त्याची ऐकीव बातमी मॉस्टिननें दीड वर्षांनें कळविली, ती अंबेकरानें आपले यजमानास लिहिली; आणि त्यानें या गप्पेचा उपयोग, मुंबईच्या गव्हर्नराकडे करून घेतला. पुढें मुंबईकरांचा महाव्रात्य वकील टेलर कलकत्त्यास गेला, त्यानें तो तिखटमीठ लावून कसा वज्रलेप केला, हें त्याच्या लिहिण्यांतच दिसून येतें. अलीकडे ना० किंकेड यांनीं आपल्या पुस्तकांत हा प्रवाद खोटा असें सप्रमाण सिद्ध केलें आहे. इंग्रज वकील अप्टन पुरंदरास आला त्यानें याजबद्दल प्रथम खात्री करून घेतली, तेव्हांच पुढें तो तहाचे वाटाघाटीस प्रवृत्त झाला.

सवाई माधवरावाच्या ग्रहांनीं चाळिसावे दिवशीं मुख्य प्रधानकीचा कोरडा मान त्यास देवविला, पण स्वयंप्रकाश मात्र त्याचा मुळींच झळकूं दिला नाहीं. पुत्रोत्साहसंबंधाचे तपशील स. मा. रो.१ ले.८२–९८ पाहण्यालायक आहेत. अमुक दिवशीं पुत्रोत्साह होईल म्हणून महादेव जोशी पावसकर यांनीं प्रश्न सांगितलेला खरा झाला; म्हणून त्यास व पुरंदरच्या ज्योतिष्यास इनाम जमिनी देण्यांत आल्या. उत्सवसंबंधानें बंदीवान मुक्त करण्यांत आले. बारा दिवसांतील जन्मोत्सवाचे तपशील खर्चा सुद्धां भरपूर दिलेले आहेत. येसूबाई सोहनी इनें सुईणपण केलें त्याबद्दल तिला सोन्याची सांखळी बक्षीस दिली. 'एक कुही शेळी तांबडी अगर काळी चांगली सरकारचे खिजमतगाराबरोबर जलद पाठवून द्यावी,' म्हणून पुण्याचे कोतवालास निकडीचा हुकूम गेला. ता.१७-२-१७७७ रोजीं चूडाकर्म झालें. असले हे क्षुल्लक तपशील आणखी येथें देण्याचे भरीस न पडतां, लहानपणचे कांहीं कठिण प्रसंग मनोरंजक वाटतील असे पुढें देतों.

**२. बालपण.**—वस्त्रें आणण्यासाठीं खुद्द सखारामबापू साताऱ्यास गेला. तेथूनच त्यानें रामशास्त्री यास पत्र लिहून पुण्यास न्यायाधिशीचे कामावर बोलाविलें. म्हणजे आठ नऊ महिनेच तो कामावर नव्हता हें उघड आहे. सन १७८३ त सालबाईचा तह कायम होऊन पुढें रघुनाथराव दादा ठिकाणीं बसेपर्यंत माधवरावाचीं पहिलीं सात आठ वर्षें लोकांस अत्यंत चिंतेंत गेलीं. गर्भावस्थेंत असतां जो धोका त्यास होता, तोच पुढें या काळांत सारखा चालू होता. जेवणखाण, निजणें बसणें इत्यादि नेहमींच्या व्यवसायांत केव्हां फितूर होईल, केव्हां कोण येऊन दगा करील, याबद्दल अहर्निश काळजी बाळगावी

लागे. खोलींत मूल व बाळंतीण असून दारांत आडवा पुरुषोत्तमराव दाजी निजून असे. नित्य माणसें आंत जाणार त्यांचा झाडा घेऊन आंत सोडावीं, अशी त्यांची शिस्त होती. एके दिवशीं नेहमींचीच एक कुणबीण आंत चालली. दाजींनीं पाहिली आणि बोलले, 'रांड फितुरी आहे, धरा.' म्हणतांच धरून झाडा घेतला. दुसऱ्या कुणबिणी आणून लुगड्या सुद्धां झाडा घेतला; कांहीं सांपडेना. नंतर वेणी सोडविली, तों बुचड्यांत सुरी निघाली. तेव्हां चौकशी करून गोणत्यांत घालून कडेलोट केला.' ( ह. वं. ब. पृष्ठ ६० ). अशी या दाजीची दक्षता होती; आणि असे दगे अव्याहत चालू होते. पुरुषोत्तमरावाजवळ त्याचे भरंवशाचीं चारशें हत्यारबंद माणसें सदैव तयार असत. बारभाई सर्व कारभार करीत खरा; परंतु चाळिसाव्या दिवशीं वस्त्रें स्वीकारण्याचे वेळेपासून हरएक महत्त्वाच्या समारंभांत, भेटींत व दरबारांत या बाळ पेशव्यास स्वतःस भाग घ्यावा लागे. पुरंदरचा तह ठरला त्यापूर्वी म्हणजे जानेवारी १७७६ त कर्नल अप्टन वगैरे इंग्रजांचे वकील पुरंदरास आले, 'त्यांच्या व श्रीमंतांच्या भेटी व्हावयाच्या, भेटीचे समयीं भितील यास्तव टोप्या कुडतानें घातलेलीं माणसें पुढें बसवून अगोदरच धीट करितात. श्रीमंतांस पागोटें शिरपेंच घालीत असतात.' पुढें अप्टनच्या भेटीसाठीं श्रीमंत किल्ल्यावरून खालीं काल डेऱ्यास आले. घड्याळीं वगैरे जिन्नस शिरस्तेप्रमाणें इंग्रजांनीं नजर केला.' या वेळीं त्याचें वय एक वर्ष नऊ महिन्यांचें होतें. त्यानंतर पुनरपि एक वर्षानें अप्टनसाहेब पुरंदराहून परत गेला, त्या वेळीं सुद्धां त्यास निरोप द्यावयास पेशवा किल्ल्याखालीं त्याचे भेटीस आला होता.

या मुलाच्या आयुष्यांतील अत्यंत दुःखप्रद प्रसंग म्हणजे आई गंगाबाईचा मृत्यु होय. ती तारीख १२-७-१७७७ रोजीं पुरंदरावरच वारली. 'मातुश्रीस सातआठ ज्वर आले, वायु झाला. एकाएकींच परवां मंदवारीं दीडप्रहर दिवसास देवाज्ञा झाली. ईश्वरें मोठा घात केला. श्रीमंत लहान आहेत. मातुश्री पांघरूण होतें, तें गेलें. निरुपाय गोष्ट भगवंतें घडविली. किल्ल्यावरच दहन झालें. रावसाहेब बाईसाहेबांस पुसतात, कोठें आहेत. तेव्हां सांगतात देवास गेलीं आहेत. 'त्यांस आणवा' असें म्हटल्यावर, आणवितों, असें सांगून विसरीं पाडितात. प्रतापी पुरुष, अवतारी आहे, दुसऱ्यानें समजावें लागत नाहीं.' एवढा एक प्रसंग व पुढें बायको मेली त्याशिवाय या मुलास दुःख म्हणून ठाऊक झालें नाहीं. कोणी दाबणारा किंवा दटावणारा नाहीं. मर्जीस

येईल तैसें चनींत सर्व आयुष्य गेलें. सन १७८० च्या सेप्टेंबरांत कांजण्या व १७८१ च्या मार्चांत त्यास देवी येऊन तो थोडा आजारी होता.

मात्र लहानपणीं जिवावरचे कठिण प्रसंग अनेक गेले. जन्म अधिक वैशाखांतला. 'किल्ल्यावर पाऊस अतोनात व हवा सर्द, म्हणून थोडे दिवस खालीं सासवडास राहण्यास आले. परंतु तेथें बंदोबस्त नाहीं, दगा होणार असा सुगावा लागल्यावरून आषाढाचे प्रथम दिवशीं घाईघाईनें किल्ल्यावर गेले. दादांचा चांगला बंदोबस्त झाल्याशिवाय उतरावयाचे नाहींत. सासवडासच असते तर हरएक दगा होता. घालमेलींत बहुत होते. साक्षी किंवा दस्तैवज कोणाचा सांपडत नाहीं. किल्ल्याची हवा वाईट खरी, परंतु मान्य करावी लागली.' यापेक्षां कठीण प्रसंग म्हणजे सरदारांच्या भेटी होत. मानाजी फाकडे म्हणजे मराठशाहींतली अत्यंत दुरुगम व्यक्ति. तोंडाचा फटकळ, वृत्तीचा उद्दाम, अंतःकरणाचा ठाव तर ब्रह्मदेवासही लागणें कठिण. केव्हां काय करील याचा नेम नाहीं. घटकेंत बारभाईंकडे सामील होऊन वाटेल तो लेख लिहून देण्यास तयार, तर घटकेंत दादासाहेबांकडे जाऊन लढाईंत हजर; आणि पुढल्या घटकेस हैदराकडे मिलाफी होऊन वाटेल तसा वागणारा; पुनः सर्वांस सोडून कोल्हापुरकर छत्रपतींच्या कच्छपीं आहेच. बरें, शूर व शक्तिमान् एवढा कीं, त्यास दुखविण्याची कोणाची प्राज्ञा नाहीं. चाळीस वर्षें ही व्यक्ति मराठशाहींत प्रमुखपणें वावरत होती. महादजी सिंद्यास त्यानें पुरे पुरे केलें; कारण तोही सिंदेच असून महादजीच्या हक्कास प्रतिस्पर्धी होता. दरबारांत भेटीस येऊं लागला म्हणजे एवढ्या दिमाखानें व ऐटीनें हत्यारबंद यायचा, कीं त्यास कोणी हूं म्हणण्याची सोय नाहीं. मानापमानाबद्दल भारी चाड. पुरंदरचा तह होतांच दादाचा डाव संपला, आणि त्याकडील फौजांस व सरदारांस बारभाईंनीं आपल्याकडे नोकरींत घेतलें. त्या वेळीं सिंदे, होळकर वगैरे सर्व लहानमोठ्या सरदारांनीं पुरंदरजवळ येऊन बालपेशव्याची भेट दरबारांत घेऊन, त्याजविषयीं आपली निष्ठा व्यक्त करावी असें ठरलें. मानाजी सिंदे फाकडे, सखाराम हरि, रामचंद्रबावाचा पुत्र सदाशिव रामचंद्र हे सर्व दादाचे कट्टे अभिमानी सरदार पुरंदराखालीं सन १७७६ च्या जून महिन्यांत पेशव्याकडे आले. अशा या अठरापगड सरदारांत कोणाचा भाव कसा, हें कोण ओळखणार! सहज कोणी अर्भकास दगा केला तर सर्व

कारभार आटोपला असता. 'श्रीमंत, मातुश्री व सखारामबापूसह, आषाढ शुद्ध ३ बुधवारीं ( १९-६-१७७६ ) दोन प्रहरीं किल्ल्याखालीं आले. डेऱ्यांत सर्वांच्या भेटी झाल्या, त्यांचें वर्णन मागें पृ. ६४ वर आलें आहे. 'हजारबाराशें मुख्य मुख्य निवडून भोजन घालून उपरांत निरोप दिला. होळकर व मानाजी फाकडे यांच्या भेटी स्वतंत्र झाल्या. त्याकरितां श्रीमंत व मातुश्री पुनः किल्ल्याखालीं आलीं. होळकरांनीं डेऱ्यास जाऊन श्रीमंतांची भेट घेतली. पर्जन्य अतिशय, यामुळें घटकाभर बसोन विडे घेऊन गोटास गेले. आज पुनः होळकर श्रीमंतांचे भेटीस किल्ल्यावर जाणार '(१८-७-१७७६) होळकराची भेट सहज पार पडली. पण मानाजी फाकड्याची भेट मात्र निर्विघ्नपणें कशी पार पडते याविषयीं कारभाऱ्यांस मोठी चिंता लागली. किल्ल्यावर येऊन यजमानास स्वतः भेटण्याचा त्यानें आग्रह धरला. नाना फडणिसाची किंवा इतरांची मानाजीसमोर येऊन बोलण्याची छाती होईना. शेवटीं पुरुषोत्तम पटवर्धनानें छाती करून तो प्रसंग निभावला. त्याचें वर्णन अस्सलच हरिवंश बखरींत वाचण्याजोगें आहे. भेट झाल्यावर नाना फडणीस वगैरेंकडे पाहून मानाजी म्हणाला, 'हीं बामणें मला फितुरी म्हणतात' असो. राष्ट्रांतील सर्व प्रमुख मंडळींची या बालपेशव्या संबंधानें एक मात्र भावना सदैव कायम होती, ती ही कीं, हा मोठा नशीबवान् आहे. याच्या पुण्याईनें हरएक कृत्यांत आपणांस यश हें खास येणार; आणि सामान्यतः एवढी गोष्ट खरी, कीं त्याच्या वीस वर्षांच्या अमदानींत हातीं घेतलेल्या कोणत्याही स्वारींत किंवा कामांत अपयश असें सहसा आलें नाहीं. शत्रु व मित्र सर्व नरम झाले. रघुनाथराव एवढा मोठा जहांबाज व हिकमती, सात वर्षें इंग्रजांचा त्यास सारखा पाठपुरवठा, पण तोही शरण आला. हैदर, टिपू, निजाम व इंग्रज सर्वांनीं थकून जाऊन पेशव्याशीं गोडी केली. गायकवाड, नागपुरकर भोसले व करवीरकर छत्रपति शरण आले. नारायणरावाच्या खुनांत सामील असलेल्या सर्व गुन्हेगारांस जबरदस्त शिक्षा झाल्या. सदाशिवरावभाऊच्या तोतयाचा पाडाव झाला. शिंदे-होळकरांसारखे सरदार पेशव्याची आज्ञा झेलूं लागले. हे सर्व प्रकार होत असतां सर्व राष्ट्राची खास भावना अशी होती कीं, 'श्रीमंतांचें दैव विचित्र आहे. त्यांचे दैवयोगें करून सर्वही गोष्टी उत्तमच होतात. श्रीमंतांचें पुण्य विचित्र आहे, तर हैदराचे

बंदींत पडलेली मंडळी सुटून येतील, चिंता नाहीं, अशी पटवर्धनांस खात्री होती. सर्वांचे तोंडीं एकच वाक्य, कीं पंतप्रधानांचा पुण्यप्रताप थोर आहे. त्यामुळेंच मातबर यश येतें.' ता.९ जून १७७८ रोजीं परशुरामभाऊ लिहितो, "काल सोमवारीं सिंदे व आम्ही सारे फौजेनिशीं सहा कोस येऊन श्रीमंतांची भेट किल्ल्याखालीं डेऱ्यांत घेतली. तमाम लोकांच्या भेटी झाल्या. लोकांचे भेटीचा समारंभ उरकून मग आम्ही थोडे निवडक श्रीमंतांच्या भेटीस गेलों. चार घटका डेऱ्यांत बसवून लोकांचा मुजरा घेऊन विडे दिल्हे. धण्याचे पाय पाहिले, आनंद जाहला तो कोठवर लिहावा. श्रीमंतांच्या बोलण्याची, बसण्याची व देखणे-पणाची तारीफ काय लिहावी ? बाललीला तर वर्णन करतां येत नाहींत. केवळ ईश्वरस्वरूपी आहेत. तूर्त श्रीमंतांचे पुण्येंकरून इंग्रज नामोहरम होऊन, जरब खाऊन, घांट उतरून परत गेला. श्रीमंतांचें पुण्य विचित्र आहे, सर्व मनोरथ स्वल्प दिवसांत घडून येतील. हें शिवशाही राज्य आहे. केवळ यनाक्रान्त होतें असें नाहीं.' अशा प्रकारचा विलक्षण आत्मविश्वास तमाम लहान थोर मंडळींच्या ठिकाणीं या पेशव्याचे काळीं सारखा वसत होता; आणि या विश्वासाच्या जोरावरच राष्ट्रानें त्या वेळीं करामत करून दाखविली. "ता.४ डिसेंबर १७७९ रोजीं रावसाहेबांची भेट सोळा घटकेस झाली. हरिपंततात्या जवळ होते. श्रीमंतांनीं सफेत पोशाख केला होता. खास निमचे व हत्ती आणून दाखविला. स्वहस्तें तिरंदाजी केली. विडे दिले. दोन घटका बसून भोजनास गेले." तळेगांवावर इंग्रजांचा पराभव झाल्यावर तुकोजी होळकर पेशव्याचे भेटीस पुण्यास येणार होते. तिसरे प्रहरीं भेटीचा मुहूर्त होता. चिंचवडास नानाची व होळकराची भेट झाली. तेव्हां नानांनीं रघुनाथराव पटवर्धनास तेथून लगोलग पुण्यास पुढें पाठविलें आणि सांगितलें, 'होळकर भेटीस येत आहेत, त्यापूर्वी तुम्ही आपले भरंवशाचे शंभर लोक घेऊन आगाऊ वाड्यांत जाऊन बसावें, आणि नीट बंदोबस्त ठेवावा.' अशा प्रकारें या भेटींची आगाऊ तजवीज ठेवावी लागे. पुढें ठरल्याप्रमाणें 'तुकोजी होळकर भेटीस आले. लोक मुजरे करून बसले. श्रीमंतही दोन तीन घटका बसले. तेथेंच तीरकमान आणविली. सर्वत्रांस म्हणूं लागले; 'आमची तिरंदाजी पहा ! दहा बारा बोथाटींचे तीर दसरचे भिंतीस मारले. सर्वांस आश्चर्य दाखविलें. उपरान्त आपले पुस्तीचे अकरा बंद लिहिले होते ते आणून दाखविले. नंतर होळकरांस वस्त्रें देऊन निरोप दिला. वसंत-

पंचमी होती, यास्तव रघुनाथराव पटवर्धनांस म्हणाले, 'आम्ही तुम्हांस कारंजाची चादर दाखवितों. भोजन करून दुसरा पांढरा पोशाख केला. कारंजाची सर सोडविली, ती पावसापेक्षां अधिक मजेदार दिसली. केशरी रंग आणून सर्वांचे अंगावर घातला आणि आपलेही अंगावर घालविला. नंतर गवई आणवून दोन घटका गाणें झालें. विडे व फुलांचे तुरे देऊन निरोप दिला.' तळेगांवावरून इंग्रज पुण्यावर येऊं लागले तेव्हां कारभारी चिंताग्रस्त असतां, बालपेशव्यानें तीरकमठा आणून इंग्रज मारला; ती आख्यायिका प्रसिद्धच आहे.

इ. स. १७७९ च्या आरंभीं तळेगांवावर; इंग्रजांचा मोड होऊन दादासाहेब सिंद्याच्या स्वाधीन झाले, आणि पुढील उन्हाळ्यांत पेशव्याच्या वयास पांच वर्षे पुरीं होतांच त्याची पुणें येथें मुंज करण्याचा निश्चय नानाफडणिसानें केला. धामधुमीच्या दिवसांत हा समारंभ पुण्यांत न करतां पुरंदरासच उरकून घ्यावा, असें परशुरामभाऊ वगैरेंचें मत होतें. परंतु नानांनीं तें मान्य केलें नाहीं. जन्मापासून श्रीमंतांची स्वारी पांच वर्षे पुरंदरास होती. तेथून चैत्रअखेर निघून, जेजुरी, मोरेश्वर, थेऊर येथें देवदर्शन करून स्वारी पर्वतीवर आली. तेथें वैशाख शुद्ध पंचमी रोजीं ( २१-४-१७७९ ) मोठ्या थाटानें मुंजीचा समारंभ झाला. सिंदे होळकर वगैरे सरदार हजर होते. त्यानंतर वैशाख शुद्ध ११ स श्रीमंतांची स्वारी पर्वतीहून निघून शहरांतून मोठ्या थाटानें मिरवत मध्यरात्रीं सुमुहूर्तानें शनिवारवाड्यांत येऊन राहिली. तथापि इ. स. १७८१ च्या फेब्रुवारींत पुनरपि इंग्रज पुण्यावर चाल करून येणार अशी बातमी येऊन पुण्यांत पळापळ झाली, त्या वेळीं थोडे दिवस पेशवा पुनः पुरंदरास गेला होता. असो. उपनयनसंस्कार म्हणजे शिक्षणाचा आरंभ होय, हें लक्षांत ठेवून आतां पुढें या पेशव्याचें शिक्षण कसें काय झालें त्याचें वर्णन करूं.

**३. दिनचर्या व शिक्षण.**—त्या वेळीं या बालपेशव्याची समग्र दिनचर्या जेव्हांच्या तेव्हां लिहून ठेवण्याची नानाफडणिसाची शिस्त मोठी कडक असून, त्यासाठीं चतुर माणसांची नेमणूक केलेली होती. कित्येक वेळां हें काम मोठमोठ्या सरदारांसही करावें लागे. खं. १०. २६३ व २६४ यांत माधवरावाच्या हस्ताक्षराचीं पत्रें स.१७८० अखेरचीं दिलेलीं आहेत, त्यांवरून साडेसहा वर्षांचे वयांत त्यास मोडी चांगलें लिहितां येत होतें असें

दिसतें. मातुल महिपत कृष्ण साठे, बाळाजी नाईक भिडे, नीळकंठ गोविंद लिमये खासगीवाले, अमृतराव पेठे, वगैरे सावकार व आप्तमंडळी लहानपणीं पेशव्याचे देखरेखीस असत. महादाजी बल्लाळ गुरुजी याचीही सवडीप्रमाणें त्याजवर देखरेख असे. पेशव्याच्या दिनचर्येचे पूर्वीचे समग्र कागद हल्लीं उपलब्ध नाहींत; परंतु कांहीं थोडीं टांचणें पारसनीस यांनीं इतिहाससंग्रहांत छापलीं आहेत, तीं बहुधा इ. स. १७८६ ते १७८८ ह्या दरम्यानचीं म्हणजे पेशव्याच्या चौदा ते सोळा वर्षांतील आहेत.|| याच वयांत मनुष्याच्या भावी कर्तबगारीचीं चिन्हें दिसूं लागतात. हीं टांचणें सर्व लक्षपूर्वक वाचलीं असतां सवाई माधवराव त्या वेळीं कडक नियंत्रणांत असतांही उच्छृंखल व छांदिष्ट होता, आणि पुढें अनियंत्रित अधिकार हातीं येता तर ही त्याची दुर्वृत्ति वृद्धि पावली असती कीं मावळली असती, सांगवत नाहीं. इतिहाससंग्रहांतील अगदीं पहिलाच कागद माधवरावाच्या बाललीलेचा आहे. महिपतराव कृष्णानें या हकीकती पत्रद्वारां नाना फडणिसास कळविलेल्या दिसतात. पाहुण्यावर कोण माणसें केव्हां आलीं, कोणकोणत्या जागीं किती राहिलीं, वगैरेंची लेखी वर्दी रोजच्या रोज नानास जात असे. 'प्रातःकाळीं घोडे फिरावयास गेले होते. श्रीमंतांचा काळवीट सुटून पळाला व पर्वतीचे हरणांत जाऊन मिसळला. त्यास धरण्यासाठीं सर्व हरणें दाणा खावयासाठीं रमण्यांत जमविलीं. मागें स्वार उभे करून कोंडिलीं. झाडून गार्दी व चौकबंदीचे लोक प्रातःकालीं पुढें पाठवून आपण व तात्या हिराबागेंत भोजनास गेले. लोक पर्वतीवर चढूं लागलेले पाहून हरणें सर्व पहाड चढून पळून गेलीं. श्रीमंतांस वर्तमान समजतांच रागें भरून माघारे आले. हें वर्तमान सन १७८८ च्या वैशाखांतलें आहे. या वेळीं पेशव्यास शिकारीचा नाद फारच लागून त्याचा सारा वेळ तिकडे जाऊं लागला, तेव्हां त्यास या नादापासून पराङ्मुख करावें, अशी महिपतराव कृष्णानें नाना फडणिसास आग्रहाची विनंति शास्त्राधार वगैरे देऊन लिहिली. 'स्वामींचा विहार मृगयेंत बहुत होतो, या मृगयाच्छंदानें बहुत दोष होतात. पाटीलबावांस मृगयायोगेंकरून एकदां डिगेवर विपरीत प्रसंग पडला, तें श्रवणारूढ असेलच. अज्ञत्वें-

|| ऐ. टि. ११. १. ६१; २. ३२ ३. १५; ५. १८; ६. २९; खरे पृ. ३६६४ व ४५७४, ले. २६५३.

करून लिहिलें याचा राग नसावा.' शिमग्याचे सणांत तर बराच फाजील-पणा होत असे असें दिसतें. तमाशे पाहण्याचा नाद श्रीमंतांस फार होता. अनेक समवयस्क मुलें जमा करून खेळ, तमाशे, बीन, चारपांचशेंपर्यंत जमवीत. जेठींच्या कुस्त्या करवीत. रात्रीं डफगाणें डफ आणून चाले. पांचचार जण पोरें सोंगें आणीत. वाड्यांतील मंडळी समागमें असत. धुळवडीच्या दिवशीं मोठा खेळ चालून शहरांत दंगे मारामाऱ्या वगैरे होत असत.

ता.२८-६-१७८६ ची नोंद. 'वानरासारखें एक कबू जनावर श्रीमंतांनीं पाळलेलें होतें. तें मोकळें करून बकुळीच्या झाडावर सोडलें. त्याजला हुसकूं लागले, तेव्हां तिसऱ्या मजल्यावरून खालीं फरसावर पडला. वांचला. फारच खेळ चालला. गणेशपंत पेठयाचा पुतण्या नमस्कारास येतो. त्याचें शरीर अत्यंत स्थूल वायुबद्ध आहे. त्याला दोन दिवस चौसोपींत किती एक प्रदक्षिणा घालवितात. श्रीमंतांचे पायास दरद झाला आहे, त्यास इंग्रज पाद्री येऊन मलमपट्टी लावितो. गुरुवारीं केशवभट तामसी याला इंग्रजाचें सोंग दिलें. भटजी अनमान करूं लागला. त्याला रागें भरून शिव्या दिल्या. मग टोपी कुडतीं आणवून दोन घटका सोंग देऊन बसविलें. भोजनसमयीं केशवभटास मनस्वी बोलों लागले. श्रीमंत म्हणाले याला झुलपें, कल्ले, दाढी राखा.'

दुसरी एक नोंद. 'शिव्या मनस्वी देतात. उपाध्ये, जोशी व जवळची मंडळी यांस आईबहिणीवरून शिव्या, तोंडावर मारावें असें होत असतें. भोजनसमयीं मुसलमानी शब्द बोलतात. शिंदे, पोरगे यांच्या वज्रमुष्टीच्या लढाया लावितात. थकोन पडला तरी ढालाइताकडून सोटे मारवावे, बळेंच उभा करून लढवावें, नाकातोंडांतून रक्तें आलीं, तरी सोडूं देत नाहींत. दोनचार मुलें दुखण्यास पडलीं आहेत. चौकी पाहऱ्यावरील लोकांस शिव्या द्याव्या, तोंडावर मारवावें. माणसें दिलगीर जाहेत. कांहीं रुसूनही गेले. शिष्ट ब्राह्मण दर्शनास आला तर शिव्या द्याव्या. चिंचवडच्या देवास शिव्या दिल्या. स्नानसंध्येसमयीं आशीर्वादास व नमस्कारास लोक येतात, त्यांस दर्शन होत नाहीं. कोणीं चांगलें सांगितलें तर ऐकत नाहींत, चांगलें सांगेल त्याचा राग करावा, त्यास पेचांत आणावें. हलक्या गोष्टी सांगेल त्याजवर ममता करावी. दोनप्रहरीं मुलें घेऊन मनस्वी खेळ करावे. ओरडत असावें. दरबारास बसावयास कंटाळा. मुत्सद्दी मंडळीच्या थट्टा कराव्या. दरबारास झगा पोषाख करून येत नाहींत.

लिहिणें, पढणें सोडून दिलें. तिरंदाजी टाकिली. दौलतीच्या उपयोगी नीति किंवा प्राचीन गोष्टी ऐकत नाहींत. बाहेर लोक आपणाबद्दल चांगलें वाईट काय म्हणतात त्याचा शोध करीत नाहींत. जवळ राहणारे झाडून दिलगीर आहेत. चित्तास येईल तें करितात. चांगलें सांगेल तो लबाड.'

यापुढील पांच सात वर्षांतील दिनचर्येचे कागद बाहेर आढळत नाहींत. बहुधा अशा गोष्टी बाहेर न कळण्याबद्दल किंवा लेखांत न ठेवण्याबद्दल विशेष बंदोबस्त केला असावा. बाल पेशव्याची जोपासना व शिक्षण याबद्दल नानानें केवढी खबरदारी ठेविली होती आणि त्यास तो किती जपत होता, याचा पुरावा मुबलक आहे. तेव्हां या मुलाची कोणत्याही प्रकारें आबाळ झाली असें म्हणतां यावयाचें नाहीं. वाचनाकरितां भागवतांतल्या उत्कृष्ट निवडक श्लोकांची एक भरपूर लांबलचक यादी तयार केलेली छापली आहे, त्यावरून त्यास संस्कृत शिकविलें जात होतें, आणि त्याविषयीं स्वतः नाना दक्षता ठेवीत होता हें उघड आहे. हे भागवतांतले श्लोक प्रार्थना, ध्यान व भक्ति वर्णन करणारे उत्कृष्टच आहेत. गुरुचरित्राची पोथी वाचण्याचाही संप्रदाय होता. लग्नानंतर दहाच दिवसांनीं ता.२२-२-१७८३ रोजीं माधवराव अनंत वेदान्ती यानें पेशव्यास लिहिलेलें एक उपदेशपर पत्र असेंच चांगलें लक्षांत ठेवण्याजोगें आहे. लग्नाआधीं थोडे दिवस त्याच्या आजीनें एका पत्रांत त्यास सुंदर उपदेश केलेला छापला आहे, त्यांत ती लिहिते, 'सूर्यग्रहण संधि अन्वये कृष्णपक्ष होऊन लोप झाला होता, तो हल्लीं वडिलांचे पुण्योदयें करून दुष्टांचा संहार व सुष्टाचे पालग्रहणार्थ तुम्ही या कुलांत जन्म घेऊन पुरंदर येथें उदयास आला, त्यापेक्षां इकडून लिहावयाचें कारण दिसत नाहीं. परंतु मानवी देह आणि तुम्हीं लिहिलें त्यापेक्षां सुचलें तें लिहीत आहें. एकंदर कलमें १३ आंतील मजकुरावरून हें पत्र सुद्धां पेशव्याचे लग्नाचे संधीस ४ सफर म्हणजे ७ फेब्रुवारी १७८३ रोजीं लिहिलेलें दिसतें. या पलीकडे या बालपेशव्याच्या शिक्षणांत त्याच्या आजीचा संबंध बिलकूल नव्हता.†

**४. लग्नसमारंभ** (१०-२-१७८३).—लग्न म्हणजे गृहस्थाश्रमाची सुरुवात व सांसारिक जबाबदारीचा आरंभ. ही जाणीव तरुण पेशव्यास करून देण्याकरतां

† खं. ६. ४३६; का. सं. प. या. ४५२ व १३३१; खरे ले. ३१३६.

विशिष्ट ग्रंथांची व न्यायनीतीची ओळख त्यास करून देण्यांत आली. लग्नाच्या प्रसंगानें नानाफडणिसानें पेशव्यांची नवीन बखर चिटणिसांचा कारकून नारायण गणेश याजकडून लिहविली, ती राजवाड्यांनीं छापली आहे. तसेंच नित्य वाचनाकरितां नानानें बापूजी गोविंद नांवाच्या व्युत्पन्न कारकूनाकडून भारत व भागवत यांच्या बखरी सारांशरूपानें लिहविल्या होत्या. 'नारायण व्यवहार शिक्षा' नांवाचा आणखी एक शिक्षाविषयक ग्रंथ ता.२०-१-१७९० रोजीं सवाई-माधवरावाकरितां लिहिलेला राजवाड्यांनीं आपल्या ४ थ्या खंडांत छापला आहे, त्यावरून तत्कालीन बौद्धिक शिक्षणाचा अंदाज करितां येईल. तसेंच पृथ्वीच्या इतिहास भूगोलाची हकीकत नामानें पेशव्याच्या उपयोगाकरितां अथवा स्वतःच्या माहितीकरितां तयार करविलेली ऐ. स्फू. ले. २-११ येथें छापलेली आहे, ती पाहतां मारठ्यांची शोधकबुद्धि किंवा ज्ञानार्जन यांची वाखाणणी करावीसें वाटणार नाहीं. पुण्याच्या रेसिडेन्सींतील डॉक्टर फिंडले हा पेशव्यास कांहीं दिवस भूगोल व खगोल हे विषय शिकवीत होता.

लग्नसमारंभाची हकीकत येथें देण्याचें प्रयोजनच नाहीं. त्याच्या तजविजींचा एक कागद पंचवीस पानें छापलेला आहे, त्यावरून नानाफडणिसाची व्यवस्था व टापटीप * चांगली दिसून येते. लग्न माघ शुद्ध ९ शके १७०४, ता.१०-२-१७८३ रोजीं झालें. त्याच्या लग्नचिठ्या डिसेंबरांतच रवाना झाल्या होत्या. लग्न लवकर करण्याविषयीं पार्वतीबाई व सगुणाबाई यांची टोंचणी असून सालबाईचा तह होऊन मनास निवृत्ति मिळतांच नानानें हें काम अंगावर घेतलें. समारंभाचा थाट अपूर्व करण्यांत आला. लग्नाच्या निमित्तानें राज्यांतले प्रमुख लोक, सरदार व शेजारी राजे संस्थानिक या सर्वांस पुण्यास आणून, सर्वांच्या संमतीनें सालबाईचा तह पक्का करावा, आणि आपल्या राष्ट्राचा जोम व सवाई माधवरावाचा पेशवाईवरील हक्क सर्व स्वकीय परकीयांस पटवून द्यावा, असा अंतस्थ राजकीय हेतु या समारंभांत नानानें धारण करून तो तडीस नेला. महादजी शिंदे, मुधोजी भोसले व फत्तेसिंग गायकवाड हे लग्नास आले नाहींत. निजामानें आपला मुलगा पोलादजंग यास पाठविलें, पण तो समारंभानंतर येऊन पोंचला. छत्रपति शाहूमहाराज समारंभासाठीं पुण्यास आले होते. बाकी सर्व सरदार होळकर, रास्ते,

* Organizing power.

पटवर्धन, पाटणकर, घोरपडे वगैरे सरदार सर्व आले आणि त्यांच्याच अनुमतीनें सालबाईचा तह ठरवून मग तो इंग्रजांकडून नानानें कायम करविला. दादासाहेब या वेळीं सुरतेस होते; पण लग्नास आले नव्हते. लग्नसमारंभाचें वर्तमान नानानें महादजीस लिहून कळविलें. माघ शु० नवमीस श्रीमंतांचें लग्न जाहलें. छत्रपतिस्वामी साताऱ्याहून समारंभास आले. समारंभ चांगला जाहला. नबाबाचे पुत्र समारंभाचे समयीं येऊन पोंचले नाहींत, मागाहून आले.'

सवाई माधवरावाचें हें लग्न म्हणजे समस्त महाराष्ट्राला आपल्याच घरचें लग्न असें वाटलें. निरनिराळ्या रूपानें त्या लग्नाच्या हकीकती महाराष्ट्रांत व पुण्यांत फार दिवस रूढ होत्या, त्याचें रसभरित वर्णन पेशव्यांच्या बखरींत सांपडेल. मराठी दप्तर रुमाल २ पृ. ११२-११३ यांतही संक्षिप्त हकीकत आहे. या प्रसंगीं भोजनाच्या व इतर समारंभांबरोबर रंग व आतषबाजीचे प्रयोगही विशेष अपूर्व असे झाले. प्रत्येक समारंभाचे कार्यक्रम व तपशील इतक्या कसोशीनें नानानें ठरविले होते कीं हल्लींच्या सुधारलेल्या पाश्चात्य व्यवस्थेसही नानाची टापटीप मागें टाकील. अशा टापटिपीच्या, व्यवस्थेच्या व नियमित-पणाचे बाबतींत नानाएवढा तरबेज मनुष्य सर्व मराठशाहींत बहुधा दुसरा कोणी सांपडणार नाहीं. ह्या लग्नप्रसंगांत वधूमंडपाच्या व्यवस्थेसाठीं रघूजी आंगरे व हरिपंत फडके यांची नेमणूक असून, समस्त पटवर्धनांकडे पाणी पुरविण्याचें काम होतें. आमंत्रणें नाना फडणिसाचे नांवें काढण्यांत येऊन, त्याचा मसुदा साधा होता तो असाः—'श्री० राजश्री रावसाहेब यांचे लग्नाचा निश्चय माघ शु० ९ स जाहला आहे. तरी आपण सहपरिवारें लग्नसमारंभास याव-याचें करावें.' पाटिल बावास नानानीं ता. २१-१२-१७८२ रोजीं लिहिलें, कीं 'तहनामा कलकत्त्याहून येण्यास दिवसगत लागेल, याकरितां आपण इंद्रसेनास समागमें घेऊन श्रीमंतांचे लग्नास जरूर यावें. म्हणजे आपण श्रीमंतांजवळ इंग्रजांचा वकील आणून तह केला हें लौकिकांत चांगलें दिसेल. तों पावेतों त्यांचा तहनामाही येईल, व दादासाहेब स्वाधीन होण्याचेंही समजेल. अवघ्या गोष्टींस चांगलें. मुहूर्त निश्चय माघ शु. ९ चा आहे. लग्नचिठ्याही मागाहून येतील. आपले चित्तांत देशीं येऊन देवदर्शन व श्रीमंतांचें दर्शन घ्यावें असें रामजी पाटील येथें असतां पुसत होते. त्यास श्रीमंतांचे लग्नसमारंभास

आल्यानें फार चांगलें आहे.' परंतु माळव्यांतील परिस्थिति बिकट असल्यामुळें महादजीस पुण्यास येतां आलें नाहीं. लग्नप्रसंगीं निजामाचे पुत्रास वस्त्रें वगैरे दिलीं, त्यांच्या यादी नजरेखालीं घालण्याजोग्या आहेत.§

सवाईमाधवरावाबद्दल सर्व सरदारांस जसा मोठा आदर व अभिमान वाटे तसाच तो अहल्याबाईसही वाटत होता. थोरल्या माधवरावाचा कारभार पाहिलेलीं जीं माणसें हयात होतीं, त्यांस या होतकरू पेशव्याची दहशतही थोडीबहुत वाटत होती. महेश्वरी धोतरजोडे, पातळें, लुगडीं, उत्तर हिंदुस्थानांतील मेवा व कांहीं विशिष्ट चिजा पेशव्यास वारंवार नजर म्हणून पाठविण्याचा अहल्याबाईचा संप्रदाय होता. 'आंगुरें पेटारी, दाळिंबें, बेदाणा, नासपाती, शेव एकूण सुमार नऊ डालींत घालून सफेत गलेफानें मढवून, लाखी मोहोर करून बाईनीं श्रीमंतांचे सेवेसीं पाठविलीं.' इतर सरदारांकडूनही त्या त्या ठिकाणच्या चिजा येत असत. महादजी सिंद्यानें तर उत्तर हिंदुस्थानच्या किती तरी चिजा पुण्यास मुद्दाम पेशव्यासाठीं पाठविल्या. पेशव्याचें लग्न पुण्यास ठरूं लागलें, तेव्हां अहल्याबाईनें मोठ्या कळकळीनें त्याची विचारपूस ठेविली. पुढें लग्नाची चिठी एक महिना आगाऊ आली, तेव्हां लग्नाचा अहेर पाठविण्याची धांदल बरेच दिवस बाईकडे चालली. नानानें स्वतः ममतापुरस्सर पत्रें लिहून आग्रहपूर्वक बाईस पुण्यास लग्नसमारंभास बोलाविलें. 'तुम्हांसारखीं मनुष्यें श्रीमंतांचे पदरीं, दानधर्म तपश्चर्या करणारीं, त्यामुळेंच हा शुभ दिवस प्राप्त झाला. सांप्रत तुम्ही वडील. अगत्य प्रसंगास यावें.' बाई बोलली, 'लक्ष प्रकारें आम्हीं जावें. पूर्व सूचना असती तर फौजेचा वगैरे सरंजाम केला असता. आतां तीथ समीप आली. एकलें थोड्या लोकांनिशीं जाणें वडिलांच्या स्वरूपास योग्य कीं काय! तेथें तुकोजीबाबा आहेत तेच आम्ही आहों. शुभकार्य सिद्धीस न्यावें.' असें बोलून बाई गेली नाहीं. 'आमचे पोटीं झाड नाहीं.' हा श्रम बाईस मोठा. एकदां काशीयात्रेस व उज्जनीस जाण्यापलीकडे अहल्याबाई महेश्वराहून तीस वर्षांत बिलकूल हालली नाहीं. लग्नानिमित्त तिनें श्रीमंतांस उत्कृष्ट पोषाख व जवाहीर, तसेंच गोपिकाबाई, सगुणाबाई पार्वतीबाई, दुर्गाबाई, नाना व हरिपंत तात्या इतक्यांस निरनिराळे देकार पाठविले. पुण्यास सोहळा पार पडला.

§ का. सं. प. या. २४०, २४३; स. मा. रो. ३४८–४९१; खरे २६६०-६७.

नंतर लगेच सर्व सरदारांकडून लग्नपट्टीचा ऐवज वसूल करण्याचा उद्योग चालू झाला, त्यांत बाईकडून पट्टी दोन लक्ष मागण्यांत आली. ती देण्यासंबंधानें बाईनें नाना प्रकारें पुष्कळ दिवस चालढकल केल्यावरून उभय पक्षीं बहुतच नाराजी उत्पन्न झाली, आणि वर्षभर प्रकरण गोंधळांत पडलें. त्याचें भारूड महेश्वर दरबारच्या पत्रांत इतकें विपुल आहे कीं तें वाचून उद्वेग वाटतो. बाईनें तुकोजीकडे हवाला द्यावा, तुकोजीनें बाईकडे बोट दाखवावें, अशी टोलवाटोलवी चालली. लग्नाची तारीफ मात्र बाई अघळ-पघळ करी. 'आम्हांस व सर्व जगतास अलभ्य लाभ. सूर्योदय जाला, त्या प्रभूच्या प्रकाशेंकरून सर्वत्र आनंद झाला. हे दिवस दृष्टीस पडतील असा भरंवसा नव्हता. श्रीमंतांच्या पुण्योदयें व जगताच्या भाग्यें करून जगत्कुटुंबी प्रभु ईश्वरें उत्पन्न केला. कै. नानासाहेबांनीं माधवरावसाहेबांचें लग्न मातबर केलें त्यापेक्षां या लग्नाची तर्तूद कारभाऱ्यांनीं चांगली केली. अशा कल्पना पूर्वीं कधीं ऐकल्यांतही नाहींत. लग्न जाल्यावर निजामांचे चिरंजीव पोलाद-जंग आले, त्यांची मेजवानी फिरून पहिल्या रंगाप्रमाणें करणें प्राप्त झाली. त्यांत कोठेंही व्यंग न दिसतां उभयतांच्या स्वरूपाप्रमाणें सर्व झालें. खर्च फार लाखांचा जाला, उगाच शब्दपांडित्य नव्हे. कै० नानासाहेब या प्रांतीं आले होते ते समयीं मालजी होळकर भेटावयास गेले, त्यांस आपलेजवळ पालखींत घेऊन बसले. बहुतच ममता केली. श्रीमंतांची ममता आम्हांवर फार. बाईनीं वारंवार स्मरण करून नेत्रांस उदक आणिलें कीं ईश्वर रावसाहेबांस सलामत राखो. मातुश्री बाईसाहेब गंगापुरीं आहेत. मोठें कठिण चित्त केलें कीं हा काळवर पाहिलें नाहीं. आतां लग्नासाठीं तरी येतील कीं नाहीं!' अशा आवेशयुक्त भाषणांनीं, मुख्य मुद्दा मनांत नसेल तेव्हां, वेळ मारून नेण्याची कला बाईस चांगली अवगत होती. पुढें निमे रुपये तूर्त देतों, बाकीचे मागाहून देऊं, असें बोलणें पावसाळ्यांत चाललें. मध्यंतरीं कांहीं दिवस बाई आजारी होती, तेव्हां सर्वच व्यवहार खुंटला. कांहीं काळानें पुनः कार-कुनांचा तगादा बाईस लागला. तो म्हणाला, 'एवढे तुम्ही गादीचे एकनिष्ठ चाकर; लाखों सरंजाम खातां. इतरांनीं दोन दोन महिन्यांत फडशे केले, आणि तुम्ही आज आठ महिने श्वेत कृष्ण विचारीतच आहां! आतां तुमच्या म्हातारपणास युक्त असेल तें करा. करणें असेल तर दोन लक्षांचा भरणा

पुरता करा.' शेवटीं प्रथम एकदां एक लक्ष तीस हजारांच्या व मागाहून पंचेचाळीस हजारांच्या अशा हुंडया बाईनें दिल्या, आणि पंचवीस हजारांचा वांधा पडला तो मिटलेला दिसत नाहीं.

रमाबाईला एक दोन मुलें झालीं असावीं. पुढें ती बरेच दिवस जीर्णज्वरानें आजारी पडून ता. ३१-१-१७९३ रोजीं माहेरीं वारली; आणि लगेच महिन्यानें दुसरें लग्न झालें, त्या बायकोचें नांव यशोदाबाई, गणेश विश्वनाथ गोखले कुवेशीकर याची कन्या. त्या लग्नाचा समारंभही पहिल्यासारखाच थाटाचा झाला, आणि त्यांत महादजीनें बडा रंग दिला त्याची भर पडली. त्याचें वर्णन पुढें येणार आहे. सुप्रसिद्ध बापू गोखले याचें नांव नरहर गणेश; बापाचें नांव गणेश बल्लाळ व चुलता धोंडो बल्लाळ. यशोदाबाईचा बाप गणेशपंत याचा बापू गोखल्याच्या घराण्याशीं संबंध नाहीं.$

**५. गोपिका आजीबाईचें लक्ष.**—गोपिकाबाईशीं या पेशव्याचा संबंध फारसा आला नाहीं. तिची काशीयात्रा तर शेवटीं झालीच नाहीं. तिचें उतारवय होऊन शरीरही दुखण्यानें जर्जर झालें होतें. स. १७६४ पासून ती पुण्यास कधीं आली नाहीं. सवाई माधवरावास तिनें पाहिलें नव्हतें, म्हणून सन १७८४ च्या कार्तिकांत नाना, हरिपंत यां सुद्धां पेशवा गंगापुरास जाऊन बाईस भेटून परत आला. त्यानंतर पुनः सन १७८८ च्या मार्चचे अखेरीस हरिपंत फडके श्रीमंतांस घेऊन गंगापुरास बाईचे भेटीस गेला. त्या वेळीं नातवाचें वर्तन बाईस पसंत पडलें नाहीं. "दोन महिने ठेवून घेणार होत्या, पण पंधरा दिवस राहणें झाल्यावर पुण्यास जाण्यास निरोप दिला. 'त्यास कोणी शहाणे करीत नाहीं, कामाची माहिती करून देत नाहीं. नाना किंवा तात्या यांपैकीं कोणी तरी एकानें त्यांजवळ कायम राहवें' असें बाईनीं सांगितलें." पुढील श्रावणांत बाईनीं स्वर्गवास केला. सन १७८९च्या कार्तिकांत पूर्णिमेस चंद्रग्रहण, अमावास्येस सूर्यग्रहण होतें. 'चंद्रग्रहणास

---

$ खरे ले. ३५०१–०४; म. द. बा. १०३७, ४१, ७७, ८१, ८३, ८९, ९५, ९७, १०२, १०३, ११०, ११२, ११३ ११५ व २०८; ऐ. व. ६ पृ. १२४.

टोक्यास गेले. तेथून त्रयोदशीस ( नोव्हें. १५ ) गंगापुरास आले. तेथेंच ग्रहण झालें. सुवर्णाची तुला करून आज नाशकास आले. दोन तीन दिवस राहून पुण्यास जातील.'

गोपिकाबाईनें आपलें सर्व लक्ष अहल्याबाईप्रमाणेंच धार्मिक कृत्यांत घालविलें. गंगापुर येथें श्री बाळकृष्णजींचें मंदिर स्थापून त्याचे खर्चासाठीं सालिना एक लक्षाची सनद ता.२५-११-१७८४ ची सवाई माधवरावाकडून करून घेतली. त्या सनदेंत खालील शब्द आहेत. 'येथील व्यवस्था करणारा धर्मपुत्र होय. पुत्रवत् आचरण असावें. त्याची देवब्राह्मणांचे ठायीं निष्ठा असावी. तो आचारसंपन्न असावा. श्रीमंतांचे वंशीं विद्यमान काळीं प्रभु जाहला आहे त्यांनीं व त्यांचे पुत्रपौत्रांनीं धर्मकार्यास प्रत्याख्यान किमपि न करितां उभय संस्थानांचें चालवावें; श्रीमूर्तीचें पूजन; ब्रह्मचारी, तेलंगी, द्रावीड यांचीं पूजापूर्वक कन्यादानें; तत्सांगता, ब्राह्मणांस अन्नदानें, सदावर्ते, नृगाख्यानाचें स्मरण, इत्यादि अनवरत प्रभूची आज्ञा वंद्य असावी. सदहु लिहिल्याप्रमाणें मान्य माधवराव नारायण, स्वहस्ताक्षर.'

नगरकरांचें घराणें पेशव्यांचे आप्तांपैकीं होतें. नीळकंठ यशवंतानें खालील विनंति गोपिकाबाईस केलेली आढळते. 'आमचे कनिष्ठ बंधु नारायणरावाचे शरीरीं विकृति होऊन बहुत अशक्तता जाहली आहे. त्यास वैद्याचें म्हणणें आहे कीं या प्रकृतीस राजमृगांकरसायण अथवा अभ्रकभस्म हीं पक्कीं खातरीचीं कोठें मिळाल्यास उपयोगी पडतील आणि प्रकृति बरी होईल. त्याजवरून सेवेसीं विनंति लिहिली आहे. तरी वरील दोन रसायणें शिलकेस असतील त्यांपैकीं एक एक तोळा कृपा करून पाठवावयास आज्ञा व्हावी. आम्ही सरकारचे कुटुंबांतील आहों, ते पक्षीं सर्वोपरी संगोपन करणें आपणाकडे आहे.'†

**६. मर्दानी खेळांची व जनावरांची हौस.**—विद्येंत निपुण किंवा स्वभावानें चतुरस्र नसला, तरी माधवरावास मर्दानी खेळांची आवड फार दांडगी होती, असें रेसिडेंट मॅलेटच्या वर्णनावरून दिसतें. घड्याळें, दुर्बिणी, भूगोल वगैरे अनेक तऱ्हेतऱ्हेच्या चिजा इंग्रजांकडून पेशव्यास मिळत.

† खरे ले. ३१२५, ३१५९,-६२; पे. द. पृ. २४७; भा. व. २ प. या. १०९.

स.१७८६ पासून १७९६ पर्यंत दहा वर्षें मॅलेट पुण्यास होता; आणि या तरुण पेशव्याबद्दल त्यास मोठा आदर असे. पर्वतीच्या खालीं पेशव्याचा मोठा शिकारखाना असून, तेथें सिंह, गेंडे, काळवीट वगैरे अनेक तऱ्हेतऱ्हेचीं जनावरें ठेविलेलीं होतीं. त्यांची पेशव्यास विशेष हौस वाटे. नानानें मोठी खटपट करून नानाप्रकारचीं श्वापदें व पक्षी मिळवून आणिले होते. बंगाली मैना, पोपट, चंडोल पक्षी, मोरांच्या जोड्या, बदकें, पाणकोंबड्या, हरणें, काळवीट, चित्ते, ससे, वाघ, गेंडे वगैरे किती तरी प्राणी मोठमोठ्या पिंजऱ्यांत पर्वतीचे खालीं बागांत ठेविले. स.१७८६ त श्रीमंतांसाठीं पाटीलबावानें खबुतरांचे जोड पाठविल्याचा उल्लेख आहे. एक शंभु वाघ म्हणून एकजात पिंवळा लहानशा घोड्याएवढा होता. तसेंच पेहलवान, कुस्त्या खेळणारे, वज्रमुष्टीवाले, दांडछडी व तिरंदाजी करणारे वगैरे अनेक हुन्नरी माणसें पदरीं ठेवून व्यायामाची व श्रमाची आवड उत्पन्न करण्यांत आली. दररोज तालीमखान्यांत जाऊन मुद्गल व लेजीम वगैरेंचा अभ्यास तरुण पेशवा नियमानें करीत असे. त्यांतल्या त्यांत नाद असा शिकारीचा व हरणाचा विशेष होता. खुल्या हत्तीवर किलाव्यांत बसून त्यास हत्ती चालवितां येत असे. पर्वतीच्या खालीं मैदानांत घोड्यावर बसून बोथाटीचे वगैरे खेळ चालत, त्या खेळांत पेशव्याचें मोठें नैपुण्य दिसून येई. एकंदरींत माधवराव घोड्यावर बसण्यांत पटाईत असून, सर्वांबरोबर तो खेळांत मोकळेपणानें भाग घेत असे. या त्याच्या गुणामुळें पुण्याच्या इंग्रज मंडळींशीं त्याचें चांगलें जमे. Poona in Rygone Days या पुस्तकांत त्या वेळच्या पेशव्याच्या वागणुकीचें व पुण्याच्या स्थितीचें सुंदर वर्णन रा. ब. पारसनीस यांनीं केलें आहे. या संबंधानें पाहिलें तर बाजीरावाचें शिक्षण अगदीं अपुरें राहिलें. लेखन, हिशेब, वेदपठन, संस्कृत, पूजाअर्चा वगैरे घरच्या घरीं शिकण्याच्या विषयांत बाजीराव तरबेज झाला, पण एका संकुचित जागेंत व भिक्षुकी थाटांत बाजीरावाचें बालपण गेलें, तसा प्रकार माधवरावाचा नव्हता. माधवरावाहून बाजीराव नऊ महिन्यांनीं लहान असून, त्याच्या अभ्यासासंबंधानें खालील उल्लेख इतिहाससंग्रहांत आहे. 'श्रीमंत सस्त्रीक कुशली आहेत. लेखनादि व्यवहार स्वेच्छेकरून जितका होईल तितकाच, रघुवंश द्वितीय सर्ग जाला. क्रीडासक्ति फार आहे. निरंकुश गजसादृश्य आहे. वरकड प्रकार आपणांस विदितप्रायच आहे.' ( ऐ. टि. ५-२ ).

'श्रीमंतांच्या वाड्यांत पंचमीस ता. १०-१२-१७८६ रोजीं जेठीयांच्या लढाया झाल्या. कर्नाटकांतून दोन जेठी आले होते. अडीच महिने रतीब खाऊन बनून गेले. काल कुस्ती जाली. तिघांपैकीं दोघांस येथील तालमेच्या आखाड्यांतील गड्यांनीं चीत केलें. एकास मखवा गौळी यानें व एकास कल्ल्या गौळी यानें. तिसऱ्या जेठीची व आबाजी सुताराची कुस्ती जाली. आबाजीस त्यानें चीत केलें. आणखी कर्नाटकाचे पहिलवानास रतीब दिला आहे. मास पक्षानें पुनः लढाई होईल.'

श्री० य. न. केळकर यांनीं संपादिलेल्या ऐतिहासिक पोवाड्यांत सवाई माधवरावाच्या जनावरांवरील आवडीची पुष्कळ उपयुक्त माहिती दिली आहे. प्रभाकर शाहीर म्हणतो, (पृ. ३०९):—

निरोगी सात सहस्र उंट नफर स्वामीचे।
वीस सहस्र तुरग निवडक भीमथडी ग्रामीचे।
सबल दोनशें नव्वद कुंजर विशाल हरकामीचे।
म्हशी दोन सहस्र कटिदार बाणीच्या।
सहा सहस्र गाई फार तरी खाणीच्या।
कांहीं सफेत कपिला व्याघ्रांबर खाणीच्या।
बैल बारा सहस्र, एवढ्या जिवांस खायाला।
कोण श्रीमंतांवांचून दुसरा समर्थ द्यायाला॥

पोवाड्यांत पेशव्यांच्या सातशें कुणबिणींची व चवदाशें घरगुलामांची व नाटकशाळांची माहिती दिलेली आहे. तसेंच शिकारखान्याचे वर्णनांत त्या पेशव्याला जनावरांचा केवढा लळा होता याचें वर्णन आहे.

जंबुक चितळे रोहि भेकरे कुरवाळुन धरणें।
रीस एडके गेंडे ससांना बनात पांघुरणें।
आपण खावें तें त्यांस पुत्रवत् किती माया करणें.।

कोणतेंही शिक्षण पुरें होण्याकरितां प्रत्येकास कांहीं तरी एखादा विशिष्ट आवडीचा विषय किंवा शोक असावा लागतो. तशा तऱ्हेचा सवाई माधवरावास पशुपक्ष्यांचा व शिकारखान्याचा शोक असून, तो नानासारख्या रेखीव माणसानें बाळपेशव्याचे ठिकाणीं उत्पन्न केला, यावरून त्या वेळच्या शिक्ष-

णाच्या कल्पना केवढ्या व्यापक होत्या तेंही आपणास अजमावतां येतें. रा० केळकरांनीं पेशव्याच्या शिकारखान्यासंबंधीं कांहीं नवीन पत्रें प्रकाशांत आणलीं आहेत, तीं सुद्धां त्या पेशव्याचें अंतःकरण खोलून दाखवितात. पेशवा स्वतः शिकारखान्याच्या कामदारास लिहितो, 'हरणाचा मजकूर आपाजीपंत गोडबोले यांचे पत्रांत लिहिलाच आहे. स्वारीपूर्वी धरऊन फत्तेचें वर्तमान व गर्दनेचें माप लवकर पाठवा. कालापहाडाची गांठ कशी आहे. वरकड हरणें आजारी होतीं तीं नांवनिशीवार लिहून पाठवा. अकडबाज रोड आहे कीं ताजा आहे, आणि काळा आहे तितकाच आहे कीं अधिक उणा जाला तें लिहा. रात्रीस हरण सोडीत असतात, त्याचे बरगडीवर गांठ आहे ती बरी झाली कीं नाहीं, इत्यादि सर्वांचे आजार नांवनिसीवार लिहा. माणीक हरणाचीं हाडें गणेश खिंडीत ठेविलीं आहेत, तीं कोणास न कळतां काढऊन शिखारखान्याचे गड्याबरोबर येथें पाठवावीं. चिरगुटांत पक्कीं बांधून गुप्त पाठवावीं. अकडबाज थोडासा रोड जाला म्हणून लिहिलें त्यास मुठी चारितात, त्यांत वेलदोडे थोडेसे अधिक टाकावे, व थोडेंसें लोणीही खावयास देत जावें. बेडक्या ताटकीसिंगाचे गांठीवर सयदअलीस पुसोन डाग द्यावा. थोरला लक्ष्मी चिपाटा आजारी आहे त्यास होईल तो उपाय करावा. मग ईश्वरसत्ता. पार्गेत हरण फिरतात, त्यांतून एकानें उडी टाकिली, त्याचे पायबीय नीट पहा. काला पहाड व अकडबाज ताजे राखावे. पोलेचुबा व हरण गंजीवर येऊन दाणा खातो, त्यास त्याला हुसकून लावावा, हरण्यांत दाणा खावयास देऊं नये.' यांत त्या पेशव्याची बारीक नजर व जनावरांची निगा दिसून येते. ज्यास जनावरांची एवढी काळजी वाटते, तो बहुधा आपल्या प्रजाजनांचीही तशीच काळजी वाहता असा संभव वाटतो.

महादजी ता.२८-९-१७९१ रोजीं पेशव्यास लिहितोः—'प्रस्तुत सरकारांत हत्ती चांगले अंबारीयोग्य नाहींत याजकरितां दोन हत्ती थोर, चांगले, खुबसुरत, निझोल, जलद चालणार, लांब पल्ल्यांचे, खासे अंबारीचे पाठवून देणें म्हणोन आज्ञा, त्यास हत्ती सिद्ध आहेत, लवकरच रवाना करण्यांत येतील. बाज चांगले पाठविणें म्हणोन पेशजी आज्ञा आली, त्या पूर्वींच बाज दोन व जुरे दोन तरुण येथें आहेत त्यांपैकीं सर्वांत उत्तम पाहून मीर शिकारी याजबरोबर रवाना केले आहेत.'

उत्तर हिंदुस्थानांतील कारागिरीच्या चिजा पुण्यास मागविण्याची नानास सदैव मोठी इच्छा असे. भिकाजीपंत पाळंदे मथुरेहून ता.२८-५-१७८९ रोजीं लिहितो. 'सोन्याचें तबक व पानदान, व गुलाबदाणी व अत्तरदान, यांजवर मिना, जमिनीवर हिरवा व वर बूट चांगले खुलत अशा तऱ्हेचे व दोन तंबुरे उंच सुराचे व दोन चौकीचे गाण्याचे बहुत चांगले, तारीफदार पाठवावे म्हणोन आज्ञा, त्यास मिन्याचा कारीगर चांगला एकच येथें आहे. त्याचे हातचा तरवारेचा परज वगैरे श्रीमंतांसाठीं येथून अलीबहादरांनीं रवाना केला आहे. रवदडी घाटाची डबी मिनेगारीची करून पाठवावी म्हणून पूर्वी लिहून आलें, ती तयार झाली आहे. त्यांत चहूं तऱ्हेचे रंग केले आहेत. कारीगर एकच असल्यामुळें दिवसगत लागते. अबखोरा सोन्याचा घाट तयार झाला आहे, त्यावर काम दोन रोजीं चालीस लावतों. तंबुऱ्याकरितां भोपळे चांगले थोर मेळविले आहेत. कारेगरही चेतसिंग राजे बनारसचे यांजपाशीं आहे. त्यास आणून काम चालविलें आहे. पंधरावीस दिवस लागतील.'

'महादजी सिंदे यांनीं ७ जिल्कादीं ( २१-६-१७९२ ) श्रीमंतांस एक हत्ती एकखांबी अंबारी सुद्धां व एक हत्तीवर हौदा, त्याजवर कमळ मळसूत्री जिकडे ऊन येईल तिकडे फिरावें म्हणजे सावली पडते, असे दोन हत्ती नजर दिले. आणखी एक दिवशीं पांच ढाला आणि पांच तरवारी नजर दिल्या मालिटाचे घरीं सिंद्यास मेजवानी झाली. पालकींत बसून गेले. वस्त्रें जवाहीर दिलें.'

सवाई माधवरावाच्या मर्दानी खेळांतील कौशल्याबद्दल सन १७९४ त रॉबर्ट मेबोननें खालील वृत्त लिहून ठेविलें आहे. 'परशुरामभाऊशीं बोथाटी खेळतांना या तरुण पेशव्याचें कौशल्य पाहून मला मोठें कौतुक वाटलें. पर्वतीच्या खालील विस्तीर्ण पटांगणांत हा खेळ चालत असे. सभोंवार शिबंदीची व इतर लोकांची मोठी गर्दी जमली होती. मध्यभागीं लहान दगडांची एक उंच रास करीत. पेशवा हातांत भाला घेऊन घोड्यावर दोनतीन चकर भरधाव करून भाल्याच्या टोंकानें ती रास कोसळून पाडी. भाल्याच्या टोंकास लाल फडक्याचा एक लहानसा चेंडू बसविलेला असे. पेशव्यानंतर परशुरामभाऊनें तसाच भरधाव घोडा फेंकून दगडाच्या राशीवर चाल केली, पण त्याच्यानें दगड पाडवले नाहींत. दुसऱ्या कित्येकांनीं प्रयत्न केला, पण त्यांसही तें साधलें नाहीं. नंतर पेशवा व दुसरा एक यांची घोड्यावरूनच

पकडापकड सुरू झाली. पेशव्यानें प्रतिपक्षास भाल्यानें घोड्यावरून पाडण्याचा प्रयत्न केला; आणि थोड्याच अवकाशांत त्यानें त्यास खालीं आणिलें. हें त्याचें घोड्यावरचें नैपुण्य अप्रतिम होतें. घोडे चांगले त्यांत शिकवून तयार केलेले असत. भरधाव जाणारे घोडे इशारा मिळतांच खाडकन थांबत. पेशव्यांना हत्तींच्या टकरांची सुद्धां विशेष आवड होती. स.१७५९ त वुल्यम प्राइस पुण्यास नानासाहेबाचे भेटीस गेला असतां, त्याजकरितां मुद्दाम हत्तींच्या टकरा करविण्यांत आल्या. खेळ तीन तास चालला होता.'

पर्वतीखालील बागेंत एक पाळलेल्या जनावरांची पशुशाला होती, त्यांत नाना प्रकारचीं जनावरें, पक्षी, सर्प, मत्स्य वगैरे पाळलेले होते. मेजर प्राइसनें ही पशुशाला स.१७९१ त पाहून तिचें वर्णन लिहून ठेविलें आहे. तो म्हणतो, 'या ठिकाणीं उत्तमोत्तम नमुने मुद्दाम आणून पाळलेले होते. एक सिंह व एक गेंडा मला इतके आवडले कीं जणूं काय ते आपल्या रानांतच विहार करीत आहेत असें दिसलें. तो पशुराज तर अत्यंत तेजस्वी व स्वच्छ दिसत होता. उघड्या जागेंत खांबास सांखळीनें बांधून त्यास ठेवलेलें होतें. त्याचें खाणें व निगा अत्यंत दक्षतेनें ठेवलेली मला आढळली. गेंड्याची तरतरी पाहून तर मला जास्तच अचंबा वाटला. वाघ वगैरे दुसरीं अनेक जनावरें तेथें होतीं, पण या दोघांच्या पुढें तीं तुच्छ वाटत. या बागेंत हरणें व काळवीट यांचे कळप बाळगलेले होते. त्यांस वाद्यांच्या नादावर झोंपाळ्यावर बसून झोंके घेण्यास शिकविलेलें होतें.' स.१७९२ त सर चार्लस मॅलेट यास पेशव्यानें मुद्दाम एकदां हा हरणाचा खेळ दाखविला. तो लिहितो, 'आम्ही दोन वाजतां तंबूंत येऊन बसलों. समोर दोन झोंपाळे बांधलेले होते, त्यांजवर तीन काळवीट वाद्यांचे सुरावर पावलें टाकीत पुढें आले. दोन त्या झोंपाळ्यावर बसले व एक खालीं सत्रंजीवर निजला. नंतर वाद्यें बंद झालीं आणि कांहीं नाचणारणी मंजूळ आवाजानें नाचत त्या काळविटांपुढें आल्या. नंतर चवथा काळवीट मागें लाजून बसला होता, तो पुढें आला. पुढें एका नोकरानें झोंके देण्यास सुरुवात केली. थोड्या वेळानें त्या म्होरक्या काळविटाचे शिंगांवर माळ घालण्यांत आली. तेव्हां ते सर्व निघून परत गेले. पेशव्यानें मला सांगितलें 'हा खेळ आज सात महिने या जनावरांस शिकविण्यांत येत आहे,' पशुखान्यांतील समस्त जनावरांचीं मातीचीं चित्रें करून त्यांचा

एक संच मॅलेटनें तयार करविला होता. त्यांत मध्यें मॅलेट उभा असून सभोंवार जनावरें आहेत.'

पशुखान्याला लागूनच पेशव्याच्या शिकारीची जागा होती. हरणाची शिकार त्यास फार आवडे. स.१७९१ तील त्याच्या या शिकारीचें वर्णन उपलब्ध आहे. महादजीनें पेशव्याजवळ एक काळवीट मागितला. पेशवा म्हणाला, तुम्ही त्यास माराल. महादजीनें सांगितलें, नाहीं; मी त्यास दुखविणार नाहीं. तेव्हां पेशव्यानें स्वतः एक काळवीट पकडून महादजीस दिला. पर्वतीच्या जवळच हिराबागेंत हवा खाण्याचा एक बंगला होता. वसंतपंचमीचे उत्सव आणि लग्नाच्या व इतर मेजवान्या या हिराबागेंत करीत. युरोपियन लोकांचा खाना सुद्धां येथेंच देण्यांत येत असे. दुसऱ्या बाजीरावानें स. १८०३ त लॉर्ड व्हेलेंशिया व रेसिडेंट सर बॅरी क्लोझ यांस हिंदी चालीचा खाना दिला, त्याची हकीकत वाचण्याजोगी आहे. याच जागीं स. १८०४ त ड्यूक ऑफ् वेलिंग्टन यासही खाना देण्यांत आला होता. पुण्याच्या सभोंवार त्या वेळीं नाना व मोरोबा फडणीस, हरिपंत फडके वगैरे दुसऱ्या अनेक प्रसिद्ध व्यक्तींचे बाग व विहारगृहें बांधलेलीं असून, मराठशाहींत पुणें शहर सदैव गजबजलेलें व सनाथ दिसे. हिराबागेंत खाना आटोपल्यावर पर्वतीच्या तलावांत दारूकाम सोडण्यांत येई. त्यांत तावदानी रोषनाई, अक्षमंडळ तारांगण, नारळी झाडें, प्रभाचमक वगैरे अनेक प्रकार असत.

पेशव्यांचे दरबारांत एक स्त्री पलटण तयार करण्याचा प्रयत्न एका युरोपियन बाईनें केला होता. तिचें नांव मिसेस जेम्स हॉल. तिच्या लष्करी पेशावरून तिला जमालखान असें नांव मिळालें. ती सन १७८८ चे सुमारास पुण्यास आली; आणि खटपट करून तिनें एक स्त्रीपलटण उभारलें. ती मोगल सरदारांप्रमाणें मर्दानी पोषाख करून सेनानायकाचें काम करी. स्वभाव कडक असल्यामुळें तिचा जम बसला नाहीं. तिच्या एका ब्राह्मण नोकरानें अपराध केल्यामुळें त्याला तिनें मरेमरेपर्यंत चोप दिला, त्यावरून नानानें तिला कैद करून लोहगडावर बंदींत ठेविलें. सात वर्षें कैद भोगल्यावर सिंद्यांचा फ्रेंच सेनापति पेरान यानें तिची सुटका केली. नंतर लगेच मुंबईस जाऊन तेथें ती स. १७९८ त मृत्यु पावली. $

$ ग्वा. ५.१३९; ऐ. जु. गो. १. १५; खरे ३०६६; ३४८३; अली ब. ले. ५५; ग्वा. २.२४०–२४४.

आतां या हकीकती केवळ स्मृतिविषय झाल्या आहेत. पूर्वीच्या राजधानीचें पुणें शहर आज पोरकें पाहून कोणाचें अंतःकरण भरून येणार नाहीं !!

**७. रागरंग.**—'शिमग्याच्या सणाच्या खालील वर्णनावरून त्या वेळच्या करमणुकींची कल्पना होईल. ता. १६-३-१७८६ रोजीं हुताशनीचे दिवशीं श्रीमंत दोन घटका रात्रीं दिल्ली दरवाजाचे बाहेर होळीजवळ येऊन, दर्शन घेऊन दरवाजाचे वर ते एक क्षण बसून तमाशा पाहून आंत गेले. दुसरे दिवशीं प्रातःकाळीं चार घटका दिवसांत भोजन करून, तिरंदाजीचे दिवाणखान्यांत बसले. जवळचे बसणारे घरचीं मुलें घेऊन आले होते. खेळ, तमाशे, बीन चार पांचशें पर्यंत होते. अगोदर वाघ बकरीचा खेळ जाहला. नंतर श्रीमंत पाणी प्यावयास उठोन गेले. समागमें मल्हारपंत भडभडे होते. मागतीं येऊन बसले. जेठींची लढाई लाविली. दोन घटका समतुल्य जाले. मग राहविले. दहा घटका दिवसपर्यंत खेळ जाहला. मग श्रीमंत उठले व मंडळी घरास गेली. खेळांत पुढाईत बाळाजीपंत ठोसर व बाळाजीपंत केळकर हे होते. रात्रीं डफगाणें, चार फड आणिले होते. पांच जण पोरे होते. त्यांत एक चांगला होता. श्रीमंत भोजन करून तिसरे घटकेस चांफेखणांत आले. अमृतराव पेठे, बाळाजीपंत लेले, मोरोबा फडके, खंडेराव त्रिंबक, खंडो अनंत, शिदोबा नाईक थत्ते, जनार्दन राम वगैरे मंडळी होती. पांच सात सोंगें प्रहररात्रपर्यंत जाहलीं. श्रीमंत उठोन निद्रेस गेले. वरकड मंडळी सर्वेच गेली. होळीचे अगोदर गांवांत कोणी खटखट न करी अशी ताकीद पेठोपेठीं केली. वद्य तृतीयेस रात्रीं भवानीपंताचा खेळ वाड्यांत जाहला. दोनतीन पोरे नाचणार व मागें डफगाणें. सोंगें कांहीं चमत्कारिक नव्हतीं. काल सकाळचे पोरांचे खेळांत दोन ठिकाणीं कजिया झाला. बुधवारचे हौदाजवळ द्राविड ब्राह्मण जात होते त्यांचे अंगावर पोरांनीं शेण टाकिलें. ते शिव्या देत. पोरें अनिवार, अधिक धूळ टाकिली. एक दोघांस धोंडे लागले. रडत निघाले. कोतवालांनीं समजूत घालून वाटेस लाविले. जोगेश्वरीजवळ तेलंगी ब्राह्मणांस धक्काबुक्की केली.'

'काल रंगपंचमीचे दिवशीं श्रीमंत सासुरवाडीस बाळाजी नाईक थत्ते यांजकडे भोजनास गेले. सौ० रमाबाई अगोदरच गेली. नंतर श्रीमंत प्रहर दिवसा

घोड्यावर बसून दिल्ली दरवाजानें समागमें मंडळी घेऊन गेले. भोजन होऊन थत्ते यांनीं श्रीमंतांस पोषाख दिला. परत घोड्यावर बसून गणेश दरवाजानें आंत आले. तिसरा प्रहरां रंग केला. मजलस गणपतीचे दिवाणखान्यांत. कलावंतिणीचे दोन तीन ताफे होते. मंडळीस अगोदर बोलावणीं केलीं तेही आले. चार घटका नाच होऊन मग रंगास प्रारंभ केला. श्रीमंतांनीं आपले हातें चिरकांडीनें कार्यकारण मंडळीचे अंगांवर घातला. नंतर रंगाची व गुलालाची रेल जाली. अंग व पोषाख भिजून चिंब झालीं, येथपर्यंत रंग खेळले. रात्रीं खेळ करावयास सांगितलें. रास्तेखेरीज अवघे गुरुजीबावा सुद्धां आले होते. खेळ, डफगाणें, पोरांचा नाच, गोविंदांचीं सोंगें सहा घटकांपर्यंत जालीं. मग श्रीमंत निद्रेस गेले. असा पांच दिवस खेळ जाला. महादु सुतारानें लांकडांची बाहुली कळासूत्री व सूर्याचा रथ केला तो दिल्लीचे कळासूत्री मजालसीचा चांगला जाला. शाहीरही गाणारे चांगले आले होते. सोंगांत भवानीपंताचें सोंग, एक दाईचें व दुसरें मोगलाचें हीं सरस जालीं. गोविंदांपैकीं एक गणपतीचें व दुसरें मुरळीचें. राणूपैकीं तपकिरीची नक्कल व सुतारापैकीं सूर्याचें, याप्रमाणें पांच दिवस तमाशा जाला.'

महादजी सिंद्याचा मुक्काम पुण्यास असतां त्याची हरिपंताचे मार्फत पेशव्याचे समक्ष नानाशीं दिलसफाई झाली, त्यासाठीं म्हणा, अगर पेशव्याचें नुक्तेंच लग्न झालें, तन्निमित्त महादजीला कांहीं अपूर्व उत्सव करून त्याचें मन आकर्षून घ्यावयाचें होतें म्हणून म्हणा, चैत्र शु. १ शके १७१५ ता. १३-३-१७९३ रोजीं त्यानें शनिवारवाड्यापासून वानवडी येथील आपल्या छावणीपर्यंत होळींतील रंग खेळण्याचा व दारूकामाचा टोलेजंग समारंभ केला, त्याचीं विस्तृत वर्णनें सुप्रसिद्ध आहेत, आणि विस्तारभयास्तव तीं येथें देण्यास सवड नाहीं. गुलाल व रंग खेळत पेशव्याची स्वारी शनिवारवाड्यांतून तिसरे प्रहरीं निघून वानवडीस सिंद्याचे मुक्कामावर गेली. रस्त्यांत निरनिराळ्या पेठांत फडके, रास्ते वगैरे सरदारांचे वाड्यापाशीं विशेष समारंभ झाले. शेंकडों खंडी गुलाल व रंग यांचा चिखल सर्व रस्त्यांत झाला. वानवडीस सर्वांनीं रंग खेळल्यावर स्नानें केलीं, त्यांस सिंद्यांनीं पोशाख दिले. नंतर दरबार होऊन स्वारी वाड्यांत दहा घटका रात्रीं परत आली. अशाच प्रकारें

पर्वतीचे खालीं दारूकामाचा अपूर्व देखावा करण्यांत आला. त्या कामाचीं नांवें वाचण्यालायक आहेत.¶

नाना फडणिसानें शनिवारवाड्यांत पुष्कळ नवीन सुधारणा केल्या. अनेक नवीन भाग वाढविले, जिने दरवाजे वगैरे सोई केल्या; सामानसुमान तऱ्हेतऱ्हेचें आणून जिकडे तिकडे आरास व शृंगार पुष्कळच केला. नानासाहेब पेशव्याचे वेळेस हा वाडा म्हणजे साधें घर होतें. तें नाना फडणिसाचे वेळेस साफ बदलून गेलें. नोव्हेंबर १७८८ त फडाचा जुना चौक पाडून नानांनीं नवीन बांधिला. दोन वर्षें काम चाललें. मग वास्तु केली. शके १७१३ म्हणजे जून १७९१ त नऱ्हें येथील नळ आणून सदाशिव पेठेच्या हौदांत सोडला. त्याच वेळीं म्हणजे ता. ७-६-१७९१ रोजीं शनिवारवाड्याचा सात मजली कळशी बंगला जळाला. अशा कित्येक नोंदी धडफळे यादींत आहेत.

त्या वेळची एक महत्त्वाची धार्मिक बाब म्हणून शृंगेरी मठाची पटवर्धनांनीं केलेली विटंबना येथेंच सांगण्यासारखी आहे. स.१७९१ च्या एप्रिलांत पटवर्धनांच्या फौजेनें शृंगेरी येथील शंकराचार्यांचा मठ साफ लुटून आणिला, यामुळें कांहीं वेळ सर्वत्र हाहाःकार उडून पुण्यास नाना फडणिसास तें प्रकरण आवरतां आवरतां पुरे झालें. हिंदूंनीं आपल्या पवित्र जागेची अशी अमर्यादा करावी ही गोष्ट सर्वत्र अत्यंत अनुचित वाटली. भोंवतालच्या प्रदेशांतले लोक युद्धमान स्थितींत आपल्या वित्ताचा व प्राणांचा बचाव व्हावा म्हणून मठाच्या आश्रयास गेले होते आणि स्वामींनींही सैन्याधिकारी ब्राह्मण धर्माचे पुरस्कर्ते असें समजून त्यांस आश्रय दिला, हें त्या लुटीचें मूळ कारण. प्रत्येक पथकाबरोबर लुटारू लोक असत, ते म्हणजे नेहमींच सेनाध्यक्षाच्या ताब्यांत राहत अगर त्याच्या हुकमानें चालत असें नाहीं. त्यांनीं मठ लुटला तेव्हां प्रकरण विकोपास गेलें. लुटीचें कृत्य रघुनाथराव पटवर्धन कुरुंदवाडकर याच्या हाताखालील लोकांनीं केलें, आणि परशुरामभाऊसही तें अत्यंत अनुचित वाटलें. सर्व लूट परत भरून द्या असें परशुरामभाऊनें रघुनाथरावास लिहिलें असतां त्यानें तें मानलें नाहीं. स.१७७०-७१ त त्रिंबकराव पेठ्याचे फौजेनें मेलकोटा येथील रामानुजाचार्यांचा मठ लुटला. स. १७७५ त हरिपंताचे फौजेनें द्वारकेच्या

¶ ऐ. टि. २-३२; पे. ब; Poona in Bygone Days; खरे ३१७५-७६, ३३३६,-३८,-८८, ३४०४,-९२.

शंकराचार्यांचा मठ लुटला. त्यापुढचे सालीं पटवर्धनांनीं करवीरचा संकेश्वर येथील मठ लुटला, असे यास पूर्वींचे दाखले सुद्धां सांपडण्याजोगे आहेत. 'लमाण व पेंढारी यांनीं रघुनाथरावाचे लष्करांतून जाऊन शृंगेरीचा मठ लुटून हत्ती वगैरे रुपयांचा माल आणिला. हत्तीवरील महातांच्या सांगण्यांत 'बायकांचा नाश फार झाला, ब्राह्मण बहुत जायां व जखमी झाले, देवतार्चनाचा माल बहुत आला.' हें वर्तमान ऐकल्यावरून नानांची मर्जी रुष्ट आहे. स्वामींचा क्रोध होऊन ते उपोषणें करतात. सरकारांत बोभाटा आला, त्यावरून नानांनीं लिहिलें, 'सर्व लुटारू व माल पकडून स्वामीस परत देऊन फडशा करावा आणि त्यांची मर्जी प्रसन्न करावी. त्यांचा रोष राज्यास फार वाईट; बेमुरवत होऊन स्वामींची भरपाई करून रोष जाई तें करावें.' परशुरामभाऊनें अगोदरच तपास लावून ही तजवीज केली. तथापि स्वामींचें समाधान झालें नाहीं. स. १७९२ च्या डिसेंबरांत स्वामी मुद्दाम त्यासाठीं पुण्यास आले होते. ता. ३ एप्रिल १७९० रोजीं जेजुरींत यात्रेच्या दाटीमुळें नगारखान्याचे दरवाजापाशीं रगडा होऊन पावणेतीनशें मनुष्य ठार झालें. त्याखेरीज सवाशें जायां आहे. यांतून काय जगतें तें पाहवें. त्याशिवाय पायऱ्यांवर उतरतांना तीनशें मनुष्यें मृत्यु पावलीं व दोनशें दुखावलीं.' असे अपघातांचे प्रसंग त्या वेळीं सुद्धां पुष्कळ घडून येत. त्यांवरून तत्कालीन परिस्थितीची कल्पना होईल.

या ठिकाणीं उत्तर विभागाच्या पहिल्या खंडाची मर्यादा संपली. यापुढचें या अल्पायुषी पेशव्याचें चरित्र दुसऱ्या खंडाच्या शेवटीं सांगून एकंदर कारकीर्दीचा उपसंहार करण्यांत येईल.

---

# वंशावळी



१. गणेशभट बर्वे
२. बापू गोखले
३. अंतोबा नाईक भिडे
४. बडोद्याचे गायकवाड
५. वेळासचे भानु
६. गोविंद-गोपाळ कामतेकर
७. बोंधले पाटील
८. घोरपडे, गुत्ती वगैरे
९. कोटेकर पंडित
१०. विसाजी केशव लेले
११. पुण्याचे मुजुमदार
१२. जतचे डफळे
१३. नारो गणेश शांचे
१४. खंडेराव हरि भालेराव
१५. जीवबा दादा बक्षी
१६. चिंतो वामन देशमुख
१७. भुसकुटे, बऱ्हाणपुर
१८. रत्नाकरपंत राजाज्ञा
१९. हरि बाबाजी केतकर
२०. हरिपंत फडके
२१. ठकार दीक्षित सातारचे
२२. ओढेकर दिवाण धारचे
२३. महादाजी बल्लाळ गुरुजी
२४. बाबूराव केशव ठाकूर




सासवड जवळ गराड गांवचे राहणारे. गणेशभट बाळाजी विश्वनाथाचा समकालीन. गोपाळराव गणेश पानिपतचे प्रसंगीं व तदुत्तर उत्तरेंत कामगिरीवर होता. पुढें बाजीराव गोविंद हा नारायणरावाचे वधापासून रघुनाथरावाचे पक्षांत असून तो पुढें वसईचे तहानंतर वारला. त्याची हकीकत या पुस्तकांत आली आहे.

## २. वंशावळ, बापू गोखले




विजयदुर्गचे मामलेदार गंगाधरपंत भानु यांच्या मार्फत या गोखल्यांची नानाफडणिसाकडे शिफारस होऊन ते मराठी लष्करांत दाखल झाले. धोंडजी वाघावर स्वारी झाली तींत कित्तूर व हल्याळ यांच्या दरम्यान ता. ३०-६-१८०० रोजीं वाघानें गोखले व पटवर्धन यांच्यावर छापा घातला, त्या प्रसंगीं धोंडोपंत व महादेव आपा ठार झाले; बापू मात्र जखमा लागून बचावला तो पुढें आष्टीच्या लढाईत ता.२०-२-१८१८ रोजीं मारला गेला.

**३. अंतोबा नाईक भिडे.**—हें सावकार घराणें पेशव्यांची पोतदारी करून प्रसिद्धीस आलें. यांचें मूळ ठिकाण कोंकणांतील गणपतिपुळें. पहिला प्रसिद्ध पुरुष अंताजी नरहर साताऱ्यास सराफी करून राहत असतां पेशव्यांबरोबर स्वारींत जाऊन संपन्न झाला; आणि पेशव्यांनीं पुण्यास वास्तव्य केल्यावर तेथें बुधवारांत भिड्यांनीं आपला वाडा बांधिला. शाहू छत्रपतीस अंताजीनें द्रव्यसाहाय्य केलें, त्यावरून त्यास छत्रपतीनें रोहिडखोऱ्यांतील तिटेघर गांव ता. १४-४-१७१८ रोजीं इनाम दिला. फत्तेसिंग भोसल्यासही अंताजीनें पैशाचें साहाय्य केलें. त्यास ता. २५-१२-१७४१ रोजीं पेशव्यांची पोतदारी व पालखीचा मान शाहूकडून मिळाला. अंतोबा नाईक ता.९-१-१७४२ रोजीं मृत्यु पावल्यावर त्याचा मुलगा रामाजी नाईक यानें बापाच्या लौकिकांत पुष्कळ भर घातली. त्यानें माधवराव व राघोबा यांसही पुष्कळ द्रव्यसाहाय्य केलें. रामाजीचा भाऊ बाळाजी यानेंही आपलें काम पुष्कळ वर्षे नेकीनें चालविलें. दुसऱ्या बाजीरावाची या घराण्यावर इतराजी झाली.

**$वंशावळ, नरहर बल्लाळ भिडे,** कोंकणस्थ ब्रा० आपस्तंब शा.

अंताजी नाईक मृ. ९-१-१७४२

मृ. १७६९ रामाजी — मृ. १७९४ भिकाजी — शंकराजी द.

बाळाजी ( दुसरे बाजीरावापर्यंत कामावर होता. ) — अंताजी — त्रिंबक

$ रा. स. ग. जोशी यांजकडून.

---

**४. वंशावळ,** बडोद्याचे गायकवाड ही पूर्वी म. वि. २ यांत आली आहे.

---

**४. वंशावळ, सर्जेराव घाटगे,** कागलकर, ( कै. व या. )

पिराजीराव—इब्राहीम आदिलशहा दुसरा, याजकडून कागल परगणा जहागीर.

पिराजीराव दुसरा

राणोजी | विठोजी | आबाजी | तुळजाजी | यशवंतराव

तुळजाजी: जयसिंगराव | रामचंद्रराव

जयसिंगराव: विश्वासराव | **सखारामराव** खून २७-७-१८०९. =सुंदराबाई ऊ० नानीसा० पाटणकर

सखारामराव: बायजाबाई १७८४–१८६३ लग्न दौलतराव सिंदे | जयसिंगराव हिंदुराव १७७९–१८५६ ल.=दादीबाई व पार्वतीबाई

बायजाबाई: चिमणाबाई लग्न=मन्याबा ऊर्फ बाबूराव बिन यशवंतराव दाभाडे | बाळाबाई=आपासा० पाटणकर

## ५. वंशावळ, भानु‡ फडणीस यांची [ प्रो. चिं. गं. भानु यांजकडून. ]

१ महादाजीपंत, रा० वेळास ता० बाणकोट

महादाजीपंत

थोरल्या बायकोचा २ | धाकटीचे ३–५

- २ गोविंदपंत
  - ६ राघोपंत
    - १२ हरिपंत
    - १३ चिमणाजी
      - १९ नारो
        - २८ माधवराव
      - २० जनार्दन
- ३ बाळाजीपंत,
  - ७ जनार्दनबाबा
    - १४ बाळाजीपंत नाना
      - २१ १महादाजी द०
      - २२ २रामकृष्ण द०
        - २९ नानासाहेब(विद्यमान)
- ४ रामाजीपंत
  - ८ बाबूराव
    - १५ मोरोबा
      - २३ रामचंद्र
        - ३० बाबूराव
          - महादाजी द०
            - मोरेश्वर
- ५ नारोपंत
  - ९ अंताजी
    - १६ कृष्णाजी
      - २४ अंताजी
  - १० महादाजी
    - १७ बळवंत
      - २५ दामोदर
    - १८ गोविंदराव
      - २६ श्रीधर
        - ३१ सदाशिव
          - गंगाधर
            - चिंतामण प्रो.
      - २७ गंगाधर
        - ३२ रामकृष्ण
          - गणेश
            - नरसो
        - ३३ भास्कर
  - ११ भिकाजी

‡ पहा पुढील पृष्ठ

*अंक १२–१३ वेळास येथेंच राहिले. हल्लीं मात्र तेथें कोणी नाहीं.

अंक १४ नानाफडणीस यांनीं प्रथम अंक २५ दामोदर यास दत्तक घेऊन नांव महादाजी ठेवलें. तो १७९७त मरण पावल्यावर स. १८३५त जिऊबाईनें अंक ३२ चा रामकृष्ण दत्तक घेतला. हा गंगाधरराव मिरजकरांचा आवई. [पे. द. पृ. १७५]. अंक २७ चा गंगाधरपंत यांस बाजीरावानें ता. १०-४-१७९८रोजीं ठार मारिलें. अंक ३१चे नातू पुण्याचे विद्यमान प्रो. चिंतामण गंगाधर. अंक १६ कृष्णाजी अनंत सवाई माधवरावाचे वेळीं साताऱ्यास होता. अंक १७ चा वंश पुण्यांत विद्यमान आहे. अंक २७ चा नातू नरसिंगराव मिरज संस्थानांत मामलेदार होते. हे चतुर, संग्राहक, सरदारी थाटाचे गृहस्थ स.१९१० सालीं वारले. नानाची शेवटची बायको जिऊबाई इला वार्षिक नेमणूक रु. १२००० व निजामाकडील ५००० व बेलबागेसाठीं ५००० मिळून २२००० रु. होती. तिचे मृत्यूनंतर नेमणूक बंद झाली. बाकीचें उत्पन्न चालू आहे. अंक ३३ चा उल्लेख खं. १०. ३२७ यांत आहे.

---

**६. वंशावळ, गोविंद गोपाळ कामतेकर,** सारस्वत ब्राह्मण, हल्लीं वस्ती **बडोदें.**

गोविंद गोपाळ कामतेकर
- गोविंद
- नारायण

गोविंदराव गोपाळ ऊ० गोंदबा हा फत्तेसिंग गायकवाडाचा दिवाण होता.

---

**७. वंशावळ,** म. वि. ४ पृ. ३०१ वर आहे.




$ द्वारकाबाई—पहा दळवीकृत जाधव कै० पृ. ८०. हिनें नातु राणोजीस करवीरकर संभाजीचें सेनापतिपद मिळविलें. ११ दत्तवाड शाखा; ३०खंडेराव मृ. लढाईंत १८१८. २६, २९, ३० पहा. पे. द. पृ. ११४.

मराठशाहीच्या अखेरपर्यंत नांवें येतात तेवढ्यापुरतीच ही वंशावळ आहे. मुधोळकर घोरपडे स्वतंत्र होत. त्यांची वंशावळ म. वि. ४ पृ.३०४.

## ९. वंशावळ, पंडित गुळगुळे कोटेकर

मूळ गांव कोंकणांत आचरें, सारस्वत ब्राह्मण.

यशवंत (खानदेशांत वडगांव येथें आले)




१ बाळाजी यशवंताची स्थापना कोटा येथें बाजीरावानें दयाबहादुरच्या पाडावानंतर केली. त्यास पहिला गांव स. १७३७ त इनाम मिळाल्याचा लेख आहे. म्हणजे बाळाजी यशवंत व त्याचा मुलगा लालाजी बल्लाळ या दोन पुरुषांनीं स. १७३० पासून १८२० पावेतों ९० वर्षें सर्व उत्तर हिंदुस्थानची कमाविशी सांभाळून, शिवाय व्यापार व पेढ्या देशभर स्थापून पैसा व लौकिक मिळविला. यावरून त्यांची लायकी दिसून येते.

---

## १०. वंशावळ, विसाजी केशव लेले, रा० बसणी, जि० रत्नागिरि.




---

## ११. वंशावळ, म. वि. ४ पृ. ३०० वर पहा.

## १२. वंशावळ, जतचे डफळे

लखमाजी चव्हाण.




---

## १३. वंशावळ, बापूजी विष्णु शौचे रांझेकर, ता. राजगड, सं. भोर. दे. ब्रा. [ म. द. बा. १ ले. ८ पृ. १८.]

गणेश बापूजी

|

**नारो गणेश** ( भाचा बाळाजी लक्ष्मण ).

|

गणपतराव नारायण

**१४. वंशावळ, बोरसरकर भालेराव,** दे. ब्रा. शुक्लयजुर्वेदी माध्यं-
दिन कृष्णात्रगोत्री, जोशी, राहणार बोरसर, वेरूळ जवळ.
शिवाजीपंत स.१७१२–१३




**१५. वंशावळ, जीवबादादा बक्षी**
विठ्ठलराव केरकर




**१६. वंशावळ, देशमुख** नारायणराव, रा० पावस




( डॉ. नानासाहेब मृ. १९२८ )

* १ हे व यांचे बंधूंस कोंकणांत वांकड गांव इनाम आहे. २ यांचा वाडा पुण्यास शुक्रवारांत होता. ३ हरि गोविंद हे गोखल्याजवळ असून त्यांचे पश्चात् बाजीरावाबरोबर ब्रह्मवर्तास गेले. त्यांस इंग्रज सरकारानें नेमणूक करून दिली तिचा दरसाल २०० रु. अंश गोपाळराव हरींस मिळत होता. ४ हे प्रसिद्ध गोपाळराव हरि (लोकहितवादी) यांचा वाडा पुण्यास सदाशिव पेठेंत आहे.

---

## १७. वंशावळ, भुसकुटे बऱ्हाणपुर.

रामचंद्र बल्लाळ — ना. रो. २२१; बा. रो. १५६–१५७; म. द. बा. २,२२८

|

कृष्णाजी रामचंद्र

- माधवराव मृ. १०-११-१७९१
- रामचंद्रराव. दुसरे बाजीरावाचे वेळीं यांजवर इतराजी झाली.

मकडाई प्रांत नेमाड लढाई करून जिंकल्याबद्दल मंडलोईपण व कानुंगोपण यांची सनद नानासाहेबानें माघ व० ११ शके १६७५ (१७-२-१७५४) ची दिली. या घराण्यांत उत्तरेकडील उद्योगाचे पुष्कळ कागद असावे.

---

## १८. वंशावळ, रत्नाकरपंत राजाज्ञा, कोल्हापुर संस्थानचे कारभारी.

उपनांव सरवळे, मूळ ठिकाण ऐतवडें, ता. वाळवें जि. सातारा.
ऋग्वेदी देशस्थ ब्राह्मण, गोत्र भारद्वाज.

रामाजीपंत

- मृ. १८१२ रत्नाकरपंत राजाज्ञा.
  - नारायणराव. यांनीं कांहीं दिवस कारभार केला. यांचा वंश कोल्हापुरांत विद्यमान आहे.
- ज्योतिपंत दिवाण

पूर्वीच्या महाराजांनीं या घराण्यास आत्मिक भावनेनें 'चिरंजीव' लिहिण्याचा प्रघात घातला त्यावरून छत्रपतींच्या श्राद्धदिवशीं त्यांस पिंडास नमस्कार करण्यास वाड्यांत जावें लागतें.

## १९. वंशावळ, केतकर




केशवराव ( प्रस्तुत हयात. )    वामनराव (हयात. १९२७)

हे मूळ पेशव्यांकडचे सरदार महादजी सिंद्यांचे पदरीं गेले. ग्वाल्हेरीस यांचा वाडा आहे. यांस गुजरातेंत पावागड येथेंही देशमुखी होती. हल्लीं यांची वस्ती पालखेड (ता. निफाड, जि. नासिक) येथें असून तेथें हरि बाबाजीनें बांधलेला वाडा आहे. हरि बाबाजी रघुनाथराव दादास घेऊन झाशीस जात होता. त्यास दादानें नर्मदेवर ठार मारून गुजरातेंत प्रयाण केलें. तेव्हां त्याचे मुलास ( गोपाळराव हरीस ) माधवराव नारायणानें जहागीर दोन गांव ता. १४-११-१७७९ च्या सनदेनें दिले, त्यांत 'तुमचे वडील दादासाहेबीं मारले, सरकारांत तुमचें अगत्य, सबब तुम्हांस दोन गांव मौजे रामेश्वर व विठेवली जहागीर करून दिली असे,' असा मजकूर आहे.

---

## २०. वंशावळ, बाळंभट फडके ( फॉरेस्ट पृ. ६७५ ).



**२१. वंशावळ, ठकार दीक्षित** वाजपेयी (सातारा) खंड१०-३२८, ३६६, ३६८, ३६९.




**२२. वंशावळ, शिवाजी शंकर ओढेकर,** म. वि. ४ पृ. ३०३ पहा.




**२३. वंशावळ, महादाजी बल्लाळ करकरे गुरुजी**
हुजूर दप्तरदार. [ ए. स. का. रोजनिशींतील उतारे,]

बल्लाळ — वि. ज्ञा. वि.

अंताजी — महादाजी† — आबाजी

† चिमणाजी सदाशिव व गणेश कृष्ण करकरे पेशव्यांचे कामगार हे याच कुटुंबांतले कीं काय ? मावळंकर सरदेसाई घ. इतिहास भा. १पृ.१६५–१७०.

**२४. बाबूराव केशव ठाकूर** म्हणून पेशवाईतील एक प्रसिद्ध मुत्सद्दी अनेक नाजूक कामगिरींवर पाठविला जात असे. कोल्हापुरांत कात्यायनीचा नळ बाबूरावानें आणिला व अनेक धर्मकृत्यें केलीं. यांचा वाडा साताऱ्यानजीक लिंब येथें आहे. हा मूळ कशेळी गांवचा कुळकर्णी असून देशावर येऊन प्रसिद्धीस आला. राजापुर प्रांतांत ठाकूर देसाई राहतात ते याच घराण्यापैकीं. खरे पृ. ४०९६ व ४४९० व ले. ३३६१. बा. रो. पृ. ३४ व २९४.

केसो ठाकूर

बाबूराव केशव — लक्ष्मण केशव

# सूची

++++

## महत्त्वाचे विषय व्यक्तींच्या नांवाखालीं पाहवे. संपूर्ण माहितीसाठीं उत्तरविभाग २ ची सूची पाहवी.

# गणेश महादेव आणि कंपनीचीं पुस्तकें

| | रु. आ. |
|---|---|
| **कादंबऱ्याः—** | |
| १ स्वराज्याचा श्रीगणेशा | २–४ |
| २ स्वराज्याची घटना | २–४ |
| ३ स्वराज्याची स्थापना | २–४ |
| ४ स्वराज्याचा कारभार | २–४ |
| ५ स्वराज्यावरील संकट | २–४ |
| ६ स्वराज्याचें परिवर्तन | २–४ |
| ७ स्वराज्यांतील दुफळी | २–४ |
| ८ आजिंक्यतारा | १–८ |
| ९ शृंगेरीची लक्ष्मी | २–० |
| १० कुठें [illegible] | [illegible]–० |
| ११ मराठशाहीची [illegible] | १–[illegible] |
| १२ राक्षसी रणसंग्राम | [illegible]–० |
| १३ गौरीशंकर | १–८ |
| १४ पालखीचा गोंडा | १–८ |
| **गोष्टीः—** | |
| १५ कळ्यांची माळ | १–० |
| १६ मानसपूजा | १–४ |
| १७ सुख-स्वप्नें | १–४ |
| **नाटकेंः—** | |
| १८ सं. नवजीवन | ०–१० |
| १९ ,, सैतानी संक्रांत | १–० |
| **काव्य-ग्रंथः—** | |
| २० गोमांतक | २–० |
| २१ माधवानुज | २–० |
| **ऐतिहासिकः—** | |
| २२ मु. रियासत (भा. १) | ३–० |
| २३ मु. रियासत( भा. २ ) | ३–८ |
| २४ म. रियासत म. वि. १, | ३–० |
| २५ ,, ,, ,, २, | ३–० |
| २६ ,, ,, ,, ३, | २–४ |
| २७ ,, ,, ,, ४, | ३–० |
| २८ ब्रिटिश रियासत, पूर्वार्ध | ३–८ |
| **धार्मिकः—** | |
| २९ श्रीएकनाथ चरित्र | ०–१२ |
| ३० भक्तिमणिमाला | १–८ |
| ३१ स्वामी रामतीर्थ खं. १, | २–८ |
| ३२ ,, ,, ,, २, | २–८ |
| ३३ ,, ,, ,, ३, | २–८ |
| पुढील ३ खंड क्रमशः निघतील. | |
| **निबंध वगैरेः—** | |
| ३४ मरणोत्तर स्थिति व परलोकविद्या | २–० |
| ३५ मानवी कर्तव्यें | १–० |
| ३६ निवडक लेख | २–८ |
| ३७ ग्रेटब्रिटनची शासनपद्धति | –१० |
| ३८ हिंदुत्व | १–० |
| ३९ विनोदसागर, तरंग १ ला | १–० |
| ४० स्वातंत्र्याचीं मूलतत्वें | १–८ |
| ४१ थालिपीठ | १–८ |
| **चरित्रेंः—** | |
| ४२ मुलींची द्रौपदी | १–८ |
| ४३ महात्मा गांधी | २–४ |
| ४४ निकोलाय लेनिन | ०–१२ |
| ४५ जोसेफ मॅझिनी | २–० |
| ४६ वीर वैरागी | १–० |